# दिल्लीच्या शहाजहानचा इतिहास

(डॉ. ब. प्र. सक्सेना लिखित History of Shahjahan of Delhi चा अनुवाद)





- अनुवाद -
श्री. भ. ग. कुंटे

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

# दिल्लीच्या शहाजहानचा इतिहास

(श्री. ब. प्र. सक्सेना लिखित History of Shahajahan
of Delhi चा अनुवाद)

अनुवाद

श्री. भ. ग. कुंटे

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

# अनुवादकाचे निवेदन

हिंदुस्थानवर राज्य करणाऱ्या सर्व मोगल सम्राटात अतिशय रसिक, रंगेल आणि तितकाच कट्टर धर्माभिमानी म्हणून शहाजहानचा उल्लेख करावा लागेल. आपला बाप जहांगीर याच्या विरुद्ध त्याने अयशस्वी बंड केले. बंडखोरीचे बीष जणुकाही मुसल्मान राज्यकर्त्यांच्या अंगी भिनले होते. हीच बंडखोरी औरंगजेबाने केली आणि आपल्या बापाला – शहाजहानला – जीवंतपणी नरकयातना भोगावयास लावल्या. शहाजहानचे चरित्र म्हणजे आनंद आणि शोक यांचा एक आविष्कार आहे. डॉ. सक्सेना यांनी आपल्या ग्रंथात हे चरित्र अष्टपैलूपणे सादर केले आहे. त्या ग्रंथाचा अनुवाद म्हणजे हे पुस्तक होय. भाषांतर करताना बऱ्याच ठिकाणी भाषेमधील वैविध्यामुळे अनुवाद स्वैर करावा लागला आहे. जरुर तेथे माझ्या स्वतःच्या तळटीपा दिल्या आहेत. अभ्यासू वाचक या अनुवादाचे स्वागत करतील अशी अपेक्षा आहे. ग्रंथ प्रकाशनाचे काम लांबणीवर पडले ते काही अपरिहार्य कारणांमुळे. तरी देखिल महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने नेटाने प्रकाशनाचे काम पुरे केले, याबद्दल मी मंडळाचा आभारी आहे. त्याचप्रमाणे श्री. सावे यांनी स्वतः जातीने लक्ष घालून काम पुरे केल्याबद्दल, श्री. नारखेडे, संशोधन अधिकारी, दर्शनिका विभाग यांनी मेहनतीने ग्रंथसूची केल्याबद्दल आणि रचना मुद्रणालयाचे मालक श्री. म्हात्रे यांनी सर्व सहकार्य दिल्याबद्दल या सर्वांचा मी ऋणी आहे.

भ. ग. कुंटे

# अनुक्रमणिका

प्रकरण पहिले

# शैशव आणि तारुण्य

### जन्म

इतिहास ज्याला धीरोदत्त शहाजहान या नावाने अधिक ओळखतो, त्या राजपुत्र खुर्रम याचा जन्म, लाहोर[1] येथे, त्याचा आजा अकबर याच्या कारकीर्दीच्या ३६व्या वर्षांत ५ जानेवारी १५९२ रोजी गुरुवारी रात्री झाला. त्याची आई म्हणजे जिच्याबरोबर सलीमने १५८६[2] मधे विवाह केला ती रजपूत राजकन्या मानमती अथवा जगत गोसाईन ही होय. ती मोता राजा उदय सिंग याची मुलगी होती.

### त्याचा भावी काळ

तूळ रास राशीमंडळात असताना शहाजहानचा जन्म झाला.[3] या नक्षत्रांच्या समूहाने नवजात अर्भकाचे भवितव्य अतिशय महान असल्याचे आणि त्याचा आयुष्यक्रम वादळी असल्याचे सूचित केले. दरबारी फलज्योतिष्यानी त्याची ग्रहकुंडली तयार केली व त्याचे भवितव्य अतिशय उज्वल असल्याचे भविष्य त्यानी एकमुखाने वर्तविले, तर दरबारी कवीनी मोठ्या चतुरपणे रचलेल्या काव्यातून मुक्तकंठाने या भविष्यवाणीची री ओढली. अशा तऱ्हेने रचण्यात आलेल्या काव्यातील दोन उतारे याठिकाणी उधृत करण्यायोग्य आहेत :–[4]

(१) साऱ्या भूमंडळाला भेदून टाकणाऱ्या सूर्याचा जणू किरण.

(२) पृथ्वीचा राजा आणि विश्वाचा सम्राट. आणि जर कदाचित भविष्यकाळ सूचित करणाऱ्या या कवींच्या तथाकथित कल्पनाशक्तीला जर काही महत्त्व द्यावयाचे असेल तर वरील काव्योक्तींपैकी दुसरी काव्योक्ती ही राजपुत्राच्या भविष्यकालिन जीवनाची खऱ्या अर्थाने निदर्शक आहे.

**अकबराचा आनंद.**

अकबराच्या दृष्टीने त्याच्या ह्या नातवाचा झालेला जन्म हा सर्वसामान्य घटनेपेक्षा अधिक महत्त्वाचा होता. त्याला ही घटना दोन अर्थाने शुभसुचक होती. त्याच्यावर रीतिरिवाजा प्रमाणे होणारा अभिनंदनाचा वर्षाव तर झालाच, परंतु त्याहीपेक्षा अधिक म्हणजे पुत्रसुखाला आचवलेली त्याची पत्नी रूकिया सुलतान बेगम हिचे ढासळत जाणारे मनोधैर्य या घटनेने सावरून धरले.[५] या शुभ घटनेचे भविष्य तिचा ज्योतिषी गोविंद याने अगोदरच वर्तविले होते आणि नवजात अर्भकाला दत्तक घेण्याचा सल्ला त्याने तिला दिला होता. म्हणून जेव्हा राजेरजवाड्यात रूढ असलेल्या प्रथेप्रमाणे अकबराला त्याचा मुलगा सलीम याने मुलाचा जन्म झाल्यानंतर सहाव्या दिवशी नवजात बालकाचे नामकरण करण्यासाठी आमंत्रण दिले तेव्हा अकबराने त्याचे नाव खुर्रम अथवा आनंददायी असे ठेवले. आणि खरोखरच साऱ्या बादशाही कुटुंबात आनंद फैलावून त्याने आपले नाव सार्थ केले. त्याच दिवशी त्याला रूकियाबेगम हिच्या हवाली करण्यात आले आणि तिने त्याला दत्तक घेतले ; आणि यानंतर तो बयात येईपर्यंतच्या कालावधीत आपल्या आजीच्या प्रेमळ छत्राच्या देखरेखीखालीच तो मोठा झाला.

मोगलांमधे मुलाची सुंता झाल्यानंतर त्याला तावडतोब शाळेत घालण्याची पद्धती होती. या पद्धती नुसार जेव्हा राजपुत्र चार वर्षे, चार महिने आणि चार दिवस इतका झाला तेव्हा त्याचा मकतब समारंभ करण्यात आला. सर्वसामान्य रूढीप्रमाणे थाटमाट आणि मौज मजा यांचा बहुधा या समारंभाचे वेळी जल्लोष उडवून देण्यात आला.[६] राजपुत्राचा पहिला शिक्षक मुल्ला कासीम बेग ताब्रेझी हा होता.[७] सुप्रसिद्ध मिर्जा जान ताब्रेझी याचा हा विद्यार्थी. कासीम बेग हा प्राविण्य मिळवलेला विद्वान आणि अनेक सुबुद्ध शास्त्रांचा अध्यापक होता, इतकेच नव्हे तर सुफी तत्त्वज्ञानाच्या अभ्यासात त्याने प्राविण्य संपादन केलेले होते. त्याशिवाय भूगोलावरील एक अतिशय प्रचंड ग्रंथ माजमुआ-इ-बुलदान

याच्या अनेक भाषांतरकारांपैकी बहुधा तो एक होता. त्याच्यानंतर शहाजहानला जो शिक्षक मिळाला तो म्हणजे तितकाच विख्यात असलेला हकीम अली गीलानी[९]. अली गीलानी हा फारमोठा नावलौकिक असलेला एक डॉक्टर होता आणि अतिशय उत्कृष्ट गुणवत्ता असलेला एक विद्वान होता. वैद्यक शास्त्रामधे तो प्रथम त्याचा मामा हकिम-उल-मुल्क शीराजी याचा विद्यार्थी आणि नंतर शहा फतुल्ला गिलानी याचा. वेदान्तामधे तो शेख अब्द-उन-नबी याचा विद्यार्थी होता. राजपुत्राचा त्याच्या इतर कोणत्याही शिक्षकांपेक्षा हकिम-अली याच्या-बरोबरच अधिक संबंध आला आणि त्याच्या बरोबर त्याचे अधिक नात्याचे संबंध निर्माण झाले असे दिसते. आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धात शहाजहान हकिम-अली याच्याकडून त्याच्या जीवनातील ज्या शिक्षणाचा मनावर परिणाम होतो अशा काळात त्याला जे ज्ञान मिळाले त्याबद्दलच्या ऋणाची तो मोठ्या आनंदाने आणि मोठ्या कृतज्ञतेने आठवण काढतो.[९] राजपुत्राच्या बौद्धीक विकासाचे योग्य ते मार्गदर्शन करणे आणि त्याला वळण देणे ही कामगिरी ज्या इतरांवर सोपविण्यात आलेली होती त्यामधे शेख सुफी याचा उल्लेख करणे आवश्यक आहे.[१०] शेख सुफी हा मिया वजीहउद्दीन गुजराती याचा शिष्य होता. गुजराती हा अतिशय उत्कृष्ट असा कवी, एक गोड स्वभावाचा मनुष्य आणि स्वैर वर्तनी असा होता. आणखी एकाचा उल्लेख करणे जरूरीचे आहे आणि तो म्हणजे शेख अबुलफजल याचा भाऊ शेख अबुल खैर. शेख खैर हा शिस्तबद्ध मनाचा बहुश्रुत असा एक तरूण होता.[११]

## तुर्की भाषेचे शहाजहानला असलेले अपुरे ज्ञान

अशा तऱ्हेच्या सुप्रसिद्ध विव्दानांबरोबर संबंध आल्यामुळे बालदशेतील या विद्यार्थ्याची बुद्धीमत्ता झपाट्याने प्रगल्भ झाली असावी असे समजण्यास हरकत नाही. परंतु त्याच्या बापाप्रमाणे त्याच्या प्रतिमेचे स्वरूप हे चिंतनात्मक नसून अधिक व्यवहारी होते. त्याने थोड्याच काळात पर्शियन भाषेचे ज्ञान संपादन करून त्या भाषेत बोलण्यात प्रभुत्व संपादन केले. परंतु तुर्की भाषेमधे त्याने फारसा रस घेतला नाही. आपल्या वाडवडलांच्या भाषेबाबत राजपुत्राने जी उदासीनता दाखविली होती त्याबद्दल जहांगीर याने रूकिया बेगम हिच्याकडे एकदा तक्रार केल्याची नोंद आहे.[१२] अकबराने ही उणीव दूर करण्याचा प्रयत्न केला असे आपल्याला दिसून येते. १६०१ मधे त्याने शहाजहानाला तुर्की भाषा शिकविण्यासाठी तातार खानाची नेमणूक केली. आपल्या तरूण विद्यार्थ्याच्या मनात या नवीन शिक्षकाला कितपत उत्साह निर्माण करता आला याबद्दल शंकेला जागा आहे. परंतु

खुर्रम हा काही मंद बुद्धीचा विद्यार्थी नव्हता. त्याची बुद्धी ही अतिशय तीव्र होती. त्याची स्मृती आश्चर्यकारक होती. कोणत्याही गोष्टींच्या तपशीलात जाण्याची त्याला आवड होती आणि अशा गोष्टीवर प्रभुत्व मिळविण्याचे सामर्थ्य त्याच्या जवळ होते.

## शहाजहानचे शारीरिक शिक्षण

परंतु मोगल राजपुत्र ग्रंथाचा नुसता पिपासु असून चालणारा नव्हता. त्याच्या शिक्षणाची योजना अशातऱ्हेने करण्यात आली की ज्यामुळे त्याचे मन खंबीर आणि शरीर धडधाकट बनणार होते. अकबराने खुर्रम याला शारीरिक शिक्षण देखील मिळेल याकडे योग्य ते लक्ष पुरविले. जेव्हां १५९७ मधे काश्मीर येथे तो अखेरच्या वेळी चालला होता तेव्हा त्याने आपल्या नातवाला मीर मुराद जुवैनी याच्या पालकत्वाखाली लाहोर येथे ठेवले.[१४] मीर त्याला धनुर्विद्या शिकविणार होता आणि त्याच्यापुढे दररोज तस्लीम-इ-कीर करून दाखविणार होता.[१५] नंतर जेव्हा खुर्रम आपल्या आजाबरोबर दक्षिणेत गेला तेव्हा अकबराने त्याला बंदुकीच्या नेमबाजीचे शिक्षण देण्यासाठी राजा शालिवाहन याची नेमणूक केली.[१६] घोड्यावर बसणे आणि तलवार चालविणे हे त्याच्या दररोजच्या मेहनतीचे एक भाग बनले आणि राजपुत्राने अलंकार शास्त्र आणि छंदशास्त्र यांच्या निरस धड्यांपेक्षा वरील गोष्टींत अधिक स्वारस्य दाखविले. त्याच्या बापाप्रमाणेच तो बंदुक आणि धनुष्यबाण यांची नेमबाजी करण्यात पटाईत बनला इतकेच नव्हे तर न थकतां घोड्यावर बसणे, अतिशय उत्तमपैकी तलवार चालविणे हे गुण त्याच्या अंगी आले आणि सर्व मैदानी खेळांबद्दल त्याच्या मनात अतिशय प्रेम निर्माण झाले.

## अकबर हा खुर्रम याला स्वतः जवळच ठेवतो

काश्मिरहून परतल्यावर अकबर हा फारच थोडा काळ लाहोर मधे राहिला आणि तेथून तो त्वरेने आग्रा येथे गेला. त्याने सलीम याला राण्याच्या विरुद्ध पाठविण्याचे आणि स्वतः दक्षिणेत जाण्याचे ठरविले. म्हणून लाहोरहून जनान्यातील स्त्रियांना बोलाविण्यासाठी जलद जासुदांची रवानगी करण्यांत आली. त्या आग्र्याजवळ आल्यानंतर जहांगीर याने त्यांचे स्वागत केले. मेवाडकडे कूच करण्याचे अगोदर सलीम याने आपल्या एखाद्या मुलाला आपल्या बरोबर घेऊन जाण्याची बादशहाकडे विनंती केली. परंतु बादशहा खुर्रम याला आपल्यापासून दूर ठेवण्यास तयार नव्हता. त्याचप्रमाणे खुश्राव याला सलीम बरोबर पाठविणे योग्य नाही असाही विचार त्याने केला. परंतु परवीज याने आपल्या बापाबरोबर मेवाडकडे जाण्यास आपला विरोध दर्शविला नाही.[१७]

### खुर्रम आजारी पडतो

परंतु प्रत्यक्षात असे घडले की सलीम याने आग्रा सोडल्याबरोबर लगेच खुर्रम हा देवीच्या रोगाने आजारी पडला. त्याची परिस्थिती अतिशय गंभीर झाली आणि त्याचा आजा हा त्यामुळे अतिशय हवालदिल झाला. त्याने तावडतोब खुर्रमवर उपाय योजना करण्यासाठी अतिशय कसबी अशा हकिमांना बोलाविले आणि त्याला लवकर बरे वाटावे म्हणून त्याने अतिशय कळकळीने परमेश्वराची प्रार्थना करण्यास सुरवात केली. त्यानी केलेल्याप्रार्थनेचा इष्ट असाच परिणाम झाला आणि राजपुत्राला लवकरच बरे वाटले. ज्या दिवशी रूढी प्रमाणे त्याला स्नान घालण्यात आले तेव्हा अकबराने हात न आखडता अतिशय उदारपणे भिक्षेची खैरखैरात केली आणि अनेक कैद्यांना मुक्त केले. यानंतर खुर्रम आपल्या आजाबरोबर दक्षिणेत गेला.[१८]

### खुर्रम याची आग्र्याला रवानगी

सलीम याच्या बंडामुळे अकबराला उत्तरेकडे जलद कूच करून जाणे भाग पडले. सामोपचाराच्या मार्गाने जेव्हा बंडखोर राजपुत्राला वठणीवर आणण्यात अपयश आले तेव्हा त्याच्या बरोबर कडकपणाने वागण्याचा अकबराने मनाशी निश्चय केला. १६०४ च्या ऑगस्ट महिन्यात मोठे सैन्य घेऊन त्याने आग्रा येथे कूच केले.[१९] परंतु त्याची आई मृत हुमायूनची पट्टराणी एकाएकी आजारी पडल्याची बातमी आल्यामुळे त्याला पुढे कूच करून जाता आले नाही. सुरवातीला त्याचा या गोष्टीवर विश्वास बसला नाही. त्याला असे वाटले की त्याला शह देण्यासाठी मरियम मकानी हिने टाकलेला तो एक डाव असावा.[२०] सलीम हा तिचा अतिशय लाडका होता आणि त्याच्या विरुद्ध कोणी कडक कारवाई करण्यास तिचा विरोध होता. सहाजीकच पट्टराणीचे हे आजारीपण बनावट नाही याबद्दल खात्री करून घेण्यासाठी म्हणून अकबराने खुर्रम आणि हकीम अली या दोघांना आग्रा येथे पाठविले. खुर्रम हा थेट आपल्या पणजीच्या महलात गेला. तेथे त्याला तिची प्रकृति अतिशय गंभीर असल्याचे आढळून आले. तो तावडतोब आपल्या आजाकडे परतला आणि त्याने अकबराला असे सांगितले की जर का त्याची आपल्या आईला जीवंत बघण्याची इच्छा असेल तर त्याने तावडतोब आग्रा येथे परत फिरावे. अकबर हा अगदी योग्य वेळी तिच्याजवळ पोहोचला. तिचा मृत्यू बरोबर झगडा चालला होता आणि काही तासातच तिचे प्राणोत्क्रमण झाले.[२१]

### अकबराचे आजारीपण

आपल्या आजीच्या मृत्यूनंतर सलीम याने आपल्या बापाला शरणागती दिली. अकबराची प्रकृती आता झपाट्याने ढासळत चालली होती. एके दिवशी

वेळ घालविण्यासाठी त्याने खुश्राव आणि सलीम यांच्या हत्तींमधे झुंजीचा कार्यक्रम आखला. त्याने आणि खुर्रमने ही झुंज झरोक्यामधुन बघितली. या झुंजीत सलीमच्या हत्तीने आपल्या प्रतिस्पर्ध्यावर मात केली. त्याशिवाय त्याच्या अनुयायानी खुश्रावच्या माणसाना शिवीगाळ केली. याबद्दल आपल्या आजाकडे तक्रार करण्यासाठी खुश्राव याने धाव घेतली. अकबराने ही मारामारी थांबविण्याबद्दल निरोप देण्यासाठी खुर्रम याला सलीमकडे पाठविले.[२२] अतिशय गलित गात्र होऊन अकबर तेथून परतला. सगळी रात्र त्याने बेचैनीत घालविली. सकाळी त्याच्या अंगात ताप भरला आणि त्यात त्याला संग्रहणीचा विकार जडल्यामुळे त्याच्या प्रकृतीत आणखी बिघाड झाला. तो आता जवळ जवळ मृत्यूच्या उंबरठयात पडल्यासारखा होता.[२३]

## दरबारातील कट

या गोष्टीमुळे दरबारामधील असंतोषी वृत्तिची जी मंडळी होती त्यांना राजद्रोही कारवाया करण्याची संधी मिळाली. त्यानी खुश्राव याला सिंहासनावर बसवून वारसा हक्काची जी पद्धत होती ती बदलण्याचा प्रयत्न केला. आपल्या या बेताला यश मिळावे म्हणून त्याने आपल्या आजारी बापाला सलीम जेव्हा भेटावयास येईल तेव्हा त्याला कैद करण्याचा बेत आखला. परंतु अगदी आयत्यावेळी मिळालेल्या सूचनेमुळे आपल्या शत्रूंच्या तडाख्यातून तो बचावला. आपला मुलगा खुर्रम याच्या सुरक्षिततेबद्दल त्याला अतिशय काळजी वाटली. कारण त्याचा अकबराकडे विलक्षण ओढा होता.[२४] आणि त्याच्याजवळून हलावयास तो तयार नव्हता. जेव्हा त्याच्या आईने त्याचे मन वळविण्याचा प्रयत्न केला तेव्हा त्याने मोठ्या खंबिरपणे उत्तर दिले : "ते शक्य नाही! जोपर्यंत शहा बाबा यांच्या प्राणाची ज्योत थोडी देखील शिल्लक आहे तोपर्यंत कोणतीही गोष्ट त्यांच्या जवळून उठण्यास मला भाग पडू शकणार नाही" आणि आपल्या आईबरोबर तो गेला नाही. हे उत्तमच झाले कारण बादशहाच्या राजवाड्यातून बाहेर पडताच क्षणी त्याला पकडण्यासाठी कटवाल्यांनी आपली माणसे नेमून ठेवलेली होती.[२५]

## अकबराचा मृत्यु

अखेर जेव्हा त्याच्या शत्रूंच्या प्रयत्नांना यश आले तेव्हा आपल्या बापाला अखेरची वंदना करण्यासाठी सलीम राजवाड्यात गेला. अकबराने आपली कट्यार राजपुत्राच्या ताब्यात देण्याबद्दल आणि आपल्या मस्तकावरची पगडी त्याच्या डोक्यावर

ठेवण्याबद्दल आपल्या अनुयायांना खूण केली. त्याने सांगितलेल्या गोष्टींची जेव्हा अंमलबजावणी झाली तेव्हा अकबराने आपले डोळे अखेरचे मिटून घेतले. आता मात्र सलीम याला खुर्रमचे मन आपल्याबरोबर येण्याबाबत वळविण्यात यश आले.

## सलीमचे राज्यारोहण

आपल्या बापाच्या मृत्यूनंतर बरोबर एक आठवड्याने म्हणजे २४ ऑक्टोबर १६०५ रोजी सलीम हा सिंहासनाधिष्ठित झाला. यानंतर काही काळाने त्याच्या सुरळीत चाललेल्या राज्यकारभाराच्या शांततेचा खुश्रावच्या बंडामुळें भंग झाला. अकबराच्या कबरीला भेट देण्याच्या मिषानें ६ एप्रिल १६०६ रोजी संध्याकाळी खुश्राव याने आग्र्याहून पलायन केले. त्याने पंजाबचा मार्ग धरला आणि वाटेमधे त्याला हुसेन बेग बदख्शी आणि अबदुर्रहीम हे दोघेजण येऊन मिळाले. खुश्रावच्या पलायनाची बातमी ऐकल्यानंतर जहांगीर हा अस्वस्थ झाला आणि त्याने शेख फरीद बोखारी याला बंडखोराच्या पाठलागावर जाण्याचा हुकुम दिला. थोड्या कालावधीनंतर त्याने स्वतः त्याच्या पाठोपाठ जाण्याचे ठरविले. राजधानीच्या सुरक्षिततेसाठी काही तरी व्यवस्था करणे जरूर होते. त्यासाठी एक राजप्रतिनिधि मंडळ बनविण्यात आले. या सल्लागार मंडळात शेख सलीम याचा नातू आणि पुढे ज्याची बंगालच्या सुभेदारीवर नेमणूक झाली तो शेख अलाउद्दीन उर्फ मिर्जा गियास बेग तेहरानी, दोस्त महमद ख्वाजा जहान आणि राजा रावसिंग भूरतिया ही मंडळी होती. राजपुत्र खुर्रम याची या सल्लागार मंडळाच्या मुख्याधिकारपदी नियुक्ति करण्यात आली.

## सार्वजनिक बाबींशी खुर्रमचा आलेला पहिला संबंध

सार्वजनिक बाबींशी खुर्रम याचा औपचारिकरीत्या आलेला हा पहिलाच संबंध[२६]. खुश्राव याचे बंड एक महिन्याचे आतच संपुष्टात आले आणि जहांगीर याने ९ मे १६०६ रोजी लाहोर मधे प्रवेश केला. त्यांच्या काही निष्ठावान सल्लागारांनी त्याला ताबडतोब आग्रा येथे परत फिरण्याचा सल्ला दिला, कारण गुजरात, दक्षिण आणि बंगाल येथील परिस्थिती ताबडतोब दखल घेण्याइतकी बदलली होती.[२७]

## खुर्रम याचे आपल्या बापाबरोबर काबूल येथे प्रयाण

परंतु पर्शियनांनी जो धमकीवजा पवित्रा घेतला होता त्यामुळे जहांगीरने त्यांची सुचनानामंजूर केली. त्यानंतरचे अकरा महिने त्यानेसीमेवरील परिस्थितीवर नजर ठेवत लाहोर येथे काढले. परिस्थिती मुळेपदावर आल्यावर त्याचा उद्देश ताबडतोब काबूलच्या दौऱ्यावर जाण्याचा होता. म्हणून त्याने राजपुत्र खुर्रम याला

मरयम-उज-जमानी आणि इतर स्त्रिया यांना घेऊन लाहोर येथे येण्याची आज्ञा दिली. तो जेव्हा लाहोरच्या नजीक येऊन पोहचला तेव्हा आपल्या आईला भेटण्यासाठी जहांगीर हा धारपर्यंत पुढे गेला.[२८] राजपुत्र परवीज हा अगोदरच दरबारात दाखल झालेला होता आणि अशा तऱ्हेने कुटुंबातील सर्व मंडळी आनंदाच्या वातावरणात एकत्र येण्याचा योग आला.

## खुर्रमचा अर्जुमंद बानूबेगम हिच्याबरोबर वाङ्‌निश्चय

आपल्या बापाच्या लाहोर येथील मुक्कामात राजपुत्र खुर्रम याला २१ मार्च १६०७ रोजी त्याची पहिली लष्करी मनसब ८ हजार जात आणि ५ हजार सवार आणि त्याबरोबर तुमान युतुघ, निशाण आणि नौबत या सहित मिळाली.[२९] एक आठवड्यानंतर त्याचा इतिकादखान उर्फ आसफखान याची मुलगी अर्जुमंद बानू बेगम हिच्याबरोबर साखरपुडा झाला. जहांगीर याने आपल्या स्वतःच्या हाताने आपल्या भावी सुनेच्या बोटात अंगठी घातली. हा प्रसंग मोठ्या थाटामाटाने साजरा करण्यात आला.[३०] याच वर्षाच्या नोव्हेंबर महिन्यात जहांगीर याने काबूलहून परतल्यावर खुर्रम याला उज्जैनमधे जहागिरी आणि हिसार फिरोजाचे सरकार नेमून दिले आणि सर्वसाधारणपणे थोरल्या राजपुत्राला जो विशेष हक्क देण्यात येतो तो म्हणजे तांबड्या कनातीचा तंबू वापरण्याची परवानगी दिली. या सर्वावर ताण म्हणजे मुहर पुजाकचा ताबा त्याच्याकडे देण्यात आला आणि सर्व फर्माने आणि परवाने यावर त्याचे शिक्कामोर्तब असावे असा हुकुम काढण्यात आला.[३१]

## काबुल येथे खुर्रम हा काही इमारतींची दुरुस्ती करतो

पर्शियनांकडून निर्माण झालेला धोका आता नाहीसा झाला होता. जहांगीर याने गुरुवार तारीख २६ मार्च १६०७ रोजी लाहोर सोडले. १० आठवड्यांच्या प्रवासानंतर ४ जून रोजी त्याने काबूल मधे प्रवेश केला. त्यावेळी सोने आणि चांदी यांच्या मोहरा उधळण्यात आल्या. राजपुत्र खुर्रम याचे निवासस्थान म्हणून उर्ताह-बागेची नियुक्ति करण्यात आली. तिथे असलेल्या इमारती ह्या राजपुत्राला पसंत न पडल्यामुळे त्याने ताबडतोब आपल्याला पाहिजे असलेल्या दुरुस्त्या तेथे करून घेतल्या आणि त्यानंतर त्याने बागेला भेट देण्यासाठी म्हणून आपल्या बापाला आमंत्रण केले. या बागेचे बदललेले स्वरूप आणि नव्या इमारतींची कलाकुसरीने केलेली सजावट आणि त्यांची प्रमाणबद्ध रचना पाहून जहांगीर याला अतिशय आनंद झाला. आपल्या मुलाच्या घरात त्याने संपूर्ण दिवस आनंदात आणि मजेमधे

घालविला. दरबारातील ज्योतीषांनी ग्रहांच्या दुष्परिणाबद्दल वर्तविलेल्या वाईट गोष्टींचे निवारण करण्यासाठी बादशहाने वंशपरंपरेने चालत आलेल्या रूढींचे पालन न करता राजपुत्राचा चांद्रमासाप्रमाणे वाढदिवस साजरा केला. त्याची सोने, चांदी आणि इतर धातू यांच्याबरोबर तुला करण्यात आली आणि ह्या वस्तू गरीबगुरीब आणि गरजू लोकांमधे वाटण्यात आल्या.[११]

### खुश्राव याचा कट

काबूल येथे बादशाही लव्याजम्याबरोबर खुश्राव हा होता आणि या ठिकाणी त्याच्यावर जो पहारा ठेवण्यात आला होता त्यामध्ये ढिलाई निर्माण झाली. त्याच्या अंगातील अस्वस्थता वाढली आणि त्याने आपल्या पक्षात इतिमाद-उद्-दौला याचा मुलगा शरीफ, आसफखान याचा पुतण्या नुरुद्दीन आणि इतिबारखान वगैरे बेजबाबदार तरुणांना सामील करुन घेतले. त्यांना त्यांच्या सारख्याच मनोवृत्तीच्या आणखी वारशे मंडळींना आपल्या बाजूला मिळवून घेण्यात यश आले. त्यांनी एखाद्या क्षणी बादशहा बेसावध असताना त्याचा खून करण्याचा आणि राजपुत्राची मुक्तता करण्याचा कट रचला. हा कट कदाचित यशस्वी झाला असता. परंतु कटामधल्या एका व्यक्तीने राजपुत्र खुर्रम याचा दिवाण ख्वाजा-वाईस याच्या जवळ अनुताप होऊन कटाची संपूर्ण कबुली दिली आणि परिणामी कट फसला. दुसऱ्या एका ठिकाणाहून आसफखानाला या कटाची थोडीशी सूचना अगोदरच मिळाली होती, परंतु बादशहाला ही महत्त्वाची बातमी ज्याने पहिल्या-प्रथम सांगितली तो म्हणजे राजपुत्र खुर्रम. तो आपल्या बापाकडे ताबडतोब गेला आणि त्याने त्याला कटवाल्यांचे बेत सांगितले. परिणामी कटाच्या मुख्य सूत्रधारांना पकडण्यात आले आणि त्यांना शिक्षा देण्यात आली. अशातऱ्हेने कट करणाऱ्यांच्या नांग्याच आखडण्यात आल्या. खुश्राव याला आंधळा करण्याचा हुकूम देण्यात आला. परंतु त्याच्याच एका अधिकाऱ्याने इतकी महत्त्वाची बातमी काढून अगदी आयत्यावेळी बादशहाचे जे प्राण वाचविले त्यामुळे राजपुत्र खुर्रम याच्या मोठेपणात भर पडली. याचा परिणाम असा झाला की त्याच्या बापाचे त्याच्याबद्दल जे मत होते त्यापेक्षा अधिक अशा प्रशंसेला तो पात्र झाला.[१३]

### आग्रा येथे दरबार परततो

जेव्हा हा कट धडून आला तेव्हा जहांगीर याने अगोदरच काबूलहून कूच केले होते. बंडाचा बिमोड झाल्यानंतर त्याने पुन्हा आपली कूच सुरू केली आणि वाटेमध्ये अनेक ठिकाणी त्याने आपला आवडता छंद कमुरघाह या मध्ये वेळ घालविला.[१४] हसन अब्दाल येथे खुर्रम आणि परवीझ या दोघांनाही शिकारीमधे

भाग घेण्याची परवानगी देण्यात आली.[३५] २३ नोव्हेंबर १६०७ रोजी बादशहाची स्वारी लाहोर येथे पोहचली. या ठिकाणी सहा महिन्यापेक्षा थोडा अधिक काळ वास्तव्य झाल्यानंतर आग्ऱ्याचा प्रवास पुढे चालू करण्यात आला. १२ मार्च १६०८ रोजी बादशहाने राजधानीत प्रवेश केला. राजपुत्र खुर्रम हा आता एक १६ वर्षाचा तरूण होता आणि त्याच्यासाठी एक वेगळे निवासस्थान आणि नोकरमंडळी यांची व्यवस्था करणे जरुर होते परंतु त्याला आपल्या पासून दूर ठेवणे हे जहांगीर याला आवडले नाही. म्हणून त्याने खुर्रम याला महमद मुकीम उर्फ वजीरखान याचे घर रहाण्यासाठी दिले. हे घर किल्ल्यामधे बादशाही निवासस्थानानजीकच होते. काबूल प्रमाणे या ठिकाणीही राजपुत्राने आपल्या अंगातील शिल्पशास्त्रविषयक अभीरुचीचा प्रत्यय आणून दिला. आपल्या आवडीला साजेल अशा तऱ्हेने त्याने या निवासस्थानाचे नविनीकरण केले आणि त्याला भेट देण्यासाठी म्हणून बापाला निमंत्रण केले. शिष्टाचारानुसार राजपुत्राने जहांगीर याला मौल्यवान नजराणा अर्पण केला आणि जहांगीर याने तो मोठ्या आनंदाने स्वीकारला.[३६]

**खुर्रमचा सफवी घराण्यातील राजकन्येबरोबर साखरपुडा, हा कोणत्या कारणास्तव झाला ?**

७ सप्टेंबर १६०९ रोजी राजपुत्र खुर्रम याला त्याच्या बापाकडून एक माणिक आणि बरोबर दोन सुटे मोती भेटीदाखल मिळाले. त्यांची किंमत अंदाजे ४० हजार रुपये होती.[३७] चार महिन्यानंतर त्याचा मिर्जा मुजफ्फर हुसेन सफवी याच्या मुलीबरोबर साखरपुडा झाला. सफवी हा पर्शियाच्या शहा इस्माईल याच्या वंशातील होता.[३८] विशेषत : राजपुत्राचा साखरपुडा अगोदरच अर्जुमंद बानू हिच्याबरोबर झालेला असताना जहांगीर याने सर्वसामान्य प्रथेच्या बाहेर जाऊन हा संबंध का घडवून आणला याचे स्पष्टीकरण प्रथमदर्शनी देता येत नाही. मोगल घराण्यामधे बहुपत्नीकत्व हे अपवादात्मक नव्हते तर प्रत्येक मोगल बादशहाच्या अनेक स्त्रिया होत्या असे जरी असले तरी वरील गोष्ट ही काहीतरी जगावेगळी होती. राजपुत्र खुर्रम याचा त्याच्या पहिल्या वाग्दत्त वधुबरोबर विवाह झाला नव्हता असे असताना दुसऱ्या साखरपुड्याची कोणती आवश्यकता होती ? त्याचे लग्नाचे वय झालेले होते हा युक्तिवाद पुढे करता आला नसता कारण सफवी घराण्यातील राजकन्येबरोबर त्याचा विवाह ताबडतोब करण्यात आला नाही, तर ह्या उलट प्रत्यक्ष विवाह समारंभ हा जवळ जवळ वर्षभर पुढे ढकलला गेला. खुर्रम एकाएकी तिच्या प्रेमात पडला

असे म्हणावे तर समकालीन कागदपत्रात अशातऱ्हेचा कुठेच उल्लेख नाही. किंबहुना अशातऱ्हेचे अनुमान करण्यास त्याच्या पुढील आयुष्यातील कोणतीही घटना निदर्शक नाही. या योजनेपाठीमागे काही राजकीय हेतू असावा असे म्हणावे तर त्यालाही काही पुरावा नाही.

बादशहाचे मन अशातऱ्हेने बदलले जाण्यास तशीच काहीतरी विशेष गोष्ट घडून आली असली पाहिजे. इतर कोणत्याही पुराव्याच्या अभावी या घटनेमधे जे काही अभिप्रेत आहे ते पहाणे आणि ज्या गोष्टींबद्दल भरपूर माहिती आहे त्यांच्या संदर्भात विशिष्ट परिस्थितीची छाननी करणे जरुरी आहे. शेर अफगाण हा ३० मार्च १६०७ रोजी बंगालमधे ठार मारला गेला होता. त्याची बायको मिहर उन्नीसा हिला दरबारात येण्याबद्दल हुकूम देण्यात आला होता. ती आल्यानंतर तिची नियुक्ती राजमाता सलीमाबेगम हिच्या नोकर मंडळींवर करण्यात आली. यानंतर काही काळाने जहांगीरने तिला बघितले आणि तो तिच्या प्रेमात पडला इतकेच नव्हे तर त्याने मोठ्या निर्धाराने आपले प्रियाराधन सुरु केले असे झाले असण्याची शक्यता अधिक संभवते. परंतु ह्या अतिशय हळव्या मनाच्या स्त्रीचा अनुनय करण्यात त्याला अपयश आले तेव्हा त्याने तिचे प्रेम जिंकण्यासाठी इतर डावपेच लढविण्यास स्वाभाविकतः सुरुवात केली. तिच्या पुतणीला बाजूला सारून तिच्या सुखात विघ्ने आणण्याची धमकी त्याने तिला दिली असावी आणि पर्शियन राजकन्ये बरोबर आपल्या मुलाचा साखरपुडा उरकून घेण्याचे बाबतीत आपला निश्चय पक्का झाला आहे असेही त्याने तिच्या निदर्शनास आणले असावे. परंतु जेव्हा या डावपेचामुळे जहांगीर याला पाहिजे असलेली गोष्ट घडून आली नाही तेव्हा त्याने २९ ऑक्टोबर १६१० रोजी राजपुत्राचा लग्नसमारंभ उरकला. तो राजपुत्राच्या निवास स्थानी गेला आणि ती रात्र त्याने घालविली. बहुतेक अमीरांना त्याने मानाचे पोशाख भेटीदाखल दिले आणि ग्वाल्हेरच्या किल्यातून पुष्कळ कैद्यांची मुक्तता केली.[३९]

## सिंहाच्या शिकारीतील खुर्रम याचा वाटा

यानंतर १५ दिवसानी जहांगीर हा एका संध्याकाळी चित्त्याच्या शिकारीत गुंतलेला असताना शिकारी लोकांचे नेतृत्व करणाऱ्या अनूपराय याने एका मोठ्या झाडाजवळ अर्धवट खाल्लेला बैल अकस्मात बघितला. आणखी एका क्षणार्धात एक प्रचंड वाघ अतिशय गर्द अशा झुडपातून बाहेर पडला आणि

त्याच्या जवळून झपाट्याने पुढे गेला. त्याने तावडतोब ह्या बातमीची खबर जहांगीर याला देण्यासाठी माणसे पाठविली आणि जहांगीर अतीशय जलद आणि उतावीळपणे तेथे दौड करत आला. त्याच्या बरोबर राजपुत्र खुर्रम, रामदास, इतिमादराय आणि हयातखान हे होते. वाघाने एका झाडाखाली आसरा घेतला होता. त्याला पाहून जहांगीर याचा घोडा बिथरला. म्हणून जहांगीर हा घोड्यावरून उतरला. राजपुत्र खुर्रम हा डावीकडे काही पावलावर उभा राहिला आणि इतरांनी त्याच्यापाठीमागे जागा घेतल्या. जहांगीर याने वाघाला मारलेली पहिली गोळी चुकली परंतु दुसरी गोळी त्याला बरोबर लागली. तेव्हा वाघाने पळून मुख्य शिकाऱ्यावर हल्ला केला आणि त्याला जखमी करून तो पुन्हा आपल्या पहिल्या जागी जाऊन बसला. जहांगीरने पुन्हा नेम धरून तिसऱ्यावेळी गोळी झाडली असेल नसेल तोच वाघाने शिकारी मंडळींवर अतिशय जोरदार चढाई केली. त्यामुळे त्यांची त्रेधातिरपीट उडून ते एकमेकांच्या अंगावर कोसळले. इतकेच नव्हे तर त्यांच्यापैकीच दोघा तिघांनी जहांगीरला पायदळी तुडविले आणि यातून वर उठण्यास अखेर इतिमादराय आणि कमाल यांनी जहांगीरला मदत केली. दरम्यान वाघ हा डावीकडे वळला आणि त्याने जीवावर उदार होऊन अनूपराय याच्यावर हल्ला केला. अनूपरायाने आपल्या हातातील काठीने त्याच्यावर प्रहार केला परंतु या जनावराच्या नुसत्या वजनानेच अनूपराय हा दबला गेला. वाघाने आपला जबडा उघडला, त्यात अनूपरायचे दोन्ही हात पकडले आणि आपले तीक्ष्ण सुळे त्यात खुपसले. अनूपराय हा वाघाच्या अंगाखाली पडला आणि त्याचा जीव धोक्यात आला. डोळ्याचे पाते लवते न लवते तोच राजपुत्र खुर्रम याने आपली तलवार उपसली आणि वाघाच्या कमरेवर वार केला, आणि आपली रक्ताने माखलेली तलवार म्यानबद्ध केली. वाघ हा वेदनांनी कासावीस झाला आणि खाली कोसळला. हयातखान खेरीज सोडून इतर कोणाच्याही नजरेस राजपुत्राचे कौशल्य आले नाही आणि जेव्हा त्याने ही गोष्ट जहांगीर याच्या नजरेस आणली तेव्हा जहांगीर याने आपल्या मुलाच्या विनयशीलतेबद्दल त्याची अतिशय स्तुती केली. इतके झाल्यानंतर देखील वाघाने अनूपराय याला छातीत जखम केली आणि एका मशालजीला ठार मारले तेव्हा त्या वाघाचा अखेर निकाल लावण्यात आला.[४०] अनूपरायाने जे शौर्य दाखविले त्याच्याबद्दल त्याला अनिरायसिंगदालन अशी पदवी जहांगीर याने दिली. नवीन वर्षाच्या निमित्ताने झालेल्या उत्सवाच्या प्रसंगी राजपुत्र खुर्रम याला १० हजार जात आणि ५ हजार सवार अशा मनसबीवर बढती देण्यात आली.

### खुर्रम याचा अर्जुमंद बानुबरोबर विवाह

जहांगीर याला अखेर त्याच्या प्रेमप्रकरणात यश आले आणि त्याने २५ मे १६११ रोजी मिहर उन्नीसा हिच्या बरोबर लग्न केले.[४१] त्याने तिला नूरमहाल हा किताब दिला आणि निःसंशय ती बादशहाच्या गळचातील ताईत बनली· अंतःपुरात, तिचा प्रवेश झाल्यामुळे दरबारात एक नवीन चैतन्य निर्माण झाले· तिने सावकाश पण ठामपणे सर्वदूर आपला प्रभाव पाडला. सुरवातीपासून तिचे लक्ष राजपुत्र खुर्रम याजवर होते. परंतु आपल्या पुतणीचे भवितव्य त्याच्या हाती सोपविण्याचे अगोदर त्याचा उत्कर्ष केवळ तिच्याच आधारावर आहे याची जाणीव नूरमहाल हिला खुर्रमला करून द्यावयाची होती. म्हणून तिने त्याची बढती[४२] १२ हजार जात आणि ५ हजार सवार इतक्या मनसबीवर २७ मार्च १६१२ रोजी करविली आणि यानंतर सुमारे ४ आठवडयानी बराच-काळ ठरलेला दोघांचा विवाहसमारंभ उरकण्यात आला.

### लग्नाचा सोहळा

तो दिवस म्हणजे वर आणि वधु या दोघांच्या माता-पित्यांना मोठचा आनंदाचा होता. हा प्रसंग मोठ्या भपक्याने आणि थाटामाटाने साजरा करण्यात आला. हा लग्नसोहळा अधिकाधिक आनंनदायी आणि भव्य व्हावा यासाठी किती पैसा खर्च होत आहे याची दिक्कत बाळगण्यात आली नाही. दिवसा निघणाऱ्या भव्य मिरवणुका आणि रात्रीच्यावेळी होणारी मोठ्या प्रमाणावरची आतषबाजी यामुळे या प्रसंगाच्या आनंदात फार मोठी भर पडली. सारे आग्रा शहर सुखसागरात बुडून गेले. हा आनंदोत्सव जवळजवळ १ महिनाभर चालला असावा कारण महिनाअखेरीला लग्नानिमित्त होणाऱ्या मेजवानीत भाग घेण्यासाठी जहांगीर हा आपल्या मुलाच्या घरी गेला. राजपुत्राने आपल्या बापाला नजराणे अर्पण केले त्याच्या बेगमांना रत्ने आणि अमीरांना मानाचे पोशाख.[४३]

### शहाजहानच्या इतर स्त्रिया

राजपुत्र खुर्रम याची तिसरी बायको ही शहानवाज खान याची मुलगी होती. शहानवाजखान हा सुप्रसिद्ध अबदूर रहिम खान खानान याचा मुलगा. हा विवाह २३ ऑगस्ट १६१७ रोजी तो दक्षिणेत असताना झाला.[४४] हा जो संबंध घडून आला त्याच्या पाठीशी निश्चितच राजकीय हेतू होते. आपले भविष्यकालीन कार्यक्षेत्र हे दक्षिणेमधे आहे याची जाणीव राजपुत्राला झाली

आणि त्या प्रदेशाची यथासांग माहिती असलेला उलट्या काळजाच्या खानानहून दुसरा कोणीही नव्हता. त्याचे सर्वतोपरी सहाय्य मिळविण्याचा उत्कृष्ट मार्ग त्याच्या घराण्याबरोबर वैवाहिक संबंध जोडण्यासारखा दुसरा कोणताही नव्हता. त्याशिवाय त्याचा मुलगा शहानवाजखान हा ज्याच्याविषयी मनात आशा बाळगावी असा एक प्रभावी तरुण होता आणि ज्या आपल्या वैयक्तिक अनुचरांची मोठ्या खुबीने वाढ करण्याचे काम खुर्रमने चालविले होते त्यामध्ये त्याचा अंतर्भाव करण्याची खुर्रमची इच्छा होती.

**शहाजहानची संतती**

राजपुत्र खुर्रम याला त्याच्या पहिल्या बायको पासून एक मुलगी झाली. तिचा जन्म १२ आगस्ट १६११ रोजी झाला. तिचे नाव परहेज बानू असे ठेवण्यात आले. तिचा प्रतिपाळ रुकिया बेगम हिने केला.[४५] त्याच्या दुसऱ्या बायकोपासून त्याला १४ मुले झाली. त्यापैकी ७ लहान असतानाच मरण पावली. जी सात जगली ती पुढीलप्रमाणे होती :–

जहान आरा बेगम, जन्मस्थान अजमेर, जन्म २३ मार्च १६१४ रोजी. दारा शुको, जन्मस्थान अजमेर, जन्म २० मार्च १६१५ रोजी. शहा शुजा, जन्मस्थान अजमेर, जन्म २३ जून १६१६ रोजी. रोशनआरा बेगम, जन्मस्थान बुरहाणपूर, जन्म २४ ऑगस्ट १६१७ रोजी. औरंगजेब, जन्मस्थान दोहद, जन्म २४ ऑगस्ट १६१८ रोजी. मुराद बक्ष, जन्मस्थान रोहटस, जन्म २९ ऑगस्ट १६२४ रोजी. गौर आराबेगम, जन्मस्थान बुरहाणपूर, जन्म ७ जून १६३१ रोजी.

**खुर्रमचे व्यक्ति चित्रण**

जहांगीरच्या कारकीर्दीच्या इतिहासाची पाने राजपुत्र खुर्रम याने मिळविलेल्या नेत्रदीपक विजयांच्या हकीकतीने भरलेली आहेत. त्याला जे लोकविलक्षण असामान्यत्व प्राप्त झाले त्यामुळे त्याचे समकालीन चकित आणि अचंबित होऊन गेले. आपल्या बापाची सदिच्छा आणि सावत्र आईची परिपूर्ण मेहेरनजर यांच्या पाठिंब्यावर त्याने आपल्या सार्वजनिक जीवनाला सुरुवात केली.[४६] जरी वयोमानाने तो तरुण होता तरी परिपक्व बुद्धिची चिन्हे त्याच्यात दिसत होती. त्याच्या अंगचे लोभसवाणे शिष्टाचार, वागणुकीच्या बाबतीतील तो पाळीत असलेले कडक नियम कर्तव्याबाबतची, त्याची असीम निष्ठा आणि

त्याच्या अंगातील बेगुमान धाडस या सर्वांच्या समुच्चयाने त्याच्या जीवनाच्या यशस्वी वाटचालीबद्दल जणूकाही ग्वाहीच दिली. परस्परविरोधात त्याचे भाऊ आणि प्रतिस्पर्धी यांच्यावर त्याला श्रेष्ठत्व मिळाले आणि अनेकवेळा त्याना जे अपयश आले त्यामुळे त्याच्या मोठेपणात भर पडली. संधिची त्याला कधीहि वाट पहावी लागली नाही, ती त्याच्याकडे आपोआपच चालत आली. त्याच्या अंगातील गुणांची पहिली परिक्षा इतिहासप्रसिद्ध अशा मेवाडच्या रणमैदानावर झाली.

**त्याची मेवाडची मोहिम**

राजपुतान्यामधील सर्व राज्यात मेवाडचेच एक राज्य असे होते की मोगल साम्राज्याच्या प्रचंड सामर्थ्याच्या विरुद्ध बराच काळपर्यंत आपले स्वातंत्र्य टिकवून धरणे ज्या राज्याला शक्य झाले. अकबराच्या प्रयत्नांनी त्या राज्याचे अस्तित्व लुळेपांगळे झाले. परंतु अकबराला त्या राज्याचा नाश करता आला नाही. आपल्या बापाच्याच पावलावर पाऊल टाकून जाणाऱ्या जहांगीरच्या कारकीर्दीतील अगदी पहिली झालेली गोष्ट म्हणजे राजपुत्र परवीज याची राण्याच्या विरुद्ध मोहिमेवर झालेली नेमणूक ही होय. परंतु खुश्रावच्या बंडामुळे आपल्या मुलाला परत बोलाविणे जहांगीर याला भाग पडले. पुढे महाबतखान, अबदुल्ला खान, फिरोज जंग, आणि राजा बासू यांना एकापाठोपाठ मेवाडमध्ये पाठविण्यात आले परंतु त्यांच्या प्रयत्नांना फारच थोडे यश प्राप्त झाले. यानंतर १६१३ मध्ये मेवाडमधील मोहिमेची सूत्रे खान आजम अजीज कोका याचे हाती सूपूर्द करण्यात आली. परंतु इतरांप्रमाणेच त्यालादेखील फारशी काही प्रगती करता आली नाही. त्याने केलेल्या सूचनेनुसार जहांगीरने स्वतः अजमेरकडे कूच केले आणि १६१३ च्या हिवाळ्यात तेथे मुक्काम ठोकला. १६१४ च्या सुरवातीला त्याने आनंद आणि विजयोत्सवात असलेल्या राजपुत्र खुर्रम याला खान आजम याच्याकडून चालविलेल्या कारवाईला मजबुती आणण्यासाठी म्हणून रवाना केले. १२००० सैनिक असलेली एक तुकडी त्याच्या अधिपत्त्याखाली देण्यात आली आणि त्याच्या फौजेचा बक्षी म्हणून फिदाईखान याला नेमण्यात आले. प्रत्यक्ष घटनास्थळी आल्यावर अजीजकोका याच्याबरोबर मिळतेजुळते घेणे अशक्य आहे असे राजपुत्राला आढळून आले. सेनाधिकारात आपल्याहून वरिष्ठ असलेल्या अजीजकोका याच्या वेळकाढू डावपेचांची राजपुत्र खुर्रम याला चीड आली आणि त्याने त्याच्याविरुद्ध लगोलग आपल्या बापाकडे तक्रार केली. खान आजम याच्या मनावर राजपुत्राशी निष्ठा बाळगण्याची जरूरी आहे हे बिंबविण्यासाठी जहांगीर

याने इब्राहीम हुसेन याला पाठविले. परंतु खान आजम याने आपला मार्ग काही बदलला नाहीं. राजपुत्र खुर्रम याने त्याला बंदिस्त केले आणि आपण केलेल्या कारवाईची खबर आपल्या बापाचे कानावर घातली. जहांगीर याने कैद्याला अजमेर येथे आणण्यासाठी महाबतखानाला पाठविले.

राजपुत्र खुर्रम याच्या अंगी वास करीत असलेल्या आक्रमक महत्त्वाकांक्षेची ही पहिली निशाणी होती. आपल्या वैभवात इतराना वाटेकरू होऊ देण्याला तो अतिशय नाखूष होता आणि स्वतःची साधनसामुग्री आणि स्वतःचेच मार्ग यांच्या जोरावर यशस्वी होण्याबद्दल तो उत्सुक होता. या कारणास्तव त्याने स्वतःला या धुमश्चक्रात पूर्णपणे लोटून दिले आणि शत्रूवर सर्व बाजूनी प्रहार करण्यास सुरवात केली. त्याचा उत्साह आणि मन एकाग्र करण्याची त्याची हातोटी यामुळे त्याने आपल्या अनुयायांचा विश्वास संपादन केला. परिणामी त्याच्या आज्ञांचे त्यांच्याकडून पूर्णतया पालन होऊ लागले. आपला चुलता राजा सुरज सिंग याने इशारा दिला असतानादेखील त्याने डोंगराळ प्रदेशात मुसंडी मारली आणि सिसोदिया रजपुतांच्या मुलखात जाळपोळीचा एकच कहर उडवून दिला आणि त्याना अगदी अन्नान्नदशेला नेऊन सोडले. त्यांच्या मुलखात ठाणी स्थापन केल्यामुळे त्यांच्याकडून होणाऱ्या अचानक हल्ल्यांना आळा बसला. सतत चाललेल्या युद्धांमुळे त्यांच्या संख्येत घट झाली आणि भुकेपोटी त्यांचे मनोधैर्य ढासळून गेले. सरतेशेवटी मोठ्या प्रमाणावर त्याच्या फौजेतील सैनिक त्याला सोडून गेल्यामुळे विरोधी पक्षाच्या छावणीत त्याची जी काही मित्रमंडळी होती त्यांच्या मदतीने तहाची बोलणी सुरू करणे राणा अमरसिंग याला भाग पडले.

**राण्याची शरणागती**

दोन्हीं पक्षात जासूदांची देवाणघेवाण झाल्यावर तहाच्या अटींबाबत झपाट्याने एकवाक्यता झाली. ज्या स्वातंत्र्यासाठी राण्याने इतका काळ लढा दिला ते आपले स्वातंत्र्य गमावण्याचे आणि स्वतः येऊन राजपुत्र खुर्रम याची भेट घेण्याचे त्याने कबूल केले. परंतु प्रत्यक्ष दरबारांत त्याने हजर व्हावे असे जे बंधन त्याच्यावर होते त्यातून त्याची मुक्तता करण्यात आली आणि त्याचा प्रतिनिधि म्हणून त्याचा मुलगा करण याने दरबारात हजर रहावे असे ठरले. त्याशिवाय आपण यापुढे कधींही चितोडची मजबुती करणार नाही असे राण्याने वचन दिले. जहांगीर याने या तहाला मंजूरी दिली आणि एक फर्मान काढून त्यावर आपल्या शुभ्र हाताच्या पंजाचा ठसा उमटविला. आपल्या अनेक अनु-

यायांना बरोबर घेऊन अमरसिंग राजपुत्र खुर्रम याच्या भेटीला आला आणि तो परतल्यानंतर त्याचा मुलगा करण हा राजपुत्र खुर्रम याला येऊन भेटला. राजपुत्र खुर्रम याने मोठ्या सन्मानपूर्वक त्याचे स्वागत केले आणि त्याला एक उत्कृष्ट मानाचा पोषाख, हिरेजडित तलवार, एक खंजीर, सोन्याचे खोगीर असलेला एक घोडा आणि एक खास हत्ती वगैरे गोष्टी भेटीदाखल दिल्या. खुर्रम याने करण याला जी औदार्याची वागणूक दिली त्यामुळे त्या दोघामध्ये निर्माण झालेले स्नेहाचे नाते त्यांच्या आयुष्यभर टिकले.[४७]

## खुर्रम याचे उत्कर्षाप्रत जाणारे भाग्य

मेवाडचा पाडाव झाल्यामुळे मोगल साम्राज्याच्या वैभवात भर पडली. या घटनेचा जहांगीर इतका अभिमान दुसऱ्या कोणाला वाटला नाही आणि राजपुत्र खुर्रम याच्याइतका आनंद दुसऱ्या कोणाला झाला नाही. ज्याचे कौशल्य पराकोटीला पोहोचले आहे आणि ज्याच्या अंगी कर्तुत्वशक्ती आहे असा एक सेनापती म्हणून त्याला अतिशय निर्विवाद अशी प्रसिद्धी मिळाली. वैभवाच्या शिखराकडे ज्याच्या जीवनाची वाटचाल होत आहे अशी एक व्यक्ती म्हणून लोक त्याच्याकडे पाहू लागले. अजमीरच्या नजीक तो आल्यावर त्याला सामोरे जाण्याचा आणि मौल्यवान भेटी अर्पण करण्याचा हुकूम दरबारातील सर्व अमीरांना देण्यात आला. जेव्हा राजपुत्र आपल्या बापासमोर उभा राहिला तेव्हा प्रेम आणि आनंद या भावनांनी त्याला गदगदून आले. त्याने त्याला आलींगन दिले, त्याच्या मस्तकाचे आणि मुखाचे चुंबन घेतले आणि त्याच्यावर खास स्नेहभाव आणि स्वागताची मेहेरनजर केली. परंतु आपल्या बापाकडून झालेली वाहवा आणि दरबारी मंडळींकडून झालेली स्तुती या सर्वांपेक्षाही वरील मोहिमेतून राजपुत्र खुर्रम याला जे मिळाले ते म्हणजे अतिशय निवडक अशा काही व्यक्तींची मैत्री, की ज्या व्यक्ती त्याच्यावर गुजरलेल्या सर्व बऱ्यावाईट प्रसंगात त्याला धरून राहिल्या. या व्यक्ति म्हणजे सुंदरदास, मुल्ला शुक्रुल्ला, सहिफखान बारहा, दिलावरखान, किशनसिंग आणि मीर हिसाम-उद्दीन या होत. राजपुत्र आता त्याच्या दैवाने आगाऊच त्याच्या कपाळी लिहून ठेवलेल्या मोठेपणाच्या उंबरठ्यावर होता.

# तळटीपा

## प्रकरण पहिले

(१) अकबरनामा, खंड ३, पान ९२१. जहांगीर जन्माची तारीख ९९९ हिजरी देतो ती निश्चितपणे चुकीची आहे. R. B. Vol I. p. 19; कजवीनी, पान ११६; लाहोरी, खंड १, पान १६ मासिर- इ- जहांगिरी, पान ४२.

(२) अकबरनामा, खंड ३, पान ७४९; बेनी प्रसाद, पान ३०, तळटीप ५; बिल (Beale) तिला चुकीने बालमती असे संबोधितो, पान ३६३; तिचे दुसरे नाव जौधबाई होते असे विधान कविराज श्यामलदास करतो परंतु लग्न झाल्याची तारीख तो १५८८ या सालांतील देतो. J. A. S. B. 1888, p. 71. मानरिक (Manrique) देखील तिचे नाव बालमती असेच देतो. खंड २, पान २०१.

(३) अकबर नामा, खंड ३, पान ९२१; कजवीनी आणि लाहोरी यानी दिलेली शहाजहानची पत्रिका पहा.

(४) शहाजहानच्या जन्माच्यावेळी यापैकी एक तरी कवन तयार करण्यांत आले होते किंवा नाहीं याबद्दल शंकेला जागा आहे. पादशाहनामा या ग्रंथाच्या अगोदरच्या कोणत्याही ग्रंथात त्याचा उल्लेख केलेला आपल्याला आढळत नाहीं. पहिल्यामधे आलमगीर या शद्वावर आणि दुसऱ्यामधे शहाजहान या शद्वावरील श्लेषालंकार वरील विधानाला पुष्टी देतो.

(५) R. B. Vol. I, p. 48; कजवीनी, पान १८ मधे गोविंदच्या भविष्यवाणीच्या गोष्टीचा उल्लेख करतो. सुलतान बेगम हिचा मृत्यू जहांगीरच्या कारकीर्दीच्या २० व्या वर्षी झाला. इक्बालनामा, पान २५१.

(६) राजपुत्र सलीमच्या मक्ताब विधिची सविस्तर हकीकत अबुल फजल याने दिलेली आहे आणि अनुषंगाने खुश्रावच्या त्याच विधिचा तो उल्लेख करतो. अकबरनामा, खंड ३, पान ९२२. परंतु खुर्रमच्या मक्ताब विधिबद्दल तो एक चकार शद्व देखील काढीत नाहीं. परंतु त्याच्या काही शिक्षकांच्या नावांचा मात्र तो उल्लेख करतो. अधिकृतरीत्या झालेल्या मक्ताब विधिबद्दलचा वृत्तान्त पुढील कालखंडात लिहिल्या गेलेल्या ग्रंथातच आपल्याला फक्त आढळतो. उदा० कजवीनी, सालिह, आणि पद्यरूप पादशहानामे. कजवीनी, पान ३४; सालिह, खंड १, पाने ३०-३२.

(७) अबुल फजल याने असे विधान केले आहे की अध्यात्मिक चिंतन करण्यांत त्याने अतिशय कष्ट सहन केले आणि त्याच्या तोंडून मनाला आंल्हाद देणारे असे अनेक सुफी वाक्प्रचार सहजतया बाहेर पडतात. अकबरनामा, खंड ३, पान ११२२. तबकात-इ-अकबरीचा ग्रंथकर्ता म्हणतो की अनेक सयुक्तीक शास्त्रामधे त्याने अतुलनीय अशी पारंगतता संपादन केलेली होती, पान ५४१; *see* also Blochmann, p. 517 and p. 106.

(८) राजपुत्र खुर्रम याचा शिक्षक म्हणून हकीम दवाई याच्या नावाचा कजवीनी आणि सालिह हे दोघेही उल्लेख करतात. परंतु अकबराच्या कारकीर्दीत ज्या एकमेव दवाईचा उल्लेख आलेला आहे तो म्हणजे सुप्रसिद्ध तर्कशास्त्रज्ञ दव्वानी याचा वंशज आणि बदाऊनीचा स्नेही हकीम ऐनउलमुल्क शिराजी हा होय. परंतु हकीम शिराजी याचा मृत्यू हिजरी १००३ मधे झाला. साहजिकच खुर्रमचा तो शिक्षक असेल हे अगदी असंभवनीय वाटते. मी अशा अनुमानाप्रत आलो आहे की हकीम दवाई म्हणजे हकीम अली गीलानी हा अभिप्रेत असावा. हा हकीम अली गीलानी हकीम ऐनउलमुल्क याच्या बहिणीचा मुलगा होता आणि त्याचा उल्लेख त्याच्या मामाप्रमाणेच करीत असल्याची शक्यता संभवते. त्या शिवाय तो राजपुत्र खुर्रमच्या कायमच्या सहवासांत होता आणि हकीम अली याच्या अंगातील गुणांची जहांगीर हा मुक्तकंठाने स्तुती करतो. हकीम ऐनउल्मुल्क याच्या बद्दलच्या अधिक माहिती साठी पहा बदाउनी, खंड ३, पान १६४ आणि Blochmann p. 481. हकीम अली याच्याबद्दलच्या माहितीसाठी पहा तबकात, पान २९१; R. B. Vol. I, p. 68, p. 152, p. 154; मासिर उल्उमरा, खंड १, पाने ५६८-७३.

(९) कजवीनी, पान ३४.

(१०) तबकात, पान २९९. सुबह–सारिक, पान १०० मधे महमद सुफी याची हकीकत दिली असून, जहांगीरच्या बोलावण्यावरून तो लाहोरला जात असताना वाटेत हिजरी १०१३ मधे त्याचा मृत्यू झाला असे त्यामधे विधान आहे.

(११) प्रथम तो खुश्राव याचा शिक्षक होता. अकबरनामा, खंड ३, पान ९२२.

(१२) लाहोरी, खंड १, पाने १३२-३३. ह्या रुकिया बेगमबरोबरच्या सहवासामुळे राजपुत्र खुर्रम हा तुर्की भाषेतील काही शब्दांशी परिचित होता असे कजवीनी म्हणतो, पान १३४.

## प्रकरण दुसरे

# वैभवाच्या शिखराकडे वाटचाल

**खुर्रमच्या मनसबीत वाढ**

मेवाडच्या अनातथ्यशील डोंगराळ प्रदेशात बराचसा खडतर काळ घालविल्यानंतर राजपुत्र खुर्रम याला त्याच्या बापाने अजमीर भोवतालच्या मनोरम्य प्रदेशात हृदयाला संतोष देणाऱ्या ज्या काही सफरी आणि शिकारी यांची योजना केली त्यामुळे त्याला बराचसा दिलासा मिळाला.

त्याने केलेल्या कामगिरीचे बक्षिस म्हणून त्याच्या मनसबीत वाढ करण्यात येऊन ती आता १५,००० जात आणि ८,००० सवार एवढी करण्यात आली[१] त्याचा दर्जा त्याचा मोठा भाऊ परवीज याच्या सारखाच झाला आणि त्याला मिळालेले स्थान हे निश्चितच त्याचा अधिक फायदा करून देणारे होते. त्याला मिळालेल्या यशामुळे त्याला एक आगळेच महत्त्व प्राप्त झाले आणि नूरजहान हिने नुकत्याच स्थापन केलेल्या पक्षाने जे काही संघटित प्रयत्न केले त्यामुळे तो अग्रस्थानी आला. त्याचे समकालीन आणि प्रतिस्पर्धी यांची आता त्याच्याबरोबर तुलनाच होऊ शकत नव्हती इतका तो पुढे गेला होता.

## खर्रमने घेतलेले मद्याचे घुटके

शुक्रवार तारीख १ फेब्रुवारी १६१६ रोजी सौरवर्षीय पद्धतीप्रमाणे त्याचा वाढदिवस अजमीर येथे साजरा करण्यात आला.[२] तो आता २४ वर्षांचा झाला होता, तरी देखील त्याचे ओठ मद्यप्राशनाने अजून विटाळले नव्हते. त्याच्या बापाने या प्रसंगी त्याला मद्यप्राशन करण्याचा अत्याग्रह केला. तो म्हणाला, "बाबा ! तू आता पोराबाळांचा बाप झाला आहेस आणि राजे महाराजे आणि त्यांचे युवराज यांनी मद्यांचे प्राशन केले आहे. आज असा दिवस आहे की तुझी तुला करावयाची आहे, म्हणून मी तुला पिण्यासाठी मद्य देईन आणि त्याप्रमाणे मेजवान्यांच्या दिवशी, नवीन वर्षाच्या वेळी आणि मोठ्या-मोठ्या उत्सवांचे वेळी तुला मी दारु पिण्याची परवानगी देईन. परंतु इतके जरी असले तरी तू संयमाच्या मार्गाने जावे असे मला वाटते, कारण आपल्या विवेक बुद्धीचा नाश होईल इतक्या थरापर्यंत दारु पिणे चांगले नाही असा विचार सूज्ञ माणसे करतात. त्याचप्रमाणे दारु पिण्यापासून आपले हितच साधले पाहिजे ही गोष्ट देखील बघण्याची जरुरी आहे." बापाच्या इच्छेला मान देण्यावाचून राजपुत्राला गत्यंतर नव्हते. एका प्रसंगी त्याने आपण दारुला कधीही स्पर्श करणार नाही अशी शपथ घेतली. अर्थात ही शपथ त्याने घेतली ती केवळ मोडण्यासाठीच.

## दक्षिणेतील परिस्थिती

या सुमारास जहांगीर अजमीर येथे आपला वेळ जरी ख्याली खुशालीत घालवीत होता तरी साम्राज्यातील राजकीय परिस्थितीकडे त्याचे दुर्लक्ष झाले होते असे म्हणता येणार नाही. दक्षिणेमधील घडामोडींकडे त्याचे अतिशय बारकाव्याने लक्ष होते, आणि तेथे त्याच्या अधिकाऱ्यांना जे अपयश आलेले होते त्यामुळे त्याचा हिरमोड झाला होता. त्याने दक्षिणेमध्ये स्वत: जाण्याचा विचार केला. या कल्पनेने त्याने अबदुल करीम मामूरी त्याला मांडू येथे पाठविले. तेथे त्याच्या खाजगी निवासस्थानासाठी एक नवीन इमारत बांधण्याचा आणि पूर्वीच्या सुलतानांच्या इमारती दुरुस्त करण्याचा हुकूम दिला.[३] परंतु त्यावेळेपुरता तरी त्याने आपला बेत पुढे ढकलला कारण मोगलांची गेलेली इभ्रत पुन्हा प्राप्त करून घेण्यासाठी खान खानान याने नव्याने जी हालचाल सुरु केलेली होती त्यामधून काय निष्पन्न होते हे पाहण्याचा त्याचा मनसुबा होता. आपला उद्देश्य साध्य करून घेण्यामध्ये खान खानान याला मोठे यश प्राप्त झाले परंतु त्याच्या अधिकाऱ्यांमध्ये निर्माण झालेल्या कलहामुळे त्याच्या प्रगतीत अडथळे निर्माण झाले. त्याशिवाय खान खानान याच्याविरुद्ध लाच-

लुचपतीच्या अफवा दरबाराकडे येऊन पोहोचल्या होत्या. अशा परिस्थितीत आपली मूळ योजना कार्यवाहीत आणणे जरूर आहे याबद्दल जहांगीरची खात्री पटली.[४]

### खुर्रम याची दक्षिणेकडे नेमणूक

यानुसार खुर्रमची मनसब वीस हजार जात आणि दहा हजार स्वार इतकी वाढविण्यात आली आणि त्याचप्रमाणे नालायकीच्या कारणास्तव दक्षिणेच्या सुभेदारीवरून परवीज याला हलविण्यात आले. त्याची बदली अलाहाबादच्या सुभ्यावर करण्यात आली. राजपुत्र खुर्रम याचे अंगी प्रामाणिकपणा आणि परिस्थितीचे ज्ञान असल्याची लक्षणे दिसून आल्यामुळे परवीज नंतर दक्षिणेच्या सुभेदारीवर त्याची नियुक्ती करण्यात आली.[५] आपला मोठा मुलगा परवीज याच्यावर अतिशय भयंकर असा अन्याय जहांगीरने केला असल्याचे ही घटना दर्शविते. त्याच्या अंगात स्वयंकर्तृत्त्व आणि प्रेरणाशक्ती यांचा अभाव होता, ही गोष्ट खरी आहे. परंतु त्यासाठी दक्षिणेमध्ये जे अपयश आले त्याचे सारे खापर त्याच्या माथ्यावर फोडणे हे बुद्धिला न पटण्यासारखे आहे. वस्तुस्थिती अशी होती की परवीजला जसा पाठिंबा मिळावयास पाहिजे होता तसा दिला गेला नाही. एक नामधारी सेनापती यापेक्षा त्याला अधिक महत्त्व नव्हते तर याउलट खरी सत्ता त्याच्या दुय्यम अधिकाऱ्यांच्या हाती होती. हे सारे अधिकारी त्याला नेहमीच कमी लेखीत. न्यायाच्या भूमिकेतून बघितल्यास आपला आवडता मुलगा खुर्रम याला जहांगीरने जी संधी दिली तशीच त्याने परवीज याला देणे जरूर होते. प्रत्यक्षात मात्र त्याच्या धाकट्या भावाचा मार्ग सुकर व्हावा यासाठी परवीजच्या भवितव्याचा बळी देण्यात आला.

### अब्दुल्ला खानाच्या वतीने खुर्रम याची मध्यस्थी

जहांगीर याने दक्षिणेचा संपूर्ण ताबा राजपुत्र खुर्रम याच्याकडे देऊन दक्षिणेच्या राजकीय घडामोडींचा सूक्ष्म दृष्टीने अभ्यास करण्याची संधी त्याला दिली.[६] यासुमारास काही दुराचरण केल्याचा अब्दुल्लाखान फिरोजजंग याच्यावर आरोप ठेवण्यात आला आणि त्याला गुजरातेतून बोलवण्यात आले. मनाच्या अतिशय संतप्त अवस्थेत तो अजमीर येथे येण्यासाठी पायी निघाला. तेथे आल्यानंतर त्याने खुर्रम याची सहानुभुती मिळविली. त्याच्या वतीने खुर्रम याने जहांगीरकडे त्याची रदबदली केली.[७] त्याच्या अपराधाची क्षमा करण्यात आली आणि त्याचा उपकारकर्ता खुर्रम याच्याबरोबर दक्षिणेत जाण्याचा त्याला हुकुम करण्यात आला. अब्दुल्लाखान हा एक अतिशय

अनुभवी असा अधिकारी होता आणि अशा प्रसंगी त्याची चाकरी आपल्याकडे खुर्रम याला मिळवून घेता आली हे खुर्रमचे मोठे नशीबच होते असे म्हटले पाहिजे. खुर्रम जाणार होता तो एका अनोळखी अशा मुलखात. तेथील अधिकारी त्याच्याशी वैर बाळगून होते असे जरी म्हणता आले नसते तरी देखील खुर्रमकडे बघण्याचा त्यांचा दृष्टीकोन हा मैत्रीचा खासच नव्हता. अशा परिस्थितीत अबदुल्ला खानासारख्या व्यक्तीची मदत खुर्रमच्या दृष्टीने मोलाची ठरणार नव्हती का?

## खुर्रम याला शहा ही पदवी दिली जाते

दक्षिणेत जायला निघण्याचे अगोदर खुर्रम याने आपल्या फौजेतील निवडक अशा सैनिकांची कवायत बादशहासमोर दिवाण-इ-आम मधे घडवून आणली. कवायतीचे दृश्य बघून जहांगीर याला इतके समाधान झाले की त्याने खुर्रम याला शहा ही पदवी बहाल केली.[८] शहाजहानला मिळालेला हा मान विलक्षण होता. याच्या पूर्वी कोणताही सम्राट जिवंत असताना राजपुत्राला शहा ह्या बहुमानाने संबोधण्यात आलेले नव्हते. कदाचित शहाजहानच्या मनात आपल्या दिमाखाची जी भावना होती तिनेच त्याला अशा तऱ्हेचे पाऊल टाकण्यास प्रवृत्त केले असले पाहिजे. इराणच्या वकीलाचे वास्तव्य त्याच्या दरबारात होते.[९] कदाचित त्याला पर्शियन वकीलाला असे दर्शवावयाचे होते की त्याच्या धन्यापेक्षा आपण मोठे आहोत कारण इराणच्या बादशहाला शहा ही जी पदवी होती ती आपण आपल्या मुलाला बहाल करू शकतो. कदाचित जहांगीर याने आपल्या मुलाला शहा ही जी पदवी दिली ही त्याची कृती म्हणजे अलाहाबाद येथे तो असतांना राजपुत्र म्हणून त्याने ज्या काही कल्पना आपल्या उराशी बाळगल्या होत्या त्यामधून निर्माण झालेली ही मानसिक प्रतिकृती असावी.[१०] ते काहीही असो. या घटनेमध्ये देणाऱ्याला आणि घेणाऱ्याला अशा दोघांनांही अभिमान वाटण्याजोगी वस्तुस्थिती होती.

## खुर्रम याचे दक्षिणेकडे प्रयाण

६ आक्टोबर १६१६ रोजी शहा खुर्रम याने त्याला किर्ती आणि प्रसिद्धी मिळावी याबद्दल त्याच्या बापाने जाहीर रीत्या केलेल्या प्रार्थनेच्या गजरांत अजमीर सोडले.[११] फिरोजजंग या शूर योद्धया व्यतिरिक्त इतर अनेक अधिकारी त्याच्याबरोबर होते. त्याच्यामध्ये प्रमुख म्हणजे राजा सूरजसिंग आणि दयानत खान हे होते. सैन्याचा बक्षी म्हणून मोतमद खान याची नेमणूक

करण्यात आली.[१२] दक्षिणेच्या मार्गावर इदपूर[१३] येथे राणा अमरसिंग याने त्याची भट घतली. त्यान राजपुत्र करण याच्या हाताखाली १,५०० घोडे-स्वरांची एक तुकडी त्याच्या दिमतीला दिली. अतिशय जलद कूच करीत तो नर्मदेच्या किनाऱ्यावर पोहोचला. तेथे खान खानान, खान जहान, महाबत-खान आदी दक्षिणी अधिकाऱ्यांनी त्याचे स्वागत केले. सीमा प्रदेशावर जास्त-वेळ रेंगाळत न राहता त्याने सरळ बुऱ्हाणपूरकडे कूच केले.[१४] ६ मार्च १६१७ रोजी तो तेथे येऊन पोहोचला.

## दक्षिणेमधे शांतता

दक्षिणेमध्ये खुर्रम याचे आगमन झाल्याबरोबर तेथील राजकीय वाता-वरणात इष्ट तो बदल घडून आला. आदिलशहा आणि मलीक अंबर यांना आपल्या पायाखालील वाळू सरकत चालल्याचे दिसून आले. त्यानी राजपुत्र खुर्रम याने तहाबाबत जी भूमिका घेतली तिला तावडतोब प्रतिसाद दिला आणि १५ लक्ष रुपये किमतीचे नजराणे भेट म्हणून राजपुत्राकडे पाठविले. मलीक अंबर याने बाला घाट मोगलाना परत दिला आणि अहमदनगर आणि इतर किल्ले मोगलांच्या स्वाधीन करण्याचे कबूल केले.[१५] अशा तऱ्हेने शांततापूर्ण मिळालेल्या विजयश्रीने मोगलांच्या प्रयत्नांना यश मिळाले. शस्त्रास्त्रांच्या जोरावर जे इतका काळ-पर्यंत साध्य होऊ शकले नाही ते केवळ मुत्सद्देगिरीच्या मार्गाने अगदी थोड्या काळात प्रत्यक्षात उतरले आणि या सर्वाचे श्रेय शहा खुर्रम याजकडे गेले. मेवाडन तो एक अतिशय कुशल असा सेनापती आहे असे दाखवून आणि दक्षिणेने तो एक हुषार मुत्सद्दी आहे हे निदर्शनास आणले. नवीन जिंकलेल्या मुलखाची योग्य ती देखभाल करण्याची व्यवस्था त्याने त्या प्रदेशाचा ताबा खान खानान आणि शहानवाज खान यांच्याकडे देऊन केली.[१६] नंतर तो आपल्या बापाला भेटण्यासाठी उत्तरेकडे निघाला.

## जहांगीरला झालेला आनंद

मांडू येथे आपल्या मुलाच्या दक्षिणेमधील मोहीमेची काय निष्पत्ती झाली ते ऐकण्यासाठी अतिशय उतावीळ उत्सुकतेने जहांगीर वाट पहात होता. सय्यद अबदुल्ला बारहा याने शहाजहान याने केलेल्या नवीन राज्यव्यवस्थेची बातमी आणली. मिळालेल्या यशाबद्दल आनंद प्रकट करण्यासाठी नौबती वाजविण्यात आल्या.[१७] याच्या पाठोपाठ राजपुत्राकडून एक पत्र आले. त्यामधे अफजलखान आणि राय रायान हे आदिलशहाच्या वकीलाबरोबर आल्याची बातमी होती.

त्याने आपल्याबरोबर हिरे, हत्ती आणि घोडे आणल्याचे राजपुत्राने लिहीले होते. अशा तऱ्हेचा नजराणा यापूर्वी कोणाच्याही कारकीर्दीत किंवा कोणत्याही काळी आलेला नव्हता असे त्याचे वर्णन राजपुत्राने दिले होते. स्वतः राजपुत्र १२ आक्टोबर १६३७ रोजी आला. राजपुत्राचे स्वागत दिवाण-इ-खास मधे करण्यात आले. बादशहाला मुजरा आणि सिंहासनासमोरील जमिनीचे चुंबन आदी विधी व्यवस्थित पार पडल्यानंतर जहांगीरने त्याला झरोक्याकडे बोलाविले. अमर्याद अशा स्नेह भावाने आणि ऊतू जाणाऱ्या आनंदाने तो आपल्या जागेवरून उठला आणि त्याने शहाजहानला प्रेमालिंगनात बद्ध केले. त्याला सिंहासनाजवळ आसन देण्यात आले आणि त्याचवेळी त्याला वीस हजार जात आणि वीस हजार सवार अशी अभूतपूर्व मनसब देण्यात आली. याबरोबर शहाजहान ही पदवीही त्याला देण्यात आली.

### शहा खुर्रम याच्यावर नव्या पदव्यांची खैरात

यावेळी जहांगीरने त्याच्यावर देणग्यांची खैरात केली. या प्रसंगानिमित्त झालेला आनंद प्रकट करण्यासाठी नूरजहान हिने एका भव्य अशा मेजवानीचा समारंभ आयोजित केला.[१८]

राजपुत्रानंतर त्याच्याबरोबर दक्षिणेत गेलेल्या अधिकाऱ्यांची बादशहाला त्याच्यातर्फे नजराणे देण्याची पाळी आली. पहिल्या प्रथम नजराणा दिला तो खान जहान लोधी याने. त्याच्या नजराण्यात एक हजार मोहरा आणि एक हजार रुपये नजर म्हणून होते आणि पेश कश म्हणून हिऱ्यांनी भरलेला एक करंडा होता. त्याच्यानंतर महाबतखान, राजा भाऊसिंग, खान खानान याचा मुलगा दाराबखान, अबदुल्लाखान याचा भाऊ सरदार खान, दयानत खान, शहाबाज खान, मोतमद खान बक्षी आणि उदाराम दरव्वनी यांनी आपापले नजराणे बादशहाला सादर केले. त्यांच्या नजराण्याचा स्वीकार करण्यात आला आणि त्यांच्या कामगिरीची प्रशंसा करण्यात आली.

### शहाजहान याने आपल्या बापाला दिलेल्या भेटी

दक्षिणेमधील आपल्या मोहीमेत शहाजहान याने आपल्या बापासाठी हिरे आणि इतर मौल्यवान वस्तू याचा जो प्रचंड साठा जमा केलेला होता तो सर्व आपल्या बापाला दाखवीपर्यंत जवळ-जवळ दीड महिन्यापर्यंतचा कालावधी लोटला. गुरुवार ता. २० नोव्हेंबर १६१७ रोजी झरोक्यासमोर दिवाण-इ-खास मधे या वस्तू मांडून ठेवण्यात आल्या. त्याचबरोबर सोने आणि चांदी

यांचा भरजरी साज चढविलेले घोडे आणि हत्ती यांचेही प्रदर्शन भरविण्यात आले. आपल्या मुलाला खूष करण्यासाठी जहांगीर हा स्वतः या सर्व वस्तूंचे यथातथ्य निरीक्षण करण्यासाठी खाली आला. या वस्तूंमध्ये किमती मोती, चकाकणारे हिरे, उत्कृष्ट असे लाल आणि सुंदर रंग व अतिशय नाजूक असलेले असे पाचू होते. परंतु बादशहाच्या मनाला कशानी मोह घातला असेल तर पर्वता-सारख्या प्रचंड आकाराच्या आणि बांधेसूद शरीराच्या पाच हत्तींनी. या नजराण्याची एकंदर किमत २२,६०,००० रु. इतकी भरली. यापैकी दोन लक्ष रुपये किमतीच्या भेटी राजपुत्राने आपली सावत्र आई नूरजहान हिला दिल्या.[१९]

## गुजराथमधील दौरा

अशा तऱ्हेने दक्षिणेचा प्रश्न तात्पुरता तरी सोडवला गेला. यानंतर जहांगीरला हत्तीची शिकार करण्याची इच्छा झाल्यामुळे त्याने गुजराथमध्ये दौरा काढण्याचे ठरविले. त्याने मरियम-उज-जमानि आणि इतर बेगमा व जना-न्यातील मंडळी आणि इतर सामान-सुमान व बरोबरील जादा मंडळी यांची आग्रा येथे रवानगी केली. तो स्वतः अहमदाबादकडे रवाना झाला. नूरजहान आणि शहाजहान ही दोघेजण त्याच्याबरोबर गेली. अहमदाबादपर्यंतचा प्रवास हा अतिशय रमत-गमत असा झाला. वाटेत धार आणि कॅम्बे या ठिकाणांना भेटी देण्यात आल्या. अखेर बादशहा आपल्या नियोजित ठिकाणी ५ जानेवारी १६१८ रोजी पोहोचला.[२०]

## जामला मिळालेले यश

दक्षिणेमध्ये शहाजहान याला जे यश मिळाले होते, त्याबद्दल भलावणी म्हणून गुजरातचा प्रांत शहाजहानकडे नेमून देण्यात आला.[२१] या प्रांताच्या द्विपकल्पासारख्या असलेल्या एका बाजूला कच्छ नावाचे एक बेट आहे. या बेटावर भारह नावाच्या अधिपतीचे राज्य होते. याच घराण्यात जन्म झालेल्या जाम नावाच्या दुसऱ्या एका अधिपतीकडे काठेवाडच्या उत्तर किनाऱ्यावरील पट्टीचा ताबा होता.

## शहाजहानचे आजारीपण

अकबर बादशहाच्या कारकीर्दीत या दोघांनी मोगलांना तात्पुरती शरणागती दिली, परंतु नंतर मात्र त्यांनी आपले स्वातंत्र्य पुन्हा प्राप्त करून घेतले. शहाजहान याने आता त्या दोघांना वठणीवर आणण्यासाठी राजा विक्रमजित याची नियुक्ती केली. पहिल्या प्रथम जाम हा शरण आला.

१६१८च्या मार्च महिन्यात तो जहांगीरच्या भेटीला आला. त्यानंतर चारच महिन्यांनी त्याच्या भावाने शरणागती दिली.[२२] गुजराथमधील तात्पुरत्या मुक्कामाने जहांगीरला फारसा काही आनंद झाला नाही. तेथील जीवघेणी उष्णता आणि जिकडे तिकडे पसरलेली धुळ यामुळे तेथील वातावरणाचा त्याला तिटकारा आला. १६१८च्या मे महिन्यात तो आणि राजपुत्र शहाजहान हे तापाने आजारी पडले. शहाजहान याला इतका अशक्तपणा आला की दहा दिवसपर्यंत तो आपल्या बापाला भेटावयास येऊ शकला नाही.[२३] पावसाळा संपण्याचे अगोदर गुजराथेतून निघणे हे अशक्यच होते. म्हणून पावसाळ्यानंतर २ सप्टेंबर १६१८ रोजी जहांगीर याने आग्र्याकडे जाण्यासाठी कूच केले. जाताना तो माळव्यामधून गेला आणि १६१९च्या जानेवारी महिन्याच्या सुरुवातीला तो राजधानीजवळ येऊन पोहोचला. परंतु त्या सुमाराला शहरामध्ये प्लेगची लागण असल्यामुळे त्याने फत्तेपूर येथेच राहण्याचे ठरविले. या शहरात जहांगीर याने ७ जानेवारी रोजी प्रवेश केला. त्याच दिवशी सौरवर्षाप्रमाणे शहाजहानचा २८ वा वाढदिवस साजरा करण्यात आला. यानंतर नऊ दिवसांनी जहांगीर याने शहाजहान याला राजवाड्यामधे सर्वत्र फिरवून आणले आणि अकबराने तेथे ज्या-ज्या इमारती बांधलेल्या होत्या त्याबाबतची संपूर्ण माहिती त्याला दिली.

## शहाजहानच्या आईचा मृत्यु

शुक्रवार ता. ८ एप्रिल रोजी नूरमंझिल येथे दरबार भरलेला असतांना शहाजहान याच्या आईचा मृत्यु झाला. दुसऱ्या दिवशी त्याच्याबरोबर त्याचे सांत्वन करण्यासाठी जहांगीर हा त्याच्या निवासस्थानी गेला आणि त्याने त्याला आपल्या राजवाड्याकडे नेले.[२४] यानंतर दुसऱ्या दिवशी बादशहाने शाही इतमामाने राजधानीत प्रवेश केला. राजधानीत यानंतर सहा महिने त्याने वास्तव्य केले. ऑक्टोबरमधे तो काश्मीरकडे जाण्यासाठी निघाला. नेहमीप्रमाणे काश्मीरचा प्रवास रमत गमत आणि संथपणे झाला. वाटेमधे शिकारीसाठी सहली काढण्यात आल्या आणि करमणुकीचे कार्यक्रम आयोजित करण्यात आले. पालम येथे राजपुत्र शहाजहान याने आपल्या बंदुकीने दोन काळवीट मारले. अशा तऱ्हेने अतिशय सावकाशपणे २० मार्च १६२० रोजी बादशहाची स्वारी श्रीनगर येथे पोहोचली. हिंदुस्थानचे नंदनवन असे जे काश्मीर तेथील भेटीचा जहांगीर याने मनमुराद आस्वाद घेतला. परंतु अधून मधून दक्षिणेतून येणाऱ्या भयंकर बातम्या त्याचे मनस्वास्थ्य बिघडविण्यास कारणीभूत झाल्या. अशा

तऱ्हेने येणाऱ्या बातम्यांनीच पुढील ऑक्टोबर महिन्यात त्याला अखेर काश्मीर सोडणे भाग पडले.

### कांगडा येथील यश

दरम्यान जी एक बातमी त्याला मिळाली त्या बातमीने त्याला खरेखुरे समाधान मिळाले. १६१५ सालापासून अधला मधला काही काळ सोडून दिल्यास कांगडा[३५] या सुप्रसिद्ध किल्याविरुद्ध मोगलांच्या कारवाया चालू होत्या. परंतु या नाही त्या कारणाने तो किल्ला जिंकून घेण्याचे बादशाही फौजांचे सारे प्रयत्न फसले. सरतेशेवटी १६१८च्या ऑगस्ट महिन्यात ही मोहीम संपुष्टात नेण्याची जबाबदारी शहाजहान याने आपल्या स्वतःच्या अंगावर घेतली. त्याने राजा विक्रमजीत याला किल्ल्याचा पाडाव करण्यासाठी पाठविले. विक्रमजित याने प्रथम किल्ल्याची पूर्णपणे नाकेबंदी केली आणि नेटाने वेढा चालू केला व किल्ल्यावरील शिबंदीला शरण येण्यास भाग पाडले.

### पुनश्च दक्षिण

परंतु साम्राज्याच्या दुसऱ्या एका भागात परिस्थिती झपाट्याने बिघडत चालली होती. शहाजहानचा फार मोठा गाजावाजा झालेला दक्षिणेमधील विजय म्हणजे एक दिखाऊ विजय होता. त्याने निजामशहा आणि आदिलशहा यांच्याबरोबर ज्या अटींवर तह केला होता त्या अटींमध्ये स्थिरतेचा यत्किंचित लवलेश नव्हता. खरोखरीची संधी येताच मोडण्यासाठीच त्या अटी होत्या, आणि ही संधी त्या दृष्टीने योग्य होती. बादशहा हा अतिदूर काश्मीर मध्ये होता. त्याचा पराक्रमी पुत्र त्याच्या बरोबर होता, बऱ्याच मोठ्या संख्येने प्रमुख अधिकारी आणि सेनानी कांगडा येथे गुंतुन पडले होते आणि दक्षिणेमधील मोगल फौजांच्या सेनापतीला मदत येऊन पोहचण्याची शक्यता फार कमी होती. या कारणास्तव आपला गेलेला मुलुख आणि अहमदनगर राज्याची गेलेली प्रतिष्ठा परत मिळविण्यासाठी मलीक अंबर याने आपल्या हालचाली सुरू केल्या.

आपल्या समान शत्रुविरुद्ध दक्षिणेमधील दुसऱ्या दोन्ही सत्तांची मदत मिळवणे त्याला शक्य झाले. कुतुबशहाने द्रव्य देऊ केले आणि आदिलशहाने आपली माणसे त्याच्या दिमतीला दिली. मलीक अंबर याने पन्नास हजार सैनिक जमा करुन मोगलांविरुद्ध आपली मोहीम सुरू केली. त्याने नुकत्याच भरती केलेल्या हलक्या मराठा घोडदळाने शत्रुला आपल्या गनिमी काव्याच्या डावपेचाने जेरीस आणले. त्यांनी शत्रुचे दळण वळणाचे मार्ग तोडले आणि

रसदीचा पुरवठा थांबविला आणि बालाघाटातून त्याला बाहेर काढले. बादशाही फौजांनी मेहेकरकडे माघार घेतली. जवळ जवळ तीन महिनेपर्यंत त्यांनी शत्रुची प्रगती रोखून धरली. परंतु अन्नधान्याच्या वाढत्या चणचणीमुळे त्यांना आणखी माघार घेणे भाग पडले. यामुळे दक्षिणी फौजाना आणखी उत्तेजन मिळाले आणि त्यांनी बालापूरपर्यंत मोगलांचा पाठलाग केला. त्यानी बालापूर पूर्णपणे तुटले. बादशाही फौजांनी आता बुरहाणपूरकडे माघार घेतली. अशा तऱ्हेने बालाघाट आणि पायिनघाट हे दोन्ही मलीक अंबर याच्या हाती पडले. दक्षिणी फौजाच्या हल्ल्याना तोंड देऊन फक्त दोनच शहरे सुरक्षित राहिली आणि ती म्हणजे बुरहाणपूर आणि अहमदनगर ही होत. परंतु या शहरांना-देखील दक्षिणी फौजांनी मोठ्या सख्तपणे वेढा दिला.

बुरहाणपूर येथे खान खानान याची परिस्थिती अतिशय अनुकंपनीय अशी होती. त्याने दरबाराकडे मदतीसाठी विनंत्यावर विनंत्या पाठविल्या. त्याने आपल्या शेवटच्या खलीत्यात कळविले की यापुढे शत्रुविरुद्ध टिकाव धरणे आपल्याला शक्य होणार नाही. त्याने त्याच्यावर ओढविलेल्या परिस्थितीची तुलना अकबराच्या कारकीर्दीत गुजराथमधे अजीज कोका याच्यावर ओढ-विलेल्या परिस्थितीशी केली. त्याने अकबराने आपल्या दूधभावाचे ज्याप्रमाणे संरक्षण केले त्याप्रमाणे जहांगीरने आपले करावे अशी मोठ्या करुणपणाने त्याची याचना केली. त्याने असेही कळविले की असे न झाल्यास आपल्या सैनिकांचा बळी देऊन जोहार करण्याशिवाय आपल्याला गत्यन्तर उरणार नाही.[२६] हा अहवाल जेव्हा जहांगीरपुढे ठेवला गेला तेव्हा त्याचे हृदय हेलावले. त्याच्या बापाने अतिशय हळूवारपणे ज्याचे संगोपन केलेले होते त्या खान खानान ऊर्फ अतालीक याच्याबद्दल त्याच्या मनात फार मोठा आदरभाव होता. कांगडा प्रकरणामुळे अजूनपर्यंत परिणामकारक अशी मदत दक्षिणेमधे पाठविणे त्याला जमले नव्हते. आता ते प्रकरण संपलेले होते आणि त्याचा अधिकारी वर्ग दक्षिणेत जाण्यासाठी मोकळा होता.

### शहाजहानची दुसऱ्यांदा पाठवणी

परंतु या मोहीमेची सूत्रे कोण हाती घेणार हा प्रश्न होता. अशा परिस्थितीत ज्या एका व्यक्तीची निवड जहांगीरने केली असती ती व्यक्ती म्हणजे शहाजहान ही होती. तो कर्तृत्ववान होता. त्याच्या अंगी दक्षता होती त्याचप्रमाणे त्याच्याजवळ जरूर तो अनुभवदेखील होता. जेव्हा बादशहाने त्याला खान खानान याजकडून आलेले खलीते दाखविले, तेव्हा त्याने ही

कामगिरी अंगावर घेण्याचे ताबडतोब कबूल केले. परंतु या प्रसंगी दरबारामधे आपले स्थान तितकेसे सुरक्षित नाही असे त्याला आढळून आले. आपल्याबद्दल नूरजहान हिच्या मनात असलेली मत्सराची भावना आणि आपल्या बापाच्या स्वभावातील चंचलता या गोष्टी त्याच्या नजरेस आल्या. ज्या पक्षाने त्याला आतापर्यंत संपूर्ण पाठींबा दिला होता, त्या पक्षांत आता त्याला फाटाफूट झालेली दिसून येत होती. अर्थात पूर्वी इतकाच वर-वर का होईना हा पक्ष त्याला मान आणि आदरभाव देत होता ही गोष्ट वेगळी. खुश्रावला पुन्हा देण्यात येऊ लागलेली सौम्यपणाची वागणूक, नूरजहान हिच्याबरोबर त्याची दोस्ती झाल्याबद्दलच्या अफवा आणि या सर्वांबरोबर त्याच्या बापाची ढासळत जाणारी प्रकृती या सर्व गोष्टींनी शहाजहानला सावध केले. त्याने खुश्रावला आपल्या ताब्यात देण्यात यावे अशी जहांगीरकडे मागणी केली.[२७] त्याची विनंती मान्य करण्यात आली.

## शहाजहान दारु पिणे सोडून देतो

शहाजहानच्या दृष्टीकोनातून ही मोहीम अतिशय अभूतपूर्व अशा महत्वाची आणि अतिशय अवघड अशी होती. यामध्ये शहाजहानच्या अंगामधे प्रदर्शन करण्याची जी उत्कट लालसा होती याची आणखी भर पडली. सर्वसामान्य जनतेच्या कल्पनाशक्तीला खेचून धरील आणि प्रसंगाचे गांभीर्य सर्वांच्या मनावर ठसविता येईल यासाठी काहीतरी विलक्षण अशी गोष्ट करणे जरूर होते. तो बाबर आणि तिमूर या दोघांना नेहमी आपल्यापुढे आदर्श म्हणून ठेवीत असे. त्याने आपल्या सुप्रसिद्ध पूर्वजांचे अनुकरण करून दारुला पुन्हा कधीही स्पर्श न करण्याची शपथ घेतली. आपल्यापाशी असलेला दारुचा सर्व साठा चंबळ नदीत फेकून देण्याची त्याने आज्ञा केली. त्याचप्रमाणे सोने आणि चांदीचे अतिशय मौल्यवान असे पेले मोडण्याचा हुकूम दिला, आणि ते गरीब आणि गरजू लोकांमधे वाटून टाकले.[२८]

उज्जयनी येथे मांडूचा सेनापती महमद तकी याच्याकडून शहाजहान याला पुढीलप्रमाणे बातमी मिळाली, ती अशी : मनसूरच्या नेतृत्वाखाली जवळ-जवळ आठ हजार दक्षिण्यांनी नर्मदा नदी ओलांडली असून त्यांनी आजूबाजूच्या जिल्ह्यात लुटालूट केलेली आहे. त्याचप्रमाणे ते किल्ल्याच्या दिशेने आगेकूच करीत असून संरक्षणाच्या दृष्टीने किल्ल्याची काहीही तयारी नाही. महमद तकी याच्या मदतीसाठी शहाजहान याने अबुल हसन आणि बैराम बेग यांची

रवानगी केली. आपल्या मदतीसाठी कुमक येत असल्याची बातमी कानावर येत असल्याचे ऐकून महमद तकी किल्ल्याबाहेर पडला आणि त्याने शत्रुवर हल्ला करून त्याला पळवून लावले. त्याच्या मदतीसाठी आलेल्या सैन्याचे आगमन झाल्यानंतर महमद तकी याने दक्षिणी फौजांविरुद्ध पुन्हा आक्रमक पवित्रा घेतला आणि ४ कोसपर्यंत त्यांचा पाठलाग केला. यानंतर बादशाही फौजांनी माघार घेतली आणि अकबरपूर येथे आपली छावणी दिली.[२९]

मांडू येथे शहाजहान याला खान खानान याच्याकडून एक खलीता आला. त्यात त्याने शहाजहान याला मांडू येथेच रहाण्याचा सल्ला दिलेला होता. याबद्दल त्याने कारण असे दिलेले होते की आपण स्वतः बुरहाणपूर येथे छावणी करुन आहोत. त्याचप्रमाणे आपली माणसे एकत्रित करणे आपल्याला शक्य नाही आणि शत्रुची संख्या जवळ-जवळ ६० हजार एवढी आहे. परंतु ही योजना शहाजहान याला संमत झाली नाही. त्याच्या यशाचे गुपीत गतीमानता, आणि अकस्मिकता यांच्यामधे होते, आणि या गोष्टी विचारात घेतल्यानंतर तो शत्रू आपल्यापेक्षा संख्येने प्रबळ आहे याची पर्वा करीत नसे. सुदैवाने या सुमारास अब्दुल्ला खान फिरोजजंग हा कालपीहून आपली दोन हजार फौज घेऊन दाखल झाला. शहाजहानजवळ आता एकूण १८००० माणसे होती. त्याने २५ मार्च १६२१ रोजी मांडू येथून कूच केले आणि तो सैन्याची व्युहरचना करून बुरहाणपूरच्या दिशेने निघाला. सैन्याच्या आघाडीचे नेतृत्व अबदुल्लाखान याच्याकडे होते, उजव्या फळीचे राजा विक्रमाजीत याच्याकडे, डाव्या फळीचे अबुलहसन याच्याकडे आणि सैन्याच्या मध्यभागाचे खुद्द राजपुत्राकडे होते. अशा तऱ्हेने अतिशय संघटित स्वरुपात आणि सैन्याच्या फळीत कोणालाही शिरकाव करता येणार नाही अशा पद्धतीने कोणत्याही तऱ्हेचे संकट न येता शहाजहान नर्मदा नदी ओलांडून गेला. जेव्हा शहाजहान बुरहाणपूरनजीक आला तेव्हा किल्ल्याचे रक्षण करण्यासाठी इतराना मागे ठेवून खानखानान हा एकटाच त्याला भेटण्यासाठी आला. कारण जर का किल्ल्यामधून सर्व माणसे बाहेर गेलेली आहेत हे शत्रुला आढळले असते तर त्याने किल्ला जिंकून घेण्याचा प्रयत्न केला असता.[३०]

**बूरहाणपूरमधे प्रवेश**

४ एप्रिल १६२१ रोजी राजपुत्राने बुरहाणपूरमध्ये प्रवेश केला. परंतु दक्षिण्यानी त्याची काहीही दखल घेतली नाही आणि शहराभोवतालच्या आपल्या जागांना ते धरून राहिले. या ठिकाणी सल्लागार मंडळाच्या झालेल्या बैठकीत खान खानान याने पुन्हा एकदा कालापहरण करण्याचे धोरण स्वीकारण्याचा

सल्ला दिला. त्याने असे सुचविले की तूर्त शत्रुला नदीच्या पलीकडे हाकलून देण्यात यावे आणि बालाघाट जिंकून घेण्यासाठी करण्यात येणारी पुढील कारवाई पावसाळा संपेपर्यंत स्थगित करावी. या सूचनेला अबुल हसन, अबदुल्ला खान आणि दाराब खान यांनी आपला पाठिंबा आणि अनुमोदन दिले. परंतु राज-पुत्राने या सूचनेचा अव्हेर केला आणि दक्षिणेतील प्रकरणाला अतिशय झपा-ट्याने आणि परिणामकारण तडाखा देण्यासाठीं तयारी करण्यास सुरुवात केली.[३१]

## दक्षिणेमधील मोहिम

त्याच्यासमोर आता जो प्रश्न निर्माण झाला तो म्हणजे आपल्या अनुयायांची संख्या कशी वाढवावी हा होता. तो सोडविण्यासाठी शत्रूने ज्या जमिनदारांच्या जमिनी हिसकावून घेतलेल्या होत्या त्यांना बोलवण्यात यावे असा हुकूम त्याने आपल्या वक्षींना दिला. त्यांना भरपूर द्रव्याचा पुरवठा करण्यात आला आणि शक्य तेवढ्या लवकर त्यांनी त्यांना नेमून दिलेले सैन्य पाठविण्याचा हुकूम देण्यात आला. अशा तऱ्हेने अगदी थोड्या अवधीत जवळ-जवळ ३०,००० सैनिकांची जमवा-जमव करण्यात आली. या सैन्याची विभागणी पांच पलटणीमधे करण्यात आली. त्यापैकी दोन खुद्द राजपुत्राच्या सैनिकांच्या होत्या आणि त्यांचे अधिपत्य अनुक्रमे राजा भीम आणि राजा विक्रमाजित यांच्याकडे होते. उरलेल्या तिन्हींपैकी एकीचे नेतृत्व दाराबखान याच्याकडे, एकीचे अबदुल्लाखान यांच्याकडे आणि तिसरीचे अबुल हसन याच्याकडे. सैन्याचे औपचारिक सेनापतीपद हे दाराब खान याच्याकडे होते. परंतु खरी हुकमत राजा विक्रमाजीत याच्या हाती सोपविण्यात आलेली होती. दाराबखान याच्या छावणीमधे सर्व सेनापतींनी विचार विनिमय करावयाचा होता.[३२] शत्रूने गनिमीकाव्याच्या युद्ध तंत्राचा अवलंब केल्यामुळे अतिशय जागरुक राह-ण्याची जरुरी होती. म्हणून शहाजहान याने प्रत्येक पलटणीची विभागणी चार तुकड्यामधे करण्यात यावी आणि या चार तुकड्यांनी आळीपाळीने आघाडी आणि पिछाडीवर पहारा करावा असा हुकूम दिला. त्याप्रमाणे मोगल सैन्य नदीच्या दिशेने हळूहळू पुढे सरकत असताना दक्षिण्यांनी पिछाडीकडून त्यांच्यावर याकूत-खानाच्या नेतृत्वाखाली हल्ला केला. पिछाडीकडे संरक्षणासाठी अबुल हसन हा होता. थोड्याश्या परंतु घनघोर युद्धानंतर शत्रुला पळवून लावण्यात आले. नदी ओलांडल्यानंतर मलकापूर येथे बादशाही फौजावर दक्षिण्यानी पुन्हा हल्ला चढविला परंतु तो मोडून काढण्यात आला. अशा तऱ्हेने पुढून आणि पाठीमागून, उजवीकडून आणि डावीकडून शत्रू तंग करीत असताना अतिशय कष्टाने बादशाही फौजांनी बालाघाटमधे प्रवेश केला. दक्षिणी फौजांबरोबर अधून मधून

चकमकी झाल्यानंतर त्यानी बालाघाट ओलांडला आणि ते खडकी येथे पोहोचले. तेथे पोहोचल्यावर त्यांनी केवळ विध्वंस करावयाच्या भावनेने खडकी येथे पूर्वीच्या १५ वर्षात उभारण्यांत आलेल्या सर्व इमारतींचा नाश केला. ५ मे १६२१ रोजी त्यांनी दौलताबादकडे कूच केली. त्यामधे त्यांचा उद्देश मलीक अंबर याला जबरदस्तीने शरण आणण्याचा होता. परंतु तेथपर्यंतचा मार्ग हा अडथळयांनी भरलेला होता. दक्षिण्यानी त्यांच्यावर सर्व बाजूंनी हल्ले केले, मोगलांना जबरदस्त धडा शिकवला आणि त्यांनी आपल्यासमोर जे उद्दिष्ट ठेवले होते ते साध्य करणे किती अशक्य आहे हे दाखवून दिले. दौलताबाद घेण्याचा प्रयत्न मोगलांना सोडून द्यावा लागला.

या सुमारास दक्षिणी फौजानी अहमदनगरला अतिशय सख्त असा वेढा दिला होता. त्या शहराच्या मदतीला जाण्याचा बेत बादशाही फौजानी केला परंतु शत्रुने त्यांची वाट अडविली आणि त्यांच्यावर वारंवार हल्ले चढविले. एका प्रसंगी राजा विक्रमजीत याने लढाईच्या मैदानात शत्रु समोरासमोर येईल अशी कारवाई करण्याचा प्रयत्न केला, परंतु पूर्वीप्रमाणे याही वेळी शत्रुने त्याच्याबरोबर लढाई दिली आणि काही काळानंतर पळ काढला. बादशाही फौजांना आपण अतिशय कठीण अशा परिस्थितीत सापडलो आहोत असे आढळून आले. शत्रुच्या प्रदेशात फार दूरवर ते घुसले होते आणि त्यांच्या परतीचा मार्ग तोडून टाकण्यात आला होता. पावसाळयाला जवळजवळ सुरवात झालेली होती आणि वातावरणात भयंकर उष्मा होता.

## मलीक अंबरची शरणागती

शहाजहानचे लक्ष मोहिमेच्या तपशीलावर होते. यासाठी शत्रुकडून बालाघाटमधे कारवाई चाललेली असताना त्याने महमद तकी याच्या हाताखाली दुसरे सैन्य वऱ्हाड आणि खानदेश जिंकून घेण्यासाठी पाठविले. महमद तकी याने थोडयाच अवधीत दक्षिणी फौजेची हकालपट्टी केली आणि दोन्हीं प्रांत ताब्यात घेतले. दरम्यान शत्रुच्या फौजानी पुन्हा बालाघाटमधे प्रवेश केला. त्यामुळे शहाजहान याने महमद तकी याला बालाघाटमधे प्रवेश करण्याची, तेथील डावपेचांच्या दृष्टीने महत्वाची असलेली ठिकाणे ताब्यात घेण्याची आणि मुख्य सैन्याबरोबर दळणवळणाचे मार्ग प्रस्थापित करण्याची आज्ञा दिली. शहाजहानच्या या डावपेचाला प्रत्युत्तर म्हणून मलीक अंबर याने आठ हजार सैन्य देऊन आतीशखान याची नियुक्ती केली. यावर शहाजहान याने राजा भीम याला महमद तकी

याच्या मदतीला जाण्याचा हुकूम दिला. या दोघांनी बासीमचा ताबा घेतला आणि शत्रुच्या सैन्याची हकालपट्टी केली. परंतु अहमदनगरवरचा दबाव त्यामुळे कमी होऊ शकला नाही आणि म्हणून राजपुत्राने हे घडवून आणण्यासाठी नाशिक आणि संगमनेर इकडे सैन्य पाठविण्याचा विचार मनात आणला. परंतु ही योजना प्रत्यक्षात आणण्याचे दृष्टीने तितकीशी सोपी नव्हती. परंतु त्यामुळे मलीक अंबर याचा धीर सुटला आणि त्याने तहासाठी वाटाघाटी सुरू केल्या. त्याच्या प्रतिनिधींनी पाटण येथे राजा विक्रमजीत याची भेट घेतली. याठिकाणी विक्रमजीत याचा आपल्या मुख्य सेनेसह मुक्काम होता. दक्षिणेमधे मोगलांच्या ताब्यात एकेकाळी असलेला प्रदेश त्यांच्याकडे सोपविण्याची आणि दक्षिणेमधील इतर दोन सत्तांपासून अशा तऱ्हेने हमी मिळविण्याची मलीक अंबर यानेत यारी दाखविली. परंतु जोपर्यन्त अहमदनगरमधून मलीक अंबर आपले सैन्य काढून घेत नाही आणि तेथील शिबंदीला जी रसद पाठविण्यात आलेली होती ती कोणताहि त्रास दिल्याशिवाय तेथे पोहोचू देत नाही तोपर्यंत राजा विक्रमजीत याने या योजनेबाबत काहीही ऐकून घेण्यास नकार दिला.

## दक्षिणेमधे शांतता

मलीक अंबर याने मांडलेल्या योजनाबाबत त्याच्या प्रामाणिकपणाची खात्री पटल्यावर राजा विक्रमजीत याने दोन्ही पक्षांमधे होणाऱ्या तहाच्या अटीबद्दल आणखी चर्चा केली. अशा तऱ्हेने आपले सामर्थ्य आणि व्यवहार चातुर्य या दोन्ही गोष्टी मोठ्या कुशलतेने एकत्र आणून शहाजहान याने दक्षिणेमधे शांतता घडवून आणली. परंतु या विजयामुळे जितके स्थैर्य निर्माण व्हावयास पाहिजे होते तितके झाले नाही, आणि दक्षिणेचा प्रश्न हा मोगल साम्राज्याला एखाद्या कर्करोगासारखा ग्रासू लागला. या प्रश्नाने मोगल साम्राज्याची शक्ती पोखरून काढली. परंतु यामुळे शहाजहान याला दोन वेळा यशाच्या शिखरावर नेले. त्यामुळे त्याच्या वैभवात भर पडली आणि त्याच्या किर्तीचा दबदबा निर्माण झाला. नेहमीप्रमाणेच त्याने मोठ्या समरभाटाने आपल्याला प्राप्त झालेल्या यशाची बातमी आपल्या बापाला कळविली-त्याने जी कामगिरी केली, तिची तुलना त्याने अकबराच्या गुजराथेतील कामगिरीबरोबर केली. इतकेच नव्हे तर आपली कामगिरी त्यापेक्षाही श्रेष्ठ आहे याबद्दल जहांगिरीची खात्री पटविण्याचा त्याने प्रयत्न केला. आपल्या कामगिरीच्या भलावणीसाठी त्याने जी पोरकट विचारसरणी मांडली आहे ती वाचतांना गम्मत वाटते. ते काहीही असले तरी त्याच्या सामर्थ्याने उच्च शिखर गाठले होते यात काहीच शंका नाही.[३३]

# तळटीपा

## प्रकरण दुसरे

(१) R. B., Vol. I, p. 288; कजवीनी, पान ६४; मासिर-इ-जहांगीरी-मधे ही संख्या २०,००० आणि १०,००० अशी आहे, पान १३१.

(२) R. B., Vol. I, p. 306; कजवीनी, पाने ६६-६७.

(३) R. B., Vol. I, p. 280.

(४) R. B., Vol. I, pp. 312-14; मासिर-इ-जहांगीरी, पाने १४०-४१; इक्बालनामा, पाने ८६-८७; Beni Prasad's 'History of Jahangir' p. 270; दो, खंड १, पाने १९२-१९३.

(५) R. B., Vol. I, p.3 29; इक्बालनामा, ९०; मासिर-इ-जहांगीरी; पान १४७-ब, कजवीनी, पान ६९.

(६) R. B., Vol. I, p. 336.

(७) R. B., Vol. I, pp. 331 and 335; मासिर-इ-जहांगीरी, पान १४४.

(८) R. B., Vol. I, p. 338; कजवीनी, पान ६९; इक्बालनामा, पान ९०; मासिर-इ-जहांगीरी, पान १४८.

(९) महमद दिजा बेग, R. B., Vol. I, p. 336.

(१०) खुद्द, जहांगीरने, जेव्हां तो बापाच्याविरुद्ध बंड करून उठला होता तेव्हा शहा ही पदवी धारण केली होती, याचे स्पष्टीकरण त्याने असे दिले की त्याचा बाप शहेनशहा होता. म्हणून अशी शक्यता संभवते की आपल्या मुलाला शहा ही पदवी देऊन राजपुत्र खुर्रम इतकाच त्याला स्वतःचा गौरव करून घ्यावयाचा होता.

(११) R. B., Vol. I, p. 337; कजवीनी, पान ६९; मासिर-इ-जहांगीरी, पान १४७ब; इक्बालनामा, पान नं. ७०.

(१२) इक्बालनामा, पान ९१.

(१३) कजवीनी, पान ६९ब, इक्बालनामा, पान नं. ९३, मासिर-इ-जहांगीरी पान नं. १४८ब; R. B., Vol. I, p. 344.

(१४) कजवीनी, पान ७०; R. B.,Vol. I, p. 368; इक्बालनामा, पान ९९; मासिर-इ-जहांगीरी, पान १४९.

(१५) R. B., Vol. I, p. 380; इक्बालनामा, पान १००; मासिर-इ-जहांगीरी, पान १५०; कजवीनी, पान ७१.

(१६) R. B., Vol. I, p. 393; इक्बालनामा, पान १०२; मासिर-इ-जहांगीरी पान १५४, कजवीनी, पान ७२ब.

(१७) R. B., Vol. I, pp. 380.

(१८) R. B., Vol. I, pp. 393-97.

(१९) ,, pp. 399-401

(२०) Beni Prasad, 'History of Jahangir' pp. 289-300.

(२१) R. B., Vol. I, p. 424; दुसऱ्या एका ठिकाणी जहांगीर असे उद्गार काढतो की राज्याच्या विरुद्ध शहाजहानला जे यश मिळाले त्याचे बक्षीस म्हणून गुजरातचा प्रांत त्याच्याकडे नेमून देण्यात आला होता.

(२२) कजवीनी, पान ७७; इक्बालनामा, पान ११०; R. B., Vol. I, p. 443.

(२३) R. B., Vol. II, p. 14; इक्बालनामा, पान ११५.

(२४) R. B., Vol. II, p. 84.

(२५) R. B., Vol. II, pp. 183-86; शहा फत्त आणि इतर ग्रंथात आलेला वृत्तान्त हा बव्हंशी जहांगीर याने दिलेल्या वृत्तांताशी जुळणारा असाच आहे.

(२६) कजवीनी, पान ८८; R. B., Vol. II, pp.155-56 and pp. 187-90.

(२७) कजवीनीने (पान ८९) याबाबत काही उल्लेखनीय विधाने केलेली आहेत. इक्बालनामा, पान नं. १७६; मासिर-इ-जहांगीरी पान १७३.

(२८) कजवीनी, पाने ९०-९१.

(२९) इक्बालनामा, पाने १८१-८२.

(३०) कजवीनी, पान ९२.

(३१) कजवीनी, पान ९३.

(३२) कजवीनी, पाने ९३-९४.

(३३) दक्षिणेमधील हकीकतीचा वृत्तान्त हा कजवीनीचा ग्रंथावार आधारलेला आहे. त्याच्या अगोदर होऊन गेलेल्या इतिहासकारांबरोबर तुलना करतां कजवीनीचा वृत्तान्त अधिक सविस्तर आहे मातमदखानाचा वृत्तान्त पूर्णपणे निराशाजनक आहे; ज्या घडामोडी त्याने आपल्या डोळ्यांनी बघितल्या त्यांची हकीकत देण्याऐवजी तो दरबारातील घडामोडींची हकीकत देण्याकडेच आपले अधिक लक्ष देतो. (पहा कजवीनी, पाने ९१-१०२).

प्रकरण तिसरे

# अपकर्ष ( ग्रहण ) आणि उदय

## शहाजहानचा दर्जा

शहाजहान आता तीस वर्षाचा होता. त्याच्या बालवयापासूनच त्याच्या मनाला महत्वाकांक्षी कल्पनांचे खत पाणी घालण्यात आले होते. अकबर असे उद्‌गार काढावयाचा की आपल्या सर्व नातवंडामधे खुर्रम यानेंच माझ्या पावलावर पाऊल टाकले आहे,[१] जहांगीर त्याच्यावरील अतिप्रेमाने लुब्ध झाला होता आणि त्याला खूष करण्याकरिता कांहीही करण्याची त्याची तयारी असे.[२] तो केवळ सोळा वर्षांचा असतांना हिसार फिरोजाची जहागिरी कीं जी फक्त गादीवर येणाऱ्या युवराजाची जहागिरी समजली जाई ती त्याच्याकडे नेमून देण्यात आली. शहाजहानच्या आयुष्यक्रमांत ही घटना म्हणजे अतिशय महत्वाची अशी ठरली. यानंतर त्याने आखलेली प्रत्येक योजना आणि त्याने हाती घेतलेली प्रत्येक मोहीम यांना अत्यंत विलक्षण असे यश मिळत गेले. त्याच्या वैभवात ही जी जलद आणि सुलभ अशी वाढ होत गेली त्यामुळे तो थोडासा मगरूर[३] आणि दुराग्रही बनला. परंतु त्यामुळे दरबारी असलेल्या त्याच्या वजनात कोणतेही वैगुण्य आले नाही. याउलट त्याच्या स्वभावातील हे विशेष म्हणजे त्याच्या दर्जाला शोभणारेच आहेत अशा दृष्टीने त्याचे अनुयायी त्याच्याकडे बघत. राज्यामधे त्याचा दर्जा सर्वोत्तम होता, आणि साम्राज्यामधे

त्याच्या जहागिरी ह्या सर्वात वैभवसंपन्न होत्या. मोगल सैन्याचा मुगुटमणी ज्याला म्हणता येईल असे सैन्य त्याच्या नेतृत्वाखाली होते. त्याचे डोळे सिंहासनावर लागून राहिलेले होते.

## शहाजहानच्या आकांक्षांवर पडलेले पाणी

थोड्या वर्षापूर्वी शहाजहान आणि त्याच्या महत्वाकांक्षेचे उद्दिष्ट यामधे कोणताही अडथळा नव्हता. परंतु थोड्याच कालावधीत सारे वातावरण बदलले आणि त्याच्या पुढील आशेवर काळे ढग जमा झाले. आतापर्यंत ज्या शक्तिनी त्याला सहाय्य केले होते त्याच आता त्याच्यावर उलटल्या. त्याचे कार्यरत मित्र त्याचे कट्टर शत्रू बनले. आपल्यावर येणारे संकट काय आहे हे त्याने जाणले आणि त्याला प्रतिरोध करण्याचे दृष्टीने विशेषतः समोर आ वासून उभ्या राहिलेल्या दुर्दैवाचा प्रहार कमजोर करण्याचे दृष्टीने त्याने उपाय योजना केली. परंतु जेव्हा त्याला परिस्थितीच्या गांभीर्याची जाणीव झाली तेव्हा फार उशिर झाला होता. त्याने परिस्थितीविरूद्ध सख्त झगडा दिला, आणि त्यांतून जो संघर्ष निर्माण झाला त्याचे स्वरूप भयंकर आणि भितीदायक असे होते. परस्परांना चिरडून टाकणाऱ्या दोन सामर्थ्यशाली महत्वाकांक्षी वृत्तींचा त्याचे बंड म्हणजे एक झगडा होता.

## अनिष्ट सूचक चिन्हे

दक्षिणेमधील त्याच्या दुसऱ्या विजयानंतर शहाजहानच्या नजरेस काही प्रतिकूल लक्षणे आली. त्याच्या मनांत नूरखानाबद्दल अगोदरच संशय होता. परंतु आता त्याला असे आढळून आले कीं त्याचा बाप देखील पूर्वीसारखा त्याच्याबरोबर स्नेहाचे संबंध राखून नाही. त्याला मिळालेल्या यशाच्या बातम्या जेव्हा अफझल खानाने जहांगीरच्या कानांवर घातल्या तेव्हा त्याने त्या बातम्याचे थोडेफार थंडपणाने स्वागत केले. आपल्या रोजनिशीत या घटनेचा त्याने मोठ्या समाधानाने उल्लेख केलेला आहे. परंतु या घटनेची त्याने तोंडभरून स्तुती मात्र केलेली नाही.[४] विजयश्री मिळवून आणणाऱ्या शहाजहानवर त्याने नव्या मानसन्मानाची बरसात केली नाही. त्याने रणदुंदुभी वाजविण्याचा हुकूम केला नाही आणि राजेशाही थाटाची मेजवानी देऊन हा प्रसंग साजराही केला नाही. या सर्व घटना अशुभ सूचक होत्या आणि त्यांनी शहाजहानला आपल्या प्रतिस्पर्ध्याबद्दल विचार करावयास लावले. हे प्रतिस्पर्धी होते तरी कोण ?

## शाहरियार

शाहरियार याचा आता भाग्योदय होण्यास सुरवात झालेली होती. त्याची बढती ८००० जात आणि ४००० सवार या हुद्यावर झालेली होती आणि त्याचा

विवाह महाराणीच्या मुलीबरोबर झालेला होता.[५] परंतु अजूनपर्यंत त्याला आपला वारस म्हणून नियुक्त करण्याचा जहांगीरचा विचार आहे असे सूचित करणारी कोणतीही गोष्ट घडली नव्हती. उलट जेव्हा शुजा आजारी पडला तेव्हां त्याच्या-बद्दलच्या काळजीने तोअतिशय चिंताग्रस्त झाला. त्याने आपण बंदुकीने गोळीबार करणार नाही अशी शपथ घेतली आणि त्याला बरे वाटावे म्हणून त्याने पर-मेश्वराची प्रार्थना केली.[६] पुन्हा जेव्हां शहाजहानने घोड्यांचा पुरवठा करण्याची विनंती केली तेव्हां त्याने शाही पैदाशीच्या घोड्यांपैकी एक हजार घोडे ताबडतोब पाठविण्यासंबंधी हुकूम केला.[७] परंतु ह्या ठिकाणी केवळ बादशहाचे हेतु काय होते हे विचारात घेऊन चालण्यासारखे नव्हते. त्याच्यावर सत्ता गाजविणाऱ्या त्याच्या सम्राज्ञीचा विचार करणेही प्राप्त होते. तिचा बाप आणि तिची आई ही दोघेजण मरण पावली होती. जहांगीरने इतिमाद उद्दौला याची सर्व मिळकत तिच्याकडे लावून दिलेली होती आणि बादशहाच्या नंतर तिच्या सन्मानार्थ वाजविल्या जाणाऱ्या दुंदुभी आणि त्याचप्रमाणे वाद्य वृंद यांनी वाजत गाजत जावे असा हुकूम त्याने सोडला होता.[८] इतर अमीर उमरावांना आपल्या बाजूकडे जिंकून घेण्याचा तिचा प्रयत्न चालू होता आणि तिच्या नवऱ्याच्या चांद्रमासाप्रमाणे येणाऱ्या वाढदिवसाच्या दिवशी झालेल्या तुलाप्रसंगी तिने वरील उमरावांपैकी चाळीस जणांना मानाचे पोशाख दिले.[९]

## परवीज

सिंहासन मिळविण्याबाबत शहाजहानचा दुसरा प्रतिस्पर्धी परवीज हा होता. अलिकडे बापाकडून त्याच्याकडे अधिक लक्ष पुरविले जात होते. काही महिन्याच्या अवधीत त्याच्याकडे एका पाठोपाठ एक असे दोन जासूद पाठविले गेले. प्रथम एक खास मानाचा पोशाख घेऊन इतिमाद उद्दौला हा त्याच्याकडे गेला त्याच्या पाठोपाठ कांही काळानंतर आणखी एक पोशाख, इंद्रनील मणी असलेला रत्नजडीत कमरपट्टा आणि अनेक माणकें आणि बिहारमधे त्याची बदली झाल्याचा हुकूम घेऊन राजा सारंगदेव[११] हा गेला. परवीजकडे मुळामधे अलाहाबाद हा प्रांत होता. त्यापेक्षांही अधिक समृद्ध आणि विस्ताराने मोठा असा बिहारचा प्रांत होता. आपल्या बापाकडून पुन्हां नव्याने दाखविले जाणारे हे प्रेम आणि मायाळूपणा या भावनांबद्दल तशाच तऱ्हेचा प्रतिसाद देण्याचा आपल्या परिने परवीजने प्रयत्न केला. त्याने जेव्हा आपल्या बापाच्या आजारी-पणाची बातमी ऐकली तेव्हां तो जलदीने आग्रा येथे गेला आणि आपल्या आजारी बापाच्या बिछान्याभोवतीं तीन फेऱ्या करण्यापासून कोणतीही शक्ती त्याला प्रतिरोध करू शकली नाही[१२]

### खुश्राव

शहाजहानचा तिसरा प्रतिस्पर्धी खुश्राव हा होता. 'अभूतपूर्व घटनांनी भरलेले जीवन आणि रक्ताने भरलेले थडगे हेच त्याच्या नशिबी लिहिलेले होते'. तो आता शहाजहानच्या ताब्यातील एक कैदी होता. आपल्या मार्गातून त्याला बाजूला करण्यासाठी शहाजहानने त्याचा निर्घृणपणें खून करविला. एल्फिन्सटन आणि बीव्हरीज या दोघांना या घटनेतील शहाजहानच्या सहापराधितेबद्दल शंका आहे.[13] परंतु जहांगीरच्या कारकिर्दीच्या इतिहासकाराने या प्रकरणी शहाजहानचा अपराध सिद्ध करतां येईल इतका प्रचंड पुरावा उपस्थित केलेला आहे.[14] हा पुरावा विस्ताराच्या दृष्टीने जरी पुरेशा असला तरी या पुराव्याचे स्वरूप अप्रत्यक्ष असे आहे कारण या पुराव्यांचा मुख्य भाग म्हणजे परदेशी प्रवाशांनी केलेली निश्चित विधाने हा होय. परंतु दुर्दैवाने याबाबत एक समकालीन असा जो पुरावा उपलब्ध आहे त्यामध्ये या घटनेकडे पूर्णपणे डोळेझाक करण्यात आलेली आहे. महमद सालिह कंबू याने शहाजहानच्या हयातीतच आपलें लिखाण केले आणि शहाजहानवर स्तुतिचा वर्षाव करण्यांत तो एक रतीभरही कमी पडत नाही. अशा परिस्थितींत त्याने जो पुरावा सादर केलेला आहे तो अतिशय विश्वसनीय असा आहे आणि या प्रसंगाचे त्याने जे वर्णन केलेले आहे ते या ठिकाणी संपूर्णपणे उधृत करण्याइतपत योग्य आहे.

### त्याच्या खुनाचा पुरावा

"आपले भाऊ आणि इतर नातेवाईक यांना नाहिसे करून या मर्त्य जगाची त्यांच्यापासून सुटका करणे हे कोणत्याही थोर सम्राटांच्या दृष्टीने पूर्णपणे कायदेशीर आहे कारण त्यांचा समूळ नाश होणे है सर्वसाधारण हितसंबंधांच्या दृष्टीने साधक ठरते. त्याचप्रमाणे अध्यात्मिक आणि प्रापंचिक पुढारी हे स्वहीतासाठी आणि सर्वसामान्यांच्या कल्याणासाठी ते शुभ सिंहासन मिळविण्याच्या मार्गात असलेल्या प्रतिस्पर्ध्याचा संपूर्ण नाश करणे ही गोष्ट विहीत मानतात. अशा सूज्ञ सल्लागारांच्या सूचनेवरून ज्या सुलतान खुश्रावला जहांगीर बादशहाने मद्य सेवनाने मनस्थिती धुंद झालेली असतांना शहाबुलंद इकबाल (शहाजहान) याच्या स्वाधिन केले होते त्याला सोमवार तारीख २२ फेब्रुवारी १६२१ रोजीं तुरुंगाच्या खोल गर्तेतून नाशाच्या मैदानांत पोहचविण्यांत आले. आपल्यावरील संशयाचे किटाळ टाळण्यासाठीं राजपुत्राचा मृतदेह योग्य त्या सन्मानाने आणि आदराने बुरहाणपूर शहराच्यामधून नेण्यात आला. प्रसिद्ध व्यक्ति आणि अधिकारी वर्ग हे सुरावर प्रार्थना म्हणत आणि मंत्र पुटपुटत

राजपुत्राच्या मृतदेहाला वाहून नेणाऱ्या गाडीबरोबर चालत गेले. बुधवारी रात्री राजपुत्राचा मृत देह आमलगंज येथे दफन करण्यात आला."[१५]

वर जे वर्णन आलेले आहे त्याच्या स्पष्टीकरणासाठी कोणत्याही तऱ्हेच्या भाष्याची जरुरी नाही. त्यामध्ये ज्या कांही घटना दिल्या आहेत त्या स्वयं प्रमाण आहेत. जो खून करण्यात आला त्याचे निमित्त त्यामधून मिळते आणि जी घटना त्यामधून घडून आली त्या घटनेचे समर्थनही त्याबरोबरच त्यामधून आपल्याला मिळते. दरबाराबरोबर ज्याचा अतिशय घनिष्ट संबंध होता आणि राज्याचा दफ्तरखाना तपासून बघण्याची ज्याला पूर्ण मुभा होती अशाच व्यक्तिने या घटनांची नोंद केलेली आहे. त्याशिवाय ही व्यक्तिही अशी होती कीं संयुक्तिक पुरावा असल्याखेरीज त्या व्यक्तिने शहाजहानवर अशा राक्षसी गुन्ह्याचा आरोप कधीही केला नसता. खुश्रावचा मृत्यु पोटशुळामुळे होणाऱ्या दुखण्याने झाला ही बातमी ऐकल्यानंतर जहांगीरच्या मनांत कसलाही संशय निर्माण होऊ नये ही गोष्ट अतिशय आश्चर्यजनक वाटते. आपल्या रोजनिशीमध्ये या घटनेची नोंद तो एक प्रकारचे मौन बाळगून आणि कोठल्याही तऱ्हेची भावना न दाखविता करतो.[१६]

### दोषी शहाजहान

दक्षिणेमध्यें हा जो भयंकर खून झालेला होता ती बातमी आल्यानंतर राजकीय वर्तुळात त्याचा कांही परिणाम झाल्याची नोंद समकालीन इतिहासकार करीत नाहीत. परंतु अशातऱ्हेचे भयानक कर्म करणाऱ्या दुरात्म्याबद्दल त्वेषाची भावना निर्माण झाली असली पाहिजे यांत कांहीच शंका नाही. दरबारांमध्ये खुश्रावचे पक्षपाती असलेले जें कांही उमराव होते आणि ज्यांना खुश्रावला ज्या तऱ्हेची वागणूक देण्यात आली त्यामुळे भयानक धक्का बसला त्यांची सहानभूति शहाजहानने निश्चितच गमावली असली पाहिजे. परंतु अशा तऱ्हेच्या भावनात्मकतेबद्दल त्यांनी कधीच पर्वा केली नाही आणि परिस्थितिची जडणघडण ते मोठ्या आत्मसंतुष्ट वृत्तीने बघत राहिले. आता एकंदर घटना अतिशय झपाट्याने वाटचाल करीत होत्या आणि जलद निर्णयाप्रत येणे जरुरीचे आहे याची जाणिव त्याला झाली. परंतु यातून जर आपण असा अर्थ काढला की त्याच्या शत्रुंनी केलेल्या हालचालीमुळे बंड करण्याखेरीज त्याला दुसरा उपाय उरला नाही तर ते चूक ठरेल. या उलट अजूनतरी जहांगीरच्या मनात त्याच्याबद्दल संशय निर्माण झाला नव्हता. नूरजहानने वरवर तरी अशी कोणतीही

गोष्ट केली नव्हती कीं ज्यामुळे त्याला तक्रार करावयाला कारण मिळणार होते. संघर्षाला खरी सुरवात केली ती शहाजहानने.

## शहा अब्बास आणि कंदहार

गेला कांही काळपर्यंत कंदहार जिकून घेण्यासाठी शहा अब्बास याची तयारी चाललेली आहे अशा तऱ्हेच्या बातम्या मोगल दरबारांमध्ये सारख्या येऊन राहिल्या होत्या. परंतु त्या बातम्या विश्वासार्ह आहेत असे समजण्यास जहांगीरचे मन घेत नव्हते. पर्शियन सम्राटाने वरवर मित्रत्व आणि सद्भावना यांचा जो देखावा केला त्यावरच त्याचा विश्वास होता. दोन्हीं दरबारात नियमितपणे वकिलांची देवाण घेवाण होत होती आणि त्या सुमारासच जंबल बेग हा दरबारात वास्तव्य करून होता. जर कां हे मैत्रीचे संबंध कटू करण्याची शहाची इच्छा असती तर हिंदुस्थानमध्ये आपल्या प्रतिनिधीला राहू देण्यांने कांहीच साध्य होणारे नव्हते. मनांमध्यें कसल्याही तऱ्हेचा संशय नसलेल्या मोगल बादशहाने आपल्या मनाचे अशा तऱ्हेचा विचार करून समाधान केले आणि धोक्याची किंचितही भावना न बाळगता तो काश्मिरच्या सहलीवर निघाला. असे दिसते की रावळपिंडी येथे त्याला सुबुद्धि सुचली आणि त्याने अहदींचा बक्षी जैन अल् आबिदीन याला शहाजहानला बोलावून आणण्यासाठी रवाना केले. "विजयी असे सैन्य, पर्वताप्रमाणे प्रचंड असलेले असे हत्ती आणि दक्षिणेच्या सुभ्यात त्याच्यासाठीं मदतीकरिता नियुक्त करण्यात आलेला विविध तोफखाना घेऊन शक्य तितक्या वेगाने" येण्याचा आदेश आबिदीनतर्फे त्याला देण्यात आला.[५७]

## शहाजहानला प्राप्त झालेली सुसंधि

बादशाही जासूद त्याच्याकडे पोहोचण्याचे अगोदरच पर्शियन सम्राटाने कंदहारला दिलेल्या वेढ्याची बातमी शहाजहान याला मिळालेली होती. जैन अल् आबिदीन याचे आगमन झाल्यानंतर जेव्हा त्याला असे आढळून आले की आपल्याकडून मिळणाऱ्या चाकरीची आता जरुरी आहे तेव्हां त्याने असा विचार केला की आपल्या प्रतिस्पर्ध्यांना नामोहरम करण्यासाठी ज्या सबळ भूमिकेची आपल्याला जरुरी आहे त्याकरीता आपल्याला फायदेशीर असा सौदा करण्याचीही योग्य अशी संधी चालून आलेली आहे. परंतु त्याच्या मनांत आपल्या बापाची अवज्ञा करण्याचा जो नियोजित विचार होता त्यावर पांघरुण घालण्यासाठी आणि आपण आपल्या बापाच्या आज्ञांचे पालन करण्याचे कामी कोणतीही

कुचराई करत नाही हे त्याच्या नजरेस आणण्यासाठी त्याने बुरहाणपूरहून कुच केले. वाटेमध्ये त्याला अफझलखान, राजा विक्रमाजीत आणि राजा भिम व त्याशिवाय गोंडवनचे जमिनदार हे येऊन मिळाले. वरील सरदारांनी दक्षिणेच्या सुलतानांकडून जमा केलेला द्रव्याचा भरपूर साठा आपल्याबरोबर आणलेला होता. त्याच्यासमोर जो भविष्यकाळ होता तो अनिश्चित असल्यामुळे त्याच्या साधन संपतीत ही जी भर पडली ती त्याच्या दृष्टीने अतिशय स्वागतार्ह अशी होती.

### शहाजहाननें घातलेल्या अटी

बुरहणपूर आणि मांडू या दोन शहरांच्यामध्ये कुठेतरी शहाजहान याने जैन अल् अबिदीन याला दरबाराकडे परतण्याची परवानगी दिली. त्याने जासूदाबरोबर जे पत्र दिले होते त्यामध्ये त्याने आपल्यातर्फेच्या अटींचे अतिशय धिटाईने प्रतिपादन केलेले होते. संकल्पित मोहिमेचे नेतृत्व आपल्याकडे यावयाचे झाल्यास या अटींची परिपूर्तता त्याअगोदर झाली पाहिजे असे त्याने आपल्या पत्रात सुचविले होते. आपल्याला पावसाळा मांडूमध्ये घालविण्याची परवानगी देण्यात यावी, अधिकाऱ्यांना बडतर्फ करण्याचे आणि बढती देण्याचे अधिकार आपल्याला देण्यात यावेत, पंजाबचा सुभा आपल्याला नेमून देण्यांत यावा, भरपूर द्रव्याचा पुरवठा आपल्याला करण्यात यावा आणि अखेर आपल्या कुटुंबीयांच्या वास्तव्यासाठी आणि संरक्षणासाठी रणथंबोर चा किल्ला आपल्याला देण्यात यावा अशा मागण्या त्याने आपल्या पत्रात केलेल्या होत्या. त्याच्या मागण्यांना उद्धटपणाचा जो दर्प येत होता त्याची तिव्रता कमी करण्यासाठी त्या प्रत्येक मागणीबद्दल सत्याभास निर्माण करणारे स्पष्टीकरण देण्याचा प्रयत्न त्याने केलेला होता. नुकत्याच आटोपलेल्या दक्षिणेतील मोहिमेमुळे त्याच्या सैन्याला जो थकवा आला होता त्यात त्याच्या पहिल्या अटीचे स्पष्टीकरण होते. त्याच्या सैनिकांवर त्याला जो निर्विवाद ताबा पाहिजे होता त्यातून त्याच्या दुसऱ्या मागणीचे समर्थन होत होते. शहा आब्बासच्या कुवतीच्या सुलताना-बरोबर दिर्घकाल चालणारे जे अपेक्षित युद्ध होते त्या युद्धात मुक्तपणे आणि भरपूर प्रमाणात रसदीचा पुरवठा होण्याची जी जरुरी होती त्यामुळे त्याने घातलेल्या तिसऱ्या आणि चौथ्या अटींचे समर्थन होत होते, आणि इतक्या दूरच्या प्रदेशात त्याच्या गैरहजेरीत सुरक्षिततेची भावना निर्माण होण्याची जी जरुरी होती त्यामुळे त्याच्या शेवटच्या अटींचे समर्थन होत होते परंतु सत्य परिस्थितीचे जे भयानक चित्र होते ते दडविण्यासाठी त्याने जो बुरखा पांघरला

होता त्याचे स्वरुप लाक्षणिक अर्थाने झिरझिरीत होते. राजपुत्राने आपला बुरखा फेकून दिलेला होता.[१८]

## जहांगीरला बसलेला धक्का

जेव्हा जैनअलअबीदीन याने असले आव्हानात्मक आणि मगरुर असे पत्र जहांगीरपुढे ठेवले तेव्हा त्याच्या भावनांना जबरदस्त धक्का बसला. कंदहारला वेढा दिला जात आहे ही बातमी त्याला संत्रस्त करण्यास पुरेशी होती. परंतु एकेकाळी त्याच्या अतिशय आज्ञाधारक मुलाकडून आता झालेले अमर्याद वर्तन हे जहांगीरला निश्चितपणे चीड आणणारे होते. तरीदेखील त्याने आपल्या भावनांना आवर घातला, आणि फक्त एवढीच आज्ञा दिली की बारहा आणि बोखाराचे सय्यद, शेखजादे, अफगाण आणि रजपुत यानी जलद कुच करावे म्हणून दक्षिणेकडे सजावलाची रवानगी करण्यात यावी. त्याचा मूळचा बेत परवीज आणि शहाजहान या दोघांना वायव्य सरहद्दीकडे पाठविण्याचा होता आणि म्हणून त्याने परवीजकडे जासूद पाठविले होते. परंतु जेव्हा शहाजहान याने आपली वज्रमुष्टी पुढे केली तेव्हा परवीज याला ताबडतोब बोलावून आणण्याची अधिक निकड भासली. मोहिमेच्या पूर्वतयारीची व्यवस्था करण्यासाठी जहांगीर याने मिरजा रुस्तूम आणि इतिकाद खान याना लाहोर येथे जाण्याचा हूकूम केला.[१९]

## शहाजहान याने केलेला पहिला आघात

दरम्यान शहाजहान याने पहिला प्रहार केला. नूरजहान हिच्या विनंतीवरुन धोलपूरची जहागिरी शाहरियार याला लावून देण्यात आलेली होती. परंतु शहाजहान याने देखील ही जहागिरी आपल्याला मिळण्याबद्दल दरबारकडे विनंती अर्ज केलेला होता. ही जहागीरी आपल्याला मिळेल याबद्दल आत्मविश्वास असल्यामुळे त्याने तिचा ताबा घेण्यासाठी आपली माणसे रवाना केली. हे लोक जेव्हा तेथे पोहोचले तेव्हा त्याना ही जहागिरी शाहरियार याच्या अधिकाऱ्यांच्या ताब्यात आहे असे आढळून आले. आपल्या धन्यासारखे ते गर्विष्ठ आणि तापट असल्यामुळे त्यांची शाहरियारच्या माणसांबरोबर मारामारीला सुरवात झाली आणि त्यांनी जबरदस्तीने त्याना त्यांच्या ताब्यातील जहागिरीतून हुसकावून लावले. ही गोष्ट जेव्हा जहांगीरच्या नजरेस आणून देण्यात आली तेव्हा त्याला अतिशय संताप आला आणि शहाजहानवर आपण जी मर्जी दाखविली आणि त्याच्याबद्दल आपण ज्या इच्छा मनात बाळगल्या त्याबाबत

तो नालायक आहे असा विचार त्याच्या मनात आला. तरीदेखील आपल्या बिथरलेल्या राजपुत्राविरुद्ध अजून हात उचलावयाचा नाही असे त्याने ठरविले आणि समजूतदारपणाचा मार्ग आणि सभ्यतेचा उच्च दर्जाचा रस्ता सोडून त्याच्या पलीकडे आपले पाऊल न टाकण्याबद्दल आज्ञा जहांगीरने त्याला दिली. त्याचप्रमाणे त्याला असे कळविण्यात आले की तो ज्या ठिकाणी आला आहे तेथून त्याने हलू नये आणि कंदहार विरुद्धच्या मोहिमेत ज्या अधिकाऱ्यांची मागणी करण्यात आलेली होती त्याना त्याने धाडून द्यावे. अर्थात शहाजहानने अवज्ञा केल्यास त्याला शिक्षा केली जाईल ही धमकी मात्र त्याला देण्यात आली.[२०]

## शहाजहानवर शाहरीयार याला अग्रहक्क

आपल्या वर्तनाबद्दल समाधानकारक स्पष्टीकरण देण्यात शहाजहान याने मुद्दाम उशीर लावला याची शक्यता संभवते. परंतु त्याच्या या वर्तनामुळे त्याच्या शत्रूचे मात्र विनासायास फावले. नूरजहान ही आपला जावई शाहरीयार याचा भाग्योदय व्हावा म्हणून प्रयत्न करीत होती. तिला आता आपला मतलब पूर्ण करून घेण्याची अतिशय नामी अशी संधि मिळाली. तिचे आपल्या नवऱ्यावर अगोदरच फार मोठे वजन होते. या वजनाचा तिने आता आपला प्रतिस्पर्धी जो शहाजहान त्याच्या वाईटासाठी उपयोग केला. तिने शहाजहान-बद्दल पूर्णपणे खोटी नाटी माहिती जहांगीरच्या कानात भरविली. आणि जहांगीरने तिने ज्या काही खऱ्या आणि अर्धसत्य गोष्टी सांगितल्या त्यावर विश्वास ठेवला.[२१] अशा तऱ्हेने कंदहारच्या मोहीमेचे नेतृत्व शाहरीयार याच्याकडे दिले जाण्यात आणि त्याच्या मनसबीत १२००० जात आणि ८००० स्वार इतकी वाढ करून घेण्यात तिला यश मिळाले. ज्या दिवशी तिच्या जावयाची या मोहिमेवर नेमणूक झाली त्या दिवशीच तिने आपल्या नवऱ्याला खूष करण्या-साठी ६० हजार रुपये किमतीचे दोन तुर्कस्तानी मोती त्याला भेटी दाखल दिले. तिचे आपल्या नवऱ्यावरील प्रभुत्व निर्विवाद होते आणि तिच्या सांगण्यावरून जहांगीरने शहाजहानचा दरबारातील मीर अब्दउस सलाम याची दरबारात भेट घेण्याचे नाकारले. अशा तऱ्हेने नूरजहानच्या यशाने परिसीमा गाठली.[२२]

## अफजल खान याची वकीलात

इकडे दुसरीकडे शहाजहान याला असे आढळून आले की त्याच्या हातातून परिस्थिती निसटत चाललेली आहे. दो आब आणि हिसार फिरोजा या सरकारातील त्याच्या जहागिरी देखील जप्त करण्यात आल्या होत्या.

शहाजहान याने निश्चितपणे त्याला पेलता येणार नाही असा पवित्रा टाकला होता. अगदी शेवटचा उपाय म्हणून आपले हेतू शांततापूर्ण असल्याबद्दल आपल्या बापाची खात्री पटविण्यासाठी आणि बायकोच्या सल्ल्यानुसार त्याने वागू नये म्हणून त्याचे मन वळविण्यासाठी त्याने आपला दिवाण अफजल खान याची दरबाराकडे रवानगी केली. जहांगीरने या जासूदाची भेट घेतली परंतु त्याच्या युक्तीवादाचा जहांगीरच्या मनावर फारसा परिणाम झाला नाही. त्याला असे स्पष्टपणे दिसून आले की, शहाजहानच्या हातून ज्याकाही बेपर्वाईच्या गोष्टी घडल्या त्याना क्षमतेच्या बुरख्याचे पांघरुण घालण्याचा त्याचा प्रयत्न चालला आहे. अशा तऱ्हेने अफजल खानाच्या वकीलातीला अपयश आले. जहांगीरने मानाचा पोशाख देऊन त्याला निरोप दिला. काही काळानंतर गुजराथ माळवा, दक्षिण आणि खानदेश हे सुभे शहाजहानला लावून दिल्याचे हुकूम जहांगीर याने काढले. त्याचप्रमाणे त्याला पसंत असेल त्या कोणत्याही ठिकाणी आपले कायम निवासस्थान ठरवून घेण्याबद्दल त्याला सांगण्यात आले.[२३]

## शहाजहान बंड करतो

अफजल खानाचे परत येणे आणि त्याच्या प्रतिस्पर्ध्यांच्या दरबारातील हालचाली यामुळे परिस्थिती आवाक्याबाहेर गेल्याची आणि माघार घेण्यासाठी वेळ नसल्याची शहाजहानला खात्री पटली. अशा तऱ्हेने इतर कोणत्याही गोष्टी-पेक्षा त्याने ज्या चुकीच्या मार्गाने जाण्याचे ठरविले त्याचा परिणाम असा झाला की त्याला ज्या मार्गाचा अवलंब करणे भाग पडले तो मार्ग साम्राज्याप्रमाणे त्याला स्वतःलाही नाशकारक ठरला. एका बाजूला त्याची प्रतिष्ठा, त्याची इभ्रत आणि त्याने इतक्या काळपर्यंत आपल्या उराशी ज्या आकांक्षा बाळगल्या होत्या त्या सर्वांचा नाश त्याच्यासमोर उभा होता. तर दुसऱ्या बाजूला उघड उघड बंडखोरी. त्याने दुसऱ्या मार्गाचा स्विकार केला आणि त्यायोगे तो जे गमावणार होता ते मोठ्या धाडसाने मिळविण्याचा प्रयत्न त्याने केला. साम्राज्यामधल्या महत्वाच्या भागामधे एकाचवेळी उठाव करून त्याने शत्रूला चिरडून टाकण्याचा बेत केला. त्यानुसार त्याने राजा बासु याचा मुलगा जगतसिंग याला त्याच्या देशात पंजाबमधील डोंगराळ भागात बंड करण्यासाठी रवाना केले[२४] आणि त्याने स्वतः आग्रा शहराकडे मोर्चा वळविला.[२५]

## एक विचित्र योगायोग

जेव्हा राजपुत्र सलीम याने आपल्या बापाविरुद्ध बंड केले तेव्हा त्याचा पहिला प्रयत्न आग्रा शहराचा ताबा मिळविण्याचा होता आणि आता जेव्हा राज-

पुत्र शहाजहान याने बंड केले तेव्हा त्यानेहि तोच प्रयत्न करावा हा विचित्र योगायोग दिसतो. याचे कारण शोधण्यासाठी आपल्याला फार दूर जाण्याची जरुरी नाही. आग्रा हे सार्वभौम बादशाही शासनाचे प्रमुख ठिकाण होते आणि संबंध मोगल संपत्ति तेथे एकत्रित केलेली होती. सारांश ज्या व्यक्तीला आग्रा शहराचा ताबा घेता येणे शक्य होते त्या व्यक्तीला या घटनेचा निश्चितपणे फार मोठा लाभ उठविता आला असता. परंतु दोन्ही वेळेला हे प्रयत्न फसले. पहिल्या प्रसंगी आग्रा शहराचा सुभेदार कुलीजखान याने बंडखोर राजपुत्राविरुद्ध अतिशय खंबीर अशी भूमिका घेतली आणि या प्रसंगी इतिबार खान हा खोजा आल्या प्रसंगाला पुरून उरला आणि त्याने बंडखोरांच्या हातातून राजधानीचा बचाव केला.[२६] जेव्हा शहाजहान आपल्या सैन्यासह फत्तेपूर शिक्री समोर येऊन दाखल झाला आणि त्याने जेव्हा आग्रा शहराच्या दिशेने कूच केले तेव्हा आग्रा शहराचे दरवाजे त्याच्याविरुद्ध बंद झाल्याचे त्याला आढळून आले. यावर त्याने विक्रमजीत याला शहराची लूट करण्यासाठी पाठविले. त्याने ही कामगिरी मोठया यशस्वीरीतीने पार पाडली आणि शहरातील अनेक सरदाराची संपत्ति लुबाडली[२७]

**जहांगीरचे दुःख**

शहाजहान याने उत्तरेच्या दिशेने जी कूच केली त्यामुळे जहांगीरचे मन अतिशय दुःखावले. त्याने शहाजहान याला जी विशेष वागणूक दिलेली होती आणि त्याच्याबद्दल जो दयाळूपणा दाखविला होता त्याचप्रमाणे त्याच्यावर त्याने मानमरातब आणि पदव्या यांची जी स्वैर-खैरात केलेली होती ते सर्व त्याच्या डोळ्यासमोर उभे राहिले. या घटनेमुळे त्याला जो निराशेचा धक्का बसलेला होता तो इतका भयंकर होता की तो सहन करणे त्याच्या शक्ती पलीकडचे होते. आपल्या विचलित झालेल्या मनाच्या स्थितीचे त्याने मोठ्या करुण रसपूर्ण असे वर्णन केलेले आहे. "दुःख आणि दुर्बलता आणि माझ्या प्रकृतीला कधीही मानवणार नाहीं अशा गरम वातावरणात घोड्यावर बसणे आणि क्रियाशील राहणे मला भाग आहे. अशा परिस्थितीत देखील माझी अशी अवस्था करणाऱ्या मुलाविरुद्ध मला चाल करून गले पाहिजे. गेली अनेक वर्षेपर्यंत ज्यांच्याशी मी अतिशय प्रेमानें वागलो आणि ज्याना मी अमीर पदाची प्रतिष्ठा दिली अशा माझ्या चाकराना आज मी खरे म्हटले तर उजबेग आणि पर्शियन यांच्याविरुद्धच्या लढाईत उपयोगात आणले पाहिजे. परंतु आज वेळ अशी आलेली आहे की त्यांच्या अधमपणाबद्दल त्यानां मी शिक्षा केली पाहिज आणि माझ्या हाताने त्यांचा नाश केला पाहिजे."[२८]

### मुसवी खानाची वकीलात

परंतु अशा अतिशय आणीबाणीच्या प्रसंगी त्याला होणारे दुःख आणि काळजी याची कदर करावयाची नव्हती. शहाजहान याने राजसत्तेच्या अधिकाराला आव्हान दिलेले होते आणि म्हणून त्याला शिक्षा होणे हे जरूर होते. जेव्हा आग्रा शहराच्या दिशेने होणाऱ्या शहाजहानच्या प्रगतीची बातमी जहांगीरच्या कानावर घालण्यात आली तेव्हा अशा प्रकारच्या मूर्खपणाच्या कृत्यापासून त्याला परावृत्त करण्यासाठी जहांगीरने मुसवीखान याची रवानगी केली.[२९] मुसवीखानाने फत्तेपूर येथे राजपुत्राची भेट घेतली. आपले म्हणणे काय आहे ते बापाच्या कानावर घालण्यासाठी शहानहान याने अब्दुल अजीज याला मुसवी खानाबरोबर पाठविण्याचे ठरविले. परंतु अब्दुल अजीज याचे काय सांगणे आहे ते ऐकून घेण्याच्या मनस्थितीत जहांगीर नव्हता. त्याने अब्दुल अजीज याची कैद खान्यात रवानगी करण्याचा हुकूम दिला.[३०] वस्तुस्थिती अशी होती की जहांगीरने मुसवीखानाला शहाजहानकडे जे पाठविले होते त्यात त्याचा उद्देश मिळेल तितका वेळ पदरात पाडून घेण्याचा होता. राजपुत्र परवीज याला अतिशय वेगाने निघून येण्याबद्दल तातडीचा निरोप देऊन जासूद रवाना करण्यात आलेले होते आणि बादशहा त्याच्या आगमनाची वाट पहात होता.

### महाबतखानाचे आगमन

दरम्यान महाबत खानाला तातडीचा निरोप देऊन बोलाविण्यात आलेले होते. तो दरबारात येऊन दाखल झाला. सहाजिकच बादशाही कामकाजावर देखरेख ठेवण्याचे काम त्याच्या हाती गेले.[३१] बंडखोर राजपुत्राबरोबर ज्यांचा विश्वास घातकी पत्रव्यवहार आहे असा एक पक्ष अस्तित्वात असल्याचे आणि त्याचे प्रमुख पुढारी मुहतरीम खान, खलील बेग झुलकद्र आणि फिदाईखान हे आहेत ही गोष्ट त्यानें ताबडतोब बादशहाच्या नजरेस आणून दिली. त्यांना कैदेत टाकण्याचा हुकूम देण्यात आला आणि त्यांच्याबाबत संपूर्ण चौकशी करण्यात आली. गिरजा रुस्तम यानें खलील बेग हा बेईमानी असल्याचे शपथपूर्वक सांगितले आणि त्याने दिलेल्या पुराव्याला नुरुद्दीन कुली याने पुष्टी दिली. त्याचप्रमाणे मुहतरीम खान याच्या विश्वास घातकी वर्तनाबद्दल अबुसईद याने शपथपूर्वक सांगितले. त्या दोघानां ठार करावे अशी आज्ञा जहांगीर याने महाबतखान याला दिली. परंतु फिदाईखानाविरुद्ध असलेले आरोप सिद्ध करता

आले नाहींत आणि म्हणून त्याची सुटका करण्यात आली आणि त्याला पुन्हा त्याच्या अधिकारावर नेमण्यात आले[३२]

### शहाजहान याचे पक्षपाती : आसफ खान

दरबारामध्ये काही व्यक्तींचा एक गट होता आणि त्यांची शहाजहानाकडे गुप्त सहानुभूति होती याबद्दल काहीच संशय नाही. यामध्ये राजपुत्राचा सासरा आसफखान हा प्रमुख होता.[३३] त्याने आपल्या कौशल्याने आणि चातुर्यानें आपल्या मनातील खरे बेत लपविण्यात यश मिळविले आणि शेवटच्या क्षणापर्यंत त्याने आपल्या निष्ठेबद्दल जहांगीराला संशय येऊ दिला नाही[३४] तो जरी मनानें शांत असला आणि वरवर आपला काहीही संबंध नाही असे दाखवित असला तरी त्याचा पाठींबा हा शहाजहान याला फार मोठ्या सामर्थ्यासारखा होता. शहाजहानच्या बंडात त्याचा प्रत्यक्ष भाग किती होता त्याची नोंद दरबारी इतिहासकारानीं केलेली नाही. परतु त्याचा पुढाकार हा निश्चित डोळ्यात भरण्यासारख्या असला पाहिजे यात काहीच शंका नाही. जेव्हा त्याला आग्र्याहून[३५] खजिना आणण्यासाठी रवाना करण्यात आले तेव्हां त्याने आपल्या हालचालींची बातमी शहाजहान याला दिली आणि त्याला हा खजिना आणणाऱ्या तांड्यावर हल्ला करण्यात उद्युक्त केले असे आपण गृहीत धरल्यास त्यामध्ये अतिशयोक्ती होईल असे वाटत नाही. शहाजहान यांने उत्तरेकडे जे कूच केले त्याची कारण मिमांसा आपल्याला यात मिळते परन्तु या तांड्याचे नेतृत्व इतिबारखान याच्याकडे होते. त्यानें मोठ्या अक्कल हुषारीने या बेतापाठीमागील कावा ओळखला आणि राजपुत्राच्या होणाऱ्या धोकादायक हालचाली लक्षात घेऊन त्याने आसफखानाला खजिना घेऊन जाऊ दिले नाही[३६].

### मोतमद खान

विरोधकांच्या छावणीतील शहाजहानच्या बाजूचा दुसरा भारी पक्षपाती मोतमदखान हा होता. बादशाहाला चांगले काय आणि वाईट काय याबाबत सल्ला देणारा तो सल्लागार होता[३७] इतक्या विशेष अधिकार युक्त पदावर असल्यामुळे त्याला दरबारात होणाऱ्या घटनांची तासा तासाला खबर मिळत असे. या तऱ्हेने त्याला मिळणारी खबर तो राजपुत्राकडे गुप्तपणे कळवित असे आपली स्वतःची कातडी बचावण्याकरिता त्यानें आपली कामगिरी पार पाडण्यासाठी मुहतरीम खान आणि खलील बेग या दोघांचा उपयोग करून घेतला

असण्याची शक्यता संभवते. परंतु वरील गोष्टींमधून त्यांना जो काही थोडाफार फायदा उठविता आला असेल त्याचे मोल मात्र त्यांना आपल्या प्राणांच्या रूपाने द्यावे लागले. मोतमदखान आपल्या ग्रंथात असे म्हणतो की महाबत खानाने बादशहाकडे त्याच्याविरुद्ध देखील तक्रार केली आणि त्याची बदली काबूल येथे करावी असे सुचविले. परंतु बादशहाने या गोष्टीला आपली संमती दिली नाही[३८].

## शहाजहान याची दिल्लीच्या दिशेने कूच

आपल्या अगोदरच भरपूर असलेल्या खजिन्यात शहाजहान याने आणखी भर घातली आणि आपण आपल्या बापाला भेटण्यासाठी जात आहोत असे जाहीर करून यमुनेच्या काठाकाठाने त्याने आपल्या सैन्यासहित कूच करण्यास सुरवात केली. परंतु त्याचा हा अभिनिवेश जहांगीर उर्फ राजपुत्र सलीम याने अकबराविरुद्ध बंड केले, त्याच्या अभिनिवेशा सारखाच दिखाऊ होता. बादशहा हा दिल्ली येथे येऊन पोहोचला होता आणि दिल्लीच्या दिशेने शहाजहान हा झपाट्याने कूच करून येत आहे, ही बातमी जेव्हा बादशहाला कळली तेव्हा त्याने त्याचा प्रतिकार करण्यासाठी सैन्याची जमवा जमव करण्याचा हुकूम दिला. राजपुत्र परवीज याच्या येण्याची वाट पहात बसणे आता शक्य नव्हते. म्हणून सैन्याचे नेतृत्व महाबत खान आणि अबदुल्ला खान या दोघांकडे देण्यात आले. सैन्याची आघाडी, दळण वळणाच्या मार्गावर नियंत्रण आणि खबर खाते या बाबतचे अधिकार फिरोज जंग याच्याकडे सोपविण्यात आले.[३९] शहाजहान याने दाराब-खान याची मुख्य सेनापति म्हणून नेमणूक केली आणि त्याचे दुय्यम म्हणून राजा भीम, रूस्तम खान आणि बैराम बेग याना नेमले.

## बिलोच पुरची लढाई

दोन्ही विरोधी फौजामधे दिल्ली जवळ कुबूलपूर आणि बिलोचपूर या गावामधे लढाईला सुरवात झाली. दोन्ही फौजांनी परस्परावर तोफांचा भडीमार केला आणि युद्धाला चांगलेच तोंड लागले. ही लढाई चालू असताना अब्दुल्ला-खान हा पूर्वीच ठरलेल्या बेतानुसार आपल्या अनुयायांना घेऊन विरुद्ध बाजूला जाऊन मिळाला. त्याच्या शहाजहानच्या छावणीमधील आगमनामुळे तेथे भयंकर गोंधळ उडाला. कारण राजा विक्रमजीत सोडल्यास इतर कोणालाही या नियोजित परित्यागाची खबर नव्हती. या संबंधी खबर देण्यासाठी तो दाराबखानाकडे चाललेला असताना वाटेत अचानक एक गोळी लागून तो ठार झाला यामुळे

परिस्थिती अधिकच वाईट झाली. बादशाही फौजांनी मोठ्या धाडसाने विस्कळीत झालेल्या शहाजहानच्या फौजेवर हल्ला केला आणि त्यांना पळवून लावले. राजा विक्रमजीत याचा मृतदेह रणांगणावर तसाच टाकण्यात आला. तेथील खेड्याच्या मुकादमाने त्याचे मस्तक धडावेगळे केले आणि खान आजम याच्याकडे पाठवून दिले. त्याने ते दरबाराकडे रवाना केले.[४०]

## जहांगीरच्या हालचाली

आग्रा शहराच्या दिशेने जहांगीर याने आपली कूच चालू ठेवली. १० एप्रिल १६२३ रोजी तो फत्तेपूर येथे येऊन पोहचला. राजधानीकडे न जाता त्याने अजमीरच्या दिशेने कूच केले. कारण दक्षिणेच्या आपल्या वाटेवर शहाजहान याने त्या रस्त्याने कूच केले होते. तो हिंदुस्थान येथे असताना राजपुत्र परवीज याच्या आगमनाची खबर त्याला देण्यात आली. बलशाली राजपुत्र आणि नामांकित अमीर उमराव यानी त्याला सामोरे जावे असा हुकूम जहांगीरने दिला. काही प्रहरानंतर दरबारामधे औपचारिकरित्या त्याचे स्वागत करण्यात आले. त्याला ४० हजार जात आणि ३० हजार स्वार या मनसबीवर बढती देण्यात आली. त्यानंतर महाबतखान आणि इतर अनेक अधिकारी यांच्याबरोबर बंडखोर राजपुत्राच्या पाठलागावर जाण्याचा हुकूम त्याला देण्यात आला[४१] राज्याचा मुख्य बक्षी सादीक खान याची पंजाबच्या सुभेदारीवर नेमणूक करण्यात आली. जगत सिंग याचा पुंडावा मोडून काढण्याचा हुकूम त्याला देण्यात आला.[४२]

## शहाजहान याची माघार

बिलोचपूर येथे शहाजहानचा पराभव झाल्यानंतर त्याने राजपुतान्यामधे प्रवेश केला आणि राजा जयसिंग याच्या गैरहजेरीत आमेर लुटले. राजा जयसिंग हा त्यावेळी दरबारात बोलाविणे आल्यामुळे राजपुतान्यात नव्हता.[४३] १७ ऑगस्ट १६२३ रोजी तो मांडू येथे पोहोचला परंतु राजपुत्र परवीज आणि महाबत खान यानी त्याचा सख्त पाठलाग चालविल्याचे त्याला जेव्हा कळले तेव्हा त्याने दुसऱ्याच दिवशी आमेर सोडले, आणि बुरहणापूरकडे कूच केले. त्याने असा विचार केला की बुरहाणपूर येथे आपल्याला थोडीफार विश्रांती मिळविता येईल. परंतु बादशाही फौजांनी वाटेतच त्याला गाठले. बडखोरांबरोबर हातघाईवर येण्याचे अगोदर महाबत खानाने शहाजहानकडील खूपशा शिपायांना अमिषे दाखवून आपल्याकडे वळवून घेतले. आपला सबंध तोफखाना घेऊन बर्कअंदाज खान हा शहाजहानला सोडून निघून गेला आणि त्याच्या पाठोपाठ

महमद मुराद बदक्षी, रूस्तूम खान आणि इतर अनेक जण शहाजहानला सोडून गेले.[६४] ही घटना शहाजहान याला नाऊमेद करण्यास पुरेशी होती. परिणामी शहाजहान याने नर्मदा नदी ओलाडली.

### खानखानान याने केलेला विश्वास घात

अखेरचा उपाय म्हणून बादशाही फौजाविरुद्ध नर्मदा नदीच्या तीरावर फळी उभारण्याचा प्रयत्न त्याने केला आणि त्यासाठी त्याने पलिकडल्या बाजूला असलेली सर्व जहाजे अलिकडल्या बाजूला घेतली. त्याशिवाय त्याने दोन्ही तीरावर कडक पहारा ठेवण्यासाठी आणि विशेषतः नदी ओलांडून जाण्याच्या तीरावर लक्ष ठेवण्यासाठी बैराम बैग याची नेमणूक केली. या घटकेस खान खानान याने जो विश्वासघात केला होता त्याची उघडीक शहाजहान याच्या-जवळ करण्यात आली. महाबत खान याच्याकडे त्याचा जो जासूद महमद तकी हा जात असे, त्याला शहाजहानसमोर उभे करण्यात आले. खान खानान याने महाबत खानाला लिहिलेली पत्रे त्याच्याजवळ होती. त्यामधे पुढील अतिशय महत्त्वाच्या ओळी असलेले एक कवन होते.

शंभर माणसे माझ्यावर नजर ठेवून आहेत
नाहीतर मी या त्रासातून पळून गेलो असतो.

जेव्हा शहाजहान याने हे पत्र खान खानान आणि दाराबखान यांना दाखविले तेव्हा त्याबद्दल आपल्याला काहीं माहिती असल्याचे त्यानी नाकारले. परंतु शहाजहान याने सादर केलेला पुरावा हा निर्णायक होता. परिणामी वरील दोघाना त्यांच्या कुटुंबीय मंडळीसहीत बंदीस्त करून ठेवण्यात आले.[६५]

येथून पुढे शहाजहान याने असीरगडच्या दिशेने मोर्चा वळविला. जमाल उद्दीन हुसेन अंजू याचा मुलगा हिसाम उद्दीन याने शहराचे दरवाजे उघडले आणि बंडखोरांना शहरात प्रवेश दिला.[६६] आपल्या काही स्त्रिया आणि जड सामान सुमान तेथे ठेवून राजपुत्राने खान खानान आणि दाराब खान याना-बरोबर घेऊन बुरहाणपूरकडे कूच केले. वाटेवर त्याने राव रतन हाडा याला महाबत खानाबरोबर तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी पाठविले. अशा तऱ्हेच्या कोणत्याही वाटाघाटी होण्यासाठी पहिल्या प्रथम खान खानान याची सुटका होण्याची अट महाबत खान याने घातली. अतिशय निराश अशा मनस्थितीत आणि असहाय्य होऊन शहाजहान याने हात जोडून आणि गुडघ्यावर वाकून शाही पक्षाबरोबर आपली बाजू मांडण्याची भीक खान खानान याच्यापाशी

मागितली. खान खानान याला आपण कसे वागतो आहोत याबद्दल कधीच विधिनिषेध नव्हता. त्याने आपली याचना करणाऱ्या शहाजहान याला आपला शब्द दिला.[४७] परंतु तो नर्मदेच्या दक्षिण तीरावर पोहोचेपर्यंत बादशाही फौजांनी नदी ओलांडलेली होती आणि त्यामुळे बंडखोरांवर त्यांना थोडीशी मात करता आली होती. खान खानानपुढे आता मोठा प्रश्न निर्माण झाला होता. आपण आगेकूच करून जावे का माघार घ्यावी हेच त्याला आता कळेना. अखेर त्याने राजपुत्र परवीज याच्याकडे जाण्याचे आणि आपली चाकरी त्याच्या पायाशी रुजू करण्याचे ठरविले.[४८]

## दक्षिणेतून शहाजहानची ससेहोलपट

बादशाही फौजांचे नदी ओलांडून जाणे आणि खान खानान याने केलेला पक्षत्याग या गोष्टींमुळे शहाजहान गलीत धैर्य होऊन गेला. अतिशय गोंधळलेल्या मनःस्थितीत त्याने १० सप्टेंबर १६२३ रोजी तापी नदी ओलांडली. मलीक अंबर आणि आदिल शहा यांच्याबरोबर चाललेल्या त्याच्या वाटाघाटींना यापूर्वीच अपयश आलेले होते. अशा परिस्थितीत त्याच्यापुढे असलेला एकच मार्ग त्याने स्विकारला आणि तो म्हणजे गोंवळकोंड्यांतून ओरिसाकडे जाण्यासाठी मार्ग शोधण्याचा आणि बंगालमध्ये आपल्या नशीबाची परीक्षा पाहण्याचा. बादशाही फौजांनी ४० करोहपर्यंत त्याचा पाठलाग केल्यांनंतर त्या बुरहाणपूरला परतल्या.[४९] बुरहाणपूर येथे राजपुत्र परवीज याला अगदी आवश्यक असलेली विश्रांति मिळाली. परंतु शहाजहानला मात्र क्षणाचीही उसंत नव्हती. त्याच्या नशीबाला लागलेले ग्रहण हे आता पूर्ण झालेले होते. त्याचे दोस्त त्याच्यापासून दूर गेलेले होते, खुद्द त्याच्या अनुयायांनी त्याला सोडलेले होते, त्याच्या साऱ्या वैभवाचा आता पूर्णपणे लोप झालेला होता. एका जागेहून दुसऱ्या जागेकडे त्याचा पाठलाग करण्यात येत होता. अशा परिस्थितीत त्याचे जीवन म्हणजे दुःखाने काठोकाठ भरलेल्या एखाद्या पेल्यासारखे होते. तरीदेखील त्याच्या हृदयात आपल्याला यश प्राप्त होईल अशा आशा बळावत होत्या. त्याच्या जोरावर त्याने मोठ्या धडाडीने एका मोठ्या नवीन साहसात उडी घेतली.

## कुतूबशहाकडून शहाजहानचे स्वागत

जेव्हा तो गोवळकोंड्याच्या राज्याच्या सरहद्दीपाशी पोहोचला तेव्हा त्याने आपल्यावर ओढवलेली दुःखद आपत्ती महमद कुतूबशहा याचे कानावर

घालून आणि त्याच्यापासून मदत मिळविण्यासाठी मीर अब्द अुस सलाम याला कुतूब शहाकडे रवाना केले. कुतुबशहाने शहाजहानच्या जासुदाचे स्वागत केले आणि त्याला मदत देण्याचे कबूल केले. त्याने जर फार काळपर्यंत कोणत्याही एका ठिकाणी वास्तव्य न केल्यास त्याला आपल्या राज्यातून जाऊ देण्याची परवानगी कुतुब शहाने देण्याचे कबूल केले. त्याशिवाय सरहद्दीवरील आपल्या अधिकाऱ्यांना राजपुत्राला योग्यतापूर्वक आणि सन्मानाने वागविण्याबद्दल हुकूम सोडले. याही पुढे जाऊन त्याने त्याच्याकडे काही द्रव्यही पाठविले. अर्थात कुतुब शहाची ही उदारता अनाठायी ठरली. कारण शहाजहान याने गादीवर आल्यानंतर या उदारतेची परतफेड अतिशय वाईट रीतीने केली.[५०]

## शहाजहान ओरिसा व्यापतो

तेलंगण ओलांडल्यानंतर शहाजहान मसुली पटमच्या बंदरात पोहोचला. तेथून त्याने ओरिसाकडे कूच केली. शहाजहान जेव्हा सरहद्दीवर येऊन पोहोचला तेव्हा त्याला तोंड देण्याची बादशाही फौजांची कोणत्याही प्रकारची तयारी नव्हती. ओरिसाचा सुभेदार अहमद बेग खान याचा चुलता इब्राहिम खान हा बंगालचा सुभेदार होता. त्याने राजपुत्राच्या हालचालीविषयी सूचना[५१] दिली होती. परंतु राजपुत्राच्या हालचाली इतक्या झपाट्याने होतील अशी अपेक्षा त्याने केली नव्हती. यामुळे सरहद्दीच्या रक्षणासाठी कसलीही उपाय योजना न करता किंवा व्यवस्था न करता एका स्थानिक जमीनदाराच्याविरुद्ध तो मोहिमेवर गेलेला होता.[५२] त्याने जेव्हा शहाजहान आल्याचे ऐकले तेव्हा त्याने मोहीम सोडली आणि तो पिपली येथे परतला. परंतु त्याचे साहस त्याला आता सोडून गेले होते. त्याने अतिशय गोंधळात कटककडे माघार घेतली आणि तेथून बरद्वानकडे.[५३] तेथे तो जफरबेग याचा पुतण्या सालीह याला जाऊन मिळाला. आपल्या पुढचा मार्ग मोकळा आहे असे शहाजहानला आढळून आले आणि ओरिसामधे कसलाही प्रतिकार न होता त्याने बंगालमधे प्रवेश केला. बंडखोरांना जाऊन मिळण्याबद्दल सालीह याचे मन बळविता येणे अशक्य झाले. बरद्वान येथे सालीह याने त्याचा प्रतिकार केला. परंतु थोड्याशा चकमकीनंतर त्याचा पराभव करण्यात आला आणि विजयी सैन्याने आपली आगेकूच चालू ठेवली.

## बंगाल

सालीहविरुद्ध मिळालेल्या विजयानंतर शहाजहान याने बंगालचा सुभेदार इब्राहिम खान याला एक पत्र लिहिले. त्यात त्याने त्याला असे कळविले की जर

त्याला आपली मानहानी करून घ्यावयाची नसेल तर त्याने दरबाराकडे निघून जावे अथवा शरण यावे.[५४] परंतु इब्राहिम खानाने मोठ्या धाडसाने शहाजहानला कळविले की जीवात जीव असे तोपर्यंत आपण प्रतिकार करू त्यानंतर तो डाक्क्याहून राजमहालकडे गेला आणि त्या किल्याची त्याने मजबूती केली.[५५] शहाजहान देखील तेथे येऊन पोहोचला. तो स्वतः शहरामधे थांबला परंतु त्याने सय्यद जफर, शुजातखान, सय्यद कासीम आणि सफ्दरखान यांना किल्ल्याला वेढा घालण्यासाठी पाठवून दिले. इब्राहिम खान याने मोठ्या कणखरपणे आणि कौशल्याने किल्ला लढविला. परंतु जेव्हा किल्ल्यामधे असलेल्या काही लोकांच्या शहरामधे असलेल्या कुटुंबियांना पकडण्याचा प्रयत्न बंडखोरांनी केला तेव्हा तो आपल्या माणसांना घेऊन किल्याबाहेर पडला. त्याने बंडखोराबरोबर घनघोर युद्ध केले आणि लढतालढता रणभूमीवर आपले प्राण सोडले.[५६] यावर त्याच्या शिबंदीने शरणागती दिली. शहाजहान याने यानंतर किल्याचा ताबा घेतला आणि तेथून डाक्क्याकडे कूच केले. तेथे त्याला अहमद बेग खान याने शरणागती दिली आणि ४० लक्ष रुपये त्याला देऊ केले. सारा बंगाल देश आता राजपुत्राच्या जणूकाही पायाशी आलेला होता. त्याच्या अगोदरच रीत्या झालेल्या खजिन्यात ३० लक्ष रुपयांच्या लुटीची भर पडली. त्याचप्रमाणे ५०० हत्ती आणि जहाजांचा एक ताफा यामुळे त्याच्याजवळील साधन सामुग्रीत प्रचंड भर पडली. वरील गोष्टींनी त्याचा सुटू पाहणारा धीर सरसावला आणि आपण आता पुढील कारवाई करावी या विचाराने त्याला उद्युक्त केले.

## बिहारच्या दिशेने कूच

बंगाल प्रांताचा ताबा दाराबखान याच्याकडे सोपवून शहाजहान याने आणखी पूर्वेकडे कूच केले. राजा भीम याने पाटणा काबीज केले आणि अशा तऱ्हेने सबंध बिहार सहज बंडखोरांच्या ताब्यात आला[५७]. रोहटासचा अजिंक्य किल्ला सय्यद मुबारक याने बंडखोराच्या स्वाधीन केला[५८]. या ठिकाणाहून अबदुल्ला खान याला अलाहाबादकडे आणि दाराबखान याला औधकडे पाठविण्यात आले. अबदुल्लाखान हा झूसी येथे पोहोचला आणि त्याने गंगा नदी ओलांडली. नंतर त्याने शहरात मुक्काम केला आणि अलाहाबाद किल्ल्याला वेढा दिला. त्याला मदत करण्यासाठी म्हणून आपल्या जवळील जहाजांच्या काफील्यासह शहाजहान जौनपूर येथे येऊन पोहोचला.

## महाबत खान शहाजहानला पळवून लावतो

दरम्यान दरबारातून अतिशय घाईने कूच करून येण्यासंबंधी बोलावणे आल्यावरून[५९] महाबतखान आणि राजपुत्र परवीज याने झपाट्याने दक्षिणेतून

कूच केले आणि बंडखोराबरोबर सामना देण्यासाठी ते अलाहाबादजवळ येऊन पोहोचले. त्यांनी किल्ल्याला वेढा देऊन बसलेल्या अबदुल्ला खान आणि इतर याना हुसकावून लावले आणि त्यांना जौनपूरपर्यंत रेटले. शहाजहानची परिस्थिती आता मोठी अडचणीची झाली होती. तिन्ही बाजूंनी त्याला बादशाही फौजांनी वेढले होते. त्यांनी त्याचा रसदीचा आणि दाण्यागोट्याचा पुरवठा तोडला होता. त्याचप्रमाणे त्याचे बंगालमधील दोस्त जे नावाडी त्यानीही पोबारा केला होता. जीवावर उदार होऊन त्याने लढाईचा धोका स्विकारला. या लढाईत त्याचा पराभव झाला आणि त्याचे बहुतेक अनुयायी ठार तरी मारले गेले किंवा पळून तरी गेले[६०]. त्याने रोहटासच्या दिशेने माघार घेतली. येथे राजपुत्र मुराद याचा जन्म झाला.

## शहाजहान दक्षिणेकडे परततो

त्याचा पूर्वेकडील विजय हा क्षणभंगुर ठरला. बादशाही फौजांनी थोड्याच अवधीत बिहार परत जिंकून घेतला. रोहटास येथे तीन दिवसापेक्षा अधिक मुक्काम करणे अशक्य आहे असे त्याला आढळून आले. त्याच्या दुःखात आणखी भर म्हणून की काय दाराबखान याने त्याच्याकडे पाठ फिरविली.[६१] अशा परिस्थितीत अकबर नगरकडे माघार घेणे त्याला भाग पडले. तेथून त्याने दक्षिणेचा रस्ता धरला. त्याच्याबरोबर दारा आणि औरंगजेब हे दोन राजपुत्र होते. निराशेने कष्टी झालेल्या त्याच्या मनाला त्याच्या विश्वासू अनुयायानी दिलासा देण्याचा प्रयत्न केला. ओरिसा आणि तेलंगण हे दोन प्रान्त त्याने ओलांडले आणि निजामअुल् मुल्क याच्या राज्यात त्याने प्रवेश केला. मलीक अंबर याने मोठ्या प्रेमाने त्याचे स्वागत केले. दोघामध्ये अतिशय घनिष्ट असा मैत्रिचा तह घडून आला. या मैत्रिला साधणार दुवा म्हणजे शाही शासनाबद्दल दोघांनाही वाटत असलेली शत्रुत्वाची भावना.

## बुरहाणपूरला वेढा

आपल्या नव्या दोस्तांच्या साहाय्याने शहाजहान याने मोगलांच्या ताब्यातील दक्षिणेत प्रवेश केला आणि बुरहाणपूरला वेढा दिला. बादशाही फौजानी राव रतन याच्या नेतृत्वाखाली अतिशय कणखर असा प्रतिकार केला. हल्लेखोरांनी अनेकवार हल्ले केले परंतु त्यात त्याना अपयश आले. वरीलप्रमाणे कारवाया चालू असताना महाबत खान आणि परवीज हे दुसऱ्यांदा दक्षिणेमधे आले. परिणामी शहाजहान याला वेढा उठवून रोहन खेडकडे माघार घेणे भाग पडले.[६२] वाटेत तो अतिशय आजारी पडला आणि त्याच्या दुःखात आणखी भर

म्हणून की काय अशा आणीबाणीच्या परिस्थितीत अबुदुल्ला खानहाही त्याला सोडून निघून गेला.[६३]

### शरणागती

शहाजहान याचे मनोधैर्य आता पूर्णपणे खचून गेलेले होते आणि त्याच्या मिजाशीची धुंदी आता ओसरली होती. बादशाही सत्तेबरोबर लढा चालू ठेवणे त्याला आता अशक्य होते. त्याला मदत करावयाला माणसेही नव्हती, ना त्याच्याजवळ द्रव्य होते. अशा परिस्तीत बादशहाने आपल्याला क्षमा करावी असे विनंती अर्ज त्याने दरबाराकडे रवाना केले. यावर बादशहाने त्याला कळविले की त्याने ताबडतोब असीर गड आणि रोहटास बादशाही फौजांच्या हाती सोपविण्याबद्दल आपल्या अधिकाऱ्यांना आदेश द्यावेत आणि याच्यापुढे त्याची वर्तणूक चांगली राहील याबद्दल अमानत म्हणून दारा आणि औरंगजेब या दोन राजपुत्रांना ओलीस म्हणून दरबाराकडे रवाना करावे. शहाजहान याने या मागण्या मान्य केल्या आणि वर तीन लक्ष रु. बादशहाला नजर म्हणून रवाना केले.[६४] परंतु त्याला अजूनही बादशाही मुलखात प्रवेश करावयाची भिती वाटत होती आणि म्हणून त्याने नाशिक येथे आपला मुक्काम केला. अशा तऱ्हेने शहाजहानचे हे बंड संपुष्टात आले. या बंडामुळे जवळ-जवळ तीन वर्षापेक्षा अधिक काळ साऱ्या साम्राजात अशांततेची परिस्थिती निर्माण केली होती. आणि मनुष्यबळ आणि वित्त याची अपरिमित हानी झाली होती. या बंडामुळे शहाजहानला सिंहासन मिळण्याच्या संभवात अधिक वाढ झाली असे म्हणावे तर ती शक्यता देखील नव्हती.

### अपयशाची कारणे

शहाजहानच्या या अपयशाची कोणती कारणे असावीत याची मिमांसा होणे जरूर आहे. पहिल्या प्रथम त्याचे चुकलेले लष्करी डावपेच. त्याने उत्तरेकडे जे कूच केले त्यामुळे तो संकटाच्या खाईत सांपडला आणि त्याने जेव्हा घाईघाईने माघार घेतली तेव्हा त्याला कोणत्याही एका ठिकाणी ठामपणे प्रतिकार करणे जवळ जवळ अशक्य होऊन गेले. दुसरी गोष्ट म्हणजे त्याच्या अधिकाऱ्यांनी त्याला दिलेला पाठिंबा हा मनापासून दिलेला नव्हता. खान खानान आणि दाराब खान हे निव्वळ संधि साधू होते आणि त्यानी त्याची बाजू घेतली ती त्यांना दुसरा मार्ग उरला नाही म्हणून. त्याचप्रमाणे त्याच्या साथीदारामध्ये असे अनेकजण होते की ज्यांचे मन या लढ्यात नव्हते. या कारणामुळे शहाजहानच्या पक्षातील अनेक जणांना आपल्याकडे फोडून घेण्यात महाबत खानाला यश मिळाले.

तिसरी गोष्ट म्हणजे त्याच्या पुष्कळशा विश्वासू सेनानींना आलेला मृत्यू. लढ्याच्या अगदी सुरवातीच्या काळातच राजा विक्रमजीत मरण पावला. आणि जौनपूरनजीक राजा भीम हा ठार मारला गेला. चौथी गोष्ट म्हणजे शहाजहान जवळील अपुरी साधन सामुग्री. आतापर्यंत त्याने जी यशस्वी भूमिका वठविली होती ती त्याला शाही शासनाकडून जो पाठिंबा मिळाला होता, केवळ त्याच्या जोरावरच, आणि आता त्याच शासनाविरुद्ध जेव्हा उभे राहण्याचा प्रसंग त्याच्यावर आला तेव्हा त्याचा पराभव होणार हे विधी लिखितासारखे ठरलेले होते. परंतु त्याला पूर्वी जे विजय मिळाले होते त्यामुळे त्याच्या मर्यादांकडे त्याची डोळे झाक झाली. शहाजहान याची झालेली मानहानी आणि अधःपात यामुळे नूरजहानही आपल्या उद्दिष्टाच्या अधिक जवळ आली असे मात्र झाले नाही.

**नूरजहानचे बेत**

एका प्रतिस्पर्ध्याला दडपण्यात आले परंतु त्याच्या जागी मैदानात दुसरा प्रतिस्पर्धी उभा राहीला. महाबत खान आणि राजपुत्र परवीज यांच्यामध्ये जे घनिष्ठ संबंध निर्माण झाले होते त्यात तिला धोक्याचा इशारा दिसला. महाबत खानाबरोबर तर तिचे जन्माचेच वैर होते. तिने त्याचे अस्तित्व सहन केले याला कारण शहाजहानचा समाचार घेऊ शकेल असा दुसरा कोणताही लायक अधिकारी तिच्या दृष्टीपथात नव्हता. परंतु आता बंडाची इतिश्री झालेली होती आणि म्हणून महाबत खानाला त्याच्या पहिल्या प्रमुख स्थानावर ठेवण्याची गरज उरली नव्हती. त्याशिवाय परवीजपासून त्याची फारकत झाली म्हणजे स्वाभाविकतया परवीजला त्याचा जो सबळ पाठिंबा होता तो नाहीसा झाला असता त्यानुसार महाबत खानाला अतिशय दुरच्या अशा बंगाल प्रांताकडे जाण्याचा हुकून देण्यात आला आणि जहांगीरचा अतिशय राजनिष्ठ सेवक खानजहान याची राजपुत्र परवीज याचा पालक म्हणून महाबत खानाचे जागी नेमणूक करण्यात आली[५५].

**महाबत खानाच्या नाशाचा नूरजहानने केलेला प्रयत्न**

इतके करून नूरजहान थांबली नाही. तिला महाबत खानासारख्या कसलेल्या योध्याचा संपूर्ण नाश करावयाचा होता. आपल्या मनातील अतिशय महत्वाकांक्षी अशा योजना तडीस जाव्या यासाठी तिला अतिशय चतुर अशा माणसाच्या पाठिंब्याची जरुरी होती, आणि एकदा का होईना ती आणि तिचा भाऊ आसफ खान यांनी एका मनाने विचार करण्याचे ठरविले. त्या दोघांनी मिळून महाबत खानविरुद्ध कट रचण्यास सुरवात केली. त्याच्यावर पैशाची अफरातफर केल्याचा

आणि राजनिष्ठा सोडल्याचा असे आरोप करण्यात आले. त्याच्यावरील या आरोपांचे त्याने खंडन करावे असेही त्याला सांगण्यात आले. परंतु त्याच्या शत्रूनी त्याला गोत्यात आणण्यासाठी रचलेल्या या बेताची योग्य ती पारख करण्याइतका बुद्धीमान तो होता आणि म्हणून आपल्या शत्रूना धडा शिकविण्यासाठी त्याने आपल्याजवळ निष्ठा बाळगून असलेल्या रजपूत अनुयायांना बरोबर घेऊन बंगालमधून कूच केले. जेव्हा बादशाही छावणी झेलम नदीवर होत होती तेव्हा तो तेथे येऊन पोहोचला आणि त्याने बादशहा आणि नूरजहान या दोघानाही कैद केले. आसफखान हा अटककडे पळून गेला. परंतु त्याला लौकरच त्याला शरण जाणे भाग पडले[६६]. आपले शत्रू आपल्या हाती आता पूर्णपणे गवसले आहेत अशा परिस्थितीत महाबत खानाने बादशहाला घेऊन काबूलकडे प्रयाण केले. काबूलच्या वाटेवर त्याच्याविरुद्ध अनेक प्रतिकट झाले. आणि परिणामी त्याची सत्ता खूपच कमकुवत झाली. काबूलहून परतताना बादशहाची सुटका करण्यात नूरजहानला यश मिळाले आणि परिणामी महाबत खानाचा दर्जा जो एखाद्या सत्ताधिशासारखा होता तो पालटून त्याची स्थिती एखाद्या बंडखोखोराप्रमाणे झाली. बादशाही फौजेने त्याचा अतिशय सख्तपणे पाठलाग केला. अशा परिस्थितीत महाबत खानाला मेवाडच्या जंगलाचा आसरा घेण्याशिवाय दुसरा मार्ग उरला नाही.

**शहाजहान याचे सिंधकडे कूच**

महाबत खानाच्या अचानक बंडाच्या या बातमीने शहाजहानचे विचार मंथन सुरू झाले. बादशहा काबूलमधे होता आणि दक्षिणेमधे परवीज आणि खान जहान यांच्या पाठीशी भरपूर कामगिऱ्या होत्या. दक्षिणेमधील राज्यकर्त्यांच्या कृपा छत्राखाली आता फार काळ त्याचे वास्तव्य झालेले होते[६७]. मलीक अंबर मरण पावला होता आणि शाही दरबारातील परिस्थिती ही अनिश्चित झालेली होती. तेव्हा आपण दक्षिण सोडावी आणि इराणच्या शहाच्या मदतीने सिंध प्रांत ताब्यात घेण्याचा प्रयत्न का करू नये असा विचार त्याच्या मनात आला. त्याशिवाय नाशिकची हवा त्याच्या प्रकृतीला मानवत नव्हती आणि दक्षिणी लोकांचा विशेषतः हबशांचा विश्वासघात त्याच्या मनात काळजी निर्माण करीत होता[६८]. म्हणून त्याने ८ जून १६२६ रोजी आश्रय घेतलेल्या ठिकाणाचा त्याग केला आणि एका महिन्यानंतर तो अजमीर येथे पोहोचला. तेथे त्याने शेख मुईन उद्दीन चिस्ती याच्या दर्ग्याला भेट दिली. नंतर नागौर आणि जैसल मीर या मार्गे त्याने थत्ताच्या दिशेने कूच केले. त्याचा पूर्वज हुमायून याने राजपुताना

पार करून जाताना जो मार्ग घेतला होता तोच मार्ग शहाजहानने यावे यावेळी घेतला. आक्टोबरच्या सुरवातीस तो थत्त्यासमोर येऊन पोहोचला आणि त्याने त्या शहराला वेढा दिला.

### त्याच्या माघारीची कारणे

परंतु वेढा देऊन एक महिना संपला न संपला तोच त्याला सिंधमधून माघार घ्यावी लागली आणि तेथून दक्षिणेचा मार्ग स्विकारावा लागला. त्याने हा जो निर्णय घेतला त्याला अनेक कारणे झाली. पहिले कारण म्हणजे किल्ला घेण्यात त्याला आलेले अपयश आणि त्याच्या राजा गोपाल दास गौड आणि अलीखान तरीन या दोन एकनिष्ठ अधिकाऱ्यांचा मृत्यू. दुसरे कारण म्हणजे परवीज याच्या गंभीर आजाराची आलेली बातमी. तिसरे म्हणजे महाबत खानाच्या वर्चस्वाचा झालेला शेवट. शेवटचे कारण म्हणजे इराणच्या शहाने शहाजहानबाबत घेतलेली निराशा जनक भूमिका.

### शहाजहानचे पर्शियाच्या शहाबरोबरील संबंध

शहाजहान याचा काही वर्षे इराणच्या शहाबरोबर पत्र व्यवहार चालू होता. शहाकडे त्याने पाठविलेला पहिला जासूद म्हणजे जाहिद बेग हा होता.[६९] तो जेव्हा पर्शियात येऊन पोहोचला तेव्हा त्याला शहा आब्बास कंदहारच्या वेढ्यात गुंतल्याचे आढळून आले. शहा या मोहिमेहून परत येईपर्यंत जाहिद बेग याला शहाच्या भेटीची परवानगी देण्यात आली नाही. परतल्यानंतर जाहिद बेग याने शहाजहान याची फत्तेपूर येथे भेट घेतली. शहाजहान याचा दुसरा वकील ख्वाजा हाजी हा होता. शहाजहान याने जेव्हा दक्षिणेकडे माघार घेतली तेव्हा त्याने त्याला पर्शियाकडे रवाना केले होते.[७०] शहाला राजपुत्राने जे पत्र लिहिले त्यात त्याने कोणत्या परिस्थितीमधे त्याला उत्तरेकडे कूच करावे लागले त्याचे वर्णन केले आहे. याच पत्रात दिल्लीजवळ बादशाही फौजांजवळ त्याला ज्या लढाया द्याव्या लागल्या त्याच्या निकालाबाबत अतिशय संदिग्ध असे उलेख त्याने केलेले आहेत. ह्या पत्राचा शेवट पुढील शब्दाने केलेला आहे. "मी माझ्या पूर्वजां प्रमाणे तुमच्याकडे मदतीसाठी वळलेला आहे आणि मला अशी आशा आहे की योग्य वेळी तुमच्याकडून मला योग्य असा सल्ला मिळेल."[७१] परंतु शहाजहान याने शहाला जी कळकळीची विनंती केली त्याला उत्तर आले ते मात्र अगदी औपचारिक. राजपुत्राने आपल्या बापाबरोबर निष्ठा बाळगावी आणि आज्ञाधारकपणे वागावे असा सल्ला शहाने राजपुत्राला दिला. त्याने असेही सांगितले की त्याच्याबाबत

जहांगीरकडे रद बदली करण्यासाठी आपण आपल्यातर्फे एका वकीलाची रवानगी करीत आहोत.[७२] शहाजहान याने जे तिसरे पत्र पाठविले ते तो शरण गेल्यानंतर. या पत्रात शाही शासनाबरोबर त्याने ज्या अटीवर सलोखा केलेला होता. त्या अटी त्याने शहाला कळविल्या.[७३] कादाचित आपला जासूद ईशक बेग याच्याबरोबर शहाला त्याने तोंडी निरोप दिला असावा आणि आपल्याला मदत करण्याविषयी शहाचे मन वळविण्यास त्याने त्याला सांगितले असावे दुसऱ्या कोणत्याही गोष्टीपेक्षा शहाकडून आपल्याला मदत मिळेल अशी जी त्याला आशा होती त्यामुळे तो सिंधच्या दिशेने कूच करण्यास प्रवृत्त झाला. इराणला कूच करून जाण्याचा आणि तेथून सिंहासनावर ताबा सांगण्यासाठी हुमायून सारखा तेथून परतण्याचाही त्याने मनाशी बेत रचला. परंतु राजपुत्राबद्दल आपला सद्भाव-व्यक्त करण्यापलीकडे आणि राजपुत्राबाबतच्या एकंदर घडामोडी बाबत आणि काळजी व्यक्त करण्यापलिकडे शहाची मजल गेली नाही. पूर्वीच्याच एका प्रसंगी त्याने जो सल्ला दिला होता त्याची उजळणी त्याने या पत्रात केली.[७४]

**परवीज याचा मृत्यू .**

त्याच्या जिवाभावाच्या मित्राने त्याच्याबाबत जी थंडपणाची भूमिका स्विकारली आणि थत्ता येथे त्याचा जो पराभव झाला त्यामुळे शहाजहान याला दक्षिणेत परतण्याशिवाय दुसरा मार्ग उरला नाही. वाटेमधे त्याच्यादृष्टीने आनंदाची अशी परवीज याच्या मृत्यूची बातमी त्याच्या कानावर आली. त्याने ताबडतोब आपली गती वाढविली, कारण या घटनेने त्याच्या हृदयात नव्या आशाना पालवी फुटली. तो प्रवासामधे असताना महाबत खानाने त्याच्याकडे मित्रत्वपूर्ण प्रस्ताव रवाना केले. शहाजहान याने त्याला अनुकूल अशी उत्तरे पाठविली. १६२६ च्या नोव्हेंबरमधे तो नाशिक येथे पोहोचला. तेथे त्याला खिदमत परस्तखान आणि सय्यद मुजफर बारहा हे येऊन मिळाले. नाशिकची हवा त्याच्या प्रकृतीला मानवण्यासारखी नसल्यामुळे निजामअुल्मुल्क याच्या परवानगीने तो मार्चमधे जुन्नर येथे गेला. याठिकाणी मलीक अंबर याने एक अतिशय सुंदर असे निवास-स्थान बांधलेले होते. येथे २२ आक्टोंबर १६२७ रोजी महाबत खान हा दोन हजार घोडेस्वार घेऊन आला.[७५] पुन्हा दुसऱ्यावेळी शहाजहानचे नशीब जोरावर येणार की काय असा रंग दिसू लागला.

**जहांगीरचा मृत्यू**

दरम्यान दरबारातील घडामोडीमधे विलक्षण झपाट्याने बदल होण्यास सुरवात झाली होती. महाबत खानाच्या गुलामगिरीमधून सोडवणूक झाल्यानंतर

जहांगीर हा काश्मीरमधे गेला, कारण त्याच्या प्रकृतिला लाहोरची उष्णता आता मानवत नव्हती. परंतु या ठिकाणी त्याची जुनी तक्रार म्हणजे दमा हा परत जोराने उसळून आला. त्याचप्रमाणे राजपुत्र शाहरीयार हा देखील कसल्यातरी रोगाने आजारी पडला. यावर जहांगीरने लाहोरला परतण्याचे ठरविले. लाहोरला दरबार पोहोचण्याचे अगोदर तेथे जाण्याचा आणि त्याठिकाणी आपल्या औषध पाण्याची व्यवस्था करण्याचा हुकूम राजपुत्राला देण्यात आला. वाटेमधे जहांगीरच्या प्रकृतीत अतिशय बिघाड झाला आणि रविवार दिनांक २९ आक्टोबर १६२७ रोजी त्याचा राजौरी येथे देहान्त झाला.

बादशहाच्या मरणामुळे वारसाचा प्रश्न पुन्हा प्रामुख्याने पुढे आला. अशा तऱ्हेची बिकट परिस्थिती आज ना उद्या ओढवणार या अपेक्षेने बराच काळपर्यंत आपले वर्चस्व टिकून राहावे यासाठी नूरजहान हिचे अटी तटीचे प्रयत्न चाललेले होते. तिने शहाजहानला दिलेला पाठिंबा काढून घेतलेला होता, कारण त्याच्या कणखर स्वभावामुळे आपल्याला त्याच्यावर हुकमत चालविता येणार नाही याबद्दल तिची खात्री पटली होती. सिंहासनासाठी तिने आपल्यातर्फे शाहरीयार याची उमेदवार म्हणून निवड केलेली होती.कारण तो स्वभावाने बुळा होता आणि मनुष्य म्हणून कुचकामी होता. त्याच्या बाजूला उजाळा देण्याचे आणि त्याला पुढे आणण्याचे तिने सर्वकाही प्रयत्न त्याच्या गैरहजेरीत करून बघितले परंतु दुर्दैवाने अगदी ऐन घटकेच्या वेळी घटना स्थळापासून तो दूर होता. सिंहासन मिळण्याबाबत त्याला जी काही आशा होती ती त्याच्या गैरहजेरीमुळे फार मोठ्या प्रमाणावर दुरावली. याला कारण असे झाले की त्याच्या बाजूला येऊन मिळणारे असे जे काही कांकू करणारे अमीर अमराव होते त्यांना प्रतिस्पर्धी उमेदवाराच्या पक्षपात्यानी सहज तया आपल्या बाजूला वळवून घेतले.

## नूरजहान हिचा अखेरचा प्रयत्न

तरी देखील सत्ता आपल्या हातामधे टिकवून धरण्याचा नूरजहान हिने अखेरचा प्रयत्न केला. तिने आपला जावई शाहरीयार याच्याकडे घाईघाईने एक जासूद पाठवून संघर्षासाठी तयार होण्याबद्दल त्याला कळविले आणि शिवाय आपल्या भावाला कैद करण्याचा देखील प्रयत्न तिने केला.[७६] परंतु आसफखान हा अतिशय सावध होता, आणि तिच्या कारस्थानाना बळी न पडण्याइतका कावेबाजपणा त्याच्यामधे होता. तिच्या भेटीला जाण्यास त्याने नकार दिला आणि आपल्या सहकाऱ्यांच्या मदतीने शहाजहान याला वारसा हक्क प्राप्त करून देण्या-

साठी त्याने जे काही बेत केलेले होते त्यांची पूर्तता करण्यास सुरवात केली. पहिल्या प्रथम मीर बक्षी इरादत खान याला त्याने आपल्या पक्षाकडे वळवून घेतले त्यानंतर त्याच्याबरोबर विचार विनिमय करून आपले पाऊल अशा तऱ्हेने टाकले की ज्यामुळे त्याच्या बेतात निर्माण होणाऱ्या घटनात्मक अडचणीवर ताबडतोब मात होणार होती आणि त्यामधून असा एक पेचप्रसंग निर्माण होणार होता की त्यामुळे परिणामी त्याने जो बेत आखलेला होता त्याला त्यामुळे सहाय्य होणार होते.

## आसफ खानाचे बेत

शहाजहान यावेळी फार दूर दक्षिणेमधे होता आणि त्याच्या गैरहजेरीत सर्वसामान्य माणूस आणि शिपाई प्यादे यांची निष्ठा त्याच्याकडे वळवून घेणे हेही अतिशय कठीण होते. त्याकाळातल्या माणसांना लढण्याची सवय होती ती व्यक्तीसाठी, एखाद्या विशिष्ठ कारणासाठी नव्हे. प्रत्यक्ष हाडामासातल्या व्यक्तींच्या प्रतिमेचा त्यांच्यावर जितक्या स्वाभाविक तया प्रभाव पडे तितके आकर्षण एखाद्या अमूर्त अशा कल्पनेबद्दल त्याना वाटत नसे. त्याशिवाय प्रत्यक्ष जाग्यावर असलेल्या व्यक्तीकडे त्याची निष्ठा पहिल्या प्रथम रुजू होत असे. सद्य परिस्थितीत शाहरियार हा शहाजहानपेक्षा अधिक जवळ होता. अशा परिस्थितीत आसफ खानसमोर जो प्रश्न उभा होता तो म्हणजे शाहरियारबरोबर ताबडतोब संघर्षाची शक्यता असताना शहाजहानबाबत सर्व साधारण सहानुभूतीचे वातावरण कसे निर्माण करावयाचे हा. या घटकेला बादशहा म्हणून शहाजहानच्या नावे तो क्दाही फिरवू शकत नव्हता. कारण त्यामुळे फारच थोडे साध्य झाले असते. त्याचप्रमाणे शाहरीयारबरोबर तो युद्धही करू शकत नव्हता, कारण त्यामुळे उघड उघड बंड पुकारल्यागत झाले असते. त्याने जे काही करावयाचे ठरविले होते ते कायद्याच्या चौकटीत बसावे यासाठी राज्यपदाच्या प्रमुख स्थानी घटनात्मकदृष्टया जिची निवड झालेली आहे अशा व्यक्तीची जरुरी होती. अशा परिस्थितीत दावरबक्ष याची बादशहा म्हणून द्वाही फिरविण्याचा बेत त्याने मनाशी आखला[७७]. कारण त्यामुळे सर्व सामान्य जगताच्या कल्पना सृष्टीत निर्माण झालेली एक पोकळी भरून निघणार होती. आसफ खानाचा हा डाव निश्चितपणे मुत्सदेगिरीचा होता यात शंका नाही. भूतपूर्व जहांगीर बादशहाची मर्जी काहीकाळ या राजपुत्रावर होती. दावर बक्ष हा मृत खुस्राव याचा मुलगा होता. याउलट शाहीरीयार हा एका गुलाम स्त्रीचा मुलगा होता आणि जरी महाराणीचा तो जावई असला तरी देखील या परिस्थितीमुळे शाहरीयारपेक्षा दावर बक्षाचा सिंहासनावर अधिक अधिकार पोहोचत होता.

वरील बेतानुसार दावर बक्ष याला पुढे करून आसफ खान आणि त्याच्या पक्षातील मंडळींनी भिभारकडे कूच केली. आपल्या शत्रूंनी हा जो अनपेक्षीत डाव टाकला होता त्याची बातमी कानावर आल्यानंतर नूरजहानही पूर्णपणे गोंधळून गेली. तिने स्वर्गवासी बादशहाच्या मृत देहाला घेऊन त्याच्या पाठोपाठ ताबडतोब कूच केले. तिच्याबरोबर दारा, शुजा आणि औरंगजेब हे तीन राजपुत्र होते. भिभार येथे आसफखान याने शहाजहान याच्या बाजूला आणखी काही मंडळींना मिळवून घेतले आणि तिथे रहात असलेल्या खाञ्जा अबुल हसन याच्या मदतीने त्याने आपल्या बहिणीच्या ताब्यातून तिघा राजपुत्राना सोडविण्यात आणि बादशहाचा मृत देह दफनासाठी लाहोरला रवाना करण्यात यश प्राप्त करून घेतले. यानंतर त्याने सादीक खान याच्याबरोबर सलोखा केला. शहाजहानबद्दल त्याच्या मनात फारशी सहानुभूती नव्हती. त्याचप्रमाणे आपण त्याच्यावर केवढी मोठी जोखीम टाकणार आहोत याबद्दल त्याची खात्री करून त्याला दिलासा देण्यासाठी आसफ खानाने तिन्ही राजपुत्रांचा ताबा त्याच्याकडे सोपविला.[७८] आता नूरजहान हिचा समाचार घेण्याचे काम अतिशय सुलभ होते. तिला ताबडतोब नजर कैदेत ठेवण्यात आले आणि तिच्याकडे जाण्याची अथवा तिच्याबरोबर बोलण्याची सर्वांना बंदी करण्यात आली.

## शाहरीयार याने चालविलेली तयारी

जेव्हा शाहरीयार याने आपला बाप मरण पावल्याची आणि शत्रूकडून तयारी होत असल्याची बातमी ऐकली तेव्हा त्याने स्वतःच्या नावे बादशहा म्हणून द्वाही फिरविली. त्याने लाहोर येथे असलेला खजिना आणि काश्मीरला जाते वेळी जहांगीर याने तेथे ठेवलेला तोफखाना आपल्या ताब्यात घेतला त्याशिवाय त्याने अमीरांची मालमत्ता जप्त केली आणि त्यांच्या बायका व मुले यांना कैद केले. नंतर त्याने मुक्त हस्ताने पैशाची खैरात करून प्रचंड सैन्याची भरती केली आणि हे सैन्य त्याने दानीयालचा मुलगा बैसंधर याच्या हाताखाली दिले. बैसंधर याने खाजा अबुलहसन याच्या ताब्यातून सुटून पलायन केले होते आणि तो लाहोरला आला होता. आसफ खानाने देखील आपल्या सैन्याची मांडणी युद्धाच्या पवित्र्यात केली आणि शत्रुच्याबरोबर सामना देण्याच्या उद्देशाने पुढे चाल करून जाण्यास सुरवात केली.

दोन्ही विरोधी फौजांची गाठ लाहोरपासून तीन मैलावर पडली. आपल्या अनुयायांच्या आपण सारखे नजरेसमोर रहावे आणि त्यांना लढण्यासाठी

उत्तेजन देता यावे या हेतूने आसफ खान हत्तीवर आरूढ झाला होता. त्याच्या सैन्याजवळ जरी भरपूर युद्ध सामुग्री नव्हती तरी त्याच्या फौजेतील माणसे अनेक लढाया बघितलेली अशी अनुभवी होती.

## शाहरीयार याचा पराभव

याउलट शाहरीयार याचे सैन्य घाईघाईने भरती केलेले होते आणि या सैन्याला बाजार बुणग्यांपेक्षा अधिक महत्त्व देता आले नसते, कारण त्यांच्या पैकी बहुतेकांनी तोफेचा आवाज देखील ऐकलेला नव्हता. विरुद्ध पक्षाने केलेल्या पहिल्या हल्ल्यातच त्यांची फळी मोडली आणि त्यांनी पलायन केले. शाहरीयार हा यावेळी आपल्या सेनापतिकडून मदतीसाठी येण्याबद्दल खुणेची काहीतरी निशाणी येईल याची वाट पहात होता. परंतु त्याच्या छावणीत याचवेळी असलेल्या अफजल खानाने आपण त्याचे मित्र आहोत असा बहाणा करून आणि अनेक लटपटी करुन त्याला अटकावून ठेवले. सहाजिकच जेव्हा शाहरीयार याने आपला सेनापती बेसंधर याचा पराभव झाल्याचे ऐकले तेव्हा त्याने किल्ल्यात माघार घेतली आणि किल्ल्याचे दरवाजे बंद केले. परंतु त्याच्या नशिबाने त्याची सजा आता निश्चित केलेली होती.

## शाहरीयार याला कैद केले जाते

लढाईच्या मैदानातून आसफ खान हा किल्ल्याच्या बाजूने पुढे सरकला आणि त्याने मेहंदी कासीम खान याच्या बागेत आपला मुक्काम दिला. इथे अफजल खान त्याला भेटण्यासाठी आला. त्याच्या पाठोपाठ शाहरीयार याचा पक्ष सोडून गेलेले त्याचे अनेक पक्षपाती मोठ्या संख्येने त्याला भेटण्यासाठी आले. किल्ल्यामधे अशा तऱ्हेने प्रवेश करणे हे सुलभ झाल्यामुळे इरादत खान आणि शायस्ता खान यांनी रात्रीच्या वेळी किल्ल्यात प्रवेश केला आणि बादशाही आवारात आपली छावणी ठोकली. सकाळी त्यांनी किल्याचा ताबा घेतला आणि शाहरीयार याच्या शोधाला सुरवात केली. शाहरीयार हा जनान-खान्यात लपून बसला होता. परंतु फिरोज खान आणि खिदमत खान या दोन खोजांचे आसफ खाना बरोबर संगनमत होते. त्यांनी राजपुत्राचा विश्वास घात केला आणि त्याला अल्लावर्दी खान याच्या ताब्यात दिले. त्याने याला दावर बक्ष याच्या समोर आणले आणि त्याला मुजरा करण्यास त्याच्यावर सक्ती केली. त्याला कैद करण्यात यावे असा हुकूम देण्यात आला आणि दोन दिवसांनी त्याचे डोळे काढण्यात आले. काही काळानंतर याचे दोन मुलगे

ताहमूर आणि होशंग यांची तुरुंगात रवानगी करण्यात आली.[७९] अशा तऱ्हेने मोठ्या कौशल्याने डाव टाकत आसफ खानाने शहाजहान याचे प्रतिस्पर्धी एका पाठोपाठ दूर केले. दावर बक्ष म्हणजे होमकुंडात बळी देणाऱ्या बोकडा-सारखा आहे हे प्रत्येकजण ओळखून होता. जहांगीर नंतर बादशहा म्हणून त्याच्या नावाने द्वाही फिरविण्यात येणार असल्याची बातमी जेव्हा त्याला सांगण्यात आली तेव्हा त्याचा विश्वास बसला नाही.[८०] सरते शेवटी जेव्हा या बातमीच्या खरेपणा संबंधाने आसफ खान आणि इरादत खान यांनी त्याच्या समक्ष शपथा घेतल्या तेव्हा त्याचा या बातमीवर विश्वास बसला. परंतु या दोघांपैकी एकाही उमरावाला अशी जाणीव झाली नाही की त्यानी जी काही कृती केलेली आहे त्यामुळे अशी एक प्रथा पडणार होती की ज्या प्रथेमुळे भविष्य काळात अनेक निरपराध राजपुत्राचे रक्त सांडणार होते. त्यावेळेपुरता तरी त्यांचा विचार शहाजहान बद्दलचाच होता आणि त्याला सिंहासन प्राप्त करुन देण्यासाठी काय वाटेल ते करण्याची त्यांची तयारी होती.

**दावर बक्षाची बळीच्या बोकडासारखी झालेली स्थिती**

ज्या दिवशी आसफखानाने दावर बक्ष याच्या नावे बादशहा म्हणून द्वाही फिरविली, त्याच दिवशी त्याने आपली शिक्याची अंगठी देऊन बनारसी हिंदू याला दक्षिणेस शहाजहान याच्याकडे रवाना केले. पत्र लिहिण्यासाठी वेळ नसल्यामुळे त्याने जासूदा बरोबर तोंडी निरोप पाठविला त्याचप्रमाणे त्याने जासूदाला शक्य तितक्या लौकर प्रवास करण्यास सांगितले.[८१] बनारसी हिंदू याने वीस दिवसात अंतर तोडले आणि रविवार १८ नोव्हेंबर १६२७ रोजी तो जुन्नर येथे पोहोचला. वाटेमध्ये तो महाबत खान याला भेटला आणि दोघेजण राजपुत्राचे अभिनंदन करण्याकरीता एकत्र गेले.[८२] परंतु शहाजहान याने वरवर आपल्या बापाच्या मृत्यूबद्दल चिंता प्रदर्शित केली आणि सुतकाचे दिवस संपेपर्यंत दक्षिणेत राहण्याचा आपला मनोदय त्यांना सांगितला. त्याच्या सल्लागारांनी मात्र त्याला तातडतोब निघण्याचा सल्ला दिला. फलज्योतिषांना उत्तरेकडे प्रवास करण्यासाठी शुभ वेळ शोधून काढण्या-साठी सांगण्यात आले. त्यांनी नंतर येणारा गुरुवार हा मुहूर्ताचा चांगला दिवस आहे असे सांगितले. ठरलेल्या वेळी शहाजहान याने जुन्नरहून कूच केले. त्याने आपण दक्षिणेहून अहमदाबादकडे कूच केल्याची बातमी आसफ खान याला कळविण्यासाठी अमान उल्ला आणि बायजीद यांना पाठविले.

### जान निसार खानाची शहाजहानकडून खान जहानकडे रवानगी

जरी शहाजहानच्या नावे अधिकृतपणे तो बादशहा झाल्याची द्वाही फिरविली नव्हती तरी शहाजहान आता प्रत्यक्षात मोगल साम्राज्याचा सार्वभौम बादशहा झाला होता. यामुळे आपल्यावर कोणत्या जबाबदाऱ्या पडलेल्या आहेत याची त्याला पूर्णपणे जाणीव झालेली होती. त्याच्या मनाला दक्षिणेतील परिस्थिती-बद्दल बरीच चिंता वाटत होती. तेथे आणखी घोटाळ्याची परिस्थिती निर्माण होऊ नये याकरता ज्या दिवशी त्याने जुन्नरहून कूच केले त्याच दिवशी त्याने जान निसार खान याला खान जहान लोधी याच्याकडे रवाना केले. खान जहान याला त्याच्या अधिकारावर कायम केल्याचा आणि त्याला इतर अनेक सवलती देण्यात आल्याचा असे हुकुमनामे निसार खानाबरोबर देण्यात आले. परंतु खान जहान याने निसार खानाबरोबर अतिशय तुसडेपणाची वागणूक केली आणि कसलेही उत्तर न देता त्याला परत पाठविले. त्याशिवाय त्याने निजाम शहाबरोबर संधान बांधले की ज्यामुळे दक्षिणेतील मोगल हित संबंधाना धोका पोहोचणार होता.[८३]

### शहाजहानची उत्तरेकडे कूच

शहाजहान याची उत्तरेकडील कूच ही एखाद्या विजय सूचक मिरवणूकी सारखी होती. त्याच्या जीवनातील दुर्दैवाचा कालखंड आता संपलेला होता आणि त्यच्या जीवनातील वैभवाची दुसरी पहाट आता सुरू झालेली होती.

गुजरातच्या सरहद्दीपाशी त्याला नाहरखान उर्फ शिरखान याच्याकडून सुभेदार सैफखान याच्या दुटप्पी वर्तनाचा अहवाल मिळाला. शहाजहान याने त्याची सुभेदार म्हणून नेमणूक केली आणि सैफखान याला कैदी म्हणून दरबारात आणण्याचा हुकूम केला. सैफखान याने अर्जुमंद बानू बेगम हिच्या बहिणीशी विवाह केला होता आणि बानू बेगमची ही बहीण अतिशय आवडती होती. सैफखान याच्या सुरक्षिततेबद्दल तिला अतिशय भिती वाटली. मर्जी मधून उतर-लेल्या आपल्या मेहुण्यांच्या जीवीताला धोका पोहोचू नये म्हणून तिने परस्त खान याला अहमदाबाद येथे रवाना केले.[८५]

### चांद्रमासीय वर्षानुसार वाढदिवसाचा साजरा केलेला समारंभ

बाबा पियारा येथील तरीपाशी नर्मदा नदी ओलांडण्यात आली. शाही लवाजमा नोव्हेंबर महिन्याच्या अखेरीला सिनूर येथे पोहोचला. या ठिकाणी

महिन्याच्या २८ तारखेला शहाजहान याने चांद्रमासिय वर्षाप्रमाणे आपला वाढदिवस साजरा केला. वाढदिवसाचा समारंभ चाललेला असताना आसफखानाने शाहरीयार याचा पराभव केल्याची बातमी देणारे पत्र शीरखान याच्याकडून आले. या बातमीमुळे शहाजहानच्या आनंदात अधिक भर पडली आणि हा विजयोत्सव साजरा करण्यासाठी त्याने नगारे वाजविण्याचा हुकूम दिला.

### शहाजहान गुजरात मधे

शहाजहान याचे स्वागत करण्यासाठी अहमदाबाद पासून १२ करोह अंतरावर असलेल्या महमूदाबाद येथे शीरखान येऊन पोहोचला. शाही छावणी कानकर्य तलावाजवळ ठोकण्यात आली. या ठिकाणी राज्यकारभाराच्या काही बाबीबाबत व्यवस्था करण्यासाठी आणि थोडी विश्रांति घेण्यासाठी शहाजहान याने एक आठवडाभर मुक्काम केला. शीरखान याला पाच हजार जात आणि आठ हजार सवार अशी आणि मिर्जा ईसा याला चार हजार जात आणि पंचवीसशे सवार अशी बढती देण्यात आली. खिदमत परस्तखान याला आसफखानासाठी एक फर्मान देऊन लाहोर येथे पाठविण्यात आले. या फर्मानात त्याला असा हुकुम देण्यात आला की, काही राजकीय आणि सार्वजनिक बाबी विचारात घेता शाहरीयार, दावर बक्ष आणि त्याचे भाऊ ताहमूर आणि होशंग यांचे डोळे काढण्यात यावे आणि शक्य झाल्यास त्याना दरबारात आणावे. त्याला पुढे असेही सांगण्यात आले की ही गोष्ट न जमल्यास त्यांची रवानगी त्यांना योग्य अशा निवासस्थानी करण्यात यावी. या हुकुमामध्ये त्याना ठार करण्यात यावे अशी प्रच्छन्न सूचना शहाजहान याने आसफ खानाला दिली.[६६]

### शहाजहान राजपुतान्या मध्ये

१ जानेवारी १६२८ रोजी शहाजहान गोगंद येथे पोहोचला. या ठिकाणी मेवाडचा राणा करण याने त्याला मौल्यवान भेटी अर्पण केल्या. या भेटीच्या बदली शहाजहान याने त्याला अतिशय किंमती असा मानाचा पोषाख, रत्नजडित तलवार, उंची खडे बसविलेला एक खंजिर, ३० हजार रुपये किंमतीचा, कूतबी बदखशानी माणिक जडविलेला एक हार, एक चांदीच्या झूलीने मढविलेला हत्ती आणि सोन्याची रिकीब असलेला एक घोडा वगैरे गोष्टी दिल्या.[६७] ६ तारखेला शहाजहान याने सौरवर्षाप्रमाणे आपला तुला समारंभ मंडेल तलावाच्या काठावर केला. १४ तारखेला तो अजमेरला पोहोचला आणि अनासागरवर

त्याने छावणी दिली आणि आपला बाप आणि आजा यांच्या प्रमाणेच तो शेख मुईन उद्दीन चिस्ती याच्या कबरीपर्यंत गेला. तिथे गेल्यानंतर मेवाडच्या मोहिमेवर असताना त्याने संगम रवरी दगडाचा दर्गा बांधण्याची जी प्रतिज्ञा केली होती त्या प्रतिज्ञेच्या पूर्तीसाठी त्याने त्याबाबत हुकूम सोडले. अजमीरच्या सुभेदारीवर त्यांने महाबत खानाची नेमणूक केली आणि नंतर त्याने आग्रा येथे जाण्यासाठी कूच केले. वाटेवर खान आलम, मुजफर खान मामूरी, बहादूरखान उजबेग, राजा जयसिंग, राजा भारत, सय्यद बारह वगैरे अमीरानी त्याच्या टप्पाटप्प्यावर भेटी घेतल्या.

**शहाजहानच्यानावे खुत्व्याचे वाचन**

अमान उल्ला आणि बायाजीद यांचे आगमन झाल्यानंतर इतर अमीरांच्या मतानुसार आसफ खानाने १९ जानेवारी १६२८ रोजी शहाजहान याच्या नावे खूत्बा वाचला. याच दिवशी त्याने दावर बक्ष याची तुरुंगात रवानगी केली. दोन दिवसानंतर खिदमत परस्तखान हा शहाजहानकडून दुसरे फरमान घेऊन आला. या फरमानानुसार आसफ खानाने दावर बक्ष आणि त्याचा भाऊ गुरशास्प, शाहरीयार आणि ताहमूर व होशंग या दानीयाल याच्या मुलांना ठार मारले.[८८] सारांश पाच अतिशय निरपराध अशा राजपुत्रांचा हकनाक बळी दिला गेला. जरी या प्रसंगी दैवाने शहाजहानवर कृपा केली तरी अखेरीला सूड देवतेला तो बळी पडला आणि जिवंतपणी त्याला आपल्या दोन मुलांची कठोरपणी झालेली हत्या आणि तिसरा मुलगा नाहीसा झालेला बघण्याचे नशीबी आले.

आग्र्याच्या नजीक शहाजहान हा गुरुवार तारीख २८ जानेवारी १६२८ रोजी पोहोचला. १२ दिवस तो दहारा बागेमध्ये थांबला याचे कारण राजधानी मध्ये शाही इतमामात प्रवेश करण्यासाठी जी शुभ घटिका ठरविली होती ती त्यानंतर होती. सोमवार तारीख ४ रोजी ज्योतिषानी सांगितलेल्या वेळेवर नव्या बादशहाचा राज्याभिषेकाचा समारंभ पार पडला[८९]. त्याच्या नावे खुत्बा वाचण्यात आला आणि त्याने अबूल मुजफर शहाबुद्दीन महमद साहीब किराणसानी ही भव्य पदवी धारण केली. अतिशय जलद गतीने जाणाऱ्या जासूदांची दूरदूरच्या प्रांतांमध्ये शहाजहानचे राज्यारोहण झाले हे जाहिर करण्यासाठी रवानगी करण्यात आली. बादशहाने या प्रसंगी अतिशय उदारपणे जी खैरखैरात केली त्यामध्ये शेख आणि सय्यद, कवी आणि ज्योतिषी, विद्वान आणि

धार्मिक हे सर्व सहभागी झाले. हकीम रुकनाई काशी, सईदाई गिलानी आणि मीर सालीह यानी प्रसंगानुरुप अशी काव्य रचना केली आणि त्याबद्दल त्यांना शहाजहान कडून भरपूर बिदागी देण्यात आली.

### वरील प्रसंगानुरुप झालेले समारंभ

दिवाण-इ-आम मधून बादशहा जनान खान्यांत गेला. तेथे त्याचे अभिनंदन करण्यसाठी अर्जुमंद बानू बेगम, जहानआरा आणि इतर स्त्रिया त्याच्या भोवती जमल्या. त्यांनी त्याच्यावर सोने आणि चांदी यांचा वर्षाव केला आणि मुक्त हस्ताने गरीब गुरीबांना दानधर्म केला. प्रेम आणि ममता या भावनांचा त्याच्या वर हा जो वर्षाव झाला त्याचा शहाजहान याला अतिशय आनंद झाला आणि त्याने त्याची परतफेड अतिशय विपुल अशा देणग्या देऊन केली. त्याची बायको महाराणी मुमताज महाल हिला त्याने दोन लक्ष अश्रफी आणि सहालक्ष रुपये बक्षीस म्हणून दिले आणि तिच्याकरता दहा लाख रुपयांची वार्षिक नेमणूक करून दिली. जहानआरा बेगम हिला त्याने १ लक्ष अश्रफी आणि चार लक्ष रुपये दिले आणि सहा लक्ष रुपये वार्षिक नेमणूक करुन दिली. यापैकी अर्धी रक्कम तिला शाही खजिन्यातून रोख देण्यात यावयाची होती आणि उरलेल्या अर्ध्या रक्कमेच्या किमती इतक्या जहागीरी तिच्या नावे करण्यात आल्या. इतर राजपुत्र आणि राजकन्या यांच्या करता तनखे आणि देणग्या देखील बाजूला काढण्यात आल्या. बादशहाने आठ लक्ष रुपये आपल्या बायकोला दिले. त्यापैकी चार लक्ष ५० हजार रुपये दारा, शुजा आणि औरंगजेब यांच्या करता वेगळे काढून ठेवण्यात आले आणि उरलेली रक्कम मुराद, लुतफुल्ला, रोशनआरा आणि सुरय्या बेगम यांच्या मधे वाटण्यात यावयाची होती.

### शहाजहान याने दिलेल्या बढत्या

अशा प्रसंगी दरबारातील मंडळी आणि अधिकारी यांना बढत्या देण्याची आणि त्यांचा मानसन्मान करण्याची प्रथा होती. या प्रथेचे शहाजहान याने आपल्या इतर कोणत्याही पूर्वजांपेक्षा अधिक सढळ हाताने पालन केले. पहिल्या प्रथम त्याने सन्मान केला तो आसफखानाचा. त्याला त्याने आठ हजार जात आणि आठ हजार सवार, दो अस्प सिह आस्पा ही मनसब, चुलता ही पदवी आणि साम्राज्यातील सर्वोच्च उमराव हा किताब देऊन त्याचा सन्मान केला. यानंतर त्याने महाबत खानाला बढती दिली ती सात हजार जात आणि सात हजार सवार, दो अस्प सिह आस्पा ही मनसब आणि खान खानान या पदवीने

दिली. या संबंधात आणखी काही नावांचा उल्लेख करणे जरूर आहे. ती नावे म्हणजे वजीरखान, सय्यद मुजफ्फर बारह, दिलावर खान, बहादूर खान, सरदार खान, राजा विठ्ठलदास आणि खिदमत परस्तखान, ही होत. यापैकी परस्तखान याला मीर तुजूक या जागेवर बढती देण्यात आली.

बढत्या नंतर शहाजहान याने जे बदल केले ते शासन पद्धतीत. राजनिष्ठ अधिकाऱ्यांना त्यांच्या जागांवर कायम करण्यात आले तर ज्यांच्याबद्दल संशय होता आणि ज्यानी अवज्ञा केली त्यांच्या जागी विश्वासू सेवकांची भरती करण्यात आली. पहिल्या वर्गात आसफ खान, इतिकाद खान, खान जहान आणि बाकर खान नज्म सानी हे होते. दुसऱ्या वर्गात मिर्जा रुस्तूम, याचे जागी बिहार मधे खान आलम याला नेमण्यात आले; ख्वाजा अबूल हसन, याचे जागी काबूलमधे लष्कर खानाची नेमणूक करण्यात आली; फिदाई खान, याचे जागी बंगालमधे कासीम खान जूवैनी याची नेमणूक करण्यात आली; सैफ खान याचे जागी गुजरात मधे शिरखान याला नेमण्यात आले; मुजफ्फर खान, याचे जागी माळव्यात महाबत खानाचा मुलगा खान जमान याला नेमण्यात आले; जहांगीर कुली याचे जागी अलाहाबाद मधे जान सिपार खान याला नेमण्यात आले आणि मुखलीस खान याचे जागी दिल्ली मधे कुलीज खान याला नेमण्यात आले

**आसफ खानाचे आगमन**

राज्याभिषेका निमित्त करण्यात येणारे जे समारंभ होते यांची समाप्ती आसफ खान याचे आगमन होईपर्यंत झाली नाही. आसफ खान हा २६ फेबुवारी १६२८ रोजी आग्रा शहराच्या परिसरात पोहोचला. वाटेत तो सिकंदरा येथे थांबला. त्याला भेटण्यासाठी मुमताज महाल आणि जहान आरा बेगम तेथे गेल्या. बराच काळ ताटातूट झाल्यानंतर मुलांची भेट झाल्यामुळे महाराणीला अतिशय आनंद झाला. दुसऱ्या दिवशी आसफ खान याचे भव्य स्वागत करण्यात यावे असा बादशहाने हुकूम दिला. दरबारातील सर्व प्रमुख सरदारांनी त्याचे स्वागत करण्यासाठी जावे आणि त्याला दरबारात घेऊन यावे असा बादशहाने हुकूम दिला. त्याला राजपुत्रा बरोबर झरोक्या जवळ नेण्यात आले. तेथे पाळी पाळीने राजपुत्रांनी आपापले नजराणे बादशहाला अर्पण केले. त्यानंतर शहाजहान हा खाली आला आणि त्याने अतिशय वात्सल्याने आपल्या मुलांना आलिंगन दिले आणि आसफ खानाला आपल्या पायाचे चुंबन घेण्याची परवानगी दिली. बादशहाकडून अशा तऱ्हेचा अपूर्व सन्मान होणे हे त्याकाळात देखील

अतिशय अपूर्व असे समजले जाई. महाराणीच्या विनंती वरून शाही शिक्याची अंगठी त्याच्याकडे सोपविण्यात आली. त्यानंतर शहाजहान याने त्याची नेमणूक वकील या अधिकारावर केली.

आसफ खानानंतर त्याच्या बरोबर लाहोर पर्यंत जे अमीर आलेले होते आणि ज्यानी शहाजहानसाठी अतिशय शौर्याने लढा दिला होता त्यांना बादशहाच्या भेटीसाठी दरबारात आणण्यात आले. शायस्ता खान, सादीक खान, शिर खान, मीर हिसाम अुद्दीन अंजू, शहानवाज खान, मीर जुम्ला, मोतमद खान आणि ज्यांची गणती करता येणार नाही असे इतर अनेक यांना बादशहाच्या समक्ष नेण्यात आले. त्यांनी केलेल्या कामगिरीबद्दल बादशहाने त्यांना भरपूर बक्षीसी दिली आणि त्यांच्या निष्ठेबद्दल त्यांची प्रशंसा केली.

सारांश एका नवीन कारकीर्दीला सुरवात झाली. ही कारकीर्द हिंदुस्थानच्या इतिहासात अतिशय भव्य झाली असे भाष्य इतिहासकारांनी केले आहे.

# तळटीपा

## प्रकरण तिसरे

(१) कजवीनी, पान ३५ ब.

(२) R. B., Vol. I. p. 436.

(३) रो, खंड १,पान १९१; मेथबोल्ड याने राजपुत्र खुर्रम याचे वर्णन पुढील प्रमाणे केले आहे; 'त्याच्या अंगात स्वत: बद्दलच्या प्रौढीची जी भावना होती ती त्याच्या अनुयायानी केलेल्या स्तुतीच्या पोटी खास निर्माण झालेली नव्हती. तो महत्वाकांक्षी होता. त्याने आपल्या भाग्योदयांत स्वत:च्या इच्छाशक्तीला कायद्याप्रमाणे मानले आणि वैभवाचा तो पाठलाग करतो तो एकाद्या मुसलमानाप्रमाणेच.' The English Factories in India (1624–23), p.46 केरीज याने शहाजहानचे जे मूल्यमापन केले आहे त्यासाठी पहा, English Factories in India (1624–29) pp. 205·207.

(४) R. B., Vol. II. p. 206.

(५) R. B., Vol. II. pp. 187. and 189.

(६) R. B., Vol. II. p. 203.

(७) R. B., Vol. II. p. 209.

(८) R. B., Vol. II. p. 228.

(९) R. B., Vol. II. p. 221.

(१०) R. B., Vol. II. p. 200.

(११) R. B., Vol. II. p. 194.

(१२) R. B., Vol. II. p. 215.

(१३) J. R. A. S. (1907), p. 599; Elphinstone, 'History of India,' Vot. II, 368.

(१४) Beni Prasad, 'History of Jahangir,' pp. 336–40 and notes.

(१५) सालिह, खंड१, पान १३७ आणि पाने १६३-६५.

(१६) R. B., Vol. II. p. 228; खुश्रावच्या खुनामधे शहाजहानचे अंग होते हे दर्शविणाऱ्या समकालीन पुराव्यासाठी पहा English Factories in India, 1622–23 विशेषत: बंगहॅमची बुरहाणपूर ते सुरत ही पत्रे पान ५९ आणि पान ९४ आणि मेथवोल्डची मसूलीपटम तें सुरत ही पत्रे पान ५९ आणि पान ९८. मेथवोल्डने याबाबत काढलेले उद्‌गार विशेष उल्लेखनीय आहेत, "सुलतान खुश्राव याची जी कारणाविना भ्रातृहत्या झाली त्याबाबत अजूनपर्यंत घेण्यात न आलेल्या वचप्याचा सर्व बोजा ज्यांचे हात रक्ताने माखलेले आहेत अशा साथीदारांवर कठोरपणे पडणार यात काहीच संशय नाही. हे साथीदार लांबवरचे अंतर लक्षात घेता आणि त्यांच्या स्नेह्यांनी डोळेझाक केल्यामुळे खुनाची बातमी मोगल बादशहापासून लपवून ठेवण्यात यशस्वी होतील. परंतु जगामधे अशी एक सर्वज्ञ शक्ती आहे की जिला बादशहा चा बादशहा असे म्हणता येईल ती कारणाविना आणि विश्वासघाताने निरपराध व्यक्तीच्या सांडल्या गेलेल्या रक्ताबद्दल शिक्षा केल्यावाचून कधीही स्वस्थ बसणार नाही." पिटर मंडी, पान २४४; पिएट्रो डेल्ला व्हॅल्ले, खंड १, पान ५८; फुतूहात आदिलशाही मधे आलेला शहाजहानच्या बंडाबद्दलचा वृत्तान्त हा जरी गोंधळ निर्माण करणारा असला तरी जहांगीरने मनांत नसताना देखील खुश्रावला शहाजहानच्या स्वाधीन कसे केले याचे अतिशय बहारदार वर्णन त्या ग्रंथात आपल्याला आढळते; ग्रंथकर्ता म्हणतो, 'यानंतर काही काळाने खुश्रावचा खून झाला अशी बातमी कानावर आली.' (पाने २८१-८५)

(१७) R. B., Vol. II. p. 231; इक्बालनामा, पान १९२; कजवीनी, पान १०२ ब; मासिर–इ–जहांगीरी, पान १०५.

(१८) कजवीनी, पान १०३ ब; सालिह, खंड १, पाने १६७-६८. जहांगीर शहाजहानला कंदहारकडे पाठविण्याकरता तीन कारणासाठी उत्सुक होता : (१) कारण तो एक कर्तृत्ववान सेनानी आणि मुरब्बी मुत्सद्दी होता; (२) कारण इमाम कुली खानाने प्रामुख्याने शहाजहानच्या नावाचा जहांगीराला लिहिलेल्या आपल्या पत्रात उल्लेख केला होता (लाहोरी, खंड १, पाने २३२-३३), आणि (३) कारण जहांगीरला असे वाटले की शहाजहानचा अब्बास बरोबर पत्रव्यवहार असल्याने त्याचे शहाअब्बासवर वजन पडेल. शहाजहान विरूद्ध काहीही करण्याचा जहांगीरचा विचार देखिल नव्हता हे यावरून सिद्ध होते आणि अजूनपर्यंत नूरजहानचा त्याच्यावर फार थोडा प्रभाव पडला होता.

(१९) R. B., Vol. II. pp. 234–35; यावेळी मोतमदखान हा दक्षिणेतून परतला. पहा इक्बालनामा, पान १९३.

(२०) R. B., Vol. II. p. 236 जहांगीरने आपल्या मुलांशी वर्तणूक करताना इतकी अनुदारता दाखविली की शहाजहानच्या मुलांबद्दल त्याला जो मोठा आदर आणि माया वाटत असे त्याप्रित्यर्थ आपण बंदूक हातात धरणार नाही ही त्याने केलेली प्रतिज्ञा मोडली. सुरतेचा एका पत्रांत धोलपूरच्या प्रकरणाचा उल्लेख आहे (The English Factories in India, pp. 90 and 94).

(२१) इक्बालनामा पान १९४; कजवीनी, पान १०४; सालिह, खंड १, पाने १६८-६९.

(२२) R. B. Vol. II. p. 237; कजवीनी, पान १०४ब.

(२३) R. B. Vol. II. p. 238–39; इक्बालनामा, पान १९६

(२५) शहाजहानचे विचार शांतत पूर्ण होते असे विधान कजवीनी अणि मोतमदखान हे दोघेहीजण करतात. ते पुढे म्हणतात की उत्तरेकडे शहाजहान जो चाल करून गेला त्यामधे त्याची इच्छा आपल्या बापाला भेटण्याची आणि त्याच्या बरोबर समझोता करण्याचीच होती. परंतु त्याच्याबरोबर प्रचंड सैन्य होते एवढी एकच गोष्ट या विधानाचा खोटेपणा सिद्ध करण्यास पुरेशी ठरण्यासारखी आहे. इक्बालनामा पान २००, कजवीनी, १०५ ब.

(२६) R. B., Vol. II. p. 247; इक्बालनामा, पान २००.

(२७) R. B., Vol. II. pp. 249–50; डेल्ला, व्हॅल्ले, पान १२१.

(२८) R. B., Vol. II. p. 248.

(२९) R. B., Vol. II. p. 249.

(३०) R. B., Vol. II. p. 250; इक्बालनामा पान २००.

(३१) R. B. Vol. II. p. 251; इक्बालनामा पान २०१.

(३२) R. B. Vol. II. p. 249; इक्बालनामा पान १९९; मासिर-इ जहांगीरी मधे मोतमदखानाच्या नावाचा समावेश केलेला आहे (पान १९०)

(३३) याबाबत डेल्ला व्हॅले म्हणतो की "आसफखानाच्या बाबतीत असे म्हणतात की बंडखोरीच्या संशयावरून बादशहाने त्याला बंदिस्त करून

ठेवले होते" (पान १२१);आग्रा येथून विलोबीने सुरतेला पुढील-प्रमाणे पत्र पाठविले, "बादशहा हा नक्की आग्रा येथे येईल आणि आसफ खानाला कैदी म्हणून लाल।वीरसिंग याचा स्वाधीन करण्यात आले आहे." (The English Factories in India, 1622–23, p. 197)

(३४) इक्बालनाम, पान १९५.

(३५) वस्तुत: आसफखान याला आग्रा येथे पाठविण्यांत आले आणि ही जी घटना घडली ती महाबतखान याच्या इच्छेला मान देण्यासाठी म्हणूनच. कारण आपला कट्टर शत्रू जो आसफ खान त्याची उचल-बांगडी झाल्या खेरीज दरबारांत हजर होणे ह्या गोष्टीला महाबत-खानाची मान्यता नव्हती. मोतमदखानाच्या वृत्तान्ता प्रमाणे आसफ-खान याला बंगालकडे पाठविण्यात यावे अशी मूळ सूचना नूर-जहानची होती. R. B., Vol. II. p. 245; इक्बालनामा, पान १९५; डेल्ला व्हॅल्लेयाबाबत लिहितो "आग्र्याहून खजिना हलविण्याचा हुकूम आसफखानाला देण्यात आला अशी जी त्याच्याबद्दलची अखेरची बातमी आहे त्यावरून बादशहाचा त्याच्यावर विश्वास होता ही गोष्ट सिद्ध होते." (पान ५९).

(३६) खजिना हलविण्याच्या कामात आसफखान याला इतिबार खान याने बहुधा प्रतिबंध केला असावा. अर्थात इक्बालनामा आणि मासिर-इ-जहांगीरी ह्या ग्रंथातील हकीकती खबरदारीच्या ज्या उपाय योजना करण्यात आल्या त्याचे श्रेय आसफ खान याला देतात. तुजुक इ-जहांगीरीबाबत बोलावयाचे म्हटल्यास या काळापासूनच ग्रंथातील हकीकत मोतमदखानाने पुढे चालू केली. पहा इक्बालनामा, पान १९९; मासिर-इ-जहांगीरी. पान १८९ ब; R. B., Vol. II. p. 248.

(३७) R. B., Vol. II. p. 246.

(३८) इक्बालनामा पान १९८.

(३९) R. B. Vol. II. p. 251; इक्बालनामा पान २०१; मासिर-इ-जहांगीरीने अबदुल्लाखानाच्या वर्तनाचे समर्थन केले आहे. त्यात असे म्हटले आहे की बादशहा आणि सम्राज्ञी या दोघांविरुद्ध त्याच्या मनात आकस होता (पान १९० ब); सालिहने या हकीकतीत भर घालून म्हटले आहे की 'अबदुल्लाखानाची राजपुत्राबरोबर हातमिळवणी आहे आणि तो खोटे अहवाल तयार करुन ते खरे असल्याची ग्वाही सादर करतो या गोष्टी माहित नसल्यामुळे जहांगीरने या जागेवर अबदुल्लाखानाची नियुक्ती केली. (खंड १,

पान १७१); हर्बर्ट याने अबदुल्लाखानाचे वर्णन त्याकाळचा 'वातकुक्कुट' असे केलेले आहे (पान ९५).

(४०) R. B., Vol. II. pp. 254–55; याबाबत इक्बालनामा, पाने 202–203 आणि मासिर-इ जहांगीरी, पान १९१ यामधील मजकूर अतिशय त्रोटक आहे.

(४१) R. B., Vol. II, pp. 258–59; इक्बालनामा, पान २०४.

(४२) R. B., Vol. II. p. 259; इक्बालनामा, पान २०३.

(४३) गौरी शंकर हीराचंद्र ओझा, 'राजपुताना का इतिहास' (History of Rajputana), पाने ८२४-२५.

(४४) इक्बालनामा, पान २०९, R. B. Vol. II. pp. 271–272.

(४५) R. B., Vol. II. p. 274; इक्बालनामा, पान २१०; मासिर-इ-जहांगीरी, पान १९४; मासिर-उल्-उमरा, खंड १, पान ७०६.

(४६) R. B. Vol. II. p. 278.

(४७) R. B. Vol. II. pp. 278–79

(४८) R. B. Vol. II. pp. 278–79.

(४९) सालिह, खंड१, पान १७७.

(५०) डेल्ला व्हॅल्ले याबाबत लिहितो, "त्याच्या बापाच्या भितीपोटी कुतुबशहाने त्याला (शहाजहान) मदत केली नाही तर त्याबद्दल त्याच्या मनात जी आदराची भावना होती त्या भावनेपोटी कुतुबशहाने त्याला आपल्या राज्यातून काढून लावले नाही. परंतु शहाजहानने त्याच्या राज्यातील ज्या विशिष्ट छोटयाशा प्रदेशात आसरा घेतला होता त्या छोट्याशा प्रदेशाच्या मालकी हक्काचा आनंद उपभोगण्यास मात्र त्याने त्याला मना केले नाही." (पान ४१९); शहाजहानला ज्या अटीवर गोवळकोड्यात प्रवेश करण्यास परवानगी देण्यांत आली होती त्यांचे वर्णन मसलीपटमहून सुरतेला पाठविलेल्या आपल्या पत्रात थॉमस आणि जॉन डॉड यांनी केलेले आहे (The English Factories in India, pp. 313–15.) कजवीनी, पान १०६; इक्बालनामा, पान २१५; R. B. Vol. II. p. 291; हदीकत-उस-सलातीन, पान २२९; फुतूहात-इ- आदिलशाही, पाने २८५-८७.

(५१) शहाजहानने केलेली ही हालचाल जहांगीरच्या नजरेस आली. R. B., Vol. II. pp. 280–81; सालिह, खंड १, पाने १७७-७८.

(५२) हा जमिनदार म्हणजे गिरधर होय असे विधान इक्बालनाम्यांत आहे (पान २१७).

(५३) सालिह मधील वृत्तान्ताप्रमाणे अहमदबेग याने शहाजहानची वाट बंद केली आणि त्याच्या बरोबर युद्ध केले. परंतु या युद्धात त्याचा पराभव झाला आणि नंतर त्याने बंगालकडे माघार घेतली (खंड १, पान १७९.)

(५४) R. B. Vol. II. p. 299; इक्बालनामा, पान १२८; सालिह, खंड १, पान १८०.

(५५) कजवीनी, पान १०६ ब; इक्बालनामा, पान २१९; इब्राहिमखान याने माघार घेतली तो किल्ला म्हणजे अकबरनगर हा नव्हे; त्याने आपल्या संरक्षणासाठी माघार घेतली ती आपल्या मुलाच्या कबरीत. ही कबर लहान होती त्यामुळे तिच्या विरुद्ध हल्ल्याला तोंड देणे सहज शक्य होते.

(५६) ह्या लढाईच्या सविस्तर वृत्तान्तासाठी पहा इक्बालनामा, पाने २१९-२२ मासिर-इ-जहांगीरी, पान १९८; सालिह, पाने, १८१-८४; कजवीनी, पाने, १०६-१०७ ब.

(५७) इक्बालनामा, पान २२२; मासिर-इ-जहांगीरी, पान १९८ब.

(५८) इक्बालनामा, पान २२२; रोहटसच्या अधिक सविस्तर माहितीसाठी पहा कजवीनी पान १०७.

(५९) R. B., Vol. II. p. 294.

(६०) इक्बालनामा, पाने २३२-३४; लढाईच्या सविस्तर हकीकतीसाठी पहा मासिर-इ-जहांगीरी, पाने २०२ ब– २०५ब; शहाजहानने आपल्या सल्लागारांनी दिलेल्या सल्ल्यानुसार जौनपूर मधून माघार घेतली एवढेच विधान कजवीनी याने केले आहे (पान १०९ब) सालिहचा कर्ता याबाबत असे म्हणतो की आपल्या बापाने आपल्या विरुद्ध पाठविलेल्या सैन्याबरोबर युद्ध करणे योग्य होणार नाही असा विचार शहाजहानने केला आणि जौनपूरहून माघार घेतली (खंड १, पान १८७)

(६१) इक्बालनामा, पान २३९.

(६२) इक्बालनामा, पान २४४.

(६३) इक्बालनामा, पाने २४८-४९.

(६४) इक्बालनामा, पान २७४; कजवीनीने ही रक्कम १० लक्ष रुपये अशी दिली आहे (पान १०९ ब)

(६५) इबाक्लनामा पान २४५; मासिर-इ-जहांगीरीने विधान केले आहे की दक्षिणेच्या सरदारांत त्याच्याबद्दल असंतोष निर्माण झाल्यामुळे त्याची दुसरीकडे नेमणूक करण्यांत आली. (पान २१३).

(६६) बंगहॅम या लढाईच्या वेळी प्रत्यक्ष हजर होता आणि त्याने या लढाईचा अतिशय रोमहर्षक वृत्तान्त सादर केला आहे.

(६७) फुतूहात-इ-आदिलशाही, पाने २९३-९५; हदीकत–उस–सलातीन, पान २९२.

(६८) सालिह, खंड १, पान १९३.

(६९) आलम आराय अब्बासी, पाने २४३ब-४४; जामउल्इन्शा, पाने २११-१४; जामअल् मरासिलात, पाने २२६-२७.

(७०) आलम आराय अब्बासी, पाने २७५ब-७६; जामउल्इन्शा, पान २१४–१६; जामअल् मरासिलात, पान २२८.

(७१) आलमआराय अब्बासी, पाने २७५ब-७६.

(७२) जामउल्इन्शा, पाने २१६-१८; जामअल् मरासिलात, पान २२७.

(७३) इक्बालनामा, पान २८०.

(७४) जामअल् मरासिलात पान २२७.

(७५) इक्बालनामा, पान २८९; कजवीनी, पान १११ ब; समकालिन वृत्तान्तासाठी पहा. President Kerrige's letter to E. I. Co. (The English Factories in India, 1624-29), pp. 204–205.

(७६) इक्बालनामा, पान २९४; कजवीनी, पान ११३ब; नूरजहानचा शाहरियार बाबतच्या हितसंबंधाकरता पहा. The English Factories in India (1624-29), pp. 171-72.

(७७) इक्बालनामा, पान २९४; कजवीनी, पान ११४.

(७८) इक्बालनामा, पान २९९; कजवीनी, पान ११४; लाहोरीने याबाबत असे विधान केले आहे की आसफखानाने बुलाकीच्या (दावर

वख्श) नावे द्वाही फिरविली असल्याने, या राजपुत्राना जवळ ठेवणे त्याला प्रशस्त वाटले नाही ,आणि म्हणून त्याने त्यांना सादिक-खानाच्या स्वाधीन केले (खंड १ पान ७२).

(७९) इक्बालनामा, पाने २९६-९७; कजवीनी, पाने ११५-१७.

(८०) इक्बालनामा, पान २९४.

(८१) इक्बालनामा, पान २९४.

(८२) इक्बालनामा. पान २९८; कजवीनी, पान११७; मिरातइ अहमदी पान ८१ब.

(८३) इक्बालनामा, पान २९९; कजवीनी पान ११८.

(८४) इक्बालनामा पान ३००; कजवीनी, पान ११८ब; मिरातइ अहमदी. पान ८२.

(८५) कजवीनी, पान ११९; इक्बालनामा, पान ३०१.

(८६) कजवीनी, पान १२०; इक्बालनामा, पान ३०३.

(८७) कजवीनी, पान १२०ब; कजवीनी याबाबत असे सांगतो की करणला ५००० जात आणि ५००० सवार इतकी मनसब देण्यात आली (खंड १, पान ८०). गौरीशंकर हीराचंद्र ओझा (History of Rajputana), राजपुताना का इतिहास, p. 828.

(८८) कजवीनी, लाहोरी आणि मोतमद खान यांनी असे ठासून सांगितले आहे की शहाजहानच्या आज्ञेवरून पाचही राजपुत्राना ठार करण्यात आले. परंतु पर्शियाच्या ऐतिहासिक वृत्तान्तात आणि काही युरोपियन प्रवाशांच्या हकीकतीत आपल्याला बुलाखी अथवा दावरबख्श याचा जो जीव बचावला त्याबाबत अतिशय चमत्कारीक असे कथन केलेले आढळते. असे म्हणतात की दावरबख्श याने आपल्या-बदली दुसऱ्या माणसाला ठेवून पलायन केले (ताहिर वहीद, पान १७ब). जाम-इ-मरासिलात येथे पर्शियाच्या शहाने सुलतान बुलाकी याला लिहिलेली दोन पत्रे आपल्याला आढळतात (पान २६३) खुतद-इ-बरीन, पाने २५९ ब-२६१ ब. बुलाकी हा कजवीनमध्ये असल्याबद्दल पुराव्यासहित विधान मँन्डेस्लो यानें केले आहे, पान ११९. हर्बर्ट हा देखिल याच गोष्टीचा पुनरुच्चार करतो. मनूची (खंड १, पान १८१) आणि टॅव्हरनियर (खंड १, पान ३३८) देखिल हीच घटना आपल्या हकीकतीत देतात. टॅव्हरनियरने तर असे विधान केले आहे की बर्नियर याने बुलाकीला प्रत्यक्ष पाहिले

आणि त्याचे त्याच्यावर बोलणे झाले. (पान ३३९). परंतु गोव्याचा व्हॉइसरॉय फिलिप बादशहाला लिहिलेल्या एका पत्रात कळवितो की हा माणूस तोतया होता. (The English Factories in India (1630-33), VI, no, 1)

(८९) राज्यारोहणाच्या सविस्तर वृत्तान्तासाठी पहा कजवीनी, पाने १२१ ३२; लाहोरी, खंड१, पाने ८२-९९. लाहोरीने असे विधान केले आहे की आसफखानाच्या सूचनेवरून शहाजहानने शिहाबुद्दीनच्या बिरुदावलीचा स्विकार केला (पान ९६).

## प्रकरण ४ थे

# सरकार विरुद्ध बंडे

शहाजहानच्या कारकिर्दीमध्ये जी तीन महत्वाची बंडे उद्‌भवली ती बंडे म्हणजे हिंदुस्थानांतील मुसलमानी कारकिर्दीच्या इतिहासांत सर्वसाधारणपणे जी प्रवृत्ति आपल्याला नेहमी आढळून येत असे त्या प्रवृत्तिचेच पुनरुज्जीवन झाल्याचे निदर्शक आहेत. यापैकी प्रत्येक बंडाचे पुढारीपण हे जहांगीरच्या मर्जीमधल्या व्यक्तिकडे होते, हा एक केवळ योगायोग होता असे म्हणता येण्यासारखे नाही. जहागीरीची पद्धति नाहीशी करून आणि कार्यक्षमतेवर भर देऊन अकबराने सार्वभौम सत्ता आणि अमीर उमराव यांच्या मधील संबंधाला एक नवीन तऱ्हेचा उजाळा दिला. या नवीन धारणेनुसार अमीर उमरावांकडून अधिक ताबेदारीच्या भावनेची अपेक्षा बादशहाने केली. अमीर उमरावांचे बादशहाबाबत जे काही कर्तव्य होते त्या कर्तव्याचा एक भाग म्हणून बादशहाजवळील त्यांची निष्ठा आणि भक्तिभाव यांची गणना होऊ लागली. या कर्तव्याच्या भावनेपोटी त्यांना कोणतेही खास अधिकार मिळणार नव्हते तर त्यांच्या अधिकारांची व्याप्ती बादशहाच्या मर्जीतून मिळणाऱ्या अधिकारांपुरतीच मर्यादित राहिली. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे झाल्यास बादशहाचे आपल्या अमीर उमरावांकडे कसल्याहीतऱ्हेचे ऋण राहू शकत नव्हते. निरंकुशपणे जुलमी राज्य टिकविण्यासाठी अतिशय जरूर असलेली हीयोग्य अशी तत्वप्रणाली

होती. ह्या तत्वप्रणालीचा जहांगीरच्या कारकीर्दीत ऱ्हास झाला इतकेच नव्हे तर ही तत्वप्रणाली त्याज्य देखिल ठरविण्यांत आली. या गोष्टीचे परिणाम नजिकच्या काळांत मोगल सार्वभौमत्वाला धोका देण्याइतके जरी गंभीर ठरले नाहीत तरी सरतेशेवटी मोगल साम्राज्याचा नाश घडवून आणण्यास जी एक वाईट गोष्ट कारणीभूत झाली त्या गोष्टीला फार मोठे प्रोत्साहन दिले गेले. पुढील हकीगतीमध्ये कांही उदाहरणे दिलेली आहेत त्यावरून आपल्याला असे दिसून येईल की त्यांच्याच स्वतःच्या देशांत दिल्या गेलेल्या जहागीरी किंवा जादा दाखविला गेलेला पक्षपात किंवा या दोन्ही गोष्टींचे एकीकरण राज्यामध्ये बंडांचा उद्रेक होण्यास कारणीभूत ठरले.

**खानजहान**

खानजहान याच्या शरीराची घडण मोठी मर्दानी होती आणि दिसायला तो अतिशय देखणा होता. जरी जन्मतःच त्याच्यावर श्री चा वरदहस्त नव्हता तरी दैवाची त्याच्यावर मेहरनजर होती. त्यांमुळे त्याचे जीवन मोठ्या सुखांत आणि विपुलतेत त्याला व्यतीत करता आले. जातीने तो अफगाण असल्यामुळे माना-पमानाच्या बाबतीत तो अतिशय संवेदनाशील होता. त्याची वागण्याची तऱ्हा आडदांडा सारखी होती आणि त्याची वागणूक गर्विष्ठ अशी होती. निसर्गाने व्यक्तिगत धाडसाच्या बाबतीत त्याच्यावर पूर्णपणे वरद-हस्त ठेवला होता. परंतु तो कुशल सेनानीही नव्हता किंवा बुद्धिमान मुत्सद्दीही नव्हता. तो भावनावश आणि हिंमतवान होता परंतु त्याच्यामध्ये सहनशक्ती फार थोडी होती. तो हिंदूंचा अतिशय द्वेष करी परंतु स्वतःच्या धार्मिक समजुतीबाबत तो सनातनी वृत्तीचा होता असे मात्र म्हणता येणार नाही. आपण सुन्नी पंथाचे अनुयायी असल्याचे तो सांगे परंतु तो बहुतेक करून पर्शियन मंडळीच्या संगतीत रहात असे. त्याची नेहमीची एक म्हण होती आणि ती म्हणजे अलीच्या ठायी भक्तीभाव असल्याखेरीज कोणाच्याही अंगी शूरपणा येणे अशक्य आहे. शेख फजलुल्ला बुरहाणपुरी याच्यावरील प्रभावामुळे त्याच्या अंगी सुफी पंथाबद्दल आवड निर्माण झाली. असे म्हणतात कीं त्याने अनेक रात्री दरवेश आणि धर्मोपदेशक यांच्या संगतीत घालविल्या. अशा तऱ्हेने खानजहान आणि बादशहा जहांगीर या दोघांमध्ये पुष्कळच गोष्टींत सारखेपणा होता. जहांगीरच्या कार्किर्दीत खानजहान याची अतिशय झपाट्याने झालेली भर-भराट याचे कारण म्हणजे वरील गोष्ट होय. [१]

## दक्षिणच्या सुभ्याचीं ताबेदारी

या पूर्वीच्या प्रकरणांत शहाजहान याच्या बंडाचा कसा बिमोड करण्यांत आला आणि ह्या ठिकाणाहून त्या ठिकाणी त्याचा पिच्छा बादशाही फौजा काढीत असतांना त्याला निजामशहाकडे आश्रय घेणे भाग पडून कसें हतबल करण्यांत आले या संबंधी हकीगत सांगण्यांत आली आहे. त्याच्या जप्त करण्यांत आलेल्या जहागीरी पैकी गुजराथ, दावरबक्ष याच्याकडे लावून देण्यांत आला आणि त्याचा मामे आजा खान आजम याला त्याचा पालक म्हणून नेमण्यांत आले.[२] परंतु वरील नेमणुकीनंतर थोड्याच अवधींत खान आजम मरण पावला[३] आणि दावरबक्ष याला दरबारामध्ये परत बोलाविण्यांत आले. त्या प्रांताचा ताबा घेण्यासाठी म्हणून खानजहान याला पाठविण्यात आले.[४] कांही काळानंतर नूरजहान हिच्या सूचनेवरून राजपूत्र परवीज याचा पालक महाबतखान याची जागा घेण्यासाठी म्हणून त्याला पाठविण्यात आले.[५] परवीजच्या मृत्युनंतर दक्षिणेचा सुभेदार म्हणून त्याची नेमणूक कायम करण्यांत आली.[६] येथे त्याने निजाम शहाबरोबर मैत्रीचे संबंध जोडले आणि ३लक्ष रुपये घेऊन बालाघाट निजाम शहाच्या स्वाधीन केला.[७]

## राजकीय वातावरणांबद्दल त्याने केलेले चुकीचे समालोचन

अशा तऱ्हेने जहांगीरच्या मृत्यूनंतर खानजहान हा मोगल साम्राज्याचा द्रोही ठरला. दरम्यान मोगल दरबारांतील झपाट्याने बदलत जाणाऱ्या राजकीय वातावरणाचे त्याने अवलोकन केले. त्याच्या दृष्टिकोनातून सिंहासनाकरिता होणारा झगडा हा शाहरियार आणि दावरबक्ष यांच्यामध्येच होता. दरबारांतील खऱ्या परिस्थितीविषयी तो पूर्णपणे अनभिज्ञ राहिला. नूरजहान हिला यश मिळेल याबद्दल त्याची पूर्ण खात्री झाली होती आणि तिची आपल्याला सहजतया समजूत घालता येईल असा त्याने विचार केला.[८] दुर्दैवाने शहाजहानला सिंहासन मिळण्याची कितपत आशा आहे या बाबतचा योग्य तो अंदाज त्याला करता आला नाही. किंबहुना अशी शक्यता संभवतच नाही अशी त्याने कल्पना केली असावी असे मानण्यास जागा आहे. खानजहान हा हुषार मुत्सद्दी निश्चितच नव्हता आणि दुसरे म्हणजे आसफखान याच्या योजना म्हणजे फार जपून ठेवलेली अशी गुपिते होती की ज्याबद्दल फारच थोड्याना माहिती होती. अशा परिस्थितीत त्याचे मित्र दर्याखान रोहिला आणि दक्षिणेचा दिवाण फाजिलखान यानी दिलेल्या दुष्ट सल्ल्यामुळे तो चुकीच्या मार्गाने गेला यांत काहीच आश्चर्य नाही. सिंहासनावर अधिकार

सांगणाऱ्या दोन प्रतिस्पर्ध्यांमधील कलहाचा शेवट होईपर्यंत थांबण्याचा सल्ला या दोघांनी त्याला दिला होता.

**खानजहानकडून शहाजहानच्या प्रस्तावाची फेटाळणी**

प्रत्यक्ष वस्तुस्थितीत त्यांनी खानजहान आणि शहाजहान या दोघांमधील संबंध निश्चितपणे तोडले असे म्हणण्यास कांहीच हरकत नाही. त्यांनी खानजहान याला असे सांगितले की शहाजहान याने सैन्याच्या मुख्य सेनापतीच्या पदावर वस्तुत: खानजहानचा अधिकार असताना ते महाबतखानाला दिले.[९] म्हणून जेव्हा जान निसारखान बुरहाणपूर येथे शहाजहानकडून निरोप घेऊन आला तेव्हा खानजहानची मनस्थिती परस्पर विरोधी भावनांनी द्विधा झाली होती. त्याने अतिशय थंडपणे जान निसारखानाचे स्वागत केले आणि त्याने आणलेल्या पत्राला कोणत्याही तऱ्हेचे उत्तर न देता आणि कोणताही शिष्टाचार न पाळता त्याला निरोप दिला. त्याने जान निसारखानाला फक्त तोंडी असे सांगितले की शहाजहानची चाकरी करण्याच्या परिस्थितीत तो नाही.[१०]

**खानजहानची शरणागती**

जान निसारखान परतल्यानंतर खानजहान याने बुरहाणपूरहून माळव्याकडे कूच केले. त्यांत त्याचा उद्देश मांडूचा सुभेदार अबदूर रज्जाक मामुरी याच्याकडून ते शहर हिसकावून घेण्याचा होता.[११] त्याच्या समवेत राजा जयसिंग आणि गजसिंग हे दोघेजण होते. परंतु शहाजहान अजमीर येथे आल्याचे त्यांच्या कानावर येताच ते दोघेजण त्याला सोडून गेले.[१२] परिस्थिती इतक्या निकरावर आली तेव्हा खानजहान याला आपण कोणत्या भयानक संकटांत सापडलो आहोत याची अखेर जाणीव झाली आणि आपली अब्रू बचावयाची असल्यास नव्या बादशहाला शरण जाण्याखेरीज दुसरा मार्ग नाही याची त्याला खात्री पटली. यानुसार शहाजहानची माफी मागण्यासाठी आणि आपला आज्ञाधारकपणा आणि निष्ठा याबद्दल त्याला आश्वासन देण्यासाठी त्याने एका दूताची रवानगी आग्रा येथे केली. बादशहाने मोठ्या सौजन्याने खानजहानतर्फे आलेल्या आवेदनाचा स्विकार केला. वऱ्हाड आणि खानदेश या प्रांतांच्या सुभेदारीवर त्याला कायम केले आणि दक्षिणेमधील गमावलेला मुलूख परत जिंकून घेण्याची त्याला आज्ञा दिली.[१३]

**दक्षिणेमधून बदली**

परंतु दक्षिणेमध्ये कोणत्याही प्रकारचे परिश्रम करण्यास खानजहान हा नाखूष होता.[१४] जेव्हां बादशहाच्या हे दृष्टचोत्पत्तीस आले तेव्हा त्याने त्याची माळव्यांत बदली केली. जुजहारसिंग हा दरबारांतून पळून गेल्यावर

त्या बंडखोराला वठणीवर आणण्याच्या कामामध्ये महाबतखानाला सहकार्य देण्याचा खानजहान याला हुकूम देण्यात आला. जुजहारसिंग याने लौकरच शरणागती दिली. यानंतर खानजहान याला दरबारांत हजर होण्याविषयी हुकूम देण्यांत आला. दरबारांत आल्यानंतर त्याचे ज्या तऱ्हेने स्वागत झाले त्यामुळे तो अतिशय विमनस्क झाला. त्याचे स्वागत करण्यासाठी दरबारांतील कोणताही मनुष्य पुढे आला नाही आणि त्याला मानवंदना करण्यासाठी कोणतीही तयारी करण्यांत आली नाही. परंतु जहांगीर बादशहाच्या कारकिर्दीत खानजहान याला जो मान देण्यांत येत असे तो विचारात घेऊन शहाजहान याने महाबतखान याला दिल्ली येथे पाठविले. कारण महाबतखान याचा लष्करी हुद्दा हा उच्च प्रतिचा असल्यामुळे आणि त्याला खान खानान ही पदवी असल्यामुळे खान जहान याला तो मुजरा करणे शक्य नव्हते.[१५]

## खानजहान याची दुर्मुखलेली वागणूक

परंतु ज्या अद्वितीय अशा विशेष हक्कांची आणि मान मरातबांची त्याला सवय लागून गेली होती आणि ज्या गोष्टी आपला अधिकार म्हणूनच आपल्याला प्राप्त झाल्या आहेत असा तो विचार करीत असे, त्याबरोबर तुलना करतांना वरील प्रकार म्हणजे कांहीच नव्हते. या गोष्टींच्या अनुषंगाने त्याच्या मनांत अपमानाची आणि शरमेची जी भावना निर्माण झाली त्यामुळे तो उदासीन आणि संशयी बनला. जेव्हा त्याला त्याच्या अनुयायांना कमी करण्याबद्दल हुकूम देण्यांत आला आणि त्याच्या कांही जहागिरी परत घेण्यांत आल्या तेव्हा मात्र तो भयभीत झाला.[१६] ह्या गोष्टी जणू कांही पुरेशा नव्हत्या म्हणून की काय आणखी एक प्रसंग घडून आला. त्यामुळे खानजहान अधिकच भयभित झाला. एका रात्री मुखलिसखान याचा मुलगा मिरजा लष्करी चेष्टेमध्ये खानजहान याच्या मुलांजवळ म्हणाला कीं त्यांना आणि त्यांच्या बापाला लौकरच तुरुंगांत टाकण्यात येणार आहे. हे ऐकल्यानंतर खानजहान याची हिम्मत खचली आणि तो आपल्या निवासस्थानाकडे निघून गेला. त्याच्या दोन हजार अफगाणांना त्याने स्वतःभोवती पहारा करण्यासाठी ठेवले, आणि त्याने दरबारांत जाणे सोडून दिले.

## समेट

त्याची गैरहजेरी शहाजहानच्या तावडतोब ध्यानामध्ये आली. या गैरहजेरीच्या कारणाची त्याने आसफखानाजवळ चौकशी केली. अधिकृतपणे त्याच्याकडे आलेल्या अहवालाने त्याचे जेव्हा समाधान झाले नाही तेव्हां त्याने खानजहानकडे

त्याच्या दरबारांतील गैरहजेरीचे कारण विचारण्यासाठी इस्लामखानाची रवानगी केली. इस्लामखानाजवळ आपल्याला वाटणाऱ्या भितीची खानजहान याने उघड उघड कबुली दिली आणि त्याला असे सांगितले की बादशहाकडून त्याच्याकडे त्याच्यावर मेहरबानी दाखविणारे असे फर्मान जर आले तरच त्याच्या मनाला पुन्हा शांती मिळेल. आसफखानाच्या मध्यस्तीमुळे शहाजहानने खानजहान याला धीर देणारे असे एक पत्र लिहिले. या पत्रामुळे तेवढ्यापुरते तरी खानजहान याचे समाधान झाले.[१७] परंतु आपल्याला धोका देण्याचा बादशहाचा हेतू नसल्याबद्दल त्याची निर्णायकपणे खात्री करणे अशक्य होते.

**खानजहानच्या भितीची कारणे**

याउलट नविन कारभाराचे त्याने जसजसे अधिकाधिक निरिक्षण केले तसतशी त्याची भिती वाढतच गेली. त्याच्या असे दृष्टीस आले की सरकारी कामकाजाच्या पद्धति या अधिकाधिक कडक होत चालल्या आहेत आणि खऱ्या खोटयाची चाड नसणाऱ्या कामचुकार अधिकाऱ्यांना त्यांच्या कृत्याचा जाब विचारण्यांत येत आहे. त्याचप्रमाणे मधल्या अंदाधुंदीच्या काळामध्ये ज्यांनी बेकायदेशीर मार्गानीं आपला फायदा करून घेतला होता त्यांना आता वठणीवर आणले जात आहे आणि नव्या बादशहाच्या पक्षांभिमान्यांना जागा करून देण्यासाठी जहांगीरच्या मर्जीतल्या लोकांना दूर करण्यांत येत आहे. याचे एक उदाहरण म्हणजे जुजहार सिंगाबाबत घडलेली गोष्ट हे होते. दुसरे उदाहरण म्हणजे लाहोर येथे शाहरियार याने स्वच्छंदीपणे उधळलेल्या पैशाची वसुली करण्याचे बादशाही अधिकाऱ्यांचे प्रयत्न हे होते. या प्रसंगांनी त्याला घाबरवून टाकले आणि त्याच्या हातून झालेल्या अपराधांची टोचणी त्याच्या मनाला लागल्यामुळे त्याची परिस्थिती जीवावर उदार झाल्यासारखी झाली.

त्याने निजामशहाकडुन फार मोठी लांच घेतलेली होती. मोगलांनी गमावलेला मुलूख परत घेण्यासाठी प्रयत्न करण्यात त्याने उघडउघड नकार दिला होता आणि शहाजहानकडून निरोप घेऊन आलेल्या प्रतिनिधीला त्याने अशिष्टाचार पूर्वक परत पाठवून दिले होते. अशा रितीने स्वतःच्याच दृष्टीला तो एखाद्या गुन्हेगारासारखा आणि राष्ट्रद्रोह्यासारखा वाटत होता. सत्तेच्या आणि प्रभावीपणाच्या उंच जागेवरून आपण हिनपणा आणि बदनामीच्या खोल गर्तेत पडलो आहोत हा केवळ विचारच त्याच्या

अपमानावर डागण्या देणारा होता. त्याला भावीकाळात मिळणाऱ्या शिक्षे-बद्दल ज्या अफवा पसरल्या होत्या त्यामुळे त्याला झालेले दुःख आणि निराशा ही अधिकच विकोपाला गेली. त्याच्या स्वभावात फार काळपर्यंत खोटेपणाचा बुरखा पांघरून रहाणे हे शक्य नव्हते आणि म्हणून त्याने पळून जाण्याचा निश्चय केला.

**खानजहानचा पळून जाण्याचा बेत**

५ आक्टोबर १६२९ या दिवशी रात्री आसफखान याची पहारा चढविण्याची पाळी होती. त्याच्या कांही अनुयायांची घरे खानजहान याच्या अगदी घराजवळ होती. खानजहानचा आग्र्याला पळून जाण्याचा बेत असल्याची बातमी त्यांनी आसफखान याला दिली. यावर बादशहाला या गोष्टीची खबर देण्यासाठी आणि खानजहान याच्या घराला वेढा घालून त्याला शिक्षा करण्यासाठी बादशहाची परवानगी घेण्याकरीता आसफखानाने वजीरखान याला रवाना केले. परंतु शहाजहानने खानजहान याला नुकतेच त्याला क्षमा करणारे जे फर्मान पाठविले होते ते लक्षांत घेऊन शहाजहान याने वरील परवानगी देण्याचे रोखून धरले आणि खानजहान याचा पळून जाण्याचा बेत हा मूर्त स्वरुपात उतरेपर्यंत आसफखान याला थांबण्यास सांगितले.

**खानजहानचा पाठलाग**

जेव्हां रात्रीचा पहिला प्रहर उलटला तेव्हां खानजहान, आपले नातेवाईक आणि मित्रमंडळी यांच्यासह पळून गेल्याची बातमी बादशहाला देण्यासाठी आसफखान घाई-घाईने तिकडे निघाला.[११] बंडखोरांचा पाठलाग करण्याचा शहाजहान याने खाजा अबुल हसन, सय्यद मुजफ्फर खान, नसीरीखान, राजा जयसिंग, खान जमान, सफदर खान, अलावर्दी खान, फिदाईखान, मोतमदखान आणि इतर अनेक अधिकारी यांना हुकूम दिला. वरील अधिकाऱ्यांपैकी सय्यद मुजफ्फर खान, राजा विठ्ठलदास, खवास खान, खिदमत परस्तखान आणि पृथ्वीराज राठोड वगैरेनी रात्रीची चमत्कारीक वेळ आहे किंवा आपल्याजवळ असलेल्या स्वारांची संख्या फार थोडी आहे या गोष्टींची पर्वा न करता भल्या पहाटेच्यावेळी झपाट्याने कूच केले आणि खानजहान आणि त्याचे अनुयायी यांना धोलपूरनजीक गाठले.

**खानजहानला बादशाही फौजा गाठतात**

समोर चंबळ नदीचे पसरलेले पाणी आणि पाठीमागे सूड घेण्यासाठी सज्ज झालेल्या तलवारी अशा परिस्थितीत जेव्हां बंडखोर सापडले तेव्हां

त्यांनी आजूबाजूच्या खाड्या आणि उतारांच्या जागांच्या ठिकाणी आपले मोर्के पकडले व बादशाही फौजेकडून हल्ला येण्याची प्रतिक्षा ते करीत राहिले. दोन्ही पक्षांमधे थोडावेळ परंतु भयानक असे युद्ध झाले. बादशाही फौजा त्यांच्या राज-निष्ठेला साजेल अशा उत्साहाने लढल्या आणि शूर अफगाणांनी आपल्या सर्व शक्तिनिशी त्यांचा प्रतिकार केला. युद्ध चालू असतांना एका प्रसंगी पृथ्वीराज राठोड आणि खानजहान परस्परांसमोर उभे ठाकले. खानजहान हा घोड्यावर बसला होता परंतु पृथ्वीराजाचा घोडा मारला गेल्यामुळे तो पायीच लढत होता. तरी देखिल दोघांनी एकमेकांवर अतिशय आवेशाने हल्ला चढविला. दोघेजण या हल्ल्यात जबर जखमी झाले. युद्ध भूमीवर अनेक ठिकाणी बादशाही फौजा आणि बंडखोर यांच्यामध्ये अशी वैयक्तिक द्वंद्व युद्धे झाली. बादशाही सैन्यातील जवळ जवळ शंभर माणसे ठार झाली. या मध्ये खिदमत परस्तखान, मीर आतिश, खवास खान भत्ती, भरहमतखान आणि सय्यद मुजफ्फर याचा नातू महमदशफी हे होते. राजा विठ्ठलदास, पृथ्वीराज राठोड आणि सय्यद मुजफ्फर यांना जबर जखमा झाल्या. बंडखोरांनी साठ माणसे गमावली. त्यामध्ये खानजहानचे दोन मुलगे अजमत आणि हुसेन आणि जावई शम्स हे होते. या गोष्टी खान जहानचा अवसान घात करण्यास पुरेशा होत्या. परिणामी त्याने लढाईच्या मैदानांतून पळ काढला

**बादशाही फौजांचा धोलपूर येथे मुक्काम**

खानजहानचा पाठलाग बादशाही फौजा करू शकल्या नाहीत कारण त्यांचे प्रमुख सेनानी युद्धांत जखमी झाले होते. म्हणून आजारी आणि जखमी असलेल्याना विश्रांती देण्यासाठी त्यांनी धोलपूर येथे मुक्काम केला. यानंतर कांही काळानें मोतमदखान, अनिराय, जयसिंग, खान जमान हे एका पाठोपाठ एक झपाट्याने तेथे येऊन पोहोचले. बंडखोरांच्या पाठलागाचे काम हाती घेण्याचा त्यांचा बेत होता. परंतु चंबळ नदीला पूर आलेला होता आणि त्यामुळे नदी ओलांडून जाणे कठीण झाले होते. दुपारच्या प्रहरी ख्वाजा अबुल हसन हा देखिल उरलेले सैन्य घेऊन धोलपूर येथे येऊन पोहोचला. अतिशय जलद कूच करून आल्यामुळे प्रत्येकजण दमून गेलेला होता म्हणून पुन्हा पाठलाग सुरू करण्याचे अगोदर थोडी विश्रांती घ्यावी असे ठरले. जखमींची रवानगी आग्रा येथे करण्यांत आली. तेथे शहा-जहानने मोठ्या उदारपणे त्यांना बक्षीसी आणि बढत्या देऊन त्यांचा गौरव केला.

**खानजहानचे दक्षिणेकडे पलायन**

आपल्या पराजयानंतर खानजहान याने चंबळ नदी ओलांडून जाण्याची युक्ति योजली. त्याची कुटुंबीय मंडळी संख्येने बरीच होती. त्या सर्वांना बरोबर

घेऊन जाणे जवळ जवळ अशक्य प्राय होते. म्हणून त्याने आपली सर्व छावणी आणि खजिना व त्याच प्रमाणे आपल्या सर्व स्त्रियांना तिथेच सोडून दिले. आपले दोन मुलगे आणि इतर पांच अफगाण याना बरोबर घेऊन हत्तीवर बसून तो मोठ्या कष्टाने नदी ओलांडून गेला. बादशाही फौजांनी धोलपूर येथे केलेल्या मुक्कामामुळे त्याला पळून जाण्याला वेळ मिळाला. त्याने बुंदेलखंडात प्रवेश केला आणि विक्रमजीत याच्या मदतीने त्याने आड वळणांनी गोंडवनांत प्रवेश केला. तेथे त्याने कांही काळ विश्रांती घेतली आणि वऱ्हाडांतून कूच करीत त्याने अहमदनगर राज्यांत प्रवेश केला. या राज्यामध्ये आश्रय घेण्याचा त्याचा विचार होता.

### खानजहानच्या पाठलागाला पुन्हा सुरवात

दोन दिवसांच्या विश्रांतीनंतर जेव्हा बंडखोरांचा पाठलाग पुन्हा सुरू करण्यासाठी ख्वाजा अबुल हसन याने चंबळ नदी ओलांडली तेव्हा त्याला त्यांचा कांहीच ठावठिकाणा लागला नाही म्हणून त्याने कुठेना कुठे तरी बंडखोरांना गाठता यावे या आशेने ग्वाल्हेर-अंत्री रस्ता घेतला. जरी त्याने मोठया झपाटयाने कूच केले तरी शत्रूचा मागमूस देखिल त्याला लागला नाही. विक्रमजीताकडून कोणतीही माहिती न मिळाल्यामुळे त्याने अुजव्या बाजूने बुंदेलखंड सोडले. तेथून तो चंदेरीच्या दिशेने गेला आणि तेथून नंतर उदयपूरकडे त्याने कूच केले. अखेर दरबाराकडून पुढील आदेशांची वाट बघत तो सलवान येथे मुक्काम करून राहिला.[१०]

### खानजहानचा त्याच्या दोस्तांबरोबर मिलाफ

खानजहान हा निजामशाही प्रदेशांत आल्यानंतर त्याला जालनापूरचा जहागीरदार सिकंदर दोतानी आणि बालापूरचा जहागीरदार बहलोल मियाना हे दोघेजण येऊन मिळाले. तेथून त्यांनी दौलताबादेकडे कूच केले आणि जेव्हां ते शहराच्या सीमेवर येऊन पोहोचले तेव्हां किल्ल्याच्या बाहेर छावणीत मुक्काम करून असलेला दुसरा मूर्तजा आपल्या पुराण्या दोस्तांचे स्वागत करण्यासाठी त्यांना सामोरा गेला. त्याने खानजहान याला छावणीमध्ये नेले. त्याला त्याने मसनदीच्या मध्यभागी बसविले आणि आपण स्वतः एका कोपऱ्यांत उभा राहिला. खानजहानबद्दल आपल्या मनांतील सद्‌भावना प्रकट करण्यासाठी मूर्तजाने बीडचा परगणा त्याच्या नावे करून दिला आणि खर्चासाठी त्याला आगाऊ रक्कम दिली. त्याच्या अनुयायांना देखिल काहीही

न देता त्याने तसेच ठेवले नाही. त्यांना देखिल मूर्तजाने चांगली वागणूक दिली आणि त्यांना जहागिरी लावून दिल्या.[३१]

## मूर्तजाने मनांत बाळगलेल्या आकांक्षा

तसे पाहिले तर खानजहान याच्या आगमनाने मूर्तजाच्या आकांक्षांना नवीन उजाळा दिला. त्याच्या मदतीने मोगलांच्या ताब्यांत अजूनपर्यंत असलेला त्याच्या राज्याचा उर्वरीत भाग त्यांच्यापासून जिंकून घेता येईल असाही विचार त्याच्या मनांत आला. दक्षिणेमध्ये असलेल्या बादशाही अधिकाऱ्यांमध्ये खानजहानचे अनेक मित्र अथवा पूर्वीच्या त्याच्या चाकरांपैकी लोक होते. निजामशहाची अशी धारणा झाली की खानजहानने नुसता इशारा केला की त्यांच्या अधिकाराखाली असलेला प्रदेश ते ताबडतोब आपल्या स्वाधीन करतील. कांही बाबतीत प्रत्यक्ष असे घडले यांत कांहीच संशय नाही. आपल्या प्रयत्नाना अधिक धार देण्यासाठी दुसऱ्या मूर्तजाने एका विशिष्ट पद्धतिने मोगलांविरूद्ध आपल्या आक्रमक हालचालींना सुरवात केली.

## दक्षिणेमध्ये मोगलांचे झालेले नुकसान

त्याने मोगलांच्या ताब्यांतील प्रदेशावर आपल्या अधिकाऱ्यांच्या नेमणुका केल्या. त्याने त्यांना त्यांच्याकडे नेमून दिलेला प्रदेश जिंकण्याचा आणि त्या प्रदेशाचा महसूल वसूल करण्याचा हुकूम दिला. अशा तऱ्हेने दुसऱ्या मूर्तजाने आपल्या माणसांना त्यांनी स्वतंत्रपणे परिश्रम करावे यासाठी उत्तेजन दिले. अगोदरच दक्षिण देशावरील मोगलांचा ताबा डळमळीत होता. मूर्तजाच्या वरील धोरणामुळे कधी नव्हे ती मोगलांची परिस्थिती आता अतिशय धोकादायक झाली. त्यांच्या ताब्यांतील मोक्याची ठिकाणे इतस्ततः विखुरलेली होती आणि त्यांच्या जवळील साधन संपत्ति ही तुटपुंजी होती. त्यामुळे त्यावेळेपुरते का होईना दक्षिण्यांबरोबर मुकाबला करणे त्यांना शक्य झाले नाही. अशा तऱ्हेने दुसऱ्या मूर्तजाला आपल्या शत्रूवर कुरघोडी करता आली आणि त्याने आपल्या राज्यांत असलेल्या उपऱ्यांची हकालपट्टी केली. आपल्याला प्राप्त झालेला विजय हा दोन घटनांमधील कालखंडासारखा तात्पुरता आहे याचा उमज त्याला पडला नाही आणि आपल्यावर भयानक संकटांची परंपरा ज्यामुळे कोसळणार आहे असे साहस आपण हाती घेतले आहे याचीही त्याला जाणीव झाली नाही. दक्षिणेमध्ये आपले साम्राज्यवादी धोरण

पुन्हा सुरू करण्यासाठी त्याने मोगल बादशहाला जणू एक सबबच दिली असे म्हटल्यास त्यांत कांहीच वावगे होणार नाही. अर्थात मोगल सम्राटाला अशा तऱ्हेची सबब पाहिजे होतीच असे मात्र नाही. परंतु त्या क्षणापुरता का होईना न्याय हा मोगल बादशहाच्या बाजूने होता.

**शहाजहानने आखलेल्या योजना**

दक्षिणेमध्ये जी आणीबाणीची स्थिती निर्माण झाली होती तिचे आकलन करण्यात शहाजहान याने एक क्षणही व्यर्थ घालविला नाही. त्याने तात्कालिक आणि परिणामकारक होईल अशातऱ्हेने पुढे पाऊल टाकण्याचे ठरविले. त्याच्या बापाच्या आणि आज्याच्या कारकिर्दीत दक्षिणेवर ज्या मोहीमा झाल्या त्यांना अपयश आले होते. त्यापासून त्याने जो धडा घेतला त्यांत त्याला असे दिसून आले की ज्या अधिकाऱ्यांकडे मोहीमेची सूत्रे दिली जातात त्यांपैकी प्रत्येकजण कितीही कार्यक्षम आणि उत्साही असला तरी अखेर ते सर्व निरर्थक ठरते. सहाजिकच त्याच्या कारकीर्दीतील ही जी पहिलीच मोहीम त्याच्याकडून अंगीकारीली जाणार होती ती फार काळ रखडत रहावी ही गोष्ट त्याला मानवणे शक्य नव्हते. म्हणून अपयशाच्या सर्व संभाव्य धोक्यांविरूद्ध तरतूद करण्यासाठी आणि आपल्या अधिकाऱ्यांकडून एकजुटीने कारवाई होईल याबद्दल निश्चिती करण्यासाठी त्याने तो राजपुत्र असतांना ज्या तऱ्हेने कारवाई केली त्या प्रमाणेच आता दक्षिणेमधील हालचालींवर देखरेख ठेवण्यासाठी म्हणून त्याने स्वत: मोहीमेवर जाण्याचे ठरविले. या बेतानुसार ३ डिसेंबर १६२९ रोजी त्याने आग्र्याहून कूच केले. त्याने माळव्यांत प्रवेश केला, परंतु मांडू येथे मुक्काम न करता त्याने सरळ नर्मदा नदीची वाट धरली आणि अकबरपूर येथे त्याने नदी ओलांडली. खानदेशच्या सरहद्दीवर २ फेब्रुवारी १६३० रोजी त्याने आपल्या सर्व सैन्याची पाहाणी केली. दुसऱ्या दिवशी दक्षिणेचा सुभेदार इरादतखान याने आपल्या प्रांतांमध्ये शहाजहानचे स्वागत केले.

**दक्षिणेमधील हालचाली**

दक्षिणेमध्ये आल्यानंतर तावडतोब शहाजहानने आपली मोहीम उघडली. त्याच्या बहुविध सैन्याने एखाद्या प्रचंड पुरासारखा बालाघाट व्यापून टाकला. इरादतखान याला बादशहाने आजमखान ही पदवी दिली आणि त्याच्या सेनापती पदाखाली बादशाही सैन्याच्या तीन मोठ्या तुकड्यांनी निजामशाही

प्रदेशाच्या मध्यभागी दबाव आणण्यास सुरवात केली. या हालचाली पाठीमागे दोन उद्देश होते. एक म्हणजे गमावलेला प्रदेश परत जिंकून घेणे आणि दुसरा म्हणजे बीड येथे ठाण मांडून असलेल्या खानजहान याचा संपूर्ण पराभव करणे. पावसाळ्याला सुरवात होईतोपर्यंत बालाघाट मधील कारवाया चालू राहिल्या. पाऊस सुरू झाल्यानंतर त्या थांबविणे मोगलांना भाग पडले. १६३० या वर्षी जून महिन्यामध्ये बादशाही फौजा आणि दक्षिणी फौजा यांच्यामध्ये अतिशय तुंबळ असे युद्ध झाले. या युद्धांत सरतेशेवटी दक्षिण्यांचा पराभव करण्यांत आला आणि त्यांना पळवून लावण्यांत आले. परंतु मिळालेल्या विजयाच्या उन्मादात असतांना बादशाही फौजा विस्कळीत झाल्या आणि मुख्य सैन्यापासून एक तुकडी अलग पडली. खानजहान याने आपल्या हाताखालील बारा हजार सैन्यानीशी पाठीमागे पडलेल्या या तुकडीवर हल्ला केला आणि त्यांची भयंकर मनुष्य हानी त्याने केली.[२२]

पावसाळ्यामध्ये दोन्ही पक्षांनी आपापल्या तळाकडे माघार घेतली. आजमखान आणि त्याचे सैनिक यांनी देवलगांवकडे कूच केले आणि खानजहान याने बीड नजीक आश्रय घेतला. पावसाळ्यानंतर एखाद्या मध्यबिंदूपाशी केंद्रित होऊन आणि नंतर मोगलांबरोबर लढा देण्याचा दक्षिण्यांचा बेत होता. परंतु आजमखानाने त्यांच्या या योजनेंत त्यांच्यावर मात करण्याचा आणि त्यांच्या एकजूटीला प्रतिबंध करण्याचा निश्चय केला. त्याच्या असे कानांवर आले की फार थोड्या सैनिकासमवेत खानजहान हा राजूरी येथे रहात आहे आणि आजूबाजूच्या खेड्यांमध्ये लुटालूट करून मिळविलेली लूट तो वाटीत आहे. ही बातमी आल्या बरोबर त्याने खानजहान याच्यावर हल्ला करण्यासाठी देवल गांवाहून कूच केले.[२३]

आजमखान याला बंडखोरांना चकीत करावयाचे होते. म्हणून त्यांनी पाथ्री किल्ल्याचा किल्लेदार शफशिकन खान याला किल्ल्याबाहेर येऊन खानजहान याला गुंतवून ठेवण्यास सांगितले. यांत त्याचा उद्देश बादशाही फौजांच्या आगमनाबरोबर खानजहान याने पळ काढून जाऊ नये असा होता. आजमखानाचा हा बेत अपेक्षेबाहेर यशस्वी झाला. कारण शफशिकन खान हा बंडखोरांबरोबर लढत असतांना त्यांच्या पिछाडीशी आजमखान हा येऊन ठेपला. यामुळे घाबरून जाऊन खानजहान याने आपली छावणी सोडून पलायन केले आणि शेजारीच असलेल्या एका टेकडीवर ती चढून जाऊन तिच्या पलीकडे जाण्याचा प्रयत्न त्याने केला. बादशाही फौजा कांही क्षणापुरत्या विस्कळीत

झाल्यासारख्या झाल्या कारण सैन्यातिल शिपायांनी शत्रूने सोडून दिलेली छावणी लूटण्यास सुरवात केली. परंतु बहादूरखान रोहिला, इहतिमानखान आणि नरहरदास झाला या सारख्या धाडसी अधिकाऱ्यांनी आपल्याजवळ फार थोडे सैनिक आहेत याची तमा न बाळगता झपाट्याने टेकडीचा माथा गाठला आणि बंडखोरांच्या पाठलागाला सुरवात केली. यावर बंडखोरांनी पलट खाल्ली आणि बादशाही सैन्या-बरोबर लढत देण्यासाठी ते थांबले. थोडावेळ बीडच्या ओबड धोबड टेकड्यांमध्ये तुंबड युद्ध झाले आणि अगदी वेळेवर आलेल्या कुमकेमुळे मोगलांचा पराजय होण्या-पासून बचाव झाला. परंतु नरहरदास झाला हा लढता लढता मरण पावला. आणि बहादूरखान रोहिला हा दोन वेळा जखमी झाला. खान जहान आणि त्याचे सैनिक यांनी त्यांच्यावर फेकण्यांत येणाऱ्या अस्त्रांचा मारा चालू असतांना शेवगांवकडे पळ काढला. बंडखोरांचा पाठलाग जवळजवळ दोन मैलांपर्यंत चालू होता. त्यामध्ये राजा पहाडसिंग याने खानजहानचा एक विश्वासु अनुयायी बहादुरखान याला ठार मारले.[२४]

बंडखोरांची बीड येथून हकालपट्टी केल्यानंतर आजमखान हा मछलीगांव या ठिकाणाकडे परतला. याचे कारण त्याच्या लवाजम्यामध्ये असलेल्या दक्षिणी सरदारांपैकी कांहींच्या निष्ठेचा त्याला संशय आला हे होते.[२५] खानजहान हा शेवगांव येथे पोहोचला. तेथे त्याला दर्याखान येऊन मिळाला. आपला पाठलाग होईल अशी भिती अजूनही त्याला वाटल्यामुळे तेथून तो दौलताबादकडे निघाला दौलताबादहून दर्याखानाने पायीन घाटकडे कूच केले. चाळीस गांव आणि धरणगांव या शहरांची त्याने यशस्वीपणे लूटालूट केली आणि तो बालाघाट कडे परतला.

**आपल्याकडे आश्रयासाठी आलेल्या पाहुण्याबद्दल मूर्तजाने दाखविलेली भावनाशून्यता.**

एकीकडे बादशाही फौजा सर्व बाजूंनी निजामशाही मुलूख उध्वस्त करीत होत्या तर दुसरीकडे दौलताबादभोवती भयंकर दुष्काळाने थैमान घातले होते. अशा परिस्थितीत सर्वसामान्य लोकांच्या हालअपेष्टांत भयानक भर पडली.[२६]

ज्या गोष्टीपासून कोणतीही फल प्राप्ती नाही अशा गोष्टीच्या पाठीमागे लागून आपण आपल्यावर जी संकट परंपरा ओढवून घेतली तिचा आता दुसऱ्या मूर्तजाला पश्चाताप झाला. त्याशिवाय त्याने खानजहानकडून केलेल्या अपेक्षा तो पूरा करू शकला नाही. त्याने हाती घेतलेल्या कार्यामध्ये संताप आणणारी

अशी घरसोडीची वृत्ती आणि संदिग्धपणा दाखविला होता. दुसऱ्या मूर्तजाला ही गोष्ट आवडली नाही आणि त्याने आपल्या पाहुण्यांबरोबरील वागणुकीमध्ये बदल केला. त्याने खानजहानबरोबर पूर्वी इतकी मैत्री ठेवली नाही. इतकेच नव्हे तर त्याने आपल्या देशांत यापुढे राहू नये असेही दुसऱ्या मूर्तजाने त्याला सूचित केले.

**खानजहानचे दक्षिणेतून पलायन**

वरील सूचनेनुसार खानजहान याने दर्याखान व आपले हयात असलेले मुलगे यांना बरोबर घेऊन दौलताबाद सोडले. तेथून त्याने पंजाबकडे जाण्याच्या उद्देशाने माळव्याकडे कूच केले. त्यामध्ये त्याचा उद्देश त्याचे देशबांधव जे अफगाण त्यांच्या बरोबर संगनमत करून धामधूम करण्याचा होता. पायीन घाटामध्ये त्याला अड-विण्यासाठी बादशहाने अगोदरच अबदुल्लाखान याची रवानगी केली होती. परंतु खानजहान याने डोळ्यांत तेल घालून लक्ष ठेवणाऱ्या मोगल सेनापतीला हुल-कावणी देऊन पलायन केले आणि धरमपूरी येथे नर्मदा नदी ओलांडली. शहा-जहान याने आता अबदुल्ला खानाच्या मदतीसाठी सय्यद मुजफ्फर याला पाठविले.[२७] त्याने अकबरपूर येथे नर्मदा नदी ओलांडली आणि तो दिपालपूर येथे पोहोचला. तेथे गेल्यावर उज्जयीनच्या मुक्तीचा अतिशय भयानक रितीने खानजहानच्या अनुयायांनी खून केल्याचे त्याला कळले. दिपालपूरहून सय्यद मुजफ्फर याने तालगांवकडे कूच केले. तेथे त्याला अबदुल्ला खान येऊन मिळाला. तेथून दोघांनी खिलजीपूरकडे कूच केले आणि तेथून सिरोंजकडे. तेथे त्यांना असे कळले की बंडखोरांनी त्यांच्यावर दोन दिवसांची आघाडी मिळविलेली आहे.

**खानजहानचा पाठलाग**

सिरोंजहून खानजहान उजवीकडे वळला आणि त्याने बुंदेलखंडात प्रवेश केला. परंतु विक्रमजीत पूर्वीसारखा त्याच्याबरोबर मैत्री बाळगून राहिला नव्हता. बंडखोरांचा समाचार घेण्यांत आपल्याला अपयश आल्यास त्यामुळे होणाऱ्या परिणामांची जाणिव त्याने शहाणपणाने मनाशी केली. जानेवारी ११, १६३१ रोजीं त्याने खानजहान याच्या पिछाडीवर हल्ला केला. पिछाडीचे नेतृत्व दर्याखान याच्याकडे होते. झालेल्या लढाईत दर्याखानाला प्राणांतिक जखम झाली. बुंदेला सैनिकांना तो खानजहानच आहे असे वाटले. त्यांनी त्याच्या भोवती गर्दी केली आणि त्याचा शिरच्छेद करून त्याचे मस्तक दरबाराकडे रवाना केले. अशा तऱ्हेने खानजहानला पळू जाऊ देण्यांत आले. त्याने ईशान्येच्या दिशेने पलायन केले आणि त्याने बांधू भधिल नीनी या गांवी प्रवेश केला.[२८]

**खानजहानचे बादशाही फौजाबरोबर युद्ध**

परंतु बादशाही फौजांनी त्याचा सरळ पाठलाग केला. खानजहान हा फार मोठ्या आणि दमवून टाकणाऱ्या प्रवासानंतर थोडीसी विश्रांती घेत असतांना सय्यद मुजफ्फर याने त्याला अचानक गाठले. अशा परिस्थितीत जीवावर उदार होऊन खानजहानने चिलखत अंगावर चढविले आणि आपल्या पांचशे अथवा सहाशें सैनिकांना बरोबर घेऊन त्याने सय्यद मुजफ्फर याला प्रतिकार केला. झालेल्या लढाईत त्याचा मुलगा महमूद आणि त्याचा गुप्त सल्लागार सद्र रोहिला हे ठार झाले. खानजहान याने आपल्या हत्तींचा त्याग केला आणि कालिजरच्या दिशेने त्याने पळ काढला. तेथिल अधिकारी सय्यद अहमद याने त्याचा मार्ग रोखून धरला. सय्यद अहमद याने खानजहान याचे बावीस हत्ती पकडले आणि त्याचा मुलगा हसन याला कैद केले. बादशहाच्या हुकुमावरून अहमद याने हसनला ठार मारले.

**खानजहानची शेवटची धडपड आणि मृत्यू**

अतिशय हालांत आणि निराश मनस्थितीत खानजहान हा सिंध नदीजवळ पोहोचला. येथे त्याचे कांही अनुचर त्याला सोडून गेले. कांही काळानंतर सय्यद मुजफ्फर आणि माधोसिंग हे आपल्या सैनिकांसह तेथे येऊन दाखल झाले. फासावर जाऊन मृत्यू येण्यापेक्षा रणांगणांवर आलेला मृत्यू चांगला असा विचार खानजहान याने केला आणि अफगाणाच्या शौर्याला साजेल अशा पद्धतिने तो बादशाही फौजांवर तुटून पडला. कांही वेळांतच त्याने आपला घोडा गमावला. परंतु पाय उतारा होऊन त्याने आपले लढणे चालूच ठेवले. त्याने मोधोसिंगाच्या दंडधाऱ्यावर हल्ला चढविला परंतु रजपूत सैनिकांनी त्याला कबजात आणले. माधोसिंगाने त्यांच्यावर खंजीराचा वार करून त्याला जखमी केले आणि त्याच्या अनुयायांनी खानजहानचे तुकडे तुकडे केले. थोड्याच वेळात अबदुल्लाखान युद्ध भूमिवर येऊन दाखल झाला आणि त्याने खानजहानचे मस्तक दरबारांकडे रवाना केले. हे मस्तक घेऊन येणारा ख्वाजा कामगार याला घैरत खान ही पदवी मिळाली.

**समालोचन**

अशा तऱ्हेने खानजहान याच्या बंडाचा सोळा महिन्यांच्या अवधित बिमोड करण्यांत आला. तो अपराधी होता याबद्दल दुमत असण्याचे कांहीच कारण नाही. स्वतःच्या मोठेपणाबद्दल त्याच्या फाजील कल्पना होत्या. जहांगीरने त्याला जी

आवास्तव मेहरबानीची वागणूक दिली त्याचा परिणाम या कल्पनांचे वारे खान-जहानच्या मस्तकांत शिरण्यांत झाला. सुरक्षिततेसाठी त्याने दक्षिणेकडे पळून जाण्याची मोठी चूक केली. त्याऐवजी त्याला पंजाबमध्ये जाता आले असते आणि अफगाणांच्या मदतिने अधिक यश संपादन करता आले असते. जर कां त्याला अपयश आले असते तर आश्रयासाठी त्याला पर्शियामध्ये पळून देखिल जाता आले असते. त्याच्या बंडाच्या संपूर्ण कालावधित त्याने केव्हांही ठाण मांडून निकराने लढा दिला नाही आणि आपल्या अनुयायांची सहानुभूति गमावली. सरतेशेवटी दुसऱ्या मूर्तजाच्या सहानुभूतिलाही तो पारखा झाला. अशा तऱ्हेने मागचा पुढचा विचार न करता केलेल्या गोष्टींमुळे त्याने स्वतःचा नाश ओढवून घेतला इतकेच नव्हे तर उतरती कळा लागलेल्या किंबहुना मरणो-न्मुख झालेल्या अहमदनगर राज्याला त्वरेने नाशाच्या मार्गाकडे नेले.

**बीरसिंग याच्यावर जहांगीरने दाखविलेली मेहरनजर**

दुसरे जे बंड झाले त्याचे नेतृत्व जुजहारसिंग याच्याकडे होते. त्याच्या आणि खानजहान याच्या बंडात अनेक बाबतीत सारखेपणा होता आणि दोघांच्या बाबतीतील कांही कारणे ही देखिल सारखीच होती. जुजहारसिंग याचा बाप बीरसिंग देव[10] हा खानजहान प्रमाणेच जहांगीरच्या खास मर्जीतला होता. त्याने आपल्या वृत्तीने आणि वागणुकीने वीरसिंग याची अशी समजूत करून दिली कीं त्याने आपल्या चाकरींत अलौकीक अशी कामगिरी केल्यामुळे आपण बीरसिंगाशी उपकार बद्ध आहोत. मोगल दरबारांत बीरसिंग याला इतके महत्वाचे स्थान प्राप्त झाले की त्याच्या अमर्याद वागणुकीबद्दल तक्रार करण्याची किंवा तशा तऱ्हेची वागणूक बादशहाच्या नजरेस आणण्याची कोणाचीही हिंमत नव्हती. कालांतराने बादशहाच्या मर्जीमधून मिळालेले आणि कोणत्याही कारणाशिवाय काढून घेतले जाणारे हे अधिकार म्हणजे आपले हे विशिष्ट हक्क आहेत असे मानण्याची सर्व साधारणपणे कोणाही व्यक्तिची विचार करण्याची जी प्रवृत्ति असते त्यानुसार वरील अधिकार ज्यांना मिळाले त्यांची वृत्ति झाली. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास जहांगीरची बीरसिंगाबाबत झालेली पहिली चूकम्हणजे त्याने त्याच्यावर दाखविलेली अमर्याद मेहरबानी ही होय. दुसरी आणि गंभीर अशी चूक म्हणजे बीरसिंग याला जहांगीरने त्याच्या जन्मभूमीत त्याला कायम जहागीरी दिली ही होय.

**जुजहारसिंग आणि त्याचा मुलगा**

बीरसिंग हा १६२७ मध्यें मरण पावला. त्याच्यानंतर त्याचा मोठा मुलगा जुजहारसिंग याच्याकडे त्याचे अधिकार पद आले. जेव्हां सिंहासनावर

आलेल्या नविन सम्राटाचे अभिनंदन करण्यासाठी जुजहारसिंग हा आग्रा येथे गेला तेव्हां बुंदेलखंडाचा राज्य कारभा त्याने आपला मुलगा विक्रमाजीत याच्या हातीं सोपविला. विक्रमाजीत हा तरूण आणि बंडखोर होताच परंतु शिवाय स्वभावाने तापट आणि क्रूर होता. थोड्याच अवधित राज्याच्या जुन्या अधिकाऱ्या-बरोबर त्याचे पटेनासे झाले. त्यापैकी काहींना त्याने कारणावाचून शिक्षा दिली. आणि इतराना बंदीवासात टाकले. बंदीवासात टाकलेल्यांमध्ये बिरसिंग देव याचा वकील आणि प्रमुख सल्लागार कृपाराम गौड हा होता. विक्रमाजीत ह्याने त्याला ओर्च्छाच्या किल्ल्यात कैदेत टाकले आणि त्याचे हालहाल करण्यास सुरवात केली. कृपाराम याने त्याच्यावरील रक्षकांना लांच दिली आणि बंदीवासातून तो पळून गेला. त्याने दक्षिणेकडे पळ काढला. विक्रमाजीत याने त्याचा धामूनीपर्यंत पाठलाग केला. तथापि कृपाराम बुरहाणपूर येथे पोहोचला तेथून तो मोगल दरबाराकडे आश्रयासाठी गेला. आणि बादशाही चाकरींत शिरला.[३१]

## जुजहारसिंग याचे आग्रा येथे आगमन आणि पलायन

एप्रिल १०,१६२८ रोजीं जुजहार सिंग हा आग्रा येथे पोहोचला. त्याने बादशहाला एक हजार रुपये आणि एक हत्ती इतका नजराणा पेश केला. बादशहाने त्याला चार हजार जात आणि चार हजार सवार या मनसबीच्या अधिकारावर कायम केले.

बादशहाने त्याला मौल्यवान खडे बसविलेला खंजीर निशाण आणि नौबत देऊन त्याचा सन्मान केला. अशा तऱ्हेने दरबारांमध्ये झालेले त्याचे स्वागत हे समाधानकारक होते.[३२] परंतु कांही काळानंतर जुजहार सिंगाच्या बापाने अनधिकृतरित्या जी संपत्ति मिळविली होती त्याबाबत चौकशी करण्याचा हुकूम दिला.[३३] बादशाहाचे समाधान आपल्याला करता येईल ही गोष्ट जुजहारसिंग याला अतिशय असंभवनिय वाटली. आपली उघड उघड मानहानी होण्याची वेळ आता प्राप्त झालेली आहे यामुळे तो भयभित झाला आणि ११जून रोजीं गुप्तपत्रे त्याने आग्रा येथून पळ काढला. त्याचा पाठलाग तात्पुरता स्थगित करण्यांत आला[३४] कारण त्याच सुमारास नजर महमद यांने काबुलवर स्वारी केली होती. परंतु जेव्हां, त्यामुळे निर्माण झालेली भानगड मिटली तेव्हा शहाजहानने आपले लक्ष जुजाहार सिंग याच्याकडे वळविले.

महाबतखानाच्या सर्वसाधारण सेनापती पदाखांली एका मोठ्या सैन्याची रवानगी आग्रा येथून करण्यांत आली. या सैन्यांमध्ये दहा हजार घोडेस्वार दोन

हजार बंदुकची आणि पांचशे खंदक खोदणारे होते. महाबत खानाचा आवेश आवाक्यांत ठेवण्यासाठी त्याच्याबरोबर बादशाहाने इस्लाम खान याला पाठविले. त्याशिवाय माळव्यांतून आपल्या आठ हजार सैनिकांसह ओच्छांकडे कूच करून जाण्याचा हुकूम खानजहान याला देण्यांत आला. बुंदेल्याच्या गादीवर आपला हक्क सांगणारा प्रतिस्पर्धी राजा भारत बुंदेला याला त्याने बरोबर न्यावे असेही खानजहान याला सांगण्यात आले.[३५] अबदुल्ला खान आणि बहादुर खान रोहिला यांच्या हाताखाली असलेल्या तिसऱ्या सेना विभागाला पूर्वेकडून ओच्छांवर चाल करून जाण्याचा हुकूम देण्यांत आला.[३६]

**शहाजहानचे ग्वाल्हेरकडे कूच**

वरील सर्व हालचालींत एकसुत्रता आणण्यासाठी आणि मोगल सैन्याकडून होणाऱ्या हालचालीमध्ये शीघ्रता आणण्यासाठी शहाजहान याने आक्टोंबर १६२८ मध्यें आग्रा सोडले. वाटेत रमतगमत कूच करीत आणि ठिकठिकाणी विशेषत: बारी येथे शिकार करण्यासाठी मुक्काम करत तो ३ जानेवारी १६२९ रोजीं ग्वाल्हेर येथे पोहोचला. दरम्यान बादशहाच्या आघाडीवर महाबतखान हा कूच करून चालला होता. तो ग्वाल्हेरच्या बाजूने गेला. आणि त्याने बुंदेल-खंडामध्ये प्रवेश केला. तो ओच्छांच्या पश्चिमेस बत्तीस मैलावर येऊन पोहोचला. त्याचवेळी खानजहान हा दक्षिणेकडून ओच्छांच्या आणखी जवळ येऊन पोहोचला होता. त्याने आजूबाजूचा प्रदेश उध्वस्त करण्यास सुरवात केली. अबुदुल्लाखान हा बुंदेल खंडाच्या पूर्वसिमेवरून आंत घुसला आणि त्याने ईरजच्या किल्ल्याला सख्तपणे वेढा दिला. बाकरखान आणि इतर अधिकारी यांच्या मदतीने त्याने किल्ल्यावर पूर्वेकडून हल्ला केला. बहादूरखान रोहिला याने उत्तरेच्या दिशेने किल्ल्या-वर हल्ला केला. राजा पहाडसिंग[३७] याने आपल्या हत्तीला किल्ल्याच्या बाहेरील भितीवर धडक द्यावयास लावून ती जमिन दोस्त केली. तर मुख्य दरवाजांतून बहादूर खान याने किल्ल्यात प्रवेश करण्यात यश मिळविले. किल्ल्यावरील शिबंदी मोठ्या शौर्याने लढली आणि तीन हजार हिंदु सैनिक ठार मारले गेले.

**जुजहारसिंग याची शरणागती**

ईरज किल्ल्याचा पाडाव आणि बादशाही सैनांनिनी हाती घेतलेल्या कामात दाखविलेली मनाची एकाग्रता यामुळे जुजहारसिंग हा भयभित होऊन गेला[३८] त्याशिवाय या सुमारास त्याच्या स्वत:च्या प्रजाजनांमध्ये

त्याच्याविषयी असंतोषाची भावना निर्माण झाली होती. याला झालेले कारण म्हणजे आपल्या पत्नीबरोबर त्याचा भाऊ हरदेवसिंग याचे अतिशय घनिष्ठ संबंध आहेत अशा केवळ संशयावरून त्याने हरदेवसिंगाला केलेला विषप्रयोग हे होते.[३९] अशा परिस्थितीत आक्रमण करून आलेल्या फौजेला प्रतिकार करण्याचा त्याने प्रयत्न करणे म्हणजे निव्वळ निरर्थक ठरले असते. परिणामी त्याने प्रतिकाराचा बेत सोडून दिला आणि त्याच्या वतीने महाबतखानाने मध्यस्थी करावी म्हणून त्याने महाबतखानाची[४०] भेट घेतली. बादशाहाने जुजहार सिंगाच्या अपराधाकडे कानाडोळा केला.

**जुजहारसिंगाची बादशहाबरोबर भेट आणि त्याला क्षमा**

वरील वाटाघाटी यशस्वीपणे पार पडल्यानंतर ७ फेब्रुवारी १६२९ रोजी शहाजहान याने ग्वाल्हेर सोडले. एका आठवड्यानंतर तो आग्रा येथे येऊन पोहोचला. येथे महाबतखानाने बंडखोर जुजहारसिंग याला बादशाहाच्या पुढ्यांत नेले. जुजहार सिंगानें बादशाहाला पंधरा लक्ष रुपये खंडणीदाखल दिले आणि चाळीस हत्ती पेशकश म्हणून दिले. या बदल्यांत शहाजहानने त्याची मुळची मनसब त्याला परत दिली. परंतु त्याच्या कांही जहागीरी जप्त केल्या. या जहागीरी खानजहान, अबदुल्लाखान, रशीदखान, सय्यद मुजफ्फरखान आणि पहाडसिंग या अधिकाऱ्यांमध्ये वाटण्यात आल्या. जुजहार सिंग याला दोन हजार घोडेस्वार आणि दोन हजार पायदळ घेऊन दक्षिणेमध्ये हजर रहाण्याचा हुकूम देण्यात आला.[४१]

**दक्षिणेमधील त्याच्या कामगिरीची नोंद**

खानजहान याच्या विरूद्ध झालेल्या मोहिमेत जुजहारसिंग याने आजमखानाच्या सेनापतीपदाखाली काम केले. मोगल निशाणाखाली तो मोठ्या शौर्याने लढला. त्याने दाखविलेल्या शौर्याबद्दल बक्षिस म्हणून जानेवारी १६३० मध्ये त्याला पांच हजार जात आणि पांच हजार सवार या अधिकारावर बढती देण्यात आली त्याच वर्षाच्या मे महिन्यांत तो आणि त्याचा भाऊ पहाडसिंग या दोघांना राजा ही पदवी देण्यांत येऊन त्यांचा सन्मान करण्यात आला.[४२] जुजहारसिंग याचे कसब आणि धाडस यामुळे आजमखान इतका प्रभावित झाला होता की अनेकदा तो जुजहारसिंग याला आपल्या सल्लागार मंडळाच्या बैठकीस बोलावणे करी आणि त्याने केलेल्या सूचनाबाबत योग्य तो विचारविनीमय करी. धारूरचा वेढा चालू असतांना जुजहार सिंगाच्या अनुयायांनी

दक्षिण्यांच्या लढाऊ ठिकाणांवर हल्ला करून अनेक हत्ती घोडे, खेंचरे आणि बैल पकडून आणले. त्या किल्ल्याचा पाडाव झाल्यानंतर जुजहारसिंगाने केलेल्या कामगिरीबद्दल त्याला साजेलशी बक्षीसी देण्यांत आली. जेव्हां आजमखानाची नेमणूक रद्द करून त्याच्या जागीं आसफखान याला नेमण्यांत आले तेव्हां त्याला जाऊन मिळण्याचा जुजहार सिंग याला हुकूम देण्यांत आला[४३] दक्षिणेमध्ये तो १६३४ पर्यंत होता. त्यानें दौलताबादला महाबतखानाने घातलेल्या वेढ्यात आणि दौलताबादच्या पाडावांत भाग घेतला. त्यानंतर महाबतखानाच्या परवानगीने त्याने आपला मुलगा जगराज याला दक्षिणेमध्ये आपला प्रतिनिधी म्हणून ठेवले आणि तो आपल्या देशाकडे परतला.[४४]

## ओर्च्छा येथे त्याचे पुनरागमन आणि त्याने केलेली अघोर कृत्ये

ओर्च्छा येथे आल्यानंतर त्याने फार मोठ्या महत्वाकांक्षी हालचाली करण्यांस सुरवात केली आणि आपल्या राज्याची वाढ करण्याकडे आपले लक्ष दिले. त्याने पहिल्या प्रथम केलेल्या बंडात बराचसा प्रदेश गमावलेला होता. त्यावेळी झालेला तोटा भरून काढण्यासाठी ही योग्य अशी वेळ होती. बादशहा या वेळी आग्र्यापासून दूर होता आणि दक्षिणेमध्ये अजून शांतता प्रस्थापित झालेली नव्हती. वरील वृत्तानुसार त्याने कांहीही कारण नसतांना राजा प्रेमनारायण याच्यावर हल्ला चढविला आणि त्याच्या चौरागढ या मजबूत ठाण्याला त्याने वेढा देऊन त्याला आंतमध्ये कोंडले. संकटांत सापडलेल्या राजाने हल्लेखोराबरोबर समझोता करण्याचा प्रयत्न केला. परंतु जुजहार सिंगाने प्रेमनारायण याने लावलेली बोलणी झिडकारून टाकली. यावर जुजहार सिंगाच्या आक्रमणांविरुद्ध मदतिची याचना करण्यासाठी प्रेमनारायण याने आपला एक दूत शहाजहान याच्याकडे रवाना केला. शहाजहानने आपल्या एका सेवकाची जुजहार सिंगाकडे त्याने वेढा उठवावा म्हणून त्याचे मन वळविण्यासाठी रवानगी केली. परंतु त्याने तिरस्काराने वरील सूचनेचा अव्हेर केला. जुजहारसिंगाला प्रतिकार करणे अशक्य झाल्यामुळे प्रेमनारायण याने कांही अटींवर शरणागती दिली. परंतु जेव्हां तो किल्ल्याबाहेर आला तेव्हां बुंदेल याने पण लावून दिलेल्या आपल्या वचनाकडे दुर्लक्ष केले आणि गैर सावध असलेल्या राजाला वेढले. राजाने जीवावर उदार होऊन आपल्या सर्व स्त्रियांना ठार मारले आणि आपल्या दोनशें किंवा तीनशें शूर अनुचरासहित लढता लढता तो मरण पावला. जुजहारसिंगाने चौरागढचा किल्ला आपल्या ताब्यांत घेतला.

## जुजहारसिंगाविरुद्ध तक्रारी

दरम्यान राजा प्रेमनारायण याचा मुलगा खान दौरान याला माळव्यांत जाऊन मिळाला होता. जुजहार सिंगाने केलेले अकारण आक्रमण आणि त्याच्या

हातून राजा प्रेमनारायण याला आलेला भयानक मृत्यु याबद्दल बादशहाकडे तक्रार करण्यासाठी त्यानें माळव्यांतून दरबाराकडे प्रयाण केले. जुजहारसिंगाबद्दल शहाजहानला संताप यावा अशी परिस्थिती आता निर्माण झाली होती. त्याने बादशहा संमती शिवाय त्याच्या सारख्याच एका मांडलीक राजावर हल्ला केलेला होता आणि याहीपेक्षा त्यांनी केलेली वाईट गोष्ट म्हणजे बादशाही हुकूमांना त्याने तुच्छ लेखले होते. त्याशिवाय दक्षिणच्या रस्त्यावर अगदी मोक्याच्या ठिकाणी असलेल्या एका प्रबळ राजाला शिक्षा न लावता तसेच राहू देणे हे अदूरदर्शीपणाचे ठरले असते. परंतु त्याच्यावर हल्ला करण्याचा अंतीम निर्णय घेण्याचे अगोदर शहाजहान याने जुजहारसिंगाला कांही अटी देऊ केल्या. या अटींचा स्वीकार त्याने केल्यास बादशहाकडून त्याला क्षमा होणार होती.

**कवीराय याची वकीलात**

बादशहाने सुंदर कवीराय याच्याजवळ जुजहारसिंगाला देण्यासाठी एक पत्र देऊन ओर्च्छाकडे रवाना केले. त्या पत्रांत पुढील प्रमाणे मजकूर होता. "आमच्या परवानगीशिवाय तू प्रेमनारायण याच्यावर केलेला हल्ला हा अयोग्य होता. परंतु याच्यापेक्षांही तू जी वाईट गोष्ट केलीस ती म्हणजे दिलेला शब्द तू खोटा ठरविलास आता जे होऊन गेलेले आहे त्याची भरपाई करता येणार नाही. तुझ्या हातून जे अपराध झालेले आहेत त्याचे क्षालन करण्याचा एकमेव मार्ग म्हणजे जबरदस्तीने ताब्यात घेतलेला प्रदेश तू सोडून देणे हा होय. त्याचप्रमाणे प्रेमनारायण याची जी संपत्ती तुझ्या हातीं पडलेली आहे त्यापैकी दहा लक्ष रुपये तू दरबाराकडे आदा करावेस. परंतु जर तुला तू जिंकलेला प्रदेश ताब्यात ठेवावयाचा असेल तर तुझ्या देशातील तितकाच प्रदेश तुला तोडून द्यावा लागेल."[५]

**शहाजहान याने दाखविलेल्या वृत्तीचे परिक्षण**

या पत्रांतून शहाजहानचे नीचपणाचे बेत उघड झालेले आपल्याला दिसतात. दुर्बल पक्षाच्या म्हणजे त्याच्याच एका मांडलीक राज्याच्या हक्कांचे संरक्षण करण्याचे ऐवजी जुजहार सिंगाने आपल्या स्वतःच्या प्रयत्नाने जे काही आपल्या पदरांत पाडून घेतले होते ते सर्व लाटण्याचा बादशहाचा इरादा होता. जुजहारसिंग याने बादशाही मोठेपणाचा उपमर्द केलेला होता आणि त्याने मांडलीक राजांच्या वर्तनाबाबतचे परंपरागत नियम मोडलेले होते. परंतु द्रव्याने सर्व कांही गोष्टींबाबत क्षमा मिळविणे शक्य होते. त्याच्या हातून घडलेली काळी-

वेरी कृत्यें देखिल पैशांमुळे पवित्रता पावणार होती. प्रेमनारायण याच्या वारसांना भरपाई देण्यांबाबत बादशहाने एक चकार शब्द देखिल काढला नाही. त्याला स्वत:साठी फक्त पैसा पाहिजे होता. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे झाल्यास त्याची इच्छा एखादा चोर ज्याप्रमाणे दुसऱ्या चोराने जमा केलेल्या लुटींत आपला भाग असावा असे इच्छितो त्याप्रमाणे होती, परंतु एखाद्या राजाप्रमाणे आपल्या स्वत:च्या प्रजेचे संरक्षण करावे अशी मात्र नव्हती. गोष्ट अशी होती कीं जुजहारसिंगाने अन्यायाच्या मार्गाने मिळविलेल्या कमाईवर त्याचा डोळा होता आणि ही कमाई त्याच्यापासून हिसकावून घेण्यासाठी त्याला एखादे निमित्त पाहिजे होते.

**शहाजहानची मागणी मान्य करण्यास जुजहारचा नकार**

वरील मागण्यांना फक्त एकच उत्तर होते. त्या उत्तराप्रमाणे कृती करण्यास जुजहारसिंगाने साफ नकार दिला. जर कां आठ महिन्यांच्या सतत प्रयत्नानंतर त्याच्या पदरांत जो आर्थिक आणि प्रादेशिक लाभ पडलेला होता त्या लाभाला जर त्याला मुकावयास लागणारे होते तर इतका त्रास घेण्याचे त्याला कारण तरी काय होते ? परिणामी त्यानें बादशाही दूताला भीडभाड न धरता निरोप दिला. त्याने आपला मुलगा जगराज[४६] ४६ याला दक्षिणेमधून गुप्तपणे पळून येऊन आपल्याला मिळण्याचा निरोप पाठविला. त्यानुसार शिकार करण्याचे निमित्त काढून जगराज याने दौलताबादेहून पलायन केले. बालाघाटचा सुभेदार खान जमान याने त्याचा पाठलाग केला नाही. परंतु पाईनघाटचा अधिकारी खान दौरान याने अधिक दक्षता दाखविली. त्याने पळून जाणाऱ्या जगराजचा मोठ्या धडाक्याने पाठलाग करून त्याला गाठले आणि माळव्यामधील अशथा येथे त्याचा पराभव केला. परंतु अलावर्दीखान याने निष्काळजीपणा दाखविला. त्याने जर खान दौरान याला सहकार्य दिलें असते तर जगराज पकडला गेला असता[४७] तो पळून गेला आणि सुरक्षितपणे धामूनी येथे पोहोचला.

**जुजहार याला वठणिवर आणण्यासाठी तयारी**

शहाजहान याने दिलेल्या अटी नाकारल्यामुळे आणि जगराज याने दक्षिणेतून पलायन केल्यामुळे जुजहारसिंग याच्याविरूद्ध कडक उपाय योजना करण्यासाठी जरूर ते समर्थन शहाजहान याला मिळाले. साम्राज्याच्या तीन नावाजलेल्या सेनानिच्या नेतृत्वाखाली वीस हजार फौजेला बुंदेल खंडात प्रवेश करण्याचा आणि बंडखोरांचा नाश करण्याचा हुकूम देण्यात आला. खान दौरान याला सहा हजार फौज घेऊन चंदेरीच्या मार्गे बिच्छोर येथे जाण्याचा आणि पावसाळा तेथेच

काढण्याची आज्ञा देण्यांत आली. त्याच्याबरोबर देबीसिंग[४८] या बुंदेला गादीवर आपला हक्क सांगणाऱ्या राजपुत्राला बरोबर देण्यांत येणार होते. देबीसिंग याला राजा ही पदवी आणि तीन हजार जात व तीन हजार सवार इतकी मनसब देण्यांत आली. अबदुल्ला खान याला ईरज जिंकून घेण्यांचा आणि मांडीर येथे मुक्काम करण्याचा हुकूम देण्यांत आला. सय्यद खान जहान याला बदायून येथे पावसाळा घालविण्याची आज्ञा देण्यात आली. पावसाळयाच्या अखेरीला तीनही सेनापतींनी ओर्च्छावर एकत्र येऊन हल्ला चढवावयाचा होता.

## जुजहारने बोलणी करण्यासाठी केलेले प्रयत्न

या प्रचंड प्रमाणावरील लष्करी तयारीमुळे जुजहारसिंगाच्या हृदयांत धडकी भरली. त्याने आसफखान याची भेट घेतली आणि आपल्या वतीनें बादशहाजवळ रदबदली करण्याची त्याला विनंती केली. शहाजहान याने सुंदर कविराय याला ओर्च्छावर पुन्हा पाठविण्यास आपली संमती दिली. परंतु या वेळेला शहाजहान याने आपल्या मागण्यांची व्याप्ती अधिक प्रखर केली. जुजहारसिंगाला तीस लक्ष रुपये खंडणी दाखल देण्याचा चौरागढच्या ऐवजी नियानवानचे[४९] सरकार मोगलांच्या स्वाधीन करण्याचा खानजमान याच्या हाताखाली चाकरी करण्यासाठी जगराज याला दक्षिणेंत पाठविण्याचा आणि जुजहार सिंगाच्या चांगल्या वर्तनाबद्दल ग्वाही म्हणून दरबारामध्ये रहाण्यासाठी त्याच्या नातवाला पाठविण्याचा वगैरे मागण्या जुजहार सिंगाकडे करण्यांत आल्या. हा निरोप घेऊन जाणारा जासूद परत येईपर्यंत मोगल सेनापतींना त्यांनी योजिलेल्या हालचाली स्थगित करण्याचा हुकूम देण्यांत आला.[५०]

पूर्वीच्या अटींप्रमाणेच नवीन अटी जुजहारसिंग याला मान्य होण्यासारख्या नव्हत्या. परंतु त्याने आपण भयभीत झाल्याचे जे दाखविले होते ते कदाचित त्याचे ढोंग असावे आणि वाटाघाटी सुरू व्हाव्या असे त्याला मनापासून वाटत नव्हते. आपली तयारी पूरी करण्यासाठी वेळ मिळावा म्हणून त्याने ती एक लबाडी केलेली होती. म्हणूनच जुजहारसिंग याने सुंदर कविराय याला पुन्हा एकदा अतिशय तुच्छतेची वागणूक दिली आणि त्याने आणलेला नवीन प्रस्ताव ऐकून घेताच त्याला तडकापडकी निरोप दिला[५१] मोगलांच्या नवीन मागण्या मान्य करणे त्याच्या आवाक्यापलिकडचे होते असे नव्हे. कारण त्याच्यापाशी भरपूर द्रव्य होते. ता असे वागण्याचे कारण म्हणजे त्याच्या हातातून पैसा सुटत नव्हता हेच केवळ होते. इतर अनेक बंडखोरांप्रमाणे त्यानेही मोगल अधिपतीच्या सामर्थ्या-

बद्दलचा आणि आपल्या शत्रूंविरुद्ध त्या ताकदीचा परिणामकारकरित्या उपयोग करण्याच्या शहाजहानच्या निश्चयाबद्दल चुकीचा अंदाज केला.

### मोहिमेची सुरवात

बादशहाकडे जेव्हां जुझार सिंगाच्या उद्धट वागणुकीसंबंधी हकीकत कळविण्यांत आली तेव्हां त्याने पूर्वी तयार केलेल्या योजनेनुसार मोहिमेला सुरवात करण्याचा आपल्या अधिकाऱ्यांना हुकूम दिला. जवळ जवळ सारख्याच दर्जाच्या[१२] असलेल्या आपल्या तीनही सेनापतींमध्ये कलह होऊ नये म्हणून शहाजहान याने राजपुत्र औरंगजेब याची प्रमुख सेनापतीपदावर नेमणूक केली. आणि शायस्ताखान याला त्याचा पालक आणि सल्लागार म्हणून नेमले. राजपुत्राची मनसब १५ हजार जात आणि ५ हजार सवार इतकी मुक्रर करण्यांत आली. आणि शाही अधिकाऱ्यांना आपल्या सर्व योजना त्याला सादर करण्यांचा आणि त्याप्रमाणे कारवाई करण्याचे अगोदर त्याची संमत्ती घेण्याचा हुकूम देण्यांत आला.

### औरंगजेबाची भूमिका

कांहींनी असे मत प्रकट केले आहे कीं राजपुत्र औरंगजेब याची या जबाबदारीच्या जागेवर योजना झाली ती त्याच्या दक्षिणेच्या सुभेदारीवरील नियोजीत नेमणुकीकडे लक्ष देऊनच. शक्य तितक्या लवकर प्रत्यक्ष राज्यकारभाराशीं राजपुत्रांचा संपर्क आणण्याची प्रथा मोगल घराण्यांत होती यात काहीच संशय नाही. परंतु या प्रसंगी औरंगजेबाची नेमणूक ही त्या दृष्टीकोनातून केलेली नसून तिचे स्वरूप केवळ नावांपुरतेच होते. त्याच्या नेमणुकीची तुलना राण्याच्या विरुद्ध किंवा दक्षिणेतील मोहिमेच्या वेळीं शहाजहानने जेव्हां सर्वाधिकार आपल्याकडे घेतले त्याबरोबर करता येत नाही. दोन्हीं प्रसंगी शहाजहानच्या शब्दाला अधिक किंमत होती आणि दोन्ही मोहिमांच्या वेळेला पुढाकार हा शहाजहानकडेच होता. परंतु बुंदेलखंडावरील मोहिमेच्या वेळीं अशा तऱ्हेची कोणतीच भूमिका औरंगजेबाकडे नव्हती आणि जर कां त्याला कसलाही अनुभव मिळाला असेल तर तो एक प्रेक्षक म्हणून. मोहिमेच्या व्यवहार्य बाजूशी त्याचा कुठल्याही तऱ्हेचा संबंध नव्हता.

### एखाद्या वन्य पशुप्रमाणे जुजहारसिंगाची शिकार

लवकरच जुजहारसिंगाच्या ताब्यातील मजबूत ठिकाणें बादशाही सैन्याने हिसकावून घेतली. परंतु त्यामुळे बादशहाचे समाधान झाले नाही. जुजहार-

सिंगाचा नाश केल्याखेरीज बादशहाला चैन पडणार नव्हते. त्याच्या मते अशा तऱ्हेच्या बंडखोराला एकमेव अशी शिक्षा म्हणजे मृत्युचीच होती. अशा परिस्थितीत नुकत्याच मिळालेल्या विजयांमुळे जोसात येऊन बादशाही सेनानिंनी चौरागढच्या दिशेने कूच केले. जुजहारसिंगाचा धीर आता पूर्णपणे खचून गेलेला होता. चौरागढ येथे ठाण मांडून बादशाही सैन्याला धडाडीने प्रतिकार करण्याचे त्राण आता त्याच्यात राहिलेले नव्हते. बादशाही सैन्याच्या आगमनाबरोबर त्यानें आपल्या तोफांचा नाश केला, इमारती उध्वस्त केल्या आणि शहापूरकडे पळ काढला. तेथून तो लांजीच्या मार्गे दक्षिणेकडे गेला. ही बातमी जेव्हां बादशाही सैन्याच्या कानावर आली तेव्हां त्यांनी जलद कूच करून चौरागढ गाठले. खान दौरान याने किल्ल्यांत प्रवेश केला, किल्ल्यामधिल मुख्य मंदिराच्या शिखरावर तो चढला, तेथे त्याने अजान वाचले आणि शहाजहानच्या नांवे प्रार्थनांचे पठण केले. अहदाद खान आणि इतर अधिकारी यांना त्याने किल्ल्यांच्या रक्षणासाठी ठेवले आणि जुजहारसिंगाचा पाठलाग पुन्हां सुरू करण्यासाठी तो अबदुल्ला खान याला येऊन मिळाला.

**मोगल जुजहारला गाठतात त्याचा वध**

शहापूर येथे राघू चौधरी याने बंडखोरांच्या हालचालीची बातमी खान दौरान याला पुरविली. तो आणि अबदुल्लाखान यांनी बंडखोराला गाठण्याकरीता झपाट्याने कूच केले. त्यांच्या पाठोपाठ पिछाडीचे संरक्षण करीत राजपुत्र औरंगजेब हा सावकाश कूच करीत आणि अधिकाऱ्यांकडून नियमितपणे अहवाल घेत चालला. हे अहवाल तो दरबाराकडे धाडून देत असे. शहाजहान याने राजपुत्राला धामूनीकडे परतण्याचा हुकूम दिला. परंतु खान दौरान आणि अबदुल्लाखान यांनी बंडखोरांचा चांद्याकडे पाठलाग केला व जवळजवळ त्याला गाठले. खान दौरानचा बेत बंडखोरांवर भयाण रात्रीच्या वेळी तुटून पडण्याचा होता. परंतु अबदुल्लाखान याने त्याला थोपवून धरले. जुजहारसिंग याला या हालचालींची वेळेवर बातमी मिळाली आणि तो गोवळकोंड्याकडे पळून गेला. परंतु खान दौरान याने त्याला लौकरच गाठले. जीवावर उदार होऊन बुंदेल्यांनी बीरसिंग देव याची पट्टराणी पार्वती हिला प्राणांतिक जखमा केल्या आणि मोगल जनान खान्यांत लाजिरवाणे जीणे जगण्याचा प्रसंग येऊ नये म्हणून आपल्या स्त्रियांना त्यांनी विद्रूप केले. परंतु जुजहार सिंग याचा मुलगा दुर्गभान आणि नातू दुर्जनसाल या दोघांना जिवंत कैद करण्यांत आले. जुजहार सिंग आणि जगराज या दोघांनी मात्र शेजारील जंगलांत पळून जाण्यांत यश मिळविले परंतु

तेथे गोडांनी त्यांना ठार मारले. त्यांची मृत शरीरे खान दौरान याला सापडली. त्याने त्यांचा शिरच्छेद करून त्यांची मस्तके दरबाराकडे रवाना केली.[१३]

### मोगलांचा झालेला लाभ

दरम्यान जुजहारसिंगाने जंगले आणि विहीरी यामध्ये ठेवलेली संपत्ती उकरून काढण्याचा हुकूम बादशाहाने सय्यद खान जहान याला दिला. खान जहान याला मदत करण्यासाठी इशाक बेग येजदी बाकी बेग कलमाक आणि मक्रमत खान यांची नेमणूक करण्यांत आली. स्थानिक रहिवाश्यांनी दिलेल्या सूचनानुसार त्यांनी धामूनी आणि दतिया यामधील मुलूख रगडून काढला. काही काळातच त्यांनी अठ्ठावीस लक्ष रुपये किमतीचा खजिना उकरून काढण्यांत यश मिळविले. एकंदर एक कोटी रुपयांची रक्कम शाही खजिन्यांत जमा करण्यांत आली. बादशाही अधिकाऱ्यांना छडा लागला नाही. त्याचा शोध स्थानिक रहिवाशी किंवा शिपाई व अहदी यांनी लावला आणि त्या वस्तु आपल्या कबजांत घेतल्या.

### शहाजहानची धार्मिक असहिष्णुता

अशा तऱ्हेने जहांगिर बादशाने आश्रय दिलेल्या बुंदेला घराण्याच्या अतिशय समृद्ध असलेल्या अशा कुटुंबाचा त्याचा मुलगा शहाजहान याच्या हस्ते दुःख पर्यवसायी असा शेवट झाला. बंडखोर म्हणून जुजहार सिंग याला अतिशय कडक असे शासन व्हावयास पाहिजे होते याबद्दल कोणतेच दुमत नाही. परंतु त्याच्या जिवंत पकडलेल्या मुलांचे जबरदस्तीने करण्यांत आलेले धर्मांतर राजवाडचामध्ये अथवा अमीर उमरावांच्या घरीं बदनामीचे जीवन जगावे म्हणून त्याच्या स्त्रियांवर लादण्यांत आलेली गुलामगिरी आणि सरतेशेवटी त्याच्या मुलुखातील देवळाचा अतिशय पद्धतशिरपणें करण्यांत आलेला विध्वंस आणि भ्रष्टाचार या गोष्टींना कोणतेच समर्थन देता येणार नाही. या उपाय योजना राजपुत्र औरंगजेबाच्या पुढाकारामुळे करण्यांत आल्या नव्हत्या. या विषयी संशय मानण्यास कोणतीच जागा नाही. अशा प्रकारच्या धोरणाची जडण घडण करण्या इतके पोढपण त्याला निश्चितच आले नव्हते.

वस्तुस्थिती अशी होती कीं, शहाजहान आपल्या मुसलमान अधिकाऱ्यांना धार्मिक बाबतींत बेलगाम पणे वागण्यास उत्तेजन देत होता. इतकेच काय परंतु ओर्च्छाच्या भव्य देवळाचा नाश करण्याचा हुकूमही त्यानेच दिला होता. त्याच्या आज्याने ज्या सलोख्याच्या धोरणाचा स्विकार केला होता त्याच्या अगदी विरूद्ध धोरणे स्विकारणे त्याला शक्य झाले याचे कारण आपल्याला अतिशय कमी विरोध

होईल अशी त्याने अपेक्षा केली. शहाजहानच्या चाकरीमध्ये जे हिंदू अधिकारी होते ते त्यांच्यापैकी कांही धाडसाच्या बाबतीत कमी पडले नसते. परंतु ते संख्येने कमी होते, अधिकाराने खालच्या दर्जाचे होते आणि चारित्र्याच्या बाबतीत ते अगदी हीन दशेला पोहोचलेले होते. राजा जयसिंग, राजा जगत्सिंग, विठलदास गौड, नरहरदास झाला, किशनसिंग बहादुरीया आणि त्यांच्या सारखे इतर यांना त्यांची अब्रू आणि त्यांच्या धर्माचे पावित्र्य यांच्यापेक्षा त्यांच्या हाती असलेली सत्ता आणि त्यांचे स्थान हे अधिक प्यार होते. परंतु या सर्वांमध्ये ज्याला अधिक दोष लावता येईल असा राजा देबी सिंग हा होता. त्याने कशाचीही दिक्कत अथवा शरम न बाळगता त्यांची कृत्यें उघडया डोळयानी पाहिली. इतकेच नव्हे तर त्यामध्ये तो सहभागीही झाला. त्याची नजर बुंदेल्यांच्या गादीवर होती, ती त्याने मिळविली परंतु ती आपल्या नातेवाईकांच्या सांडलेल्या रक्ताने डागाळूनच आणि त्याच्या धर्माच्या बेईज्जतीने दुषित झालेली अशीच. बुंदेल खंडाच्या गादीचे राजेपण त्याच्याकडे आले परंतु बीरसिंगदेव अथवा जुजहार सिंग यांनी त्या गादीमुळे जो सन्मान प्राप्त करून घेतला तो मात्र त्याला मिळविता आला नाही.

बुंदेल खंडामधिल उरलेले किल्ले जिंकून घेण्यास फारसा अवधी लागल नाही. दतिया लवकरच ताब्यांत घेण्यांत आले. परंतु झांशी येथे जुजहारसिंगाचा एक अनुयायी बसंत याने थोडासा प्रतिकार केला. परंतु मक्रमत खानाने किल्ल्याला अतिशय जारीने असा वेढा दिला आणि किल्ल्याच्या शिबंदीला शरण येण्यास भाग पाडले. या ठिकाणी विजयी सैन्याला मौल्यवान अशी लूट मिळाली. दारूने भरलेल्या कोठीसहीत संपूर्ण तोफखाना, धान्याचे भरलेली कोठारें आणि खुपसा खजिना त्यांच्या हातात पडला. विठलदासाचा मुलगा गिरधर याच्या ताब्यांत त्याच्या बापाने बजावलेल्या कामगिरीचें चीज म्हणून हा किल्ला देण्यांत आला.

### शहाजनची बुंदेल खंडाला भेट

आपल्या बापाला औरंगजेबाने जे पत्र लिहिले त्यांत त्याने बुंदेलखंडाचे अप्रतिम सृष्टीसौंदर्य, जंगली जनावरांनी भरलेली तेथिल दाट जंगले, त्या देशातील कृत्रिम तलाव आणि हिरव्यागार टेकडया याविषयी त्याने मोठया भरघोसपणे वर्णन केले.

शहाजहानची उत्सुकता त्यामुळे चालविली गेली आणि तो जरी दक्षिणेकडे जाण्यासाठी निघाला होता तरी ग्वाल्हेरपासून तो पूर्वेकडे

वळला आणि त्याने बुंदेल खंडात प्रवेश केला. भूमगढ येथिल अल्हाददायी धबधबा आणि दतिया येथिल सुंदर इमारती यामुळे त्याला खऱ्याखुऱ्या आनंदाचा प्रत्यय आला. ओर्च्छा येथे तो बीरसिंग देव ह्याच्या भव्य प्रासादांत राहिला. त्याने बीरसागरला भेट दिली आणि तेथे पाणकोंबडयांची शिकार केली. धामूनीच्या जवळ राजपुत्र औरंगजेबाने आपल्या बापाचे आगत स्वागत केले. ह्या ठिकाणाहून आपल्या दक्षिणेच्या प्रवासास पुन्हां सुरवात करण्यासाठी त्या दोघांनी सिरोजकडे कूच केले.[५४]

**चंपतराय याच्या हालचाली**

जुजहारसिंगाच्या पाडावानंतर बुंदेल्यांच्या इतिहासांतील अखंडता नाहीशी झाली, परंतु त्यांच्या राजांच्या वाटचाला जे निर्घृण भवितव्य आले आणि विजयी मोगलांनी त्यांच्यावर जे भयानक अत्याचार केले त्यामुळे बुंदेल खंडाच्या रहिवाश्यांमध्ये विरोधाची वृत्ती निर्माण झाली. लवकरच एका कर्तृत्ववान आणि उत्साही पुढाऱ्याने आपल्या नेतृत्वाखाली त्यांना खेचून घेतले आणि मोगलांबरोबर युद्धाची घोषणा केली. हा पुढारी म्हणजे महोबाचा अधिपती उदयजीत याचा वारस चंपतराय हा होय. ओर्च्छा घराण्याच्या दैदिप्तमान तेजापुढे त्याचे घराणे फिके पडले होते. चंपराय हा बीरसिंग याचा स्नेही होता आणि त्याने जुजहारसिंग याला त्याच्या बंडात मदत केलेली होती. जुजहार-सिंगाच्या बंडाचा बिमोड झाल्यानंतर त्याने जुजहारचा धाकटा मुलगा पृथ्वीराज याला दत्तक घेतले. बुंदेला गादीचा प्रतिस्पर्धी वारस म्हणून त्याला पकडण्याचे कामी बादशाही फौजांना अजूनपर्यंत यश आले नव्हते. आपल्या उत्साही अनुयायांच्या मदतिने चंपतरायाने आता इस्लामाबाद या नावाने ओळखला जाणाऱ्या झत्राच्या महालांवर छापा घातला. त्या सरकारचा फौजदार बाकीखान याने चंपतरायाच्या हालचालींना प्रतिबंध करण्यांसाठीं त्याला शक्य होते तेवढे केले. परंतु बुंदेल्यांच्या गनिमी काव्याच्या हिकमती-मुळे त्याच्या सर्व बेतांवर पाणी पडले.[५५]

**चंपतरायाला वठणीवर आणण्यासाठी अबदुल्ला खानाची रवानगी**

जेव्हां साधारण जानेवारी १६३९ च्या मध्यावर शहाजहान याने लाहोरला जाण्यासाठी आग्रा सोडले तेव्हां चंपतरायाने पूर्वीपेक्षा अधिक साहसीपणा दाखविण्यास सुरवात केली. त्याने मोगलांच्या ठाण्यांवर निर्धोकपणे हल्ले चढविले आणि सुभेदारांनी पाठविलेले तांडे बिनघोरपणे अडविले. त्याने मोगल प्रदेशात चालविलेली लुटालूट ही सिरोंज भिलसा आणि धामूनी

येथपर्यंत पोहोचली होती. त्यामुळे दक्षिणेकडे जाण्याच्या मार्गाला जी असुरक्षितता निर्माण झाली ती दूर करण्यासाठी बंडखोराला पकडण्याकरिता शहाजहान याला अबदुल्ला खानाची रवानगी करणे भाग पडले.[५६] एका वर्षापेक्षा अधिक काळ चंपतरायाला वठणीवर आणण्याचे अबदुल्लाखानाने प्रयत्न केले परंतु त्याच्या प्रयत्नांत त्याला फारच थोडे यश आले. अखेरीला एप्रिल १६४० मध्ये त्याच्या हेराने चंपतराय आणि पृथ्वीराज हे दोघेजण ओर्च्छा आणि झाशी यांच्यामध्ये असलेल्या जंगलांत असल्याची बातमी त्याला दिली. बंडखोरांचा मोड करण्यासाठी आपण स्वत: जावे अशी अबदुल्ला खानाची इच्छा होती. परंतु या मोहिमेचे नेतृत्व आपल्याकडे सोपविण्यात यावे यासाठी बाकीखानाने त्याचे मन वळविले. त्याने बुंदेल्याना यशस्वीरीत्या अचानक गाठले आणि पृथ्वीराजाला पकडले. त्याला ग्वाल्हेरच्या किल्ल्यात कैद करण्याचा हुकूम झाला. परंतु धूर्त असा बंडखोर चंपतराय हा निसटला, आणि बुंदेलखंडामध्ये बंडखोरी चालूच राहिली.[५७]

### बहादूरखानाचे प्रयत्न

अबदुल्ला खानाने ज्या धीमेपणाने मोहिमेचे नेतृत्व केले होते त्याबद्दल शहाजहान हा नाखूष झाला होता. म्हणून त्याने त्याला परत बोलविले. त्याच्या जागी तरूण आणि हिमतवान अशा बहादूरखान रोहिला याची नेमणूक करण्यांत आली. नव्या सेनापतीने आपले काम मोठया उत्साहाने सुरू केले आणि लवकरच बंडखोरांच्या एका टोळीचा त्यांनी धुव्वा उडविला. परंतु दरबारांतील त्याच्या शत्रूनी त्याच्या हालचालींबद्दल बादशाहाकडे विपर्यस्त माहिती दिली आणि त्याला अशी सूचना दिली की बहादूरखानाला बुंदेल खंडात राहू दिल्यास तो बुंदेलखंडाचे दुसरे रोहिल खंड करील.[५८] बादशहाने त्याला माघारी बोलविले आणि दुसऱ्यांदा अबदुल्ला खानाची रवानगी केली.[५९] परंतु परिस्थितीमध्ये सुधारणा घडवून आणण्यासाठी त्याला फारच थोडे करता आले. बुंदेल खंडाच्या रहिवाशानी चंपतरायाला खंबीर असा पाठींबा दिल्यामुळे चंपतरायाने नेहमी मोगलांना झुलवित ठेवले.

### पहाडसिंगाचे यश

यामुळे बादशाहाने पहाडसिंग याला त्याच्या मायदेशांतील बंडाळीचा बिमोड करण्याचा हुकूम दिला. पहाडसिंग हा बीरसिंग देव याचा मुलगा. सहाजिकच त्याला त्याच्या देशबांधवांची निष्ठा आपल्याकडे वळवून घेणे

शक्य होते. याचा परिणाम चंपतरायाची एकंदर परिस्थिती निश्चितच दुर्बल होण्यांत झाला असता. त्याशिवाय ज्याठिकाणी त्याचा जन्म झाला तेथिल प्रदेशाची त्याला उत्तमपैकी माहिती होती, आणि म्हणून बंडखोरांबरोबर त्यांच्याच शस्त्रांनी त्याला लढणे शक्य झाले असते. १६४२ च्या मे महिन्यांत तो बुंदेलखंडात आला. एका महिन्यांत चंपतराय त्याला शरण आला, आणि बादशाहाच्या संमतिने तो त्याच्या चाकरीत शिरला. असे दिसते की कांहीकाळपर्यंत चंपतरायाने पहाडसिंग याची निष्ठेने चाकरी केली. परंतु लवकरच पहाडसिंग याला चंपतरायाला प्राप्त झालेल्या लोकप्रियतेचा मत्सर वाटावयास लागला. परिणामी चंपतरायाने त्याची चाकरी सोडली आणि तो दाराच्या चाकरींत शिरला.[६०]

**चंपतराय दाराची नोकरी सोडतो**

पहाडसिंगाबरोबरील त्याच्या संबंधात जरीं बिघाड झाला होता तरी देखील चंपतरायाने वरवर कां होईना त्याच्या बरोबर सलोख्याचे संबंध ठेवण्याचा प्रयत्न केला. परंतु पहाडसिंग हा खऱ्याखोट्याची चाड न बाळगणारा होता. एका प्रसंगी चंपतराय हा त्याला भेटण्यासाठी आलेला असतांना पहाडसिंगाने त्याला विषप्रयोग करण्याचा अयशस्वी प्रयत्न केला. कालांतराने दुसऱ्या एका वेळी पहाडसिंगाने चंपतरायाच्या छावणींत चोरीची मालमत्ता लपूनछपून आत घुसविली, त्याच्यावर चोरीचा आळ घेतला आणि अशा तऱ्हेने त्याची बे अदबी केली. चंपतरायाने राजपूत्र दारा याच्याकडे तक्रार केली. त्याने या घटनेबाबत चौकशी करण्याचे ऐवजी पहाडसिंग याच्याबर विश्वास ठेवला आणि चंपतरायाची जहागीर त्याच्याकडून काढून घेतली.[६१] या गोष्टीमुळे त्याचे आणि राजपुत्राचे संबंध दुरावले आणि मोगलांबरोबरील शत्रूच्या भावनेला त्याने पुन्हा उजाळा दिला.परंतु त्याने पुढे चंबळ नदी पार करण्याचा फारसा माहित नसलेला मार्ग औरंगजेबाला दाखवून आणि सामुगढ येथे औरंगजेबाच्या बाजूने लढून दारावर पूर्ण सूड घेतला[६२].

परंतु औरंगजेबाबरोबर चंपतरायाचा झालेला समेट हा फक्त तात्पुरता होता. चंपतरायाचा मुलगा सुप्रसिद्ध छत्रसान याने सिंहासनावर आल्यानंतर मोगल सत्तेला आव्हान दिले आणि बुंदेलखंडात खूप गडबड उडवून दिली.

### नूरपूरचे जमिनदार

माऊनूरपूरचा जमिनदार राजा बासू[६३] हा जहांगीरच्या मर्जीतला होता. त्याच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा सूरजमल हा गादीवर आला. परंतु त्याने बादशहाबरोबर विश्वासघाताची वर्तणूक केली आणि म्हणून त्याचे जागी जगतसिंग[६४] याला बसविण्यांत आले. जहांगीरने जगतसिंग याला एक हजार जात आणि पांचशे सवार या मनसबीवर बढती दिली आणि विक्रमाजीत याला कांगडाच्या वेढयांत मदत करण्यासाठी त्याची नियुक्ती केली. अधूनमधून जरी तो मोगलांबरोबर फरकारून वागला हे जरी खरे असले तरी तो बादशाही चाकरीतच राहिला आणि जहांगीरच्या कारकीर्दीच्या अखेरीला त्याच्या मनसबींत तीन हजार जात आणि दोन हजार सवार इतकी वाढ झाली होती. जेव्हां शहाजहान सिंहासनावरती चढला तेव्हां त्याने जगतसिंग याला त्याच्या मनसबींत कायम केले.[६५] १३ मार्च १६३४ रोजीं जगतसिंग हा बादशहाला भेटण्यासाठी सराय इतिमाद उद्दौला येथे आला[६६].

### जगतसिंगाच्या चाकरीचा आढावा

त्याच वर्षीच्या नोव्हेंबर महिन्यांत जगतसिंग याला खटक[६७] बंडखोरांचा मोड करण्यासाठी मध्य बंगशचा ठाणेदार म्हणून नेमण्यांत आले. त्याने तीन वर्षेपर्यंत आपल्या वरीष्ठांना समाधान होईल अशा तऱ्हेने आपल्यावर सोपविण्यात आलेली कर्तव्ये पार पाडली. १६३७ च्या जानेवारी महिन्यात काबूलच्या सुभ्याशी तो संलग्न होता. तेथे त्याने अहदाद[६८] याचा मुलगा करीमदाद यानी केलेले हल्ले परतवून लावण्यात आणि त्याला पकडण्याचे कामी सुभेदाराला मदत केली. १६६९[६९] च्या फेब्रुवारी महिन्यांत तो लाहोर येथे दरबारांत हजर झाला आणि पुढील महिन्यात सबंध बंगशचा ताबा घेण्यासाठी त्याची नेमणूक झाली[७०] त्यानंतर एका वर्षाने बादशाहा काश्मिरकडे जात असतांना जगतसिंगाला तिकडे जाण्याचा मार्ग मोकळा करण्यांचा हुकूम देण्यात आला.[७१]

### राजरुप

दरबारांमधील त्याच्या गैरहजेरीच्या काळांत नूरपूर संस्थानचा कारभार जगतसिंग याचा मुलगा राजरूप याने चालविला. त्याने आपल्या स्वतःसाठी कांगडा दरीची फौजदारी प्राप्त करून घेतली. त्याने बादशाहाला बरीच मोठी खंडणी

देण्यास कबूली दिली परंतु त्याच्या उधळेपणामुळे त्यानें आपल्या अंगावर घेतलेली जबाबदारी त्याला पार पाडणे शक्य झाले नाही. बादशाहाच्या खजिनदाराकडून जेव्हां पैशासंबंधी मागणी आली तेव्हां त्याने बंडखोरीची प्रवृत्ती दाखविण्यास सुरवात केली. त्याने घेतलेल्या या पवित्र्यांत त्याला त्याच्या बापाने गुप्तपणे उत्तेजन दिले. कांगडा दरीतील सरकारी अधिकाऱ्यांना राजरुपचा बंदोबस्त करणे जमले नाहीं.

### जगतसिंग आपल्या मायदेशी परततो

जगतसिंगाने आपल्या मुलाच्या वर्तनाबद्दल आपण नाखूष असल्याचे ढोंग केले आणि त्याच्या विरुद्ध काढण्यांत येणाऱ्या मोहिमेचे नेतृत्व आपल्याकडे देण्यांत यावे अशी विनंती केली. जगतसिंग हा अप्रमाणिक आहे किंवा त्याच्या मनांत विश्वासघात करावयाचा आहे असा संशय शहाजहान याला आला नाही. त्याने ऑगस्ट १६४० मध्ये जगतसिंगाला आपल्या मायदेशी परतण्याची परवानगी दिली. याबद्दल जगतसिंगानें दरवर्षाला चार लक्ष रुपये खंडणी दाखल देण्याची हमी घेतली त्यानंतरचे जवळजवळ बारा महिने जगतसिंग हा आपल्या मायदेशांत असतांना कोणतीही विपरीत घटना घडून आली नाही, आणि त्याने बादशाही आज्ञांचे तंतोतंत पालन केले. परंतु त्याच्या वागणुकीबद्दल शहाजहान याला समाधान न वाटल्यामुळे त्याने कांगडा दरीची फौजदारी जगतसिंगाकडून काढून घेतली आणि त्याच्या जागीं सैदखान जफरजंग याचा मुलगा खानजादखान याची नेमणूक केली.[७२]

जगतसिंगाविरुद्ध जे कांहीं निश्चित असे आरोप होते त्या संबंधी कोणतीही नोंद उपलब्ध नाही. समकालीन बखरीमध्यें त्याच्या बंडाच्या कारणाबद्दल जे निश्चित विधान आपल्याला सातत्याने आढळते ते असे की त्याच्या स्थानाच्या सुरक्षिततेविषयीं जगतसिंग याला वाजवीपेक्षा अधिक आत्मविश्वास वाटत होता. परंतु हे विधान कांहीं त्याच्या बंडखोरीबद्दल पुरेसे स्पष्टीकरण देऊं शकत नाही. हिंदुस्थानामधील जमिनदारांची शासनाच्या सत्तेला तुच्छ लेखण्याची सर्वसामान्यपणें आढळणारी वृत्ती आणि वसुलाचा भरणा सरकारी तिजोरींत जमा करण्याबद्दल त्यांची नाखूषी हे जगतसिंगाच्या बंडाळीचे संभवनिय कारण असावे असे म्हणता येईल. परंतु कोणत्याही तऱ्हेची अथवा पद्धतिची पुरेशी चेतावणी नसतांना अशा तऱ्हेच्या बंडाचा उद्रेक झाल्याची उदाहरणे फारच क्वचित आपल्याला दिसतात. याउलट जगतसिंगानें केलेले बंड

हे कोणत्याही कारणास्तव होते असे मानणे हे निरर्थक ठरेल. जगतसिंग हा मूर्खही नव्हता किंवा लबाड देखिल नव्हता. त्याच्याबाबत पुढे जी माहिती उपलब्ध होते त्यावरून तो शूर युयुत्सु आणि दूरदर्शी होता असे दिसते. असे असतांना आपल्यावर संकट आणि विनाश ओढवून घेण्याचा जणू कांही त्याने आटापिटा केला ही परिस्थिती प्रथम दर्शनी तरी आपल्याला गूढ वाटते.

परंतु जगसिंगाने बंड करण्याचे अगोदर ज्या अनेक घटना घडल्या त्या त्याच्या प्रवृतीला कारणीभूत ठरल्या. पहिल्या प्रथम बादशाहाची त्याच्याबाबतची थोडी-फार उदासिनता त्याच्या ध्यानांत आली. त्याने बादशाहाच्या प्रित्यर्थ अतिशय उल्लेखनिय अशी कामगिरी केलेली असतांना देखिल त्याला बढती मिळालेली नव्हती. परिणामीं तो दुर्मुखलेला आणि असमाधानी बनला. दुसरी गोष्ट म्हणजे सरकारकडून होणाऱ्या मागण्या पुऱ्या करण्यासाठी त्याच्या देशाची साधन संपत्ति अपुरी होती असे आपल्याला दिसते. त्याला नेमून देण्यांत आलेली जहागीरी ही तुटीफूटी आणि खडकाळ अशी होती. सहाजिकच अंतर्गत शांतता आणि सुव्यवस्था राखण्यासाठी लागणाऱ्या उत्पन्नापेक्षां त्या जहागीरीपासून येणाऱ्या वसुलापेक्षां जास्त असणे शक्य नव्हते. किंबहुना ते कमीच होते. तिसरे कारण म्हणजे तो आपल्या राज्यांत आल्यानंतर त्याने चंबाच्या राजावर अतिक्रमण केले, त्याच्या राज्याचा कांही प्रदेश आपल्या राज्याला जोडला आणि तेथे तारा-गडचा किल्ला बांधला. जगसिंग याने केलेले हे आक्रमण आणि त्यामुळे त्याला प्राप्त झालेले सामर्थ्य यामुळे बादशाहा त्याच्यावर नाराज झाला. त्याच्या दृष्टीने काश्मिरच्या वाटेवर उद्दाम राजाचे अस्तित्व हे अतिशय धोकादायक होते. शेवटी जगतसिंगाने आपला मुलगा राजरुप याच्याविरुद्ध कडक उपाययोजना करण्यांत केलेली टाळाटाळ ही घटना शहाजहानच्या मनांत तावडतोबीने त्याच्या-बद्दल नाराजीची भावना निर्माण करण्यास कारणीभूत ठरली. शहाजहानने कांग-डाच्या फौजदारीवर जगतसिंगाऐवजी दुसऱ्या अधिकाऱ्याची नेमणूक केली.

**आपल्या वर्तनाचे स्पष्टिकरण देण्यास जगतसिंगाचा नकार**

सरकारकडून दरबारांत हजर होण्याबद्दल आलेल्या खलीत्याप्रमाणे वागण्यास त्याने दिलेला नकार म्हणजे त्याने बंडाची निशाणी पुकारल्याची पहिली खूण होती. जगतसिंगाकडून याबद्दल स्पष्टीकरण मागण्यासाठी आणि त्याचे भावी बेत काय आहेत याबद्दल माहिती मिळविण्यासाठी शहाजहान याने सुंदर कवीराय

याला पाठविले. कवीराय याने आपल्या अहवालांत असे कळविले कीं जगतसिंग याने जरीं वरवर निष्ठा आणि आज्ञापालन यांचा आव आणला असला तरी बंड करण्याचा त्याचा विचार आहे. यावर शहाजहान याने आपले तीन सेनापती सय्यद खानजहान, सैद खान बहादूर जफरजंग आणि असालत खान यांना जगतसिंगाच्या डोंगरी प्रदेशांत प्रवेश करण्याचा बंडखोरांच्या मजबूत ठाण्यावर हल्ला करण्याचा आणि निर्माण झालेल्या बंडखारीचा नायनाट करण्याचा हुकूम दिला. त्यावेळीं राजपूत्र मुराड हा काबूलहून परत येत होता. त्याच्याकडे त्याने या मोहिमेची सर्वाधिकार सूत्रें सोपवली.[७३]

**मोहिम**

पावसाळ्याचा मोसम संपेपर्यंत मोहिमेला सुरवात झाली नाही. जेव्हां राजपुत्र मुराद पैठण येथे आला तेव्हां त्याला सैद खान बहादूर हे दोघेजण येऊन मिळाले. सैद खान याने पावसाळा बहरामपूर येथे घालविला होता आणि असालत खान हा जम्मूमधील जमिनदारांकडून खंडणी वसूल करून परतला होता.[७४]

बादशाहाने एकंदर कारवाईची जी योजना आखली होती त्यानुसार एकाच वेळीं माऊ आणि नूरपूर या किल्ल्यांना वेढा द्यावयाचा होता त्यानुसार पैठण, पासून आठ मैलावर असलेल्या माऊला वेढा घालण्यासाठी सैदखान, असालत खान आणि जयसिंग यांची रवानगी करण्यात आली. सैन्याला रसदीचा पुरवठा बरोबर होत आहे किंवा नाही यावर देखरेख ठेवण्यासाठी राजपूत्र मुराद हा पैठण येथे छावणी देऊन होता. सैद खान याने हाडा दरींतून कूच केले तर जयसिंग आणि असालतखान चक्की नदी पार करून दऱ्हांचा मार्ग घेतला. सैदखान हा पहिल्या प्रथम माऊ येथे येऊन पोहोंचला आणि त्याने दऱ्हां आणि माऊ टेकड्यांच्यामध्ये असलेल्या राजा बासू या बागेला लागून असलेल्या सपाट जमिनीच्या एका तुकड्यावर आपली छावणी दिली. त्याच्यानंतर थोड्याच अवधित जयसिंग आणि असालतखान तेथे येऊन पोहोचले त्यांना अबदुल्लाखान कुलिजखान, बहादूरखान, अल्लावर्दीखान आणि जफरघान यांची आणखी कूमक मिळाली.

माऊचा किल्ला घनदाट जंगलांने आच्छादलेल्या अशा उंजनिच अशा डोंगरांत होता. आजूबाजूच्या डोंगरांच्या ज्या रांगांच्या मध्यभागी किल्ला उभा होता. त्यामधील पोकळ जागा ह्या अतिशय मजबूत अशा चिरेबंदी कामाने बुजवून

टाकण्यांत आलेल्या होत्या आणि अशा तऱ्हेने किल्ल्याकडे येण्याचे सर्व मार्ग बंद करून टाकण्यांत आलेले होते. छावणीच्या रक्षणासाठी सैनिकांची एक तुकडी पाठीमागे ठेऊन मोगल सेनापतीने आपल्या सेनेची विभागणी अनेक भागांमध्ये केली आणि त्यांची रवानगी किल्ल्याच्या अवतीभवती उभारण्यांत आलेली कृत्रिम तटबंदी जमीनदोस्त करण्यासाठी करण्यांत आली. शत्रूने त्यांची प्रगति रोखून धरण्यासाठी आपल्या परीने सर्व प्रयत्न केले आणि अधूनमधून आजूबाजूच्या जंगलांत जळण आणि वैरण गोळा करण्यासाठी गेलेल्या शिपायांना एकटे दुकटे गाठून त्यांच्यावर हल्ले केले. एकदां वेढा चालू असतांना आपल्या तारुण्य सुलभ उत्साहाच्या भरांत राजा जयसिग हा शत्रूबरोबर युद्ध करण्यासाठी आपल्या रजपूत सैनिकांना फक्त घेऊन चाल करून गेला. परंतु शत्रूने तोफांचा अचूक भडीमार केला आणि त्याला माघार घेण्यास भाग पाडले या प्रसंगामुळे बाद-शाही सैन्यांमध्ये बरीचशी औदासिन्याची भावना निर्माण झाली आणि पुढील तीन महिन्यांत वेढयाच्या कामांत फारशी प्रगति होऊ शकली नाही.

कांही स्थानिक जमिनदारांनी केलेल्या सुचनेवरून माऊ किल्ल्याचा वेढा अधिक जोरदारपणे रेटण्याचा निर्णय घेण्यांत आला. त्यानुसार नजाबतखान नजरबहादूर खैशगी, अकबर कुली सुलतान खक्कर आणि राजा मान ग्वालीजोरी यांना नूरपूरच्या सैन्यांतून काढून माऊ येथिल सैन्याला कुमक म्हणून पाठविण्यांत आले. त्यांचे तेथे आगमन झाल्यावर ९ नोव्हेंबर १६४१ रोजीं सैद खान याने माऊ सोडले आणि त्याने किल्ल्याच्या पिछाडीवर मारा करता येणारी एक टेकडी जिंकून घेण्यासाठी रापेरच्या दिशेने कूच केले. त्याने आपले दोन मुलगे सादुल्ला आणि अबदुल्ला आणि जुल्पिकार खान यांना सैन्याची एक तुकडी बरोबर टेकडीच्या माथ्यावर छावणी करण्यास योग्य अशी जागा शोधून काढण्यासाठी रवाना केले. परंतु त्यांना टेकडीवर दाट झाडें झुडपे असल्याचे आढळून आले म्हणून त्यांनी आपल्या बापाकडे जागेची साफसफाई होईतोपर्यंत आहे तेथेच राहण्याचा निरोप पाठविला. ते आपल्या कामामध्ये गुंतलेले असतांना बंडखोरांनी शेजारच्या एका टेकडावरून त्यांच्यावर तोफांचा भडीमार केला आणि मोगल तुकडींत त्यांनी एकच गोंधल उडविला. यावर सैद खानाने आपला दुसरा मुलगा लुतफुल्ला याला सादुल्लाच्या मदतिसाठी पाठविले परंतु लुतफुल्ला पराजीत होऊन जखमी झाला आणि त्याचा हल्ला परतविण्यांत आला. सरतेशेवटीं, शत्रूला हाकलून देण्यांत जुल्पिकार खानाला यश आले. दुसऱ्या दिवशीं सैद खान राबेर येथे पोहोचला आणि त्याने पुढे कूच केले. प्रत्येक मुक्कामाच्या वेळीं

त्याने बंडखोरांकडून रात्रीच्या वेळीं होणाऱ्या हल्ल्याला प्रतिबंध करण्यासाठी आपल्या छावणी भोवती कांटेरी झाडे आणि झुडपें यांची छाती इतकी उंच भिंत उभी केली. त्यानें सावकाशपणें परंतु निश्चलपणें आगेकूच केले. परंतु शत्रूने प्रत्येक इंच इंच भूमी लढविली.

१५ नोव्हेंबर रोजी सैदखानाच्या सैन्याच्या आघाडीचे नेतृत्व असलेला नजाबतखान हा राजा बासू बागेच्या विरुद्ध दिशेला असलेल्या शत्रूच्या बचाव फळीवर मारा करता येईल अशा एका उंचवठ्याचे ठिकाणीं पोहोचला. तेथे शत्रूने अतिशय मजबूत असे संरक्षक दल ठेवलेले होते. परंतु जुल्पिकार खान आणि त्याचे बंदुकधारी सैनिक यांनी एका बाजूने आणि नजर बहादूर खेशगी, शेख फरीद आणि राजा मान यांनी दुसऱ्या बाजूनें त्यांच्यावर हल्ला चढविला. परंतु बंडखोर त्यांच्याबरोबर अतिशय शौर्याने लढले आणि आक्रमकांचे त्यांनी अतिशय भयंकर असे नुकसान केले. वरील तटबंदीवर अचानक हल्ला करून ती घेण्याच्या प्रयत्नांना अपयश आले. त्यावेळेपुरतें तरी माऊवरील कारवाईला खळ पडली. राजा मान याला जवळच असलेला एक किल्ला जिकण्यासाठी पाठविण्यात आले. किल्ला जिंकून घेण्यांत त्याला यश आले.

लढाईच्या दुसऱ्या एका केंद्रस्थानी देखिल परिस्थिती फारशी आशादायक नव्हती. नूरपूरचा किल्ला जिंकून घेण्यासाठी सय्यद खानजहान याची नियुक्ति करण्यांत आली होती. त्या किल्ल्याजवळ पोहोचण्याच्या अडचणी ह्या माऊ किल्ल्यात प्रवेश मिळविण्यासाठी ज्या अडचणी होत्या यापेक्षा कांही कमी नव्हत्या. त्या किल्ल्याच्या उत्तर आणि दक्षिण बाजू यांचे संरक्षण उंच होत जाणाऱ्या डोंगरांनी केलेले होते आणि ह्या टेकड्या नूरपूरचा किल्ला ज्या टेकड्यांच्या माथ्यावर होता त्याहिपेक्षा उंच होते. या किल्ल्याच्या पश्चिम बाजूला एका बाणाच्यापैकी एवढ्या अंतरावर अतिशय सोसाट्याने वाहणारा आणि पार करून न जाता येणारा असा ओढा होता. या किल्ल्याच्या पूर्व बाजूला जेथे किल्ल्याचा मूख्य दरवाजा होता तेथे चढउतार असलेतें एक मैदान होते, आणि सैन्याने छावणी करण्यांस ते पूर्णपणे निरुपयोगी होते. त्या शिवाय किल्ल्यावरील शिबंदीजवळ रसद आणि लढाईसाठी लागणारी इतर सर्व साधन सामुग्री यांचा भरपूर साठा होता. यांत आणखी भर म्हणून शत्रूने आजूबाजूच्या सर्व इमारती उध्वस्त करून टाकल्या होत्या.

नूरपूरच्या वाटेवर असतांना सय्यद खानजहान हा २८ सप्टेंबर १६४१ रोजीं बिल्हवान येथे पोहोचला. तेथे आल्यावर त्याला असे कळले कीं त्याची वाट राजरूप याने सुसज्ज अशा एका सैनिकांच्या तुकडीच्या मदतीने रोखून धरली आहे. आक्टोबर १५ रोजीं त्याच्यावरोबर लढाई देण्यासाठी त्याने कूच केले. सैन्याच्या आघाडीचे नेतृत्व नजाबतखान याच्याकडे होते. त्याने राजरूप याला पळवून लावले. दुसऱ्या एका तुकडीने मोगलांची प्रगति रोखून धरण्यासाठी ज्या गवंडी कामाची उभारणी केली होती ते काम जमिनदोस्त केले. परंतु या यशामुळे सय्यद खानजहान हा आपल्या उद्दिष्टानजीक आला असे मात्र म्हणता येणार नाही. नूरपूरकडे जाण्याची वाट अजून खुली झालेली नव्हती. प्रत्येक जागेचे संरक्षण बंदूकधारी सैनिक आणि तिरंदाज हे उत्तम तऱ्हेने करत होते. परंतु खान जहान याने डोंगरावर रहाणाऱ्या एका तेथिल रहिवाशाच्या मदतीने एका अनोखी मार्गाने कूच केले आणि ९ नोव्हेंबर रोजी तो नूरपूरपासून एक मैलावर येऊन पोहोचला.

या ठिकाणी त्याला किल्ल्याच्या संरक्षणासाठी जगतसिंग याने जी प्रचंड तयारी केली होती त्याची बातमी कळली. किल्ल्याच्या संरक्षणासाठी एकंदर दोन हजार बंदुकधारी सैनिक होते. तरी देखिल सय्यद खानजहान याने मोठया उत्साहाने वेढयाच्या कामाला सुरवात केली. त्याने किल्ल्या सभोवार खंदक खोदले आणि मोठया कष्टाने तटबंदीच्या जवळ जाण्यात यश मिळविले. सुरूंग पेरून तटबंदी उडवून टाकण्याचा त्याने प्रयत्न केला. परंतु प्रत्येक वेळी निरनिराळया मार्गाने शिबंदीने त्याचे प्रयत्न हाणून पाडले. कांही वेळा सुरूंग पेरलेल्या ठिकाणी त्याने भरपूर पाणी सोडले तर दुसऱ्या वेळी तटबंदीची भिंत दैदिप्यमान प्रकाशाने ते उजळून टाकीत त्यामुळे बादशाही सैनिक त्यांच्या प्रखर माऱ्याची निशाणी बनत. इतकेंच नव्हे तर सुरूंगाच्या पेरणीचे काम करणे त्यांना अशक्य होऊन जाई. जेव्हां नजाबतखान आणि इतर अधिकारी यांना सय्यद खानजहान याच्या सैन्यातून काढून टाकण्यात आले. तेव्हां तर त्याची प्रगति जवळजवळ थांबली. तरी देखिल त्याच्या दोन गोलंदाजांनी किल्ल्याच्या तटबंदीच्या खाली सात सुरुंग पेरले. त्यापैकी सहां सुरूंग किल्ल्यावरील शिबंदीने शोधून काढले. परंतु सातवा सुरूंग त्यांच्या नजरेतून निसटला. हा सुरुंग देखिल शिबंदीने लोक झपाटयाने शोधून काढतील या भितीने सय्यद खानजहान याच्या मुलाने त्यांत दारू भरली आणि त्या सुरूंगाला बत्ती देण्याच्या आज्ञेची आपण वाट पहात आहोत असा निरोप त्याने आपल्या बापाकडे पाठविला

आपली माणसे बरोबर घेऊन सय्यद खानजहान हा तेथे आला आणि सुरूंगाच्या स्फोटामुळे जे खिंडार पडले त्यामधून हल्ला करण्यासाठी तेथे तो तयारीने उभा राहिला. परंतु हा सुद्धा सुरूंग व्यवस्थित भरला न गेल्यामुळे भितीचा कांही भागच उडाला आणि मोगलांचा हाही प्रयत्न फसला.

माऊ आणि नूरपूर येथे केलेल्या हालचालींना आलेल्या अपयशामुळे शहाजहान याला आपल्या बेतात थोडासा बदल करणे भाग पडले. त्याने असालतखान याला नूरपूर येथे जाण्याचा हुकूम दिला आणि सय्यद खानजहान याला माऊच्या किल्ल्याकडे पाठविले. राजपूत्र मराद याला पैठाणचा ताबा राव उमराव सिंग आणि मिर्जा हसन सफवी यांच्याकडे सोपवून माऊच्या किल्ल्याला देण्यात आलेल्या वेढयाचे कामावर समक्ष देखरेख करण्यासाठी जाण्याचा हुकूम देण्यांत आला. बादशाही प्रयत्नाचे एका ठिकाणी झालेले हे केंद्रीकरण पाहून जगतसिंग हा भयभीत झाला, आणि त्याने आपल्या वागणुकीबद्दल माफी मागण्यासाठी आणि बादशाही दयेची भीक मागण्यासाठी आपला मुलगा राजरूप याला अल्लावर्दीखान याच्यातर्फे राजपुत्राकडे पाठविले. क्षमेचे अभिवचन मिळाल्या-नंतर २८ नोव्हेंबर १६४१ रोजी राजपुत्र मुराद याला येऊन भेटला. झालेल्या मुलाखतीत त्याने कांही अशक्य अशा अटी सुचविल्या त्यावर राज-पुत्राने उद्गार काढले कीं आज्ञा पालन म्हणजे जे दिले आहे त्याचा स्वीकार करणे आणि आपल्याला इच्छा आहे त्या प्रमाणे मागणी न करणे. राजपुत्राच्या या उद्गारामुळे जगतसिंग याच्या मनाने पलट खाल्ली आणि आपले प्रयत्न जारी राखण्यासाठी तो आपल्या किल्ल्याकडे निघून गेला.

माऊचा वेढा आता पूर्वीपेक्षाही अधिक जोरदारपणे चालविण्यांत आला. सय्यद खानजहान रूस्तम खान आणि बहादूर खान यांना गंगथळ'च्या बाजूने किल्ल्याकडे जाण्याचा हुकूम देण्यांत आला आघाडीच्या सैन्याचे नेतृत्व बहादूरखानाकडे होते. त्याने शत्रूबरोबर पुढे कूच करता करता लढाई चालू ठेवली आणि त्यांत त्याची सातशे माणसे जाया झाली. परंतु त्यामुळे नाउमेद न होता या सेनापतींनी धाडसीपणें आपली आगेकूच चालू ठेवली. दरम्यान १३ डिसेंबर रोजी राजपुत्र मुराद याने किल्ल्यावर ज्या टेकडीवरून देखरेख ठेवता येईल ती काबीज केली आणि किल्ल्यावर एकत्रितपणे हल्ला करण्याचा हुकूम दिला. जय-सिंग आणि अल्लावर्दीखान यांनी दऱ्हीच्या बाजूने किल्ल्यावर हल्ला चढविला. आणि किल्ल्यामध्ये सहजतया प्रवेश केला. इकडे डाव्या बाजूने कुलिज खानाने डाव्या

बाजूकडील "हल्ल्याचे नेतृत्व केले. इतर अधिकाऱ्यांनी ऊजव्या बाजूने जंगलात प्रवेश केला आणि किल्ल्यावर ताबा चालविता येईल अशा टेकड्या काबीज केल्या. जगतसिंग याचा धीर आता सुटला आणि तो तारागढकडे पळून गेला. याचवेळी नूरपूर येथिल शिबंदीचाही धीर सुटला आणि त्यांनी किल्ला खाली केला. मोगलांनी किल्ल्याचा ताबा घेतला.

जरी जगतसिंगाच्या ताब्यातील प्रदेशाचा प्रमुख भागाचा मोगलांनी ताबा घेतला होता तरी देखिल त्याच्यावरील मोहीम अजून संपुष्टांत आलेली नव्हती. अजूनपर्यंत त्याच्याकडे तारागढच्या किल्ल्याचा ताबा होता. २८ डिसेंबर रोजी बहादूरखान आणि असालतखान यांची किल्ला जिंकून घेण्यासाठी रवानगी करण्यांत आली. त्यांच्यापुढे मोठया संख्येने बेलदार आणि चर खणणारे जंगल साफ करण्यासाठी आणि रस्ता रूंद करण्यासाठी रवाना करण्यात आले. त्या शिवाय चंबाचा राजा प्रिथीचंद याला आपल्या मायदेशी परतण्याचा आणि किल्ल्याच्या वेढ्याचे कामी मदत करण्यासाठी तयारी करण्याचा हुकूम देण्यांत आला. त्याच्या समवेत जगतसिंग याचा कट्टर शत्रू राजा मान ग्वालीओरी हाही गेला. चंबा जिल्ह्यामध्ये असलेली आणि जिच्यावरून तारागढ किल्ल्यावर हुकुमत चालविता येईल अशी टेकडी ताब्यात घेण्याची आज्ञा त्यांना करण्यांत आली.[७५]

## अजितसिंग याची शरणागति

१६४२ च्या जानेवारी महिन्याच्या सुरवातीला तारागढचा वेढा सुरू करण्यांत आला. वेढा दोन महिने चालला जरी बादशाही फौजांची फारच थोडी प्रगति होऊ शकली तरी जगतसिंग हा मोगलांबरोबर चाललेल्या संघर्षाला थकला. आपल्या वतीने राजपुत्र आणि बादशाहा यांच्याजवळ मध्यस्थि करण्यासाठी आणि त्याची मनसब आणि राज्य त्याला परत मिळवून देण्याकरींता विनंती करण्यांसाठी त्याने आपला मुलगा राजरूप सय्यद खानजहान याच्याकडे पाठविले.[७६] राजपुत्र मुराद याच्या शिफारसीवरून जगतसिंग याला आणण्यासाठी सय्यद खानजहान याला पाठविण्यांत आले. तो जेव्हां तारागढ येथे पोहोचला तेव्हां जगतसिंग याने त्याला किल्ल्यामध्ये घेतले आणि त्याच्या सन्मानार्थ एक थाटाची मेजवाणी दिली. या मेजवाणीला त्याने बहादूरखान आणि असालत खान यांनाही आमंत्रण दिले. यानंतर कांही काळाने तारागढची तटबंदी जमिनदोस्त करण्याबद्दल बादशाहाकडून हुकूम येऊन

पोहोचले. त्याचा परिणाम बादशाही अधिकाऱ्यांत मतभेद निर्माण होण्यांत झाला. वरील आज्ञांचे ताबडतोब पालन करावे असा बहादुरखान आणि असालत खान यांचा मानस होता, परंतु खानजहान याने थोडा सबरीचा सल्ला दिला. बहादुरखान आणि असालत खान यांनी स्विकारलेल्या धोरणामुळे जगतसिंग हा संतप्त झाला आणि त्यांना असे म्हणाला, " मी तुम्हांला किल्ल्यात घेतल्यामुळे तुम्ही किल्ल्यामध्ये प्रवेश करू शकला. अजून देखिल सर्व कांही गमावल्यांसारखे झाले नाही. मी किल्ल्याच्या बाहेरील तटबंदी सय्यद खानजहान याच्या ताब्यांत देत आहे आणि किल्ल्याच्या दुसऱ्या संरक्षण फळीच्या पाठीमागे मी मागे होत आहे. तुम्ही माझ्यावर कशी मात करतां तेच मला पाहू दे." आपल्या म्हणण्याप्रमाणे जगतसिंग खरो-खरीच बालेकिल्ल्याकडे गेला आणि मोगलांना आणखी प्रतिकार करण्यासाठी तयारी त्याने सुरू केली.[७७]

**या घटनेतील खानजहानचा भाग**

यावर खानजहान याने पुढील मजकुराचा खलीता शहाजहाकडे पाठविला मी जगतसिंगाबाबत शिफारस केली ती त्याच्याबद्दल मला भिती वाटत होती म्हणून नव्हे प्रत्यक्षात त्याच्या नरडीचा घोट घेण्यांत मी उत्सक होतो. वरील प्रमाणे शिफारस करण्यांत माझी कारणे वेगळी होती. राजपुत्र आणि इतर प्रमुख अधिकारी यांच्या नेतृत्वाखालील मोहीम फार काळ लांबली होती आणि जगतसिंगाने ज्या किल्ल्यांचा आसरा घेतला होता तो अजिक्य होता. यापुढे कारवाई चालू ठेवली असती तर त्यामुळे बादशाही इभ्रतीला धक्का पोहोचला असता मी जमालखानाला पाठवित आहे. तो आलमपन्हाना एकंदर सर्व परिस्थितीचे स्पष्टीकरण करून सांगेन. बंडखोरांना क्षमा करावयाची किंवा नाही ते ठरविण्याबाबतचा निर्णय घेण्यांचा अधिकार आलमपन्हाना-कडे आहेत" वरील पत्र पाठविल्यानंतर खानजहान याने बादशाहाकडून आलेल्या आज्ञांचे पालन करण्याबाबत बहादूरखान आणि असालतखान यांना यशस्वीपणे प्रतिबंध केला आणि एकंदर परिस्थितीबद्दलची सर्व जबाबदारी कागदोपत्री आपल्या शिरावर घेतली.

शहाजहान याने तारागढची तटबंदी जमिनदोस्त करण्याबाबत आग्रह धरला असावा असे दिसते. कारण सय्यद खानजहान याने बादशाहाला पुढे जे एक पत्र पाठविले त्यात तो असे लिहितो की आपल्या कुटुंबाला राहण्याकरिता ज्या इमारती बांधण्यांत आल्या आहेत त्यांना धक्का न लावल्यास जगतसिंग

तारागढची तटबंदी जमिन दोस्त करण्याबद्दलची आपली जी अट आहे त्याला संमती देण्यास तयार आहे. किल्ल्याची बाहेरील तटबंदी जमिनदोस्त केल्यानंतर आणि किल्ल्याच्या उरलेल्या भिंती आणि इतर किल्ले भुईसपाट करण्याच्या कामगिरीवर आपला जावई सय्यद फिरोज याला ठेऊन सय्यद खानजहान हा ११मार्च १६४२ रोजी जगतसिंगाला घेऊन राजपुत्राकडे आला. एका आठवड्यानंतर बादशाहाबरोबर जगतसिंगाची भेट करून देण्यात आली आणि त्याच्या मनसबीबर त्याला परत नेमण्यात आले. त्याने आपले उर्वरीत आयुष्य बादशाहाच्या चाकरीत घालविले.[७८]

**बुंदेल्यांच्या बंडाबरोबर तुलना**

हे बंड आणि बुंदेल्यांचे बंड ही दोन्ही अगदी सारखी असल्याचे आपल्याला दिसून येईल इतकेच नव्हे तर या दोन्ही बंडामध्ये पुष्कळ बाबतीत-समभाव असल्याचे आपल्याला आढळेल. दोन्ही बंडांचा उगम सारख्याच कारणामधून झाला आणि दोन्ही बंडांचे कांही तपशिल परस्परांशी जुळणारे आहेत. जुजहार सिंगाने चौरागढचा बळजबरीने तांबा घेतला त्याची तुलना आपल्याला छंबा राज्यावर जगतसिंग याने जे आक्रमण केले त्या बरोबर करता येईल. प्रेमनारायण याचा जो विश्वासघाताने खून झाला आणि जवळजवळ तशाच परिस्थितीत प्रिथीचंद याच्या बापाचा जो खून झाला त्याबाबतची एकरूपता आपल्याला सिद्ध करता येईल आणि जर जुजहारसिंग याचा मुलगा विक्रमाजीत हा कांहीकाळपर्यंत राजद्रोही होता असे आपल्याला दिसते तर जगतसिंग याचा मुलगा राजरूप यानेही आपण तसेच आहोत असा आव आणल्याचे आपल्याला दिसून येईल. दोन्ही बंडात फरक एवढाच की एका बाबतीत बंडखोरांच्या संपूर्ण वंशाचा उच्छेद करण्यांत आला तर दुसऱ्या बाबतीत त्यांच्यावर दया दाखविण्यांत येऊन त्यांना क्षमा करण्यांत आली. ह्याबाबत कारण शोधण्यासाठी आपल्याला फार दूर जावयास नको. बुंदेल्यांच्या बाबतीत त्यांच्या संपत्तीने मोगल बादशहांची द्रव्य लालसा चेतविली गेली. आणि ही संपत्ती मिळवावयाची तर बुंदेल्यांचे अस्तित्व नाहीसे केल्याखेरीज ते अशक्य होते. जगतसिंगाचे बाबतीत अशा प्रकारचे कोणतेही प्रलोभन नव्हते आणि जेव्हां एकदा जगतसिंगाने आपल्या ताब्यातील सर्व किल्ले जमिनदोस्त करण्यास संमत्ती दिली तेव्हा बंडखोर आता निरूपद्रवी झालेले आहेत या समजुतीने शहाजहानला त्यांच्याबाबत आणखी पुढे पाऊल टाकणे जरूर आहे असे वाटले नाही. ⌘⌘

# तळ टीपा

## प्रकरण चौथे

(१) खान जहानचे पूर्वज आणि त्याचे पूर्वायुष्य यांच्या हकिकतीसाठी पहा मरवजन-इ-अफाघ्ना R. B., Vol. I, pp. 87-89; मासिर उळ उमरा, Vol. I. pp. 716-32.

(२) R. B. Vol. II, p. 260.

(३) इक्बालनामा, पाने २२९-३१, माकिद उल् उमदा, खंड १, पाने ६७५-९३.

(४) इक्बालनामा, पान २३१.

(५) इक्बालनामा, पान नं. २४५.

(६) इक्बालनामा, पान २७९.

(७) या लाचेबद्दलचा उल्लेख फक्त मोतमदखान हा करतो; या मुद्याबाबत ज्यांनी मौन बाळगले आहे त्यामध्ये कजवीनी, लाहोरी आणि शहानवाजखान देखिल आहेत, शहानवाजखान सांगतो की महाबतखान हा मांडूवर चाल करून येत आहे अशा बातम्या फैलावल्या तेव्हां खान जहान याने निजाम उल् मल्क याच्याबरोबर दोस्ती केली (इक्बालनामा, पान २८४, कजवीनी, पान ११८, लाहोरी, खंड १, पान ७६ ; मासि उल् उमदा, खंड १, पान ७२२).

(८) "खानजहान याने आपल्या मुलाला भडोच येथे रवाना केलेले आह आणि या प्रांतातील त्याच्या सर्व जहागीरीमध्ये आणि नदियाड-मध्ये देखिल बुलाकीच्या खुल्याचा उपयोग केला जात आहे (The English Factories in India) (1624-29), (p. 223.)

(९) मासिर उल् उमरा, खंड १, पान ७२२.

(१०) कजवीनी, पान ११८; The English Factories in India (1624-29) p. 241.

(११) कजवीनी, पान ११८ ; लाहोरी, खंड १, पान ७६.

(१२) कजवीनी, पान १७९ब; लाहोरी, खंड १, पान ७६.

(१३) कजवीनी, पान १८० ; खान जहान याने मोत्यांची एक माळ शहाजहानाकडे पाठविली असे विधान मासिर उल् उमरा मधे आहे (खंड १, पान ७२३).

(१४) लाहोरी, खंड १, पान २७३.

(१५) मासिर उल् उमरा, खंड १ : पान नं. ७२३.

(१६) मासिर उल् उमदा, खंड १, पान २७३.

(१७) कजवीनी, पाने १८०ब-१८१ ; लाहोरी, पाने २७४-७५.

(१८) कजवीनी, पाने ११५ब ; लाहोरी, खंड १, पान ७२.

(१९) जेव्हा खान जहान हितिया पूल गेटाजवळ ((The Elephant Gate) पोहोचला तेव्हा तो उद्गारला अरे देवा मी माझी अब्रू वचावण्यासाठी पळून जात आहे ; माझ्या मनांत बंडखोरीचे बेत नाहींत (मासिर उल् उमरा, खंड १, पान ७२५).

(२०) कजवीनी, पाने १८०-८३ब ; लाहोरी खंड १, पाने २७६-८०

(२१) मासिर उल् उमदा, खंड १, पान ७२६.

(२२) कजवीनी, पान १९२; लाहोरी, खंड १, पाने ३०४-३०५: खान जहानच्या अर्धवट उत्साहीपणाबद्दल मासिर उल् उमराच्या कर्त्याने एक मनोरंजक गोष्ट दिली आहे. तो म्हणतो की लढाईच्या दिवशीं खानजहा मोठ्या आत्मसंतुष्टपणे पालखीत बसून तंबाखू ओढीत होता. यावर त्याचा मुलगा अजीज त्याला म्हणाला की "तुम्हाला जर लढावयाचे असेल तर घोड्यावर स्वार व्हा आणि लढा ; नाहीतर इतक्या जीवांच्या नाशाला कारणीभूत होण्याचे तुम्हाला कारण काय आहे ?" यावर खानजहानने उत्तर दिले की "तुला असे वाटते का आपण बादशाही फौजांविरुद्ध यशस्वी होऊ ? परमेश्वर हा त्यांच्या बाजूला आहे. मला माझ्या वागणुकीने शांततेला पोषक असे वातावरण निर्माण करावयाचे आहे म्हणजे तुला तुझा उत्कर्ष करून घेण्याची संधि मिळेल आणि मला मक्केला जाता येईल." (मासिर उल उमदा, खंड १, पाने ७२६-२७).

(२३) कजवीनी, पान २०० ; लाहोरी खंड १, पान ३२१.

(२४) कजवीनी, पाने २००ब-२०२-ब ; लाहोरी खंड १, पान ३२२-२६

(२५) कजवीनी, पान २०२ब ; लाहोरी, खंड १, पाने ३२६.

(२६) कजवीनी, पान २०७ ; लाहोरी, खंड १, पाने २३४-३५.

(२७) लाहोरी, खंड १, पान २३६, कजवीनी, पान २०७ब.

(२८) लाहोरी खंड १, पान २३८-३९; कजवीनी, पाने २०८-२०९ब.

(२९) लाहोरी, खंड १, पाने २४८-५२; कजवीनी, पान २१५ब-२१७ ब.

(३०) मासिर उल् उमदा, खंड २, पाने १९७-९९ ; वीर सिंग देव याच्या पूर्वजांच्या माहितीसाठी शेख जलाल हिसादीचा वृत्तान्त, पाने १३७-३९; आणि छत्र प्रकाश पहा.

(३१) शेख जलाल हिसारी, पान १३९ब.

(३२) कजवीनी, पान १५२, लाहोरी, खंड १, पान १९६.

(३३) कजवीनी, पान १६८ब ; जुझाद सिंगाच्या या अचानक पलायनाबद्दल कोणतेही कारण लाहोरी देत नाही (खंड १, पान २०३); शेख जलाल कजवीनीबरोबर सहमत आहे (पान १४०) , मासिर उल् उमदा, खंड २, पान २१५.

(३४) जुझाद सिंगाचा पाठलाग करण्याचे पुढे ढकलण्यांत आले याला कारण बादशाहाने त्याबद्दल परमेश्वरावर निर्वाळा ठेवला असे स्पष्टीकरण कजवीनी आणि लाहोरी हे दोघेजण देतात. (कजवीनी पान १६८ब, लाहोरी, पाने २०३-२०४).

(३५) मासिर उल् उमदा, खंड २, पाने २१२-१४; कजवीनी, पान १६९.

(३६) कजवीनी, पान १६९; महावतखानाच्या उतावीळपणाला मर्यादित करण्यासाठी इस्लाम खानाची नेमणूक करण्यांत आली असे विधान लाहोरी करीत नाहीं (खंड १, पान २४); शेख जलाल, पान १४०

(३७) मासिर-उल्-उमदा, खंड २, पाने २५६-६०.

(३८) कजवीनी, पान १७२, वाटाघाटींची सुरवात इदजचा पाडाव होण्यापूर्वी झाली असे लाहोरीचे मत आहे. (खंड १, पान २४६); या प्रसंगाबाबत शेख जलाल हिसारी याने दिलेला वृत्तान्त अतिशय त्रोटक आहे (पान १४०).

(३९) छत्र प्रकाश, प्रस्तावना, पाने ९-१०; दुर्दैवाने श्याम सुंदर दास याने बुंदेलखंडावरील या दोन मोहिमांची गल्लत केली आहे.

(४०) कजवीनी विशेषेकरून महावतखानाच्या नावाचा उल्लेख करीत नाही (पान १७२); परंतु लाहोरी निश्चितपणे त्याच्या नावाचा उल्लेख करतो (खंड १, पान २४६) शेख जलाल लाहोरीबरोबर सहमत आहे (पान १४०).

(४१) कजवीनी, पान १७३ ; लाहोरी, खंड १, पाने २५४-५५.

(४२) लाहोरी, खंड १, पाने २९६ आणि ३०३.

(४३) लाहोरी, खंड १, पान ४०५.

(४४) कजवीनी, पान ३४३, लाहोरी, खंड १, भाग २, पान ९५; शेख जलाल, पान १४०.

(४५) कजवीनी, पान ३४३; तवातबाई, पान १३६ब; लाहोरी, खंड १, भाग २, पान ९५; शेख जलाल, पान १४१.

(४६) खान जहान याचा पाठलाग करण्याची जी कामगिरी विक्रमाजीत याने बजाविली त्याबद्दल पारितोषक म्हणून त्याला जगराज हा किताब मिळाला ; कजवीनी, पान २०९; लाहोरी, खंड १, पान ३३९.

(४७) तबातबाई असे सांगतो की अलावर्दीखान हा त्याच्या (जगराज) मार्गावर होता आणि त्याने त्याचा पाठलाग केला (पान १३७); परंतु वर उल्लेखिल्याप्रमाणेच कजवीनी, लाहोरी आणि शेख जलाल यांचे मत आहे.

(४८) राजा भारत बुंदेला (मृत्यू १६३३-३४) याचा हा मुलगा होता, साहाजिकच परंपरागत वारसाहक्कान्वये मिळणारे प्रमुखपद हे त्याच्याकडे सोपविले गेले (मासिक उल्-उमदा, खंड २, पाने २९५-९७)

(४९) Jarret, खंड २, पाने १८८.

(५०) कजवीनी, पान ३४४ ब, तवातबाई, पान १३७ब, लाहोरी, खंड १, भाग २, पान ९६.

(५१) कजवीनी, पान ३४८ब, लाहोरी, खंड १, भाग २, पाने ९८-९९.

(५२) लाहोरी, खंड १, भाग २, पान ९९.

(५३) लाहोरी, खंड १, भाग २, पाने ११०-१६; कजवीनी, पान ३५३ब आणि पाने ३५७-५९ब; शेख जलालयाची हकिकत धामुनी काबीज होईपर्यंतच सांगितलेली आहे कारण त्यानंतर त्याचा आश्रयदाता

सय्यद खान जहान याला जंगले आणि विहिरी यांत दडवून ठेवलेली जुजहारसिंग याची संपत्ति उकरून काढण्याच्या कामगिरीवर नियुक्त करण्यांत आले. परंतु शेख जलाल हा काही शद्वातच जुजहारसिंग याच्या पाडावाचे वर्णन देतो.

(५४) कजवीनी याने बुंदेलखंडावरील स्वारीच्या वर्णनाचा जो वृत्तान्त रचला त्यामुळे बादशाहाची त्याच्यावर मर्जी बसली (पान १० आणि पाने ३५५-५६ब).

(५५) छत्र प्रकाश, पाने १०–११; मासिर-उल्-उमरा मधील बाकीखान याचा वृत्तान्त पहा, खंड १, पाने ४२७-२९, लाहोरी, खंड २, पान १३६.

(५६) बुंदेल्यांनी जी धामधूम उडवून दिली त्यासाठी ग्वाल्हेरच्या तुरुंगाचा अधिक्षक सय्यद मुजफ्फर बारह खान जहान याची पत्रे पहा (पाने १-२५); लाहोरी, खंड २, पान १३६; छत्र प्रकाश, पान २५.

(५७) लाहोरी, खंड २, पाने १९३-१९४.

(५८) लाहोरी, खंड २, पाने २२१ आणि २४७, मासिर उल् उमरा, खंड १, पान १२०.

(५९) लाहोरी, खंड १, पान २४७.

(६०) लाहोरी, खंड २, पाने ३०३-३०४; मासिर-उल्-उमरा, खंड, पाने २५७-५८; छत्र प्रकाश, पाने ३०-३१, कुन्चचा परगणा चंपतला नेमून देण्यांत आला होता.

(६१) छत्र प्रकाश, पाने ३१-३२.

(६२) छत्र प्रकाश, पाने ३६-३७.

(६३) मासिर उल्-उमरा, खंड २, पाने १५७-६०; R. B., Vol. I. p. 49; Archaeological Survey of India, Annual Report, 1904-05, pp. 110-20.

(६४) मासिर उल्-उमरा, खंड २, पाने १७६-७९ आणि पाने २३८-४१ R. B., Vol II, pp. 54-57. and pp. 74–75.

(६५) शाहरियार बरोबर झालेल्या युद्धांत जगतसिंग शहाजहानच्या बाजूने लढला (कजवीनी, पान ११६); लाहोरीच्या हकीकतीनुसार तो आसफखानाबरोबर आग्रा येथे आला ३,००० जात आणि

५०० सवार या अधिकारात त्याची नेमणूक कायम करण्यांत आली. शहाजहानच्या कारकिर्दीचे १०वे वर्ष पूर्ण झाले तेव्हा तो ३,००० जात आणि २,००० सवार या अधिकाराच्या जागी होता. (खंड १, पान १८३).

(६६) लाहोरी, खंड १, भाग २, पान ९ ; कजवीनी, पान ३०७.

(६७) लाहोरी, खंड १, भाग २, पान ६४; कजवीनी, पान ३३४.

(६८) लाहोरी, खंड २, पान १३.

(६९) त्याने कंदहार परत जिंकून घेण्याच्या कामगिरीत भाग घेतला होता आणि तो सईदखानाकडे तैनात झाला होता (लाहोरी, खंड २, पान १३५).

(७०) लाहोरी, खंड २, पान १४४.

(७१) लाहोरी, खंड २, पान १९०.

(७२) लाहोरी, खंड २, पाने २३७-३८.

(७३) लाहोरी, खंड २, पान २३९; शेख जलाल, पाने १२८ ब -१३०ब.

(७४) लाहोरी, खंड २, पान २६१; शेख जलाल, पान १३०.

(७५) लाहोरी, खंड २, पाने २६१-७८; शेख जलाल, पाने १३०-३५.

(७६) शेख जलाल, पान १३५.

(७७) शेख जलाल, पान १३५.

(७८) अर्जदाष्त, पाने २०ब-२४.

प्रकरण पांचवे

# (शहाजहानच्या) लहान सहान मोहिमा आणि (साम्राज्यातील) बारीक सारीक बंडाळी.

**पोर्तुगीज**

इ.स. १५३७ मध्ये सानदीपमधील काही पोर्तुगीज व्यापारी लोकांनी बंगालच्या तत्कालीन राजाकडून[1] हुगळीच्या एका बाजूकडील व्यापाराची सनद मिळविली. सुरवातीला लहान असलेले हुगळी गाव लवकरच विस्तार आणि लोकसंख्येच्या बाबतीत झपाट्याने वाढले. तेथील रहिवाशांनी मजबूत घरेदारे बांधली, आणि त्यांच्या छपरावर छोट्या बंदुका आणि मैदानी तोफा यांचे मोर्चे उभे केले. गंगेच्या एका उपनदीने शहराच्या एका बाजूला संरक्षणाची निसर्गतया तरतूद केली होती, तर उरलेल्या तिन्ही बाजूंना कृत्रिम खंदकांनी वेढलेले होते.[2] बंगालच्या व्यापारी राजरस्त्याच्या तोंडावरच वसलेल्या या शहराला परिस्थितीचा फायदा मिळाला आणि थोड्याच कालावधीत त्या भागातील एक वैभव संपन्न आणि गजबजलेले बंदर म्हणून हुगळी प्रसिद्धीला आले. या ठिकाणी हिंदुस्थानच्या इतर भागातून चीनमधून. मोलुकासमधून आणि मॅनिक्कामधून आलेली गलबते नांगर टाकून असत. आणि तेथे मोगल, पर्शियन आणि आर्मोनियन व्यापारी हे अतिशय तेजीत व्यापार करीत असत.[3]

**बंगालमधील त्यांची परिस्थिती**

१६व्या शतकाच्या उर्वरीत कालखंडात बंगालमधील अस्थिर राजकीय परिस्थिती ही पोर्तुगीजांच्या दृष्टीने फार मोठी फायद्याची ठरली. त्यांनी तेथे आपले वर्चस्व प्रस्थापित केले. आणि आपला व्यापार वाढविला. त्यांनी सरकारकडून मीठाबाबत मक्तेदारी प्राप्त करून घेतली. आणि मोगल खजिन्यामध्ये सालीना दहा-हजार टंका इतका महसूल भरण्यास सुरवात केली. थोडयाच कालावधीत बंगालमधील पोर्तुगीज जमात ही श्रीमंत आणि संपन्न बनली, आणि त्यांची जवळजवळ स्वतंत्र अशी हुकमत चालू झाली आणि त्यांच्या अंतर्गत बाबीमध्ये मोगल सुभेदार कधीही हस्तक्षेप करीत नसे. बंगालमधील पोर्तुगीजांचा कारभार एक प्रमुख आणि चार निवडलेले नागरिक पहात असत. त्यांच्या ज्या थोड्याफार आध्यात्मिक गरजा होत्या त्या भागविण्यासाठी एक चर्च होते आणि या चर्चची देखभाल 'ऑगस्टीनियन' धर्मप्रचारक करीत असत. बंगालमधील बहुतेक पोर्तुगीज हे मिश्र जातीय होते. ज्यांच्यापासून त्याचा जन्म झाला होता त्यांना ते गोवा, कोचीन आणि मोलुकस येथे सोडून आलेले होते. बंगालमधील पोर्तुगीज हे वृत्तीने साहसी आणि उलट्या काळजाचे होते.[४]

या पोर्तुगीजांनी चितगाव येथील चाच्यांबरोबर एकजूट केली. हे चांचे देखील पोर्तुगीज असून त्यांना वरील वर्णन पूर्णपणे लागू होते. या दोघांनी मिळून आजूबाजूच्या समुद्रपट्टीत भयंकर उपद्रव मांडला. गंगानदीच्या अनेक उपनद्यांमध्ये त्यांनी प्रवेश केला. आणि खालच्या बंगल्यातील अनेक बेटे उध्वस्त केली. "अनेक वेळा ते अंतर्भागात ४० ते ५० लीग घुसत असत. आणि बाजाराच्या दिवशी आणि पुष्कळ वेळा जेव्हा रहिवाशी लग्न समारंभ किंवा इतर काही उत्सवाचे प्रसंगी एकत्र जमत तेव्हा (खेड्यामधून सर्व लोकांना पळवून नेत." अशाप्रकारे पळवून आणलेल्या लोकांना ते गुलाम म्हणून अतिशय भयंकर अशी वागणूक देत. "पुष्कळ वेळा ते अतिशय म्हाताऱ्या अशा लोकांना त्यांच्या राहत्या जागी विकावयास काढीत. पुष्कळ वेळा आपल्या आई-वडीलांना त्यांच्या गुलामगिरीतून सोडविणाऱ्या तरूण माणसांना बघताना जो देखावा निर्माण होत असे तो देखावा अतिशय करुणाजनक असे"[५]

पोर्तुगीजांच्या व्यापारात झालेल्या वाढीमुळे सात गावं आणि सोनार गाव यांच्या भरभराटीला फार मोठा धोका पोहोचला. या उलट पोर्तुगीजांनी केलेल्या लुटमारीमुळे आजुबाजुच्या शहरांची नासधूस झाली. त्याशिवाय त्याच्या

हुकमतीखाली आलेल्या सर्व लोकांवर त्यांनी सातत्याने कॅथॉलिक धर्म जबरदस्तीने लादण्याचा प्रयत्न केला.[६] अशा तऱ्हेने धर्म परिवर्तन केलेल्या लोकांना पोर्तुगीजांच्या ताब्यातील इतर प्रदेशांत गुलाम म्हणून पाठविण्यांत येई अथवा मोगलांचा अतिशय कट्टर असा जो शत्रू, आराकानचा[७] माघ राजा त्याची गलबते चालविण्यासाठी विकण्यात येई. आराकानच्या या राजाला पोर्तुगीज बंदुकीची दारू, इतर दारू गोळा, सोरामीठ व लढाईसाठी लागणारी इतर युद्धसामुग्री याचा पुरवठा करीत. सारांश खालच्या बांगला देशच्या शांततेला आणि भरभराटीला पोर्तुगीजांच्या अस्तित्वापासून अतिशय भयंकर असा धोका निर्माण झाला. याला कारण म्हणजे एकेकाळी शांततेने व्यापार करणाऱ्या पोर्तुगीजांचे परिवर्तन भटकणाऱ्या चांच्यामध्ये झालेले होते. परंतु जहांगीरच्या कारकीर्दीत जोपर्यंत त्यांनी सरकारने मागणी केलेल्या रक्कमेचा भरणा केला तोपर्यंत मन चाहेल तसे वागण्याची त्यांना पूर्ण मुभा होती. परंतु शहाजहानच्या बाबतीत मात्र त्यांच्याविरूद्ध मनामध्ये आकस बाळगण्यास त्याला अतिशय सबळ असे कारण होते. कारण बंडखोर म्हणून तो बंगालमध्ये गेलेला असताना त्याला मदत करण्यास पोर्तुगीजांनी नकार दिला. इतकेच नव्हे तर त्यांनी राजपूत्र परवीज याच्याबरोबर सहकार्य केले. आणि त्यांच्यापैकी एकाने शहाजहानजवळ लाडी लबाडी केली हुगळीचा एक रहिवासी मॅन्यूअल रॅव्हर्स याने शहाजहानबरोबर प्रथम संगनमत केले. परंतु शहाजहानवर जेव्हा आणिबाणीचा प्रसंग ओढवला तेव्हा त्याने ह्याचा पक्ष सोडला. आणि उंची मालानें भरलेल्या काही गलबतांचा ताबा घेऊन त्याने शहाजहानच्या गुलाम स्त्रियांना घेऊन यांनी पळ काढला. यामध्ये मुमताजमहाल हिच्या दोन गुलाम दासी होत्या याच वेळेला दुसरा एक प्रसंग घडून आला, आणि तो म्हणजे मिगेल रॉड्रीगज या अतिशय शूर व सन्मानीत आणि त्याचप्रमाणे बंगालचा सुभेदार इब्राहीमखान याच्या भर्जीतल्या तरूणाची उद्धट वागणूक. जेव्हा त्याला शहाजहान याने आपल्याला येऊन मिळण्याविषयी कळविले तेव्हा त्याने शहाजहानच्या नोकरीत येण्यासंबंधी उघड उघड नकार दिला. शहाजहानचे अनेक वेळा झालेले हे अपमान त्याच्या मनात डाचत होते आणि अधिकारावर आल्याबरोबर त्याने त्याबद्दल सूड घेण्याचा विचार मनांत आणला. शहाजहान गादीवर आल्यानंतर देखील त्याची समजूत घालण्याचा कोणताही प्रयत्न पोर्तुगीजांनी केला नाही. इतकेच नव्हे तर त्याला भेटी व अभिनंदनपर संदेश पाठविण्याचे देखील त्यांनी टाळले.[८]

परंतु केल्या कृत्याचा झाडा देण्याचा क्षण अजून आलेला नव्हता. त्यांच्या नशीबाने शहाजहान साम्राज्यामधील इतर घडामोडीमध्ये गुंतलेला होता. त्याच्यावर कोसळणाऱ्या भयानक प्रसंगाची पोर्तुगीजांना कसलीही जाणीव नव्हती. आणि म्हणून त्यांनी आपले लुटारूपणाचे आणि धमकी देऊन पैसे उकळण्याचे धोरण तसेच चालू ठेवले. १६२९ मध्ये डी एगो द-सा हा माघ प्रदेशातून एकदम बाहेर पडला आणि डाक्का शहरानजीक असलेल्या एका मोठ्या खेड्याच्या दिशेने त्याने आपली गलबते हाकारली, आणि अतिशय निर्दयपणे त्या खेड्याची लुटालुट केली. त्याशिवाय त्याने एका उच्च पदस्थ मोगल स्त्रीला कैद केले. ही स्त्री आपली मुलगी आणि सून यांच्यासह एका आच्छादलेल्या गाडीतून पळून जात होती. द सा याने तिची अब्रू लुटण्याचा प्रयत्न केला. या अत्याचाराबद्दल तिच्या नवऱ्याने बादशहाकडे तक्रार केली. वरील घटनेमुळे शहाजहान अतिशय संतप्त झाला. परंतु पोर्तुगीजांना शासन करण्यासाठी परिणामकारक कारवाई करण्यासाठी १६३२ साल उजाडावे लागले.

[९]या सुमाराला सातगाव मधील एक आणि हुगळी मधील एक अशा दोन पोर्तुगीज व्यापाऱ्यांमध्ये भांडण झाले. पोर्तुगीजांवरील नियोजीत हल्ल्याला या प्रसंगाचे निमित्त मिळाले. त्यापैकी एक मार्टिन अफोन्सो द मेल्लो याने आपला प्रतिस्पर्धी मार्टिन ल्यूथर याला भांडण मिटवण्यासाठी हुगळी या शहारामध्ये बोलाविले. परंतु लूथर याचे वरपर्यंत वशिले असल्यामुळे आपल्याला योग्य निवाडा मिळेल याबद्दल अफोन्सो याला आशा वाटत नव्हती. म्हणून तो डाक्क्याचा सुभेदार कासीमखान याच्याकडे गेला. त्याने त्याच्याकडे हुगळी शहराविरूद्ध तक्रार केली. त्याने तेथील रहिवाशांवर अशा गुन्ह्यांचे आरोप केले की, ज्याच्याविरुद्ध कसल्याही पुराव्याची जरूरी नव्हती. कासीम खानाची नेमणूक झाली त्यावेळी बादशहाने त्याला निश्चितपणे पोर्तुगीजांचा नाश करण्याची आज्ञा दिलेली होती, आणि त्यानंतर बादशाहाने त्याला वारंवार फर्माने पाठवून या गोष्टीची आठवण दिलेली होती. अफोन्सो याने केलेली तक्रार आणि त्याने कासीमखानाला दिलेले मदतीचे आश्वाशन. यामुळे त्याला तो फार काळ शोधीत असलेली संधि मिळाली.[१०]

त्याने पोर्तुगीजांवर अचानक हल्ला करण्याचा बेत केला.[११] या बेतानुसार त्याने आपला मुलगा इनायत अुल्ला याला बरद्वान मधील हिजली

या ठिकाणावर मोहिम करण्याच्या मिषाखाली रवाना केले. तेथे त्याला श्रीपूर येथून ख्वाजा शीर, मासुम जमीनदार महमद सालीह आणि इतर हे आरमारी जहाजे घेऊन येईपर्यंत थांबण्याचा हुकूम दिला. त्याशिवाय बहादूर याला इनायत अुल्ला ह्याने ख्वाजा शीर याच्या अधिपत्याखाली येणाऱ्या आरमाराबरोबर हातमिळवणी केल्याबरोबर त्याच्याशी सहकार्य करण्यासाठी पांचशे सैनिक देऊन मखसुसाबाद येथे पाठविण्यात आले. पूर्वी ठरलेल्या संकेतानुसार इनायत अुना हा बरद्वान मधून बाहेर पडला. आणि चोवीस तासात सातगाव आणि हुगळी याच्याबरोबर मधे असलेल्या हळदीपूर याठिकाणी पोहोचला. थोड्याच अवधीत बहादूर हा आपल्या तुकडीनिशी त्याला येऊन मिळाला आणि पोर्तुगीजांनी हुगळीमधून पळून जाऊ नये म्हणून त्यांनी हुगळीच्या मार्गाची नाकेबंदी करण्यास सुरवात केली. हल्ला करणाऱ्या मोगलांच्या सैन्यांत ६०० जहाजे १४००० घोडेस्वार, ९० हत्ती आणि बरेच मोठे पायदळ होते.

[१२] जेव्हा पोर्तुगीजांनी इतके प्रचंड सैन्य जमिनीवरून आणि जलमार्गाने चाल करून येतांना बघितले तेव्हां त्यांची घाबरगुंडी उडाली. त्यांनी हुगळी शहरातील सोसायटी ऑफ जीससमधील धर्मगुरूंना आक्रमण करून येणाऱ्या मोगल सैन्याबरोबर सलोख्याचा समेट घडवून आणण्यासाठी आवाहन केले.[१३] यानुसार जॉन कॅब्राल हा मोगल सेनापतीची भेट घेण्यासाठी दोन संरक्षक घेऊन गेला. मोगल सेनापतीने हुगळी येथील पोर्तुगीजांवर, माघ राजाने मुर्शिदाबादवर जो हल्ला केला आणि त्या शहराची जी नासधूस केली त्यामध्ये त्यांच्याशी संगनमत केल्याचा, त्याचप्रमाणे त्यांच्यापैकी एकाने सय्यद जमातीतील एका स्त्रीला विकत घेतल्याचा गुन्हा केल्याचा आणि अखेर त्यांच्यातर गुलामांचा व्यापार केल्याचा आरोप केला. अझवेद या पोर्तुगीज अधिकाऱ्याने पहिल्या आणि तिसऱ्या आरोपाबद्दल नाकबूली दिली आणि दुसऱ्या आरोपाबद्दल त्याने असे सांगितले की व्यक्तिनी केलेल्या कृत्याबद्दल त्याला जबाबदार धरता येत नाही. यावर बहादूरखानाने पोर्तुगीजांच्या निवासस्थानाची झडती घेण्यासाठी आपली माणसे पाठविण्याची योजना सुचविली. त्याने असेही सांगितले की ज्यांच्या ताब्यात गुलाम असतील त्यांना शिक्षा करण्यांत यावी. परंतु याही गोष्टीला देखील पोर्तुगीज कप्तानांनी मान्यता दिली नाही. सरतेशेवटी कॅब्राल याने पुन्हा एकदा दोन्ही पक्षामध्ये समझौता घडवून आणण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांत त्याला यश आले नाही. दोन्ही पक्षांनी आता युद्धाची तयारी करण्यास सुरवात केली. कांही

काळ हुगळीमध्ये भयंकर गोंधळ माजून राहिला. कारण तेथील सर्व रहिवाशांचे कोणत्याच बाबतीत एकमत होईना त्यांच्यापैकी काहीजण मोंगलांच्या स्वाधीन गुलाम करण्यास खुशी होते. इतकेच नव्हे तर मोंगलांच्या इतर मागण्या देखील मान्य करण्याची त्यांची तयारी होती. परिणामी शहरामध्ये एक मोठी सभा घेण्यात आली. या सभेत वरील प्रश्नांची संगोपांग चर्चा करण्यात आली. सभेमध्ये जमलेल्या लोकांमध्ये बहुसंख्य लोकांचे मत लढाई करावी असे होते. आणि त्याप्रमाणे निर्णय घेण्यांत आला. शहराच्या संरक्षणासाठी संघटना करण्याचे काम अझवेदो याच्यावर सोपविण्यात आले. त्याला फार मोठ्या अडचणींना तोंड द्यावे लागले. स्थानिक लोकांवर त्याला विश्वास ठेवता येईना आणि त्याच्या हाताखालील गोऱ्या लोकांची संख्या जेमतेम ३०० एवढी होती. त्याशिवाय शहराच्या संरक्षणासाठी कोठल्याही प्रकारची तटबंदी नव्हती. शहराच्या संरक्षणाची एकमेव व्यवस्था म्हणजे त्या शहराभोवती असलेला खंदक ही होय. अझवेदोने जी कारवाई यावर केली ती म्हणजे तात्पुरती तटबंदी उभारून शहरामधील अनेक घरे एकमेकांना जोडणे ही होय. या तटबंदीवर त्याने आपल्या जवळील लहान तोफांचे मोर्चे उभारले. अशातऱ्हेने संरक्षणाची जुजबी व्यवस्था केल्यानंतर मोगलांच्या हल्ल्याचा ओघ अडविण्याचे दृष्टीने तो ठाण मांडून उभा राहिला.

पहिल्या दिवशी मोंगलांनी आपल्या लष्करी सामर्थ्याचे प्रदर्शन करून शहरातील शिबंदीला भिवविण्याचा प्रयत्न केला. त्यांनी हल्ला करण्याची बतावणी केली, आणि नंतर माघार घेतली. १ जुलै रोजी त्यांनी शहराच्या अगदी नजीक कूच केले, आणि पोर्तुगीजांच्या तोफांच्या टप्प्यामध्ये ते आले. या तोफा बाहेरून दृष्टीस पडणार नाहीत अशातऱ्हेने लपविलेल्या होत्या. शहरामधील शिबंदीने तोफांचा भयंकर भडीमार केला, आणि शत्रूचे भयंकर नुकसान करून हा हल्ला परतवून लावला. दुसऱ्या दिवशी मोगलांनी जमिनीवरून आणि समुद्रावरून एकत्रित असा हल्ला चढविला. जमिनीवरून पोर्तुगीजांच्या संरक्षण फळीच्या इतक्या नजीक ते आले की शत्रूच्या हातातून चापाच्या बंदूका आणि पिस्तूले सहज हिसकावून घेणे त्यांना शक्य झाले असते. परंतु समुद्रावर त्यांना अतिशय मार खावा लागला. कारण दोन्ही पक्षामध्ये जे युद्ध झाले त्यामधे त्यांनी जवळजवळ ६०० माणसे गमावली.

वरील लढाईत झालेल्या भयंकर मनुष्य हानीने मोगल अधिकाऱ्याचा धीर खचला आणि त्यांनी इनायत अुल्ला याला त्याने मोक्याच्या ज्या जागा तेथून

माघार घेण्याबद्दल विनंती केली. परंतु बादशाही इभ्रतीला कोणत्याही प्रकारे कमीपणा येईल असे काहीही करण्यास तो नाखूष होता. आणि म्हणून तो होता त्या ठिकाणीच राहिला. शत्रू सुद्धा आता दमून गेलेला होता आणि काही काळ पर्यंत युद्ध थांबले. पोर्तुगीजांनी मोगल सेनापतीबरोबर तहाच्या वाटाघाटीची चर्चा करण्यासाठी फादर फ्राय अँन्टोनिओ द ख्रिस्टो याला पाठविले. त्यांनी त्याच्याबरोबर एका मोगल स्त्रीची रवानगी केली. यामधे त्यांचा उद्देश तिच्या उपस्थितीचा मोगल सेनापतीवर दबाव पाडावा असा होता. इनायत अुल्ला याने आपल्यातर्फे तीन मागण्या मांडल्या. पहिली मागणी अशी होती की पोर्तुगीजांनी जबरदस्तीने पकडलेली चार लढाऊ जहाजे परत करावी, दुसरी मागणी पोर्तुगीजांनी सर्व बंगाली गुलामांना मुक्त करावे, आणि तिसरी मागणी जी पोर्तुगीजांच्या दृष्टीने त्यांची मानखंडना करणारी होती ती अशी की, शहरातील प्रत्येक पोर्तुगीजांचे व्यक्तिशः इनायत अुल्ला याच्याकडे येऊन त्याला मुजरा करावा आणि त्याला वंदन करावे.

पहिल्या मागणीला पोर्तुगीज कप्तानाने ताबडतोब मान्यता दिली आणि पकडलेली जहाजे मोगलांच्या स्वाधीन केली. दुसऱ्या मागणीबाबत त्याने शहरातील नागरिकांची एक सभा बोलावली. या सभेमधे बहुसंख्य लोकांनी या मागणीचा स्विकार व्हावा असे मत दिले परंतु सोसायटी ऑफ जीसस मधील धर्मगुरूनी फादर मॅल्यूएल कोहेलो याच्या नेतृत्वाखाली असें प्रति-पादन केले की पोर्तुगीजांनी लोकांच्या धार्मिक भावनेला आवाहन करावे आणि अगदी विरूद्ध अशा मार्गाचा अवलंब करावा. परंतु त्याने जो प्रस्ताव मांडला त्याला कोणीही मान्यता दिली नाही आणि पोर्तुगीज कप्तानाने जवळजवळ ९० ख्रिश्चन गुलाम मोगलांच्या स्वाधीन केले. यावर मोगलांनी त्यांच्या ताब्यातील तद्देशिय स्त्रिया त्यांचे सर्व कुशल आचारी, त्यांच्या नर्तक मुली, त्यांचे हलवाई आणि त्यांचे शिवणकाम करणारे आपल्या स्वाधीन करण्याचा आग्रह धरला. काहींनी याही गोष्टीला मान्यता दिली. आणि शहरातील चर्चमधे वर वर्णन केलेली मंडळी मोठया संख्येने जमा केली. पोर्तुगीजांनी आता कसलीही माघार घेण्याला ज्यांचा विरोध होता अशा पोर्तुगीज शिपायांनी या लोकांना उधळून लावले. परंतु तिसरी मागणी मात्र शब्दशः मान्य करण्यात आली.

यानंतर पोर्तुगीजांनी खंडणी किती द्यावी ते ठरविण्याची वेळ आली. मोगल सेनापतीने सात लक्ष पटकांची मागणी केली. परंतु पोर्तुगीजांनी तेवढी

मोठी रक्कम देण्यास नकार दिला. त्यावर इनायत अुल्ला याने तेव्हा जॉन कॅब्राल द ख्रिस्तो आणि त्यांच्याबरोबर आलेली मोगल स्त्री या पोर्तुगीजांच्या पूर्णाधिक्कारांना अटकावून ठेवले. दुसऱ्या दिवशी त्याने कॅब्राल याची सुटका केली. त्यामधे त्याचा उद्देश त्याने त्याच्या मित्राचे मन वरील अटी स्विकारण्याबद्दल वळवावे असा होता. परंतु कॅब्राल हा जेव्हा जाण्यास निघाला तेव्हा त्याला एका अर्मोनियन माणसाने सांगितले की, बोलणी लांब-विण्यासाठी मोगल सेनापतीने वेळ काढूपणाचे धोरण स्विकारले आहे आणि तो अधिक कुमक येण्याची वाट पहात आहे. हेरांनी या बातमीला दुजोरा दिला, आणि पोर्तुगीजांनी लढण्याचे ठरविले. परंतु बाली आणि हुगळी या दोन्ही ठिकाणाचे संरक्षण करणे शक्य न झाल्यामुळे त्यांने हुगळीकडे माघार घेतली. मोगलांनी बालीचा ताबा घेतला, आणि तेथील रहिवाशांची लुटालूट करून त्यांची कत्तल करून आणि घरादारांना आगी लावून आपल्याला मिळालेला विजय त्याने साजरा केला. तथापि बाली येथील ख्रिश्चन महा-विद्यालय आणि काही इतर घरे यांना मात्र त्याने हात लावला नाही. यानंतर जवळजवळ दीड महिना मोगल आणि पोर्तुगीज यांच्यामध्ये चकम-कीचे युद्ध चालूच राहिले. यानंतर मोगलांचा १२ पौंडी आणि त्यापेक्षा अधिक गोळे फेकणाऱ्या १२० तोफा असलेला भारी तोफखाना हुगळीला पोहोचला. त्याचप्रमाणे शिबंदीचा कट्टर शत्रू मार्टिन अफोन्सो हा सुरूंग पेरणाऱ्यांची एक तुकडी आणि काही लढाऊ गलबते घेऊन वेढा घातलेल्या मोगल फौजेच्या मदतीला येऊन पोहोचला. अशातऱ्हेने मोगलांच्या ताकदीत वाढ झाल्यावर त्यांनी हुगळी शहरावर सर्व बाजूनी तोफांचा भडीमार करण्यास सुरवात केली. त्याशिवाय पोर्तुगीजांच्या नोकरीमध्ये जे वल्हे-करी होते त्यांना भिवविण्यासाठी मोगलांनी जवळजवळ ४००० कुटुंबांना कैद केले. आपल्या बायका आणि मुले यांना वाचविण्यासाठी हे सर्व वल्हेकरी एकत्र मिळून पोर्तुगीजांना सोडून निघाले आणि मोगलांना येऊन मिळाले.[१४]

वरील घटनेमुळे पोर्तुगीजांची बाजू कमकुवत झाली. आपल्याला कुमक येईल याविषयी खात्री न वाटल्यामुळे त्यांनी पुन्हा तिसऱ्या वेळी वाटाघाटींना सुरवात केली. इनायत अुल्ला याने त्यांच्याबरोबर समझोता करण्याला ताबडतोब आपली संमति दिली. कारण फौजेतील तात्पुरत्या अन्न टंचाईमुळे त्याच्या सैन्यातील शिपाई निघून जाऊ लागले होते. काही काळ वाटाघाटी झाल्यानंतर खंडणीचा पहिला हप्ता म्हणून पोर्तुगीजांनी १०००० टंका

दिल्या व उरलेला २ लक्ष टंकांचा काही हप्ता काळानंतर देण्याचे कबूल केले. पोर्तुगीजांच्याकडून मिळालेल्या या द्रव्यामुळे मोगलांच्या खजिन्यात भर पडली. आणि इनायत अुल्ला याने आपल्या फौजेला मजबूती आणली. त्याने प्रचंड तुळया, खिळे, आकड्यांच्या कांबी आणि साखळया यांच्या मदतीने अनेक गलबतांना एकत्र बांधून एक तरंगत पूल तयार केला. या पुलाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत एक जड दोरखंडा होता. आणि हुगळीच्या खाडीच्या या किनाऱ्यापासून त्या किनाऱ्यापर्यंत त्यामुळे जणूकाही एक कमानच निर्माण झालेली होती. त्या शिवाय त्याने शहरामधून बाहेर पडण्याचे इतर सर्व मार्ग देखील रोखून धरण्यात यश मिळविले.

इनायत अुल्ला याने ही जी प्रचंड तयारी केलेली होती त्याची पोर्तुगीजांना दहशत बसली. परिणामी काही काळपर्यंत त्यांच्यामध्ये अतिशय गोंधळाचे वातावरण आणि परस्पर विरोधी मसलती यांनी एकच घोटाळा माजविला. सहाजिकच अशा परिस्तितीत मोगल सेनापतिबरोबर चाललेल्या वाटाघाटी मोडल्या. वस्तुस्थिती अशी होती की इनायत अुल्ला वाटाघाटी मोडण्यासाठी काही निमित्त मिळते का याची वाटच पहात होता आणि त्याने हुगळीचा वेढा अधिक जोरदारपणे चालविण्यास सुरवात केली. मोगल आक्रमकांनी आपल्या हल्ल्याचा रोख शहरातील चर्चकडे वळविला. कारण या ठिकाणी शहराभोवती असलेला खंदक हा अरुंद आणि अधिक उथळ होता. मोगलांनी हा खंदक सहजपणे कोरडा केला आणि बहादूरखान, अल्लायारखान व सय्यद हसन कामुना यांनी आपले मोर्चे थेट चर्चच्या पायापर्यंत नेले. त्यानंतर त्यानी सुरुंग खणले आणि त्यांच्यामधे दारु भरली. शहरामधील शिबंदीने त्यापैकी दोन हुडकून काढले आणि त्यामधे दारू ऐवजी माती भरली. परंतु बहादूरखानाच्या मोर्चामधे असलेला तिसरा सुरूंग त्यांच्या नजरेतून निसटला. आपली फौज या ठिकाणी मोगलांनी एकत्रित केली. परिणामी या भागापाशी पोर्तुगीज आपोआप जमा झाले. जेव्हा ते अशा तऱ्हेने जमा झाले तेव्हा सुरूंगाला बत्ती देण्यात आली. सुरूंगाच्या स्फोटामुळे शिबंदीचे भयंकर नुकसान झाले आणि जे वाचले त्यांच्या मनोधैर्याला कधीही भरून न येण्याजोगा तडा गेला.

आपल्यापैकी ५० अथवा ६० माणसांना पाठीमागे ठेवून उरलेल्या पोर्तुगीजांनी सर्व मिळून जहाजातून हुगळी सोडली. यावर मोगलांनी ताबड-

तोब शहराचा ताबा घेतला आणि शहरामधे भयानक अशी कत्तल सुरू झाली. रस्त्यामधे प्रेताचे खच पडले. अनेक घरे जाळून टाकण्यात आली. मोगलांनी शहराभोवती घातलेली साखळी तोडून नदीतून पळून जाण्याचा-प्रयत्न पोर्तुगीजांच्या एका आरमारी ताफ्याने केला. पोर्तुगीजांच्या जवळ मोठया संख्येने गलबते होती परंतु त्यांचे नावाडी अशक्त आणि बेशिस्त होते. फक्त मॅन्यूअल अजवेदो याचे जहाज फिरकी तोफ आणि बंदुका यानी सज्ज होते. परंतु त्यांना प्रतिकार करणाऱ्या सैन्याजवळ ५०० जहाजे आणि १ लक्ष सैनिक असून त्याच्या रक्षणार्थ पाच लीग लांबीचे खंदक, १२० तोफा आणि अमोज बंदुका एवढी सामुग्री सज्ज होती.

जेव्हा मोगलांनी पोर्तुगीजांना नदीवर पाहिले तेव्हा त्यांनी सोळा गलबतांवर उभारलेला आणि भरपूर जळाऊ लाकूड डांबर, सोरामीठ आणि गंधक याचा साठा असलेला जळता तराफा त्यांच्या दिशेने रवाना केला. परंतु शत्रुच्या आरमारी काफिल्याला पेटवून देण्याचा त्यांचा प्रयत्न फसला. या उलट पोर्तुगीजांनी तो तराफा पकडला आणि त्यांची वाट ज्या साखळीने बंद करण्यात आली ती साखळी त्यांनी मोडून काढली. आता पोर्तुगीजांच्या अत्यंत प्राण घातक अशा पाठलागाला सुरूवात झाली. आणि त्यामधे शेकडो जीवांची हत्या झाली. निर्वासितांनी भरलेली पोर्तुगीजांची गलबते एकापाठोपाठ एक पकडण्यांत तरी आली अथवा बुडविण्यात आली. त्यांच्यापैकी एक जहाज भरपूर संपत्तिने भरलेले होते. ते जहाज हुगळी-मधील एक प्रमुख व्यापारी गोमेज बारे सिरोज याच्या मालकीचे होते. मोगलांनी जहाजावरील खलाशांना कबज्यात आणले आणि जहाजावरील माणसांना कैद केले. तरीदेखील काही पोर्तुगीजांनी पळून जाण्यात यश मिळविले आणि ते सागौर येथे पोहोचले. तेथे एक पॅगोडाची त्यांनी किल्ल्यासारखी मजबूती केली. नंतर त्यांनी जॉन कॅब्राल याला आराकानच्या माघ राजा-बरोबर तह करण्यासाठी पाठविले.

अशा तऱ्हेने हुगळी येथील चाच्यांचा बिमोड झाला. या मोहिमेत वृद्ध, तरूण, बायका आणि मुले मिळून एकंदर दहा हजार माणसांना ठार मारण्यात आले त्याशिवाय युरोपीयन स्त्री-पुरुष, गुलाम-पुरूष आणि स्त्रिया, ज्यांना सक्तीने खिश्चन धर्माची दिक्षा देण्यात आली होती, अशा ४४०० मंडळीना कैदी करण्यात आले. त्याशिवाय पोर्तुगीजांच्या हाती पडलेली शेजारचे परगणे आणि

खेडी यामधील १०,००० मंडळी पोर्तुगीजांच्या कैदेतून मुक्त करण्यात आली. मोगलांचे झालेले नुकसानही काही कमी नव्हते मोगलांनी जळणाऱ्याचे बोटीचा जो तराफा पाठविला होता त्यात त्यांची ३८ गलबते नाश पावली. त्याशिवाय त्यांनी शहराभोवती उभ्या केलेल्या साखळीत ६० गलबतांचा नाश झाला, आणि १०० पेक्षा अधिक गलबते किनाऱ्यावर अडकून पडली, आणि त्यामुळे निरुपयोगी झाली. त्यांच्या मृत झालेल्या सैनिकांची संख्या हजारोनी मोजता आली असती.

पकडल्या गेलेल्या कैद्यांचे भवितव्य भयंकर होते. नाजूक स्त्रियां आणि निष्पाप मुले-बाळे यांना वादळी हवेला तोंड देत जवळजवळ अकरा दिवसांचा अतिशय कंटाळवाणा असा प्रवास करावा लागला. त्यानंतर ही सर्व मंडळी आग्रा येथे पोहोचली. तेथे त्यांना शहाजहान समोर उभे करण्यात आले. त्याने या स्त्रियां आणि मुले यांना आपले राजपुत्र आणि सरदार यांच्यामधे वाटून टाकण्याचा हुकूम दिला. काही सुंदर स्त्रियाना मात्र त्याने आपल्या जनानखान्यात भरती केले. त्याशिवाय काही पोर्तुगीज पाद्री लोकांना मानाच्या जागा आणि आकर्षक् अशी बक्षिसे देण्याचे वचन देऊन मुसलमान धर्म स्विकारण्याबद्दल त्यांची मने वळविण्याचा बादशाहाने प्रयत्न केला. परंतु त्यांनी मोठ्या हेकटपणे बादशाहाने केलेली ही विनंती धुडकावून लावली, इतकेच नव्हे तर आपल्या आत्याचा अधोगतीपासून बचाव करण्यासाठी बादशाहानच ख्रिश्चन धर्माचा स्विकार करावा असे द ख्रिस्तो याने मोठ्या धाडसाने बादशहाला सुचविले. द ख्रिस्तो याची तुरूंगामधे रवानगी करण्यात आली. तेथे त्याने एखाद्या खऱ्या ख्रिश्चन माणसाप्रमाण नऊ वर्षे क्रॉस अंगावर बाळगून आपले आयुष्य घालविले. दोन ख्रिश्चन पाद्रयांना, जे हुगळीमधे राहिले होते, अतिशय भयंकर अशी वागणूक डाक्का येथील मुल्लानी दिली. या दोहोपैकी एकाला चेचून ठार करण्यात आले. आणि दुसऱ्याला अतिशय भयंकरपणे जखमी करण्यात आले. इतर पोर्तुगीजापैकी ज्यानी इस्लामचा स्विकार केला त्यांची ताबडतोब सुटका करण्यात आली, तर इतरांना कैद करण्यात आले आणि निर्दयपणे त्यांचे हालहाल करण्यात आले.[१५]

हुगळीचा करण्यात आलेला नाश आणि पोर्तुगीजांना देण्यात आलेली अमानुष वागणूक या दोन्ही गोष्टींबद्दल कारण म्हणून नेहमी शहाजहान याच्या धार्मिक असहिष्णुतेकडे बोट दाखविण्यात येते. हे सत्य आहे परंतु संपूर्ण सत्य

नाही. आतापर्यंत ज्या काही गोष्टी सांगण्यांत आलेल्या आहेत त्यावरून एक गोष्ट उघड होते की धार्मिक उन्मादाशिवाय इतर आणखी अनेक कारणे शहाजहानच्या वागणुकीला जबाबदार होती. याउलट शहाजहान याच्या वर्तनाबद्दल जे त्याचा धिःकार करतात ते पोर्तुगीजांच्या बाजूने एक शब्द देखील उच्चारत नाहीत. हुगळीमधे सनदशीर मार्गाने व्यापार करणारा आणि शांतता प्रिय असलेला असा समाज असे पोर्तुगीजांचे चित्र कोणीही रंगवित नाही. त्यांची चांचेगिरी, लोकांचे धर्मपरिवर्तन करण्याबाबतचा त्यांचा दांडगा उत्साह आणि त्यांचा अप्रामाणिकपणा याची नोंद परदेशी आणि स्थानिक समकालीन प्रत्येक इतिहास ग्रंथात केली गेलेली आहे. त्यांच्या नशीबाने त्याना जे भोग भोगावयास लागले ते त्यांच्या कृती बघता अतिशय योग्य असेच होते. परंतु त्याना जी शिक्षा करण्यात आली तिची अम्मल बजावणी अतिशय कठोरपणे करण्यात आली. पोर्तुगीजांचा नाश आणि शहाजहान याने धार्मिक असहिष्णुतेच्या धोरणाचा केलेला स्विकार या गोष्टी योगायोगाने जर एकाचवेळी घडून आल्या तर शहाजहानचे हे धोरण पोर्तुगीजांच्या नाशाला कारणीभूत ठरले असे अनुमान काढणे हे चुकीचे ठरेल.

## छोटा तिबेट

या कालखंडातील, शहाजहानचा प्रदेश जिंकण्यासाठी ज्या काही बारीक सारीक मोहिमा झाल्या त्यामधील अतिशय धाडसाची म्हणून छोटचा तिबेटच्या मोहिमेचा उल्लेख करावा लागेल. जहांगीरच्या कारकिर्दीत हशीमखान याने हा प्रदेश जिंकण्याचा प्रयत्न केला होता. परंतु त्यात त्याला भयंकर अपयश आलेले होते[१६] शहाजहान याला या प्रयत्नाची पुनरावृत्ती करण्याचा मोह झाला आणि त्यात त्याच्या पदरात थोडे फार यशाचे माप पडले. समकालीन इतिहासकारांनी त्यांच्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे उत्तरेकडच्या अतिथ्यविन्मुख अशा डोंगराळ प्रदेशातील बादशाहाच्या मोहिमेचे समर्थन करण्याचा प्रयत्न केला नाही ही गोष्ट मोठी आश्चर्यकारक वाटते. कारण प्रत्यक्ष वस्तुस्थितीत ज्या गोष्टीकडे अभिमानाने बोट दाखविता येईल अशी फारच थोडी आकर्षणे छोटचा तिबेटमधे होती. कारण तेथील एकमेव उत्पन्न म्हणजे अतिशय खरखरीत अशी लोकर एवढेच होते. परंतु असे दिसते की त्या देशाचा राजा अबदाल याने काश्मीरचे मूळ राज्यकर्ते जे चाक या राजघराण्यातील होते त्यांना आसरा देऊन मोगलांना दुखावले होते. हे लोक वारंवार पूर्वी आपल्या ताब्यात असलेल्या प्रदेशात प्रवेश करीत

आणि तेथे अशांततेचे वातावरण निर्माण करीत काश्मीरचा सुभेदार जफरखान याने १६३४ मध्ये मोगलांचे सार्वभौमत्व मान्य करण्याविषयी, आणि बादशाहाच्या नावे खुल्या वाचण्याबद्दल अबदाल याचे मन वळविले.[१७] परंतु नंतरच्या ४ वर्षातच तो आपले वचन विसरला आणि त्याने तहाचा अस्विकार केला. म्हणून १६३७-३८च्या वसंत ऋतुत शहाजहान याने जफर खानाला तिबेट जिंकण्याची आज्ञा दिली. जफरखान हा २००० घोडेस्वार आणि १०,००० पायदळ घेऊन मोहिमेवर निघाला आणि त्याने छोटचा तिबेटमधे प्रवेश केला. अबदाल याने एका मोक्याच्या ठिकाणापासून दुसऱ्या मोक्याच्या ठिकाणापर्यंत माघार घेण्याचे धोरण स्विकारले आणि जेव्हा आपल्याला आता वेळ निभावून नेता येणार असे त्याला वाटले तेव्हा तो जफरखानाला शरण गेला. शहाजहानच्या नांवे पुन्हा एकदा खुल्बा वाचण्यास आला. अबदाल याने १० लक्ष रुपये खंडणी दाखल दिले.

छोटया तिबेटमधील विजय हा शस्त्र सामर्थ्यापेक्षा प्रच्छन्न आणि विश्वासघाताच्या मार्गांनी मिळविण्यात आलेला होता. परंतु अबदाल याच्या शरणागतीपेक्षाही खास अधिकार अथवा इतर बारीक सारीक प्रकरणे यावरून कुरबरी निर्माण होत. परंतु त्यांनी कधीही गंभीर स्वरूप धारण केले नाही. १६४७ मधे गौहातीच्या फौजदाराकडून अहोम राजाकडे एक मित्रत्व निदर्शक वकीलात पाठविण्याचा उल्लेख सापडतो. परंतु मोगल बादशहाचा त्याला अधिकृत पाठिंबा होता किंवा नाही याबद्दल संशय आहे.[११] प्रत्यक्ष वस्तुस्थिती अशी होती की १६३९ नंतर मोगल इतिहासकारांनी आसामची फारच थोडी दखल घेतलेली आहे. अशा परिस्थितीत त्या विभागामधे मोगलांनी विचारपूर्वक धोरण अंगिकारले असे अनुमान काढणे हे जरा साहसाचे ठरेल. कामरुपचा मोगलांनी जो ताबा घेतला ही घटना अतिशय क्षुल्लक स्वरूपाची असून शहाजहानच्या कारकिर्दीमधे मोगल दरबारचे जे सर्वसाधारण धोरण होते त्याच्याशी या घटनेचा अर्थाअर्थी काहीही संबध नव्हता. शहाजहान याला आपल्या साम्राज्याची वाढ वायव्येकडे आणि दक्षिणेच्या दिशेने करावयाची होती. बंगालच्या पलीकडे असलेल्या पूर्वेकडील विभागाकडे त्याची नजर कधीच वळली नाही. आसामबरोबर त्याने जे युद्ध पुकारले त्यामधे त्याचा उद्देश प्रामुख्याने कामरूपचे रक्षण करणे हा होता. जर का अहोम राजाने बलीनारायण याला उत्तेजन दिले नसते आणि त्याच्या पक्षाच्या पाठपुरावा केला नसता तर त्या विभागामधे मोगलांनी आपली इतकी शक्ति आणि

वेळ यांचा अपव्यय केला. असता किंवा नाही याबद्दल संशयाला जागा आहे.

मध्य हिंदुस्थानातील बीरभुम आणि पाचेतपासून रतनपूर पर्यंतचा आणि दक्षिण बिहारमधील रोहटसगढपासून ओरिसाच्या सीमेपर्यंतचा संपूर्ण प्रदेश याला मध्य युगीन कालखंडात झारखंड असे नांव होते हा प्रदेश अनेक स्वतंत्र राज्यांमधे विभागला गेलेला होता. या राज्यांकडून मोगलांना अधून मधून उपद्रव होई हा विभाग अतिशय डोंगराळ आणि जंगलांनी भरलेला असल्यामुळे तेथील राजे राजवाड्यांना वठणीवर आणणे म्हणजे फार मोठया काळाचा अपव्यय करण्यासारखे होते. त्या शिवाय तशाच तऱ्हेच्या इतर काही जमीनदारांप्रमाणे अधिक महत्वाची घटना म्हणजे हबीब चाक आणि अहमद चाक यांच्या कुटुंबियांना झालेली कैद ही होय. इत्तिकाद खान हा काश्मीरचा सुभेदार असताना अहमद चाक याच्याकडून तेथे भयंकर उच्छाद केला गेला होता. आता अबदाल याने त्याची रवानगी बादशाही सैन्याची पिछाडी धोक्यात आणण्यासाठी आणि त्यांचा पुरवठा खंडित करण्यासाठी केली. परंतु हबीब चाक हा अजून तिबेटमधे होता. तो आपल्या शंभर अनुयायांसह जफरखान याला शरण गेला. आपल्या प्रांतामधे काहीतरी गडबड होईल या भितीने जफरखान हा अबदाल आणि चाक या कैद्यासहित ताबडतोब काश्मीरमधे परतला.[१८]

**आसाम**

जेव्हा शहाजहान सिंहासनावर आरूढ झाला तेव्हा साम्राज्याच्या ईशान्य सीमेवरील राजकीय परिस्थिती कोणत्याही घोटाळ्यापासून मुक्त होती असे म्हणता येणार नाही. कूच बिहार या प्रांतावर लक्ष्मीनारायण यांचा मुलगा बीर नारायण हा राज्य करीत होता. कामरूप या प्रांताचा तात्पुरता ताबा शेख जाहिद या मोगल अधिकाऱ्याकडे होता. या विभागात जवळजवळ दहा वर्षेपर्यंत कोणतीही गडबड झाली नाही. कारण कामरूपच्या राजकारणात हस्तक्षेप करून मोगलांबरोबर निष्कारण भांडणात स्वतःला गुंतवून घेण्यात आसामच्या अहोम राजाची पूर्णपणे अनिच्छा होती.

शांततेचे हे वातावरण सातत्याने टिकून धरण्यासाठी बंगालचा सुभेदार कासीम खान याने अहोम राजाकडे आपला एक दूत एका आसामी व्यापाऱ्याबरोबर रवाना केला. परंतु अहोमच्या राजाने काही स्वार्थी सल्लागारांच्या दडपणाखाली मध्यस्थी करणाऱ्या व्यापाऱ्याला ठार मारण्याचा हुकूम दिला

आणि मोगल वकिलाला भेटण्यास नकार दिला. त्याशिवाय परिक्षितचा मुलगा बली नारायण याला त्याने कामरूपवर आक्रमण करण्यास मदत केली. मोगलांनी परिक्षित याची कामरूपमधून हाकालपट्टी केलेली होती. सारांश अशा तऱ्हेने दोन्ही पक्षात युद्धाचा डोंब पेटला. हे युद्ध जवळजवळ दोन वर्षे-पर्यंत चालले आणि त्याने जिवित आणि संपत्ती याची अतिशय भयंकर अशी हानी घडवून आणली.

या हल्ल्याला तोंड देण्याची मोगलांची कसलीही तयारी नव्हती. परिणामी कामरूपमधून लौकरच त्यांची हाकालपट्टी झाली आणि कामरूपची राजधानी हाजो हिचा ताबा आक्रमकांनी घेतला. दरम्यान बंगालमधे कासीमखानाचे जागी इस्लाम खानाची नेमणूक झालेली होती. इस्लामखानाने अधिकारग्रहण केल्याबरोबर पूर्वेकडील बादशाही प्रतिष्ठा पुन्हा प्रस्थापित करण्याचा अतिशय कसोशीने प्रयत्न केला. त्याने कामरूपकडे भरीव मदतीची रवानगी केली. परिणामी त्याच्या अधिकाऱ्यांनी बलीनारायण आणि त्याचे अनुयायी याना पळवून लावले. मोगल कारवाई चालू असतानाच बलीनारायण हा मरण पावला. अशातऱ्हेने पूर्व विभागातील अंदाधुदीला जबाबदार असलेले एक मोठे कारण नाहीसे झाले.

कामरूपमधे ही सर्व धामधूम माजविण्यास कारणीभूत असलेल्या अहोम राजावर सूड उगविण्यासाठी मोगलांनी लढाईची व्याप्ती आसाममधे नेण्याचे आणि मोगल साम्राज्याच्या सीमा अधिकाधिक पूर्वेकडे वाढविण्याचे ठरविले. त्यांनी कजली या अहोमांच्या ठाण्यावर हल्ला केला आणि ते ताब्यात घेतले. कजली येथे त्यानी मजबूत शिबंदी ठेवली. तेथून मोगलांनी पुढे कूच केले आणि समधारा येथे मुक्काम केला. मोगलांच्या चढाईचा ओघ थांबविण्यासाठी अहोम राजाने आता मोठ्या कसोशीने तयारी करण्यास सुरवात केली. त्याने समधाराच्या किल्ल्यावर भरपूर युद्ध साहित्य पाठविले आणि शिबंदीची तेथे रवानगी केली. अशा तऱ्हेने शत्रूबरोबर आपली ताकद अजविण्यासाठी तो उभा ठाकला. मोगलांनी जेव्हा आसाममधे प्रवेश केला. तेव्हा अहोमानी केलेल्या तयारीची त्यांना कल्पना आलेली नव्हती. त्यांच्यावर अहोम राजाने जोरदारपणे हल्ला चढविला आणि त्यांना ब्रह्मपुत्रा नदीच्या पलीकडे हाकलून दिले. कजलीचा किल्ला पुन्हा अहोमांच्या हाती पडला. त्यानी आता कामरूपची राजधानी गौहाती येथे हालविली.

यानंतर १६५८ पर्यंत मोगल आणि अहोम राजा याच्यामधील संबंध मित्रत्वाचे जरी नाहीत तरी शांततेचे होते. अधून मधून दोन्ही राज्या-मधील सीमा, व्यापाराबाबतचे वादळाची चाहूल लागल्यावर तें वाकत असत आणि त्यानंतर लगेच पहिल्या प्रमाणे वागण्यास सुरवात करीत.

**उज्जईनिया**

बक्सारजवळ उज्जईनिया या गावचा जमीनदार प्रताप याचा मोड करण्याबद्दल शहाजहान याने अबदुल्ला खान फिरोज जंग याला हुकूम केला. इकडे अबदुल्ला खान याने प्रताप याच्या भोजपूरच्या मजबूत ठाण्याला सख्तपणे वेढा दिला तर जबरदस्त खान याच्या हाताखालील एका तुकडीने दक्षिणेच्या दिशेला असलेल्या कोहापूरच्या किल्ल्यावर हल्ला चढविला आणि तो किल्ला जिंकून घेतला. भोजपूरचा वेढा जवळजवळ सहा महिनेपर्यंत टिकला. किल्ल्यावरील शिबंदीची परिस्थिती अतिशय अनुकंपनीय झाली. सरतेशेवटी प्रताप याने मुख्यकिल्ल्यातून माघार घेतली आणि आतल्या बाजूला असलेल्या बागेचा आश्रय घेतला. या ठिकाणी देखील त्याला फार काळ टिकाव धरता आला नाही. त्याचा बेत जफर खानाच्या मुलांनी अगोदरच ताब्यात घेतलेल्या किल्ल्याचा आसरा घेण्याचा होता. परिणामी दोन्ही पक्षामधे भयंकर युद्ध झाले आणि या युद्धात जफर खानाची मुले ठार झाली. आता मोगलांनी क़िल्ल्यामधील प्रताप याला वेढले आणि त्याला शरण येण्यास भाग पाडले. तो अबदुल्ला खान याला भेटण्यासाठी आला. त्यावेळी त्याने फक्त कमर बंध बांधला होता आणि त्याने आपल्या बायकोला हात धरून पुढे चालविले होते. अबदुल्ला खान याने त्याला तुरुंगात टाकण्याची आज्ञा दिली. आणि आपल्याला मिळालेल्या यशाचा अहवाल दरबाराकडे रवाना केला. प्रताप याला ठार करावे अशी बादशाहाने आज्ञा दिली आणि त्याच्या बायकोला एखाद्या मुसलमान अधिकाऱ्याच्या हवाली करण्याचा हुकूम दिला.[२०]

**रतनपूर, १६३४-३५.**

अबदुल्ला खान याने यानंतर जो हल्ला चढविला त्याचा रोख रतनपूर-वर होता. रतनपूरचा जमीनदार बाबू लछमन हा होता. तो हेकेखोर आणि अवज्ञा करणारा असा झाला होता. बांधुचा जमीनदार अमरसिंग याची मदत घेऊन अबदुल्ला खानाने रतनपूरकडे कूच केले. वाटेमधे बाबू लछमन याच्या पक्षपात्यांनी त्याच्या वाटेत त्याला अडथळे आणण्याचा प्रयत्न केला. परंतु अबदुल्ला खानाने त्याचा मोड केला आणि नंतर तियुंथरच्या किल्ल्याला वेढा

दिला. जीवावर उदार होऊन किल्ल्यावरील शिबंदीने आपल्या बायका आणि मुले यांना ठार मारले आणि शत्रूशी सामना देण्यासाठी मोठ्या शौर्याने ते किल्ल्याबाहेर पडले. त्यांनी मोठ्या शौर्याने प्रतिकार केला. परंतु मोगलांच्या संख्याबळापुढे त्यांचे काहीही चालले नाही आणि त्यांची एकूण एक माणसे ठार झाली. बादशाही फौजांनी तियुंथर या त्यांच्या मजबूत ठाण्याचा ताबा घेतला. अबदुल्लाखानाने तेथून रतनपूरकडे कूच केले. बाबू लछमन याने अमरसिंग याच्या मध्यस्थीने तहाच्या वाटाघाटींना सुरवात केली. बाबू लछमन याला बादशहाकडून क्षमा करण्यात येईल असे आश्वासन त्याला देण्यासाठी अबदुल्लाखान याने कविराय याची रवानगी केली. बाबू लछमन याने शरणागती दिली आणि तो फिरोज जंग याच्याबरोबर दरबाराकडे गेला."

**पलामाऊ**

वरील दोन्ही मोहिमांपेक्षा अधिक लक्ष्यवेधक घटना म्हणजे पलामाऊची मोहिम ही होय. हा जिल्हा त्याच्या सभोवतालच्या प्रदेशासारखाच घनदाट जंगलांनी भरलेल्या टेकड्यांच्या वेड्यावाकड्या समूहासारखा होता. हा प्रदेश म्हणजे छोटा नागपूरचे पठार आणि त्यामधील सुपीक दऱ्याखोऱ्यापासून निघालेल्या एखाद्या शाखेसारखा होता. कोलारीयन जमातीची एक चेरो नावाची शाखा होती. तिच्या ताब्यात हा प्रदेश होता. या सुमारास त्याच्यावर प्रताप हा राजा राज्य करीत होता. बिहारचा सुभेदार याची त्याने केलेली अवज्ञा हा अतिशय अक्षम्य असा गुन्हा होता आणि या अपराधाची कडक शिक्षा त्याला होणे हे अतिशय जरूर होते. परंतु प्रतापचे नशीब बलवत्तर होते. त्यामुळे अबदुल्लाखान हा जेव्हा त्या प्रांताचा सुभेदार होता तेव्हा तो इतर बऱ्याच भानगडीत गुंतला असल्यामुळे प्रतापकडे लक्ष देण्यास त्याला वेळ मिळाला नाही. मोगल इतिहासकारांच्या शद्वात सांगावयाचे झाल्यास "राजा हा अतिशय तामसी बनला आणि प्रांताचा नवीन सुभेदार शायस्ताखान याच्याशी त्याने अतिशय उद्धटपणाची वागणूक केली. जेव्हा शायस्ताखानाने ही घटना दरबाराकडे कळविली तेव्हां बादशहाने प्रताप याला हाकलून देण्याचा आणि त्याच्या अस्तित्वाच्या घाणीपासून देशाची मुक्तता करण्याचा त्याला हुकूम दिला."

वरील आज्ञेनुसार शायस्ताखानाने आपल्या मुलाला पाटणा शहराचे अधिकार देऊन स्वतः १२ आक्टोबर १६४१ रोजी पलामाऊकडे प्रयाण केले. त्याच्याबरोबर ५००० घोडेस्वार आणि १५००० पायदळ एवढे सैन्य होते.

त्याने युद्धाच्या व्यूहरचनेनुसार कूच केले. त्याने सैन्याच्या मध्य आघाडीचे नेतृत्व स्वतःकडे ठेवले. सैन्याची आघाडी जबरदस्तखान याच्या हाताखाली दिली. सैन्याच्या डाव्याबाजूवर आतिशखान दख्खनी याला ठेवले, उजवी आघाडी बखतियारखान याच्या नेतृत्वाखाली दिली आणि सैन्याच्या पिछाडीवर सय्यद मिर्जा याला ठेवले. गयेनंतर पुढे शायस्ताखानाने अतिशय सावधगिरीने कूच केले. प्रत्येक मुक्कामावर तो शत्रूकडून अचानक हल्ला होऊ नये म्हणून आपल्या छावणी भोवती मातीची भिंत उभारीत असे. कूच करण्याचे अगोदर मुख्य सैन्याच्या पुढे सैन्यातील जंगल तोड करणारे जंगल साफ करण्यासाठी आणि रस्ता रुंद करण्यासाठी पुढे जात असत. ज्या रस्त्याने सैन्य कूच करीत असे त्या रस्त्याच्या दोन्ही बाजूकडील खेडी अतिशय क्रूरपणे लुटली जात आणि त्यांचा नाश केला जाई. यामधे त्यांचा उद्देश शत्रूच्या हृदयात धडकी भरविण्याचा असे. तरी देखील अधूनमधून सभोवारच्या जंगलातून चेरो जमातीचे लोक बाहेर पडत व मोगल सैन्यातील पाठीमागे राहिलेल्या सैनिकावर हल्ले करीत. २६ जानेवारी १६४२ रोजी बादशाही सैन्याने आरू येथून कूच केले, आणि पलामाउ किल्ल्याच्या उत्तरेच्या बाजूच्या रोखाने ते निघाले. ज्या बाजूला रस्ता विभागत होता तेथे शत्रूने बादशाही सैन्याचा मार्ग अडविण्याचा प्रयत्न केला. परंतु अतिशय घनघोर युद्धानंतर शत्रूची हाकालपट्टी करण्यात आली. यानंतर शायस्ताखानाने छावणीची जागा मुकरर करण्यासाठी एका अधिकाऱ्याची नियुक्ती केली. परंतु त्याच्यावर शत्रूने हल्ला केला आणि त्याच्या सैन्याचे प्रचंड नुकसान केले. सरतेशेवटी फार मोठ्या कष्टानंतर किल्ल्याच्या बाजूने वाहात असलेल्या एका नदीच्या किनाऱ्यावर आपली छावणी देण्यात शायस्ताखानाला यश मिळाले. परंतु शत्रूने त्याच्या सैनिकांना सतावण्याचे कार्य चालूच ठेवले. काही काळानंतर बादशाही फौजांनी किल्लयासमोरील टेकडीचा ताबा घेतला आणि तेथून त्यानी किल्यावर प्रचंड भडिमार सुरू केला. त्यावर प्रताप हा अतिशय भयभित झाला आणि त्याने आपल्याला बादशहाकडून क्षमा केली जाईल याची खात्री मिळत असल्यास ८० हजार रुपये पेषकश म्हणून देण्यास आपण तयार आहोत असा निरोप पाठविला. त्याच प्रमाणे मोगल सुभेदाराला भेटून त्याला हजेरी सादर करण्यासाठी पाटणा येथे जाण्यास आपण तयार आहोत हे देखील त्याने कबूल केले. पावसाळा नजीक आल्यामुळे शायस्ताखानाला ही मोहिम चालू ठेवावयाची नव्हती. त्याला या अटी समाधानकारक वाटल्या आणि म्हणून तो मोहिमेवरून परत फिरला

परंतु या घटनेनंतर थोडाकाळ लोटला नाही तोच पलामाऊमधे मुलकी व्यवस्थेत काही गोंधळ निर्माण झाल्यामुळे तेथील कारभारात हस्तक्षेप करण्याचे आणखी एक ताजे निमित्त मोगलांना मिळाले. असे दिसते की प्रताप याने आपल्या अधिकाऱ्यांबरोबर अतिशय उद्धटपणे वर्तन केले, आणि परिणामी त्यांनी त्याला राज्यावरून काढून टाकण्याचा कट रचला. शायस्ताखानानंतर इतिकादखान याची बिहारच्या सुभेदारीवर नेमणूक झालेली होती. त्याने आपल्या अधिकाराची सूत्रे हाती घेतल्यावर दर्याराय आणि तेजराय हे दोघे चेरो प्रमुख त्याला भेटण्यासाठी आले. त्यांनी त्याचा पाठिंबा मिळविला आणि प्रताप याला कैदी म्हणून पाटणा येथे पाठविण्याचे वचन दिले. त्यानंतर ते पलामाऊ येथे परतले आणि आपल्या मित्राच्या मदतीने त्यांनी प्रताप याला कैद करण्यात यश मिळविले. तेजराय आता जमातीचा प्रमुख झाला. जेव्हा इतिकादखान याने त्याला आपले वचन पूर्ण करण्याबद्दल सांगितले, तेव्हा त्याने दिरंगाई करण्यास सुरवात केली. परंतु तेजराय याला देखील आपली भूमिका फार काळ टिकवून धरता आली नाही. कारण त्याचा मोठा भाऊ दरियाराय याने काही काळानंतर त्याच्या विरोधी भूमिका घेतली. तेजराय याला शिक्षा करण्यासाठी इतिकादखान याने दरियाराय याला आपल्याकडे वळवून घेतले. दरियाराय याने असे कबूल केले की जर का इतिकादखान याने आपली माणसे पाठविल्यास तो देवगाव त्याच्या स्वाधीन करील.

वरील बोलीनुसार इतिकादखान याने शिपायांची एक तुकडी जबरदस्तखान आणि शहाबादचा जमीनदार यांच्या हाताखाली रवाना केली. आक्टोबर १६४३ च्या सुरवातीला हे सैन्य देवगाव येथे पोहचले. दरियाराय हा आपले मुलगे आणि इतर काही चेरो प्रमुख याना बरोबर घेऊन त्यांना भेटण्यासाठी आला आणि त्याने किल्ला त्यांच्या स्वाधीन केला. जबरदस्तखानाने दरियाराय आणि त्याचे अनुयानी यांना पाटणा येथे रवाना केले आणि देवगाव येथील आपल्या ठाण्याची मजबुती करण्यास त्यानें सुरवात केंली. आज्ञेचे पालन करणाऱ्यांना त्याने बक्षिशी देऊन आपल्या बाजूला वळविले आणि दुराग्रही व शिरजोर यांना त्याने शिक्षा लावली. यानंतर त्याने जंगल साफ करण्यासाठी आणि पलामाऊचा रस्ता रूंद करण्यासाठी टेहेळणी करणाऱ्या तुकडीची रवानगी केली. १५ आक्टोबर रोजी अशी बातमी आली की मोगल फौजांना रोखून धरण्यासाठी तेजराय याने सहाशे घोडेस्वार आणि सात हजार पायदळ यांची रवानगी आपला वकील मदन सिंग ठाकूराय याच्या हाताखाली बाओली चीवन या ठिकाणाकडे आणि आणखी दोन

सैनिकांच्या तुकड्यांची रवानगी मोरदा आणि कुंदा या ठिकाणांकडे केलेली आहे. या बातमीत आणखी असे म्हटले होते की ठाकूराय याच्या हाताखालील तुकडीने मोगलांवर रात्रीच्या वेळी अचानक हल्ला करण्याचा बेत केलेला आहे. जबरदस्तखान शत्रूच्या हल्ल्याची अतिशय धीमेपणाने वाट पहात राहिला आणि शत्रूने हल्ला केल्यावर तो त्याने परतवून लावला.

दरम्यान तेजराय याने मोठ्या काळजीपूर्वक जी तयारी केलेली होती या संबंधीच्या बातम्या इतिकादखान याच्या कानावर आल्या. त्याने देवगाव येथील आपल्या फौजेला कुमक म्हणून बाकरखान नज्म सानी यांची ताबडतोब रवानगी केली. परंतु बाकरखान हा आपल्या नियोजित स्थळी पोहोचण्याचे अगोदरच पलामाउ येथे क्रान्ती घडून आलेली होती. ५ नोव्हेंबर रोजी शिकारीसाठी तेजराय हा गेलेला असताना त्याच्या गैरहजेरीत सुरतसिंग आणि सबळसिंग या मदनसिंग ठाकूरायी याच्या मुलांनी प्रताप याला मोकळे केले आणि त्याच्या प्रतिस्पर्ध्यांच्या पक्षपात्याना त्याच्या हवाली केले. तेजराय याच्या नशीबी घरदार नसलेल्या एखाद्या भटक्या सारखे या ठिकाणाहून त्या ठिकाणी पळ काढण्याचे व जंगले आणि डोंगर यांच्यामध्ये आसरा शोधण्याचे जिणे आले. त्याचा वकील मदनसिंग याच्यावर देखील अशाच तऱ्हेचे जीवन कंठण्याची पाळी आली. यावर जबरदस्तखानाने देवगावचा ताबा धीरेंद्र उज्जयिनिया याच्याकडे सोपवून पलामाउकडे कूच केले. त्याने वाटेतील घनदाट जंगल पार केले आणि तो मानगढ येथे येऊन पोहोचला. तेथे त्याला प्रताप याचे शरणागतीचे आणि आज्ञा पालनाचे असे नम्र पत्र मिळाले. परंतु जबरदस्तखानानें त्याला उत्तर दिले की पाटण्यापर्यंत, आपल्या बरोबर येण्याची त्याने सम्मती दिली तरच त्याच्या शब्दावर विश्वास ठेवणे आपल्याला शक्य होईल. प्रताप याने जबरदस्तखान याच्या या योजनेला आपला विरोध दर्शविला. यावर जबरदस्तखान याने त्याला बाकरखानाचे आगमन झाल्यानंतर होणाऱ्या गंभीर परिणामाबद्दल ताकीद दिली. या गोष्टीची प्रताप याला दहशत वाटून त्याने वरील अटींना आपली मान्यता दिली आणि १७ नोव्हेंबर रोजी पाटण्याला जाण्यासाठी तो जबरदस्त खानाबरोबर निघाला. वाटेत त्याची बाकरखानाबरोबर गाठ पडली. पाटणा येथे प्रताप याने १ लक्ष रुपये खंडणी देण्याचे कबूल केले आणि इतिकाद खान याने प्रताप याला मनसब देण्यात यावी अशी शिफारस सरकारकडे केली. बादशहाने त्याची एक हजारी मनसबदार म्हणून नेमणूक केली.

अशा तऱ्हेने पुढील काळात औरंगजेबाच्या कारकिर्दीत पलामाउवर जी आपत्ती कोसळली तिच्यापासून यावेळेपुरता तरी पलामाउचा बचाव झाला.[३२]

**माळवा**

माळव्यामधे बादशाही अधिकाऱ्याना गोंड आणि भिल्ल अधून मधुन उपद्रव देत. माळव्यातील खाताखेरीचा जमीनदार भागीरथ भिल्ल हा होता. त्याला आतापर्यंत माळव्याचा कोणताही सुभेदार वठणीवर आणू शकला नव्हता. त्याने आपल्या ताब्यातील मजबूत ठाणे हे पूर्णपणे अजिंक्य आहे यावर विसंबून १६३२ च्या डिसेंबरमधे काही अत्याचारी कृत्ये केली. माळव्याचा सुभेदार नसीरीखान याने त्याला शिक्षा करण्यासाठी चाल केली. यामुळे भागीरथ हा घाबरून गेला आणि त्याने त्याचा शेजारी कुनरचा जमीनदार संग्राम याने आपल्या वतीने मध्यस्थी करावी म्हणून त्याला विनंती केली. त्याने आपण एकनिष्ठ आणि आज्ञाधारक राहू असे वचन दिले आणि बराच काळ त्याचे निवासस्थान असलेला किल्ला मोगलांच्या ताब्यात परत देण्याचे ऐवजी नियमितपणे खंडणी देण्याचे त्याने कबूल केले. पुढे त्याने अशीही विनंती केली की दरबारात प्रत्यक्ष हजर न राहण्याची आपल्याला मुभा देण्यात यावी. या टाळाटाळीच्या उत्तरांनी नसीरीखान याचे समाधान झाले नाही, आणि त्याने पुन्हा आगेकूच करण्यास सुरवात केली तो जेव्हा खाताखेरीच्याजवळ चार मैल अंतरावर आला तेव्हा भागिरथ याचा धीर सुटला आणि त्याने आपल्याला क्षमा करण्यात येईल आणि सुरक्षित जाऊ देण्यात येईल या वचनांवर किल्ल्याचा ताबा नसीरीखानाकडे दिला. त्याने २४ डिसेंबर १६३२ रोजी किल्ल्याचा ताबा घेतला, बादशहाच्या नावे किल्ल्यामधे प्रार्थना म्हटल्या आणि मुसलमानी संस्काराप्रमाणे किल्ल्याचे शुद्धीकरण केले.[३३]

यानंतर १० वर्षांनी गोंडवनामधील डोंगरातल्या कुनारमधे थोडीफार गडबड झाली. तेथील जमीनदार संग्राम हा मोगल सरकार बरोबर एकनिष्ठ होता. त्याच्या मृत्यूनंतर त्याचा मुख्य अधिकारी माखीगोंड याने त्याचा मुलगा भूपत याचे अधिकार हिरावून घेतले आणि राज्य स्वतः बळकाविले. त्याने अगदी क्षुद्र वेतनवर त्याची बोळवण केली व तेथीलच एका पक्षाच्या मदतीने आपले स्थान मजबूत केले. नंतर त्याने मोगलांबरोबरील आपली राजनिष्ठा झुगारून दिली आणि वार्षिक खंडणी देण्याचे थांबविले. त्याने घालून दिलेला कित्ता इतरांनी गिरविला. इतर अनेक जमीनदारानी

आपली खंडणी आडवून ठेवली. आणि मोगलांबरोबरील संबंधात खुनशी वृत्ती धारण केली.

या घटनेमुळे परिस्थिती ही असह्य झाली आणि अतिशय ताबडतोबीच्या आणि परिणामकारक अशा उपाय योजना करण्याची गरज भासली. खान दौरान याने रायसेन सोडले आणि बंडखोरांना शिक्षा लावण्यासाठी त्याने कूच केले. त्याने त्याच्या राज्यात प्रवेश केला आणि जंगलांतून रस्ता साफ होईतोपर्यंत तो तेथेच मुक्काम करून राहिला. परतीच्या मार्गावर त्याने वेगवेगळ्या टप्प्यांवर पुरेसे रक्षक दल ठेवले आणि त्याने कुनारच्या दरीत जाण्यासाठी प्रवेश केला. एप्रिल २६,१६४३ रोजी शत्रूत्वाची भावना बाळगून असलेले गोंडांचे पाच हजार सैन्य त्याच्याशी मुकाबला करण्यासाठी सामोरे आले. त्यांना ७०० ते ८०० बंदुकधारी सैन्याची कुमक होती. या सैन्याने त्याची वाट अडवून धरली. थोड्याशा चकमकीनंतर खान दौरान याने त्यांना उधळून लावले. पावसाळयाच्या मोसमात त्याने त्याच दरीमधे मुक्काम केला. दरम्यान त्याने सैनिकांची एक तुकडी आजूबाजूची खेडी उध्वस्त करण्यासाठी रवाना केली. मोगल सेनापतीच्या निर्धाराची माखी गोंड याला दहशत बसली. परिणामी उभय पक्षात शांततापूर्ण तडजोड घडवून आणण्यासाठी म्हणून त्याने मिर्जावली आणि गोविंद दास या खान दौरान याच्या विश्वासू अनुयायांची भेट घेतली. आपल्या मित्रत्वाचे निदर्शक म्हणून त्याने मोगल छावणीमधे भूपत याची रवानगी काही ज्येष्ठ अधिकाऱ्यांबरोबर केली.

दोन्ही पक्षात वाटाघाटी चाललेल्या असताना शिबंदीमधील काही मंडळी भूपतची सुटका करण्याचा प्रयत्न करीत आहेत असे आढळून आले. यावर खान दौरान याने भूपत बरोबर आलेल्या ज्येष्ठ मंडळीना बंदिस्त केले आणि भूपतची कैदखान्यामधे रवानगी केली. माखी गोंड याने किल्ल्याचा ताबा न दिल्यामुळे खान दौरान याने आगेकूच केली. आणि लखरा टेकडीचा ताबा घेतला.. परंतु किल्लयाचा पाडाव होईल याबद्दल विशेष मोठी अशी आशा नव्हती. कारण कुनारचा किल्ला हा एका दुमजली डोंगराच्या माथ्यावर असून हा डोंगर म्हणजे उभ्या चढत गेलेल्या प्रचंड फत्तराच्या गोळयासारखा होता. या निसर्गनिर्मित तटबंदीतील एकमेव खिंडार हे भरीव बांधकामाने भरून काढण्यात आलेले होते आणि या बांधकामाच्या प्रत्येक इंचाइंचाचे रक्षण करण्यासाठी तोफांचे मोर्चे होते.

अशा परिस्थितीत भारी तोफखान्याचे सहाय्य असल्याखेरीज किल्ल्यावर हल्ला करणे हे अशक्य होते. म्हणून खान दौरान याने मोठ्या तोफा आणि रसद आपल्याकडे पाठविण्याबद्दल शहाजहानकडे विनंती केली. यावर शहाजहान याने बुरहाणपूरहून रशीदखान अन्सारी याला पहाडसिंग बुंदेला याला त्याच्या जहागिरीमधून मंदसूरहून जानसिपारखान याला अ णि रामपूरहून पृथ्वीराज राठौड याला खान दौरान याच्या मदतीसाठी ताबडतोब कूच करून जाण्याचा हुकूम दिला. मदतीसाठी निघालेल्या या फौजा येऊन पोहोचल्यानंतर १८ फेब्रुवारी १६४४ रोजी खान दौरान याने वेढयाला सुरवात केली आणि उभारलेल्या मोर्चामधून तोफांचा भडिमार करण्याला प्रारंभ केला. प्रतिकार करण्यात आता अर्थ उरला नाही याची खात्री झाल्यामुळे मारवी गोंड याने तहाची याचना केली आणि मार्च महिन्याचे अखेरीला तो खान दौरान याला भेटण्यासाठी आला. खान दौरान याने किल्ल्याचा ताबा घेतला आणि आपला भाऊ महमद सालीह याला त्याने किल्ल्याच्या अधिकारावर नेमले. त्याच्या दिमतीसाठी त्याने ५०० घोडे आणि ७०० बंदुकची यांची एक तुकडी दिली[२४].

**गढवाल आणि कुमाऊन**

मोगल सम्राटांचे लक्ष गढवाल आणि कुमाऊन या डोंगराळ राज्यांनी देखिल वेधून घेतले. अधूनमधून ती राज्ये आपल्या ताब्यांत आणण्याचे प्रयत्न देखिल त्यांच्याकडून करण्यात आले. जहांगीरच्या कारकिर्दीत कुमाऊनचा राजा दरबारात आला होता आणि मोठ्या सढळ हाताने त्याच्यावर बक्षिसांची खैरात करण्यात आली.[२५] त्याने मोगल घराण्याबरोबर सातत्याने निष्ठा दाखविली असे दिसते.

शहाजहानच्या कारकिर्दीत गढवाल जिंकून घेण्याचा अगदी सुरवातीचा प्रयत्न एप्रिल १६३५ मधे करण्यात आला. तेव्हा कांगडाचा फौजदार नजाबत खान याने श्रीनगरवर हल्ला करण्याची परवानगी आपल्याला देण्यात यावी अशी विनंती केली. त्याने सिरमूर टेकडयामधे प्रवेश केला, यमुनेच्या काठावरील शीरगड जिंकून घेतला आणि हरद्वार पर्यंतच्या प्रदेशावर आपला कब्जा केला. या ठिकाणी त्याने गंगानदी ओलांडली, गढवालमधे प्रवेश केला आणि श्रीनगरपासून सहा मैलावर तो येऊन पोहोचला. १० लक्ष रुपये खंडणी देण्याचे वचन त्याला देऊन राजाने त्याला फसविले आणि डोंगराळ विभागात

त्याला अडकवून ठेवले. मोगलांची माघारीची वाट त्याने बंद केली. आणि त्यांची कोंडी करून त्यांच्या संपूर्ण सैन्याचा नाश केला. झालेल्या संहाराची दरबाराकडे खबर देण्यासाठी एकटा नजाबतखान हा जिवंत राहिला. कांगडाच्या फौजदारीवरून त्याला काढण्यात आले.[२६]

यानंतर २० वर्षांनी १६५४ मधे श्रीनगर जिंकून घेण्याचा अयशस्वी प्रयत्न खलील अुल्ला याने केला. बादशाही फौजांनी त्या प्रदेशात बहादूरपूर येथपर्यंत धडक मारली, कुमाअुनच्या राजाची शरणागती मिळविली आणि तेथून तें परत फिरले.[२७] १६५६ च्या जानेवारीमधे कासीमखान मीर आतिश याने चार हजार सैन्य घेऊन गढवालवर स्वारी केली. त्याच वर्षीच्या जुलै महिन्यात श्रीनगरच्या राजाचा मुलगा मेदनीसिंग हा दरबारात हजर झाला आणि त्याने आपल्या बापाचे वतीने बादशहाकडे आपली शरणागती दिली.[२८] हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्द प्रांतामधील डोंगरी जमातीत आज्ञा पालन न करण्याची वृत्ती आणि नेहमी काहीतरी गडबड करण्याकडे कल या गोष्टी कायम वास्तव्य करून होत्या. जहांगीरच्या कारकिर्दीत अहदाद याच्या अस्वस्थतेच्या वृत्तीमुळे बादशाही अधिकाऱ्याना अतिशय अुपद्रव झाला, परंतु १६२५-२६ मधे जफरखान याने त्याला जेरीस आणले आणि नवाक येथे त्याला वेढले. याठिकाणी बंदुकीची एक अचानक गोळी लागून बंडखोर ठार झाला.[२९] अहदादनंतर त्याचा मुलगा अबदुल कादीर हा गादीवर आला. जफरखान हा खैबरखिंडीच्या मार्गे काबूलकडे कूच करून जात असताना त्याची छावणी अबदुल कादीर याने लुटली. या प्रसंगी मोगल सुभेदाराच्या संपूर्ण सैन्याचा नाश झाला. शहाजहान सिंहासनावर आल्यानंतर काबूलच्या सुभेदारीवर जफरखानाचे जागी त्याने लष्कर खानाची नेमणूक केली.[३०]

खान जहान याने बंड केले तेव्हा कमालुद्दीन नावाच्या एका व्यक्तीने काबूल आणि अटक यांच्या दरम्यान असलेल्या अफगाण टोळीवाल्याना चिथावून देऊन गडबड माजविली. परंतु सैदखान याने त्यांच्याविरूद्ध तावडतोब कूच केले, आणि अबदुल कादिर याला अलग पाडून बंडखोरांचा बिमोड केला.[३१] १६३८ मधे पुन्हा एकदा नग्झमध्ये टोळीवाल्यांनी सार्वत्रिक उठाव केला, परंतु त्यांचा पुढारी करीमदाद याला जिवंत पकडण्यात आले आणि त्याचा वध करण्यांत आला.[३२] यानंतर दोन वर्षांनी युसुफजाईनी बंड-

खोरीचा मार्ग स्विकारला, परंतु त्यांच्या बंडाचा बिमोड सुलभतेने करण्यांत नौशेराचा ठाणेदार सय्यद दिलीरखान याला यश मिळाले.[33] इ.स. १६५० मधे खुशहाल खटाक याची त्याने आपणहून केलेल्या विनंतीनुसार युसुफजाईना काबूत आणण्याच्या कामगिरीवर नेमणूक करण्यांत आली. त्याला या कामी यश आले असावेसे दिसते. त्याशिवाय हिंदुस्थानमधून कन्दहारच्या मोहिमेवर सैन्याची जी सातत्याने हालचाल चालू राहिली त्यामुळे शहाजहानच्या उर्वरीत कारकिर्दीत टोळीवाल्यांना काहीही हालचाल न करता स्वस्थ राहणे भाग पडले.[34]

कजवीनी याने आपल्या हकीकतींत सांगितले आहे की लाहोरच्या जवळ वाईसनघर याचा पराभव झाल्यानंतर त्याने बदक्शानमधिल कैलासकडे पळ काढला. तेथेच तो मरण पावला. परंतु एका अज्ञात इसमाने त्याचे नाव धारण केले आणि बाल्खचा मार्ग स्विकारला. तेथे त्याचे हृद्यपणे स्वागत करण्यांत आले. एकदा तर त्याचा विवाह आपल्या घराण्यात लावून द्यावा असा देखिल विचार बाल्खच्या सुलतानाने केला. परंतु त्याच्या खरेपणाविषयी शंका आल्याने त्याने ही गोष्ट प्रत्यक्षात उतरविण्याचे टाळले. ह्या तोतयाने नंतर बाल्खहून इराणकडे प्रयाण केले. तेथे शहाने जरी त्याची समक्ष भेट घेतली नाही तरी अप्रत्यक्षरित्या त्याने त्याच्यासाठी भरगच्च मनोरंजनाचे कार्यक्रम आखले. इराणमधून त्याने बगदाद आणि तुर्कस्तानकडे प्रवास केला आणि अखेर तो थत्ता येथे येऊन पोहोचला. येथेही त्याने आपल्या ढोंगीपणाचा बुरखा थत्ताचा सुभेदार दौलतखान याजपुढे मिरविला. परंतु दौलतखानाने त्याला कैद केले आणि त्याची रवानगी दरबाराकडे केली. तेथे त्याचे ढोंग वक्कास हाजी याने उघडकीस आणले. यावर त्याला ठार मारण्याचा हुकूम देण्यांत आला. ही घटना इ.स. १६३६ मधे घडली.[35]

# तळटीपा

## प्रकरण पांचवे

(१) 'Imperial Gazetteer of India,' Vol. XIII p. 164; 'History of the Portuguese in Bengal,' Chapter V; Danvers says that about this time attempts were made to extend the Portuguese influence in Bengal. 'The Portuguese in India,' Vol. I p. 422.

(२) तबातबाई, पान ११ ब; कजवीनी, पान २५२; लाहोरी, खंड १, पान ४३४.

(३) Manrique, Vol. II, p. 392 (Cabral's letter).

(४) Manrique, Vol. II, p. 393.

(५) बर्नियर, पाने १७४-७६; कजवीनी, पान २५२ ब.

(६) Danvers, 'Vol. II, p. 246; सातगाववर जी विपन्नावस्था ओढविली तिचा उल्लेख कजवीनी करताना आपल्याला आढळतो.

(७) Manrique, Vol, II. p. 314.

(८) Letter of J. Cabral.

(९) ,, ,,

(१०) पोर्तुगीजांचा नाश करण्याचा शहाजहानने जो हुकूम दिला, त्यांत त्याचा धार्मिक हेतू होता असे जे, काब्राल याने ठामपणे प्रतिपादन केले आहे. कजवीनी (पान २५२ ब) आणि लाहोरी (खंड १, पाने ४३४–३५) हे धार्मीक बाजूला दुय्यम पण राजकीय दृष्टिकोनांतून विचार करता कोणत्याही दृष्टिने कमी महत्वाचे नसलेले असे स्थान देतात. परंतु डॅनव्हर्स याने गृहित धरले आहे की दक्षिणेमधिल आपल्या पराभवाचा वचपा भरून काढण्यासाठी शहाजहान याने हुगळीवर हल्ला चढविला हे चुकीच्या विचारसरणीवर आधारलेले आहे (खंड २, पान २४७.) मोगलांची दृष्टी बंदेलच्या संपत्तिवर होती ही गोष्ट काब्रालनें दृष्टीत्पत्तीस आणून दिलेली आहे. मुमताज महालच्या आराहामुळे हा हल्ला झाला असावा अशी मनुची याची विचारसरणी होती.

(११) कजवीनी, पाने २५२ ब–५३; लाहोरी, खंड १, पाने ४३५–३६. काब्राल कासिमखानाला बादशहाचा एक विश्वासू अनुयायी या नावाने संबोधितो आणि कजविनी आणि लाहोरी याप्रमाणेच असे विधान करतो की कासिमखान घाव घालण्यासाठी योग्य त्या संधिचीच वाट पहात होता. (Manrique, Vol. II, p. 396).

(१२) या आकड्याचा उल्लेख मॅनरिक याने केला असून तो म्हणतो की बचाव करणाऱ्यांची संख्या १८० पोर्तुगीज आणि ६०० गुलाम एवढी असून हल्लेखोरांच्या दृष्टीला हीच संख्या एवढी प्रचंड भासली की त्यांनी हल्ला करण्याचे धाडस दाखविले आणि बचाव करणाऱ्यांना वचने आणि आमिषे दाखवून हुगळीचा बचाव करण्यापासून त्यांना परावृत्त करण्याचा प्रयत्न केला (Vol. II, p. 323). डॅनव्हर्सच्या मते पोर्तुगीजांची संख्या २०० एवढी होती. (Vol. II, pp. 247–48).

(१३) या वाटाघाटीचा वृत्तान्त जे. काब्राल यांच्या पत्रावर आधारलेला आहे.

(१४) कजवीनी, पान २५३.

(१५) बर्नियर, पाने १७६–७७; Manrique, Vol. II. p. 325; pp. 331–33; p. 336 and pp. 336–39; मनुची, Vol. I, p. 183.

(१६) कजवीनी, पान ४१३ ब.

(१७) कजवीनी, पान ३०६.

(१८) कजवीनी, पाने ४१३–१७; लाहोरी, खंड १, भाग २, पाने २८१–८९.

(१९) Bhattacharya, 'The Moghul North East Frontier Policy,' pp. 250—96; लाहोरी, खंड २, पाने ६४–९०.

(२०) कजवीनी, पाने ४०७–८ ब; लाहोरी, खंड १, भाग २, पाने २७१–७४.

(२१) कजवीनी, पाने ३३९–३४०; लाहोरी, खंड १, भाग २, पाने ७४-७६

(२२) लाहोरी, खंड २, पाने ३५६–६१; J. A. S. B., 1871, pp. 111—24.

(२३) कजवीनी, पाने २५३–६०; लाहोरी, खंड १, पाने ४४९–५०.

(२४) लाहोरी, खंड २, पाने ३७०–७२.

(२५) R. B., Vol. I, p. 218.

(२६) लाहोरी, खंड १, भाग२, पाने ९०-९३.

(२७) वारिस, पाने १४२ ब–१४३ ब.

(२८) वारिस, पान १५७ आणि पान १५९ ब.

(२९) मासिर–उल्–उमरा, खंड २, पाने २४६–४७.

(३०) लाहोरी, खंड १, पाने १९०–९१; कजवीनी, पाने १५५ ब–५६

(३१) लाहोरी, खंड १, पाने ३११–१३; पाने १९५ ब–१९७.

(३२) लाहोरी, खंड २, पाने १२–१४.

(३३) लाहोरी, खंड २, पान २२२.

(३४) वारिस, पान ६७ ब.

(३५) कजवीनी, पान ३८७; लाहोरी, खंड १, भाग २, पान २०६, आपल्या सुरतेहून पर्शियाला लिहिलेल्या पत्रांत (मे १३, १६३१) शहाजहानच्या राज्यावर तार्तर राजाबरोबर संगनमत करून आक्रमण करण्याचा वाइसंघरचा बेत आहे अशा तऱ्हेच्या उठलेल्या वावडचांचा उल्लेख प्रेसिडेन्ट रस्टेल हा करतो. The English Factories in India (1630–33), p. 160. For Baisanghar see Proceedings of the Asiatic Society of Bengal, 1869, p. 218.

# प्रकरण सहावे

# अहमदनगरचा नाश

## अहमदनगर राज्याचे समालोचन

अहमदनगरच्या राज्याची स्थापना इ. स. १४९० मधे मलिक अहमद निजाम अुलमुल्क याने केली.[1] तो बहमनी साम्राज्यापासून फुटून बाहेर पडला. नामधारी सुलतान महमूद याने त्याला वठणीवर आणण्याचे वारंवार केलेले प्रयत्न त्याने हाणून पाडले. परंतु मलिक अहमदच्या मृत्यूनंतर काही-काळातच राज्यामध्ये फुटीर वृत्तींनी डोके वर काढले. यानंतर बराच काळ-पर्यंत अहमदनगरचे राज्य अस्तीत्वात होते. परंतु (प्रजेच्या दृष्टीने) हित-कारक अशा योजना प्रत्यक्षांत आणण्याऱ्या किंवा सुव्यवस्थितपणे राज्य कार-भार चालविणाऱ्या शासनाची स्थापना करणाऱ्या अशा एका देखिल सुल-तानाची कारकिर्द आपल्याला या कालखंडात झालेली दिसून येत नाही. अशातऱ्हेने बंडखोर पुढाऱ्यांच्या लढाऊ महत्वाकांक्षांना खतपाणी घालणारी भूमी एवढेच अहमदनगरचे या सर्व कालखंडात स्थान राहिले. या बंडखोर पुढाऱ्यांचा एकमेव उद्देश आपले वर्चस्व कायम टिकवून धरणे एवढाच असे, आणि या उद्दिष्टाच्या पूर्तीसाठी राज्याच्या एकात्मतेला धोका निर्माण झाला तरीदेखील त्याची त्याना पर्वा वाटत नसे. या परिस्थितीत विजापूर आणि गोवळकोंडा याजबरोबर सातत्याने चाललेल्या युद्धाची आपण भर घातली, तर अहमदनगर राज्याच्या दुर्दशापूर्ण विपन्नावस्थेचे चित्र पुरे

होते. सोळाव्या शतकाच्या शेवटच्या दशकांत आणि सतराव्या शतकाच्या पहिल्या कांही दशकांत अहमदनगर राज्याची स्थिती शक्तिचा ऱ्हास झाल्यामुळे, साधनसंपत्तीत घट पडल्यामुळे आणि शासन यंत्रणा पूर्णपणे विस्कळीत झाल्यामुळे एखाद्या चेतनाहिन कलेवराप्रमाणे झाली होती. मलिक अंबर याने एखाद्या सडलेल्या देहाप्रमाणे झालेल्या अहमदनगर राज्यांत पुन्हा काहीकाळ चेतना निर्माण केली परंतु त्याच्या मृत्यूनंतर अहमदनगर राज्याच्या विनाशाला पुन्हा सुरवात झाली.

### मोगलांबरोबर संबंध

अहमदनगर आणि मोगल यांच्यामधील औपचारीक संबंधाची सुरवात पहिल्या बुरहाण निजाम शहाच्या कारकिर्दीत जेव्हा बुरहाण निजाम शहाने गुजराथचा सुलतान बहादूरशहा याच्या अरेरावी विरुद्ध बाबर[२] आणि हुमायून[३] यांच्याकडे संरक्षणाची याचना केली तेव्हा झाली. परंतु या संबंधाची राजनैतिक पातळीवरून स्थापना होण्यासाठी तिसरा मोगल बादशाहा सिंहासनावर येऊन सोळा वर्षे होईपर्यंतचा कालावधी जावा लागला. गुजराथवरील आपल्या पहिल्या स्वारीत अकबराने निजामशहाच्या दरबारांत मीर मुहसीन रिजवी[४] याला पाठविले. आपल्या ह्या कृतिने त्याने असे सुचित केले की आपण गुजराथ जिंकून घेतल्यामुळे आपोआप च आपल्याला अहमदनगरवर सार्वभौमत्व प्राप्त झालेले आहे.[५] परंतु त्यावेळेपुरते तरी निजामशहाने त्याच्याकडे जी तकलुपी राजनिष्ठा दाखविली आणि जे नजराणे त्याच्याकडे रवाना केले त्यावर त्याने आपले समाधान झाल्यासारखे दाखविले. त्याची सत्ता अजून उत्तरेमध्ये पक्की दृढमूल झाली नव्हती आणि अशा परिस्थितीत दक्षिणेमधील राज्यकर्त्यांना आव्हान देणे हे शहाणपणाचे[६] नव्हते.

### दक्षिणेच्या दिशेने झालेल्या अकबराच्या प्रगतिची कारणे

परंतु यानंतरच्या वीस वर्षामधे मोगलांनी आपले वर्चस्व निर्विवादपणे प्रस्थापित केले. बंगालच्या पूर्व सीमांपासून तो पश्चिमेस कंदहारपर्यंत आणि उत्तरेत काश्मिरपासून तो दक्षिणेस नर्मदा नदीपर्यंत साऱ्या देशाने एका सार्वभौमाच्या सत्तेपुढे मान तुकविली आणि साऱ्या देशाने समान अशा राज्यकारभाराच्या पद्धतिचा अनुभव घेतला. साम्राज्याचा हा जो प्रचंड इमला उभारण्यात आला होता त्याच्या गाभ्याचे मुख्य सूत्र लष्करी हुकुमशाही हे होते आणि अशा तऱ्हेची लष्करी राजवट सातत्याने क्रियाशील ठेवण्यासाठी

कायम प्रादेशिक आक्रमणाचा पुरस्कार करणारे धोरण अंगीकारणे जरूर होते. त्याशिवाय या सामर्थ्यशाली साम्राज्याचे अस्तित्व संख्येने प्रबळ असलेल्या सैन्यावर अवलंबून होते, आणि या सैन्याची सारखी वाढ होत होती. या सैन्याची व्यवस्था हजारो शूर शिपाई आणि कार्यक्षम अधिकारी यांच्या हाती होती आणि त्यांना निरुद्योगी ठेवणे म्हणजे राज्याच्या अंतर्गत सुरक्षिततेला फार मोठा धोका निर्माण करण्यासारखे होते. शिवाय एवढ्या मोठ्या सैन्याला कामगिरीवाचून ठेवणे म्हणजे फार मोठे खर्चाचे होते. सारांश वाजवीपेक्षा अधिक वाढ झालेल्या सैन्याला काहीतरी उद्योग देणे अकबराला क्रमप्राप्त झाले. या प्रश्नातूनच अकबराच्या दक्षिणेबाबतच्या धोरणाने साकार स्वरुप धारण केले.

दुसऱ्या एका विचाराचा अकबराच्या मनावर या संदर्भात परिणाम झाला असावा आणि तो म्हणजे चक्रवर्तीपदाचा मान आपल्याला प्राप्त व्हावा ही त्याच्या मनात निर्माण झालेली महत्त्वाकांक्षा हा होय. त्याच्या डोळ्यासमोर उत्तरेकडील प्रदेश जिंकण्याचे काम पुरे केल्यानंतर दक्षिणेकडे ज्यांनी मोर्चा वळविला आहे अशा अनेक हिंदू सम्राटांची उदाहरणे होती. ही उदाहरणे इतिहासजमा झालेली होती असे जरी गृहीत धरले तरी अलाउद्दीन खिलजी आणि महमद तघलक यांची कारकीर्द संपून फार मोठासा काळ लोटला होता असे म्हणता आले नसते आणि या दोघांबरोबर तुलना करता अकबराच्या वाट्याला कमी गुणवत्ता आलेली नव्हती.

उत्तरेकडील सत्तांची दक्षिणेच्या दिशेने आपल्या साम्राज्याचा फैलाव करण्याची जी एक अनिवार्य प्रवृत्ति होती त्याशिवाय आणखी एका विचाराचा प्रभाव अकबराच्या मनावर पडला. प्रत्येक देशामध्ये चांगली शासन यंत्रणा स्थापन करण्याची कामगिरी कोण्या एका परमेश्वरी संकेतानुसार आपल्यावर सोपविण्यात आलेली आहे अशी त्याच्या मनाची दृढ भावना होती. त्याच्या दृष्टीकोनातून चांगला राज्यकारभार करणारे सरकार म्हणजे मोगल शासन-यंत्रणेशिवाय दुसरे असू शकत नाही ही कल्पना अभिप्रेत होती. अशा परिस्थितीत त्याच्या मनांतील कल्पना प्रत्यक्षात उतरविण्यासाठी अहमदनगर-सारखी दुसरी योग्य भूमी नव्हती.

**अहमदनगरमधील अराजक स्थिती**

मूर्तजा निजामशहाच्या बेताल राज्यकारभारामुळे अहमदनगर राज्या-मध्ये पक्षोपपक्षांतील कलहाच्या वृत्तींना खतपाणी घातले गेले. हुसेन आणि

इस्माईल निजाम शहा यांच्या फारच थोडा काळ झालेल्या कारकिर्दीत "अहमदनगर शहर आणि राज्य यामध्ये वारंवार होणाऱ्या कत्तली आणि सर्वत्र होणारी लुटालुट या वृत्तींनी इतका धुमाकूळ घातला की जणू कांही जगामधून शांतता आणि सुरक्षितता यांनी पलायन केले आहे की काय असा आभास निर्माण झाला."[८] आपल्या माथेफिरू भावाच्या जुलमी वागणुकीपासून स्वतःचा बचाव करण्यासाठी दुसरा बुरहाण अकबराकडे पळून आला;[९] त्याचप्रमाणे अनेक अधिकाऱ्यांनी देखील पलायन करून मोगल दरबाराचा आश्रय घेतला. अशातऱ्हेने अहमदनगर राज्यामध्ये निर्माण झालेली अंदाधुंदीची परिस्थिती, त्या राज्यावर हक्क सांगणाऱ्या एका राजपुत्राचे त्याच्या दरबारांतील अस्तित्व आणि त्याने मदतीसाठी केलेली याचना या गोष्टीमुळे अहमदनगरच्या कारभारांत ढवळाढवळ करण्यासाठी सर्वसाधारणपणे ज्याचे समर्थन करता येईल असे एक निमित्त मोगल सम्राट अकबर याला मिळाले.

**बुरहाणचा उद्दामपणा**

दुसऱ्या बुरहाणला आपण मदत केल्यास दक्षिणेमधे आपले वर्चस्व अधिक प्रभावितपणे आपल्याला प्रस्थापित करणे शक्य होईल असे अकबराला वाटले. परंतु आपला पित्त्या अगदीच बुळा निघेल ही जी अकबराची अपेक्षा होती ती मात्र खोटी ठरली. गादीवर आल्यानंतर कांही काळानंतर त्याने अकबरापाशी असलेली आपली राजनिष्ठा सोडून दिली आणि त्याचा शेजारी खानदेशचा सुलतान याने दिलेल्या स्नेहाच्या सल्ल्याकडे त्याने दुर्लक्ष केले. इतकेच नव्हे तर ज्यावेळी मोगलांचा वकील फैजी याचे त्याच्या दरबारांत आगमन झाले तेव्हा दुसऱ्या बुरहाणने त्याच्याबरोबर वागताना थोडीफार देखील सौज्यन्यशीलता दाखविली नाही. इतकेच नव्हे तर अकबराकडे त्याला साजेलसा नजराणा[१०] पाठविण्यास देखील निग्रहपूर्वक नकार दिला. इतके कारण अकबराचा क्रोधाग्नि प्रज्वलीत करण्यास पुरेसे होते. दुसऱ्या बुरहाण निजामशहाच्या मृत्यूनंतर अहमदनगरमध्ये परस्पर विघातक असे जे झगडे निर्माण झाले त्यामुळे अकबराला अधिकच उत्तेजन मिळाले. त्याने राजपुत्र मुरादच्या हाताखाली एका प्रचंड सैन्याची रवानगी केली. या सैन्याने अहमदनगरला वेढा दिला आणि परिणामी वऱ्हाडचे दान आपल्या पदरांत अकबराने पाडून घेतले.[११]

**मोगलांकडून वऱ्हाड खालसा आणि त्याचे झालेले परिणाम**

वऱ्हाडचे मोगल साम्राज्यांत झालेले विलिनीकरण म्हणजे मोगलांनी दक्षिणेमध्ये ज्या चढावाच्या धोरणाचा स्विकार केला त्याची सुरवात होती

असे म्हणण्यास हरकत नाही. यामुळे उत्तर आणि दक्षिण यामध्ये असलेली भिंत कोसळून पडली आणि या घटनेने मोगल सरकार आणि निजामशाही राज्य यांना सातत्याने चाललेल्या झगड्यांत जखडून टाकले. दक्षिणेवर आपले राजकीय वर्चस्व टिकवून धरणे या तत्वाने मोगलांच्या दक्षिणेबाबतच्या धोरणावर छाप पाडली आणि म्हणूनच अहमदनगरचा संपूर्ण विनाश केव्हां होतो हा प्रश्न कांही काळापुरताच मर्यादीत राहिला. १५९५ मध्ये राजपुत्र मुराद याने सुरू केलेली कामगिरी पूर्ण करण्यासाठी अकबर स्वतः दक्षिणेमध्ये उतरला. त्याने खानदेशचे राज्य जिंकून घेतले, वऱ्हाड प्रांत पुन्हा आपल्या ताब्यात घेतला आणि बालाघाट मोगल साम्राज्याला जोडला परंतु एकाएकी निर्माण झालेल्या गंभीर घटनेमुळे[१२] त्याला दक्षिणेतील आपली कामगिरी अर्धवट सोडून उत्तरेकडे परत फिरणे भाग पडले.

## अंबरचा उदय

आपल्या ताब्यात आलेल्या मुलुखामध्ये सुसूत्रपणा आणण्याचे कामी मोगल कमी पडल्याचा तडकाफडकी परिणाम असा झाला की अहमदनगर राज्याचे कांही भाग त्या राज्यातील महत्वाकांक्षी अशा सरदारांच्या ताब्यात गेले. या पैकी दोघेजण म्हणजे अंबर आणि राजू विशेष करून पुढे आले आणि दोघांमध्ये वर्चस्व मिळविण्यासाठी झगडा सुरू झाला. आपल्या अंगातील कौशल्य आणि धाडस यांच्या जोरावर मलीक अंबरने आपल्या प्रतिस्पर्ध्याचा पराभव केला, आपल्या ताब्यांतील मुलूखावर आपली पकड घट्ट केली आणि अहमदनगर राज्याच्या वैभवाला उजाळा देऊन त्याच्या मसलतीने चालणाऱ्या एका इसमाची दुसरा मूर्तजा निजामशहा या नावाने द्वाही फिरविली[१३] त्यानंतर त्याने उत्तरेकडून आलेल्या आक्रमकांचा प्रतिकार केला आणि त्यांना खानदेशकडे हाकलून दिले. जहांगीर बादशहाच्या सर्व कारकिर्दीत हिकमती मलीक अंबर आणि मोगल साम्राज्याचे सेनानी यांच्यामध्ये सतत युद्धाची धुमश्चक्री चालली होती. खानखानान, खानजहान, अजीजकोका वगैरे सर्वांनी एका पाठोपाठ आपल्या कौशल्याची शिकस्त केली. परंतु पराक्रमी मलिक अंबरने त्या सर्वांचे हल्ले परतवून लावले. सरतेशेवटी राजपूत्र शहाजहान याला दक्षिणेत पाठविण्यात आले. त्याला मलिक अंबर वरील दोन मोहिमानंतर मोगल घराण्याचा आब पुन्हा स्थापन करण्यांत यश प्राप्त झाले. या प्रतिष्ठेला शहाजहानच्या बंडामुळे पुन्हा काळीमा प्राप्त झाला. जेव्हा १६२६ मध्ये

मलिक अंबर मरण पावला तेव्हां दक्षिणेतील मोगलांच्या ताब्यातील प्रदेशांत खानदेश, वऱ्हाड, अहमदनगरचा किल्ला आणि बालाघाटचा कांही भाग यांचा समावेश होता.

## दुसरा मूर्तजा आणि फतेखान

मलिक अंबर नंतर त्याचा मुलगा फतेखान याच्याकडे वजीर पदाचे अधिकार आले. परंतु दुसऱ्या मूर्तजाचा त्याच्यावर विश्वास नव्हता. त्या दोघांमधील बेबनाव विकोपाला जाण्यास पुढील घटना कारणीभूत झाली. ती अशी : शहाजहानच्या पाठलागावर खानजहान असताना मुसळधार पाऊस पडल्यामुळे खानजहानची परिस्थिती अतिशय अनुकंपनीय अशी झाली. त्या वेळी त्याला पकडण्याचे कामी फत्तेखानला अपयश आले.[१४] फतेखान राजधानीला परतल्यावर दुसऱ्या मूर्तजाने त्याला सिन्नरच्या किल्ल्यांत बंदिस्त करून ठेवले. परंतु फतेखानाने त्याच्यावरील रक्षकांना लांच चारून आपली सुटका करून घेतली आणि तो अहमदनगरचा मोगल सेनापती सिपाहदारखान याच्याकडे पळून आला. त्याने फतेखानाचे स्वागत केले.[१५] लौकरच फतेखाना-भोवती मोठ्या संख्येने अनुयायांची जमवाजमव झाली. त्याने दुसऱ्या मूर्तजा बरोबर लढाई देण्यासाठी आगेकूच केले. परंतु या लढाईत त्याचा पराभव होऊन तो कैद झाला. यावेळी त्याला दौलताबादच्या किल्ल्यांत बंदिस्त करून ठेवण्यात आले. दुसऱ्या मूर्तजाने मुकर्रबखान याची सरसेनापती म्हणून आणि इखलास खान याची पेशवा म्हणून नेमणूक केली.[१६]

## खान जहानची बेईमानी

जहांगीरच्या मृत्युनंतर महाबत खानाचे बंड आणि नूरजहान आणि आसफखान या दोघांमधील मत्सरग्रस्त हेवादावा यामुळे मोगल दरबारांत अतिशय गोंधळ निर्माण झाला. त्याचा फायदा दुसऱ्या मूर्तजाने घेतला आणि दक्षिणेचा सुभेदार खान जहान याच्या कडून बालाघाटचा काही भाग आणि मोगलांच्या ताब्यातील दक्षिणेतील काही प्रदेश आपल्या पदरात पाडून घेण्यात यश मिळविले.[१७] खान जहानच्या या विश्वास घातकी वर्तनामुळे अहमदनगर मधे बादशहाच्या ताब्यात फक्त अहमदनगरचा किल्लाच तेवढा राहिला. किल्ल्याचा किल्लेदार सिपाहदारखान याने मात्र किल्ल्याची शरणागती दिली नाही. जेव्हा शहाजहान सिंहासनावर आला तेव्हा त्याने दक्षिणेच्या सुभेदारीवरील खानजहानची नेमणूक कायम केली आणि गमावलेला मुलूख परत जिंकून

घेण्याची त्याला आज्ञा केली. परंतु खानजहानने वेळकाढूपणाचे धोरण स्विकारले. परिणामी त्याची नेमणूक रद्द करण्यात येऊन[१८] त्याच्या जागेवर खानजहान याचा मुलगा महाबत खान या अधिक हिकमतीच्या अधिकाऱ्याची नेमणूक करण्यात आली.

परंतु सुभेदारात जरी बदल झाला तरी त्यामुळे परिस्थितीत मात्र सुधारणा झाली नाही. दक्षिणेमधील लष्करी कारवाया आणि दोन्ही पक्षातील बोलणी ही पूर्वी प्रमाणेच रखडत चालू राहिली. त्या शिवाय मोगल आक्रमणाला प्रतिकार करण्यासाठी दुसऱ्या मूर्तजाला त्याच्या शेजारील सुलतानांकडून मदत मिळाली. अहमदनगरचे अस्तित्व हे विजापूर आणि गोवळकोंडा यांच्या दृष्टीने अत्यंत महत्वाचे होते. या दोन्ही राज्यामध्ये जरी परस्परांबद्दल मत्सराची भावना असली तरी देखील दोघांचा एकमेव शत्रू जे मोगल त्यांच्याविरुद्ध लढा देण्यासाठी अनेक वेळा ही दोन्ही राज्ये एकत्र आलेली आपल्याला दिसून येतात. परंतु अशा तऱ्हेने दोन्ही राज्यांत होणाऱ्या संगनमताचे स्वरूप अगदी तात्पुरते असे. पुष्कळदा अशा तऱ्हेचे संगनमत झाल्याबरोबर ते मोडले जाई. परस्परांविषयी संशय, धमकावण्या आणि मोगलांकडून देऊ केली जाणारी आकर्षक प्रलोभने यापैकी कोणतेही एक कारण या संग्नमतात सामील झालेल्या एका अथवा दोन्ही पक्षांना तिसऱ्यापासून फूटून निघण्यास उद्युक्त करण्यास आणि पूर्वीच्या आपल्या मित्रास एकाकी सोडून देण्यास पुरेसे होते. परंतु अखेर अखेर विजापूर आणि गोवळकोंडा या दोन्ही राज्यांनी आणि विशेषत: विजापूरने अहमदनगर राज्याची एकात्मता जरी नाही तरी त्या राज्याचे बाह्य स्वरूप टिकवून धरण्याचे कामी मदत केली. अशातऱ्हेने अहमदनगर राज्याला बाहेरून ही जी मदत मिळाली त्याचा परिणाम अहमदनगर राज्याचा अंतीम विनाश अधिक लांबणीवर पडण्यात झाला.

**खानजहानचे बंड**

खान जहान याचे जागी थोड्याच काळाने इरादत खान[१९] याची नेमणूक दक्षिणेच्या सुभेदारीवर झाली. काही कालावधीनंतर खान जहान याने दरबारातून पलायन केले आणि दुसऱ्या मूर्तजाकडे आश्रय घेतला. दौलताबाद येथे बंडखोराचे झालेले आगमन आणि तिथे त्याचे झालेले जोरदार स्वागत ही परिस्थिती शहाजहानला सहन होण्यासारखी नव्हती. मोगल साम्राज्याचे

स्वत्व आता दोन गोष्टींमुळे पणाला लागले होते. या दोन गोष्टी म्हणजे निजामशहाने चोरटे पणाने बलाघाटचा ताबा घेतला होता आणि आता त्याने खानजहानची बाजू घेऊन बादशाही सत्तेला उघड उघड आव्हान दिलेले होते. अहमदनगरचे अस्तित्व आता मोगलांना सहन होण्यासारखे नव्हते.

**अहमदनगर राज्याचे क्षेत्र, शहाजहानचे बेत**

या सुमारास अहमदनगर राज्यांत औरंगाबादचा संपूर्ण सुभा, जालना, नाशिक, बागलाण आणि बाणकोट पासून कल्याणपर्यंत कोकणांतील कल्याणचा जिल्हा इतक्या प्रदेशाचा समावेश होता. गनिमी काव्याच्या युद्धाचे तंत्र आत्मसात केलेल्या आणि या युद्ध पद्धतिचे ज्यांनी खास शिक्षण घेतले होते अशा दक्षिण्यांना अहमदनगरच्या तुटचाफुटचा प्रदेशाचे भौगोलिक विशेष हे अतिशय अनुरूप असे होते. मोगल सैन्यावर त्यांचे जे अचानक हल्ले होत ते मोगलाना स्वप्नवत वाटत असत. त्यांची चपळाई आणि चलाखी यामुळे बादशाही सेनापतींची मती गुंग होऊन जाई. आपल्या बाजूकडील ही प्रतिकुलता काढून टाकून शत्रूशी समतोल आणण्यासाठी शहाजहानने जी योजना आखली ती अशी : आपल्या निव्वळ संख्येने शत्रूला घेराव घालणे आणि एकाच वेळी शत्रूच्या मोक्याच्या जागांवर हल्ले चढविणे. त्याने एक मोठे सैन्य बालाघाटमध्ये घुसवून खानजहानवर कुरघोडी करण्यासाठी आजमखानाच्या (इरादतखान) हाताखाली रवाना केले; दुसरी एक सैन्याची तुकडी त्याने नाशिक आणि संगमनेर या शहरांची लुटालूट करून ती ताब्यात घेण्यासाठी ख्वाजा अबुलहसन याच्या हाताखाली रवाना केली; तिसऱ्या तुकडीची रवानगी त्याने पूर्वेकडे तेलंगणात नसीरी खानाच्या हाताखाली केली.[२०]

**मराठा अधिकाऱ्यांचा सन्मान**

मोगलांनी आपल्या लष्करी डावपेचांत आणखी एक महत्वाचा पवित्रा टाकला होता आणि तो म्हणजे मोगलांच्या चाकरीत पहिल्या पासून असलेल्या मराठा अधिकाऱ्यांचा सन्मान करणे हा होय. या मध्ये त्यांचा उद्देश इतर मराठा अधिकाऱ्याना निजामशहाची नोकरी सोडून येण्यासाठी प्रलोभन दाखवून प्रवृत्त करणे आणि अशातऱ्हेने निजामशहाच्या सेनादलाला संख्येच्या दृष्टीने कमकुवत करणे हा होता. ह्या पवित्र्यानुसार शहाजहान दक्षिणेत आल्याबरोबर खेळोजी, मालोजी आणि उदाजीराम दखनी याना शहाजहानच्या भेटीला नेण्यांत आले. त्याने त्याना पदव्या देऊन आणि

त्यांच्या हुकमतीत वाढ[२१] करून त्यांचा मानसन्मान केला. त्यानंतर त्या उलटया काळजाच्या जाधवरावाचे भाईबंध दरबरात हजर झाले आणि त्यांचाही सन्मान करण्यांत आला.[२२] मोगलांच्या पक्षाकडे आलेल्या मुसलमान अधिकाऱ्यांपैकी ज्यांचा उल्लेख करणे आवश्य आहे ते म्हणजे आतिशखान, याकुतखान आणि खुदावंदखान हे होत.

**धारुरचा पाडाव**

आजमखानाने आपल्या मोहीमेची सुरवात निजामशाही सैन्याचा दणदणीत पराभव करून केली. त्याने खानजहान याची अहमदनगर मधून हकालपट्टी केली आणि बालाघाट ओलांडून जाणाऱ्या रस्त्यावरील लष्करी दृष्टया अतिशय महत्वाच्या असलेल्या धारूर या ठिकाणाला वेढा दिला. किल्ल्याच्या तटबंदीला असलेल्या झरोक्यांतून गोळीबार करून मोगल सैन्याने धारूरच्या शिबंदीमधील गोलंदाजांना ठार मारले आणि त्यांची संख्या कमी केली. किल्ल्याच्या तटावरून अचानकपणे एक तोफ खाली पडली. या घटनेमुळे किल्ल्याचे संरक्षण करणाऱ्या शिबंदीमधील शिपाई अधिकच नाउमेद झाले. तशामध्ये जेव्हा हल्ले खोरांपैकी कांहीजण शिडया आणि दोरखंडाचे फास यांच्या सहाय्याने तटबंदी चढून जाण्यात यशस्वी झाले तेव्हा किल्लेदार सिद्दी सलीम याचा धीर सुटला आणि त्याने किल्ल्याची शरणागती दिली.[२३]

**परेंडा शहराची लुटालूट**

या सुमारास आदिलशहाने आपला सेनानी रणदुल्लाखान याची नियुक्ति आपल्या राज्याच्या सरहद्दीवर देखभाल करण्यासाठी केली होती. धारूरचा पाडाव झाल्यानंतर त्याच्या बरोबर निरर्थक वाटाघाटी करण्यांत आजमखानाने काही काळ व्यर्थ घालविला.[२४] विजापूर मध्ये यावेळी राज्याची सर्व सूत्रे खवास खान याच्याकडे होती. निजामशहाबद्दल त्याचा दृष्टीकोन अनुकूल असल्याच्या अफवा कानावर आल्यामुळे आजमखानाला धास्ती वाटली आणि त्याने बादशहाकडे आपल्याला कुमक पाठविण्याबद्दल विनंती केली.[२५] यानंतर थोड्याच काळाने अनुक्रमे विजापूर आणि गोवळकोंडा येथून भेटी घेऊन येत असलेल्या शेख मुईन उद्दीन आणि शेख मुहीउद्दीन याना सुरक्षितपणे प्रवासाचा परवाना मिळवून देण्याबद्दलचे हुकूम आसफ खाना कडून त्याच्याकडे येऊन पोहोचले.[२६] दक्षिण्यांचे अवधान विचलीत करण्यासाठी आजम खानाने परेंड्यावर दबाव आणण्याचे

ठरविले. त्याने परेंडा शहर आणि शहराचे उपविभाग या मध्ये लुटालुट करण्यासाठी जयसिंग आणि मुल्तफतखान यांची रवानगी केली. बादशाही सैन्याच्या हाती खूप लूट पडली. त्यामध्ये सात हत्ती होते.[२७]

### अहमदनगर आणि विजापूर यांच्यामधील तह

परेंड्याची लूट आणि मोगल सैन्याचे अतिसानिध्य यामुळे मुकर्रबखान अस्वस्थ झाला. त्याने मदतीसाठी रणदुल्लाखानाकडे अतिशय कळकळीची विनंती केली. त्याने अहमदनगर राज्याची झालेली विपन्नावस्था त्याच्या नजरेस आणून त्याला कळविले की अहमदनगर राज्याचे अस्तित्व जवळ जवळ संपुष्टात आल्या सारखेच आहे. कारण सर्व देश मोगलांनी आपल्या ताब्यात घेतलेला आहे. नाशिक आणि संगमनेर या शहरांची लुटालूट करून अबुल हसन याने त्या शहरांचा ताबा घेतलेला आहे. आता मोगलांबरोबर मैत्रीचे नाते जोडलेल्या शहाजीचा जुन्नर, चाकण आणि पुणें यावर ताबा आहे; धारूरचा पाडाव झालेला आहे, कंधार पडण्याच्या अगदी बेतात आले आहे आणि दौलताबाद शहराच्या आवतीभोवती भयंकर दुष्काळाने थैमान घातलेले आहे. मुकर्रबखानाने पुढे असे लिहले की परेंडा शहर देखील ताब्यांत जाऊ देण्यात आले तर निजामशाही घराण्याचा विनाश पूर्ण झाल्यासारखा होईल. इतकें लिहून त्याने रणदुल्लाखानाला असे बजावले की असे झाले तर विजापूर जिंकून घेण्याचा मोगलांचा मार्ग मोकळा करून दिल्यासारखे होईल.[२८]

### परेंडा जिंकून घेण्याचा निष्फळ प्रयत्न

रणदुल्लाखान आणि मुकर्रबखान यांच्यामध्ये चाललेल्या पत्रव्यवहारासंबधी अहवाल आजमखानाकडे सारखे येत होते. दोन्ही राज्यामध्ये शांततेचा तह झाला आहे आणि खवासखानानें मुकर्रबखानाला मदत करण्याची रणदुल्लाखानाला आज्ञा दिली आहे या विषयी जेव्हा आजमखानाची खात्री पटली तेव्हा त्याने परेंडा जिंकून घेण्याचे ठरवले. कुमक येण्याची वाट न पाहता त्याने परेंड्याच्या वेढ्याला सुरवात केली. किल्ल्याला तीन बाजुनी वेढा देण्यांत आला आणि निरनिराळ्या अधिकाऱ्यांची वेढ्याचे कामावर नियुक्ति करण्यांत आली. घनघोर युध्दानंतर मोगलांनी खंदकाकडे जाणाऱ्या एका वाटेचा ताबा मिळवला. हा खंदक बुजविण्याचे काम बादशाही फौजांनी सुरू केले. विपन्नावस्थेत असलेल्या किल्ल्यावरील शिबंदीने मुकर्रबखानाकडे मदत पाठविण्याबद्दल विनंती केली. किल्ल्याला वेढा देऊन बसलेल्या मोगल सैन्यावर छापा घालण्या-

साठी मुकर्रबखानाने विठोजीची रवानगी केली, परंतु बादशाही फौजानी त्याचा हल्ला परतवून लावला.

दरम्यान मोगल छावणीतील अन्नधान्याचा पुरवठा कमी होऊ लागला. सहाजिकच दुरवर असलेल्या जिल्ह्यांत दाणावैरण आणणाऱ्या टोळ्यांची रवानगी करणे वेढा घालून बसलेल्या मोगल सैन्याला जरूर पडले. यामुळे अशा टोळ्यांना सतावण्याची मोठी संधी दक्षिणी सैनिकांना मिळाली. एका प्रसंगी मुल्तफतखान आणि खुदावंदखान हे दोघेजण सर्पण आणि वैरण घेऊन परत येत असतांना मुकर्रबखान त्यांच्यावर तुटून पडला. परंतु ऐनवेळी आजमखान तेथे येऊन पोहोचल्यामुळे निर्माण झालेला धोका टळला. शत्रूचे प्रचंड नुकसान करण्यांत येऊन त्याचा हल्ला परतवून लावण्यांत आला. बादशाही फौजांनी सहाशे उंट, दोनशे घोडे आणि अनेक बैल आपल्या ताब्यांत घेतले.

अशातऱ्हेच्या दुःसह परिस्थितीत वेढा चालू ठेवणे जवळजवळ अशक्य होते. मोगल दुष्काळी परिस्थितीच्या भयंकर कचाट्यांत सापडले होते आणि छावणीतून एक इंचभर देखील हालचाल करणे शत्रूने त्यांना अशक्य करून सोडले होते. विजापूरच्या सहकार्यामुळे निजामशाही फौजांची ताकद दुपटीने वाढलेली होती. यात भर म्हणून की काय अपेक्षीत असलेली कुमक वेळेवर येऊन पोहोचली नाही म्हणून आजमखानाला परेंड्याहून माघार घेणे भाग पडले. त्याने धारूरच्या दिशेने माघार घेतली. या माघारींत शत्रूने त्याचा सख्त पाठलाग केला. डोंगराळ प्रदेश आपल्या माघारीत ओलांडून जात असताना दोस्तांच्या फौजांनी त्याच्यावर एकाचवेळी पुढून आणि पाठीमागून हल्ला केला. फार मोठे कष्ट सहन केल्यानंतर तो आपल्या नियोजित स्थळी येऊन पोहोचला.

**कंधारचा पाडाव**

काहीकाळ धारूर येथे विश्रांती घेतल्यानंतर आजमखानाने आपली मोहीम पुन्हा उघडली. बहलोल नावाचा निजामशाही अधिकारी रणदुल्ला-खानापासून अलग होऊन पडला होता. त्याच्यावर त्याने आचानक हल्ला चढविला. त्याने नऊशे घोडे, दोनशे उंट आणि अनेक बैल पकडले. नंतर तो अंबा येथे परतला. याचवेळी दोस्तांच्या फौजांनी कंधारच्या बचावासाठी कूच केले. परंतु आजमखानाने त्यांचा मार्ग यशस्वीपणे रोखून धरला. इकडे कंधारचा वेढा नसीरीखानाने मोठ्या जोरदारपणें चालू ठेवला होता. त्याने

सरफराजखान या दक्षिणी अधिकाऱ्याने अचानकपणे केलेला हल्ला परतवून लावला. किल्ल्याच्या तटबंदीखाली सुरूंग भरण्याचे काम मोगलांनी चालू ठेवले एकवीस सुरूंगांवर काम सुरू करण्यांत आले होते. त्यापैकी सहांचे काम पूर्ण करण्यांत येऊन ते बत्ती देण्यासाठी तयार ठेवण्यांत आले. आजमखानाचे आगमन झाल्यानंतर त्यापैकी तीन सुरूंग उडविण्यात आले. त्यापैकी एक सुरूंग फुसका निघाला. परंतु दुसऱ्या दोन सुरूंगांनी बाहेरचे मातीकाम आणि अर्धा बुरूज उध्वस्त करून टाकला. किल्ल्यावरील शिबंदीने अग्निबाण, उखळी-तोफा, दगड आणि दारूगोळे यांचा भडीमार सतत चालू ठेवला. परंतु हल्ला करणाऱ्या मोगल शिपायांनी आपला दबाव कायम ठेवला. मध्यान्हीच्या वेळेपासून सूर्यास्तापर्यंत घनघोर रणकंदन माजले. परंतु किल्ल्याच्या भितीला पडलेल्या भगदाडातून आंत घुसणे अशक्य झाल्यामुळे मोगल हल्लेखोरांना माघार घेणे भाग पडले. रात्रीच्यावेळी मोगलांनी आपल्या मोर्चाचे चर पुढे खणत नेले आणि उरलेल्या तीन सुरूंगांना बत्ती देण्याची तयारी करण्यात आली. किल्ल्याचा पाडाव होण्याचा समय आता जवळ आला आहे याची जाणीव झाल्यामुळे किल्ल्यावरील शिबंदीने काही अटीवर शरणागती दिली. बादशाही फौजांनी ७ मे, १६३१ रोजी किल्ल्याचा ताबा घेतला.[१०]

## अहमदनगर राज्याच्या पश्चिम जिल्ह्यांतील बादशाही फौजांची हालचाल

अहमदनगरमधील मोगलांच्या हालचालीचा वृत्तांत पुरा करावयाचा म्हटल्यास ज्या दुसऱ्या दोन मोगल सेनानींना अनुक्रमे वऱ्हाड आणि नाशिक या भागात पाठविण्यात आलेले होते त्यांच्या हालचालींचा उल्लेख करणे आवश्य आहे. वजीर खानाने अतिशय झपाट्याने शत्रूला वऱ्हाड बाहेर हाकलून काढले आणि तो बुरहाणपुर येथे परतला. परंतु अबुल हसन याच्यावर सोपविण्यात आलेली कामगिरी इतक्या सहजासहजी पुरी होण्यासारखी नव्हती. बादशहाने दिलेल्या हुकमानुसार त्याने आपल्या दुय्यम अधिकाऱ्यांना गाळणा आणि पातोरा या महालांत लुटालूट करण्यासाठी रवाना केले. या आक्रमकांना विरोध करण्यासाठी दुसऱ्या मूर्तजाने महालदारखान आणि दादा पंडित यांची रवानगी केली. परंतु बादशाही फौजांनी त्यांचा पराभव करून संगमनेरपर्यंत त्यांचा पाठलाग केला. बादशहाच्या कारकिर्दीचे वर्ष संपतासंपता अबुलहसन याने नाशिक आणि संगमनेर यांचा ताबा घेतला. यावेळी शहाजी मोगलांना येऊन मिळालेला होता. त्याच्या ताब्यात नाशिक देण्याचा आणि नसीरीखानाच्या मदतीसाठी कूच करून जाण्याचा हुकूम त्याला देण्यांत आला.[११]

मोगलांकडून मोठ्या प्रमाणावर होणाऱ्या ह्या हालचालीमुळे देशाचा विध्वंस होत असताना निजामशाही दरबारांत राजक्रांती घडून आली आणि त्या दुर्दैवी राज्याच्या विनाशाचे जणू शिक्कामोर्तबच झाले. मुकर्रबखानाने अजूनपर्यंत मोगलांच्या चढाईस प्रतिकार चालू ठेवला होता. परंतु त्याच्या कामगिरीची दुसऱ्या मूर्तजाला फारशी आपरूपता वाटली नाही. त्याशिवाय आपला भाऊ फतेखान याची सुटका करण्याबद्दल मूर्तजाच्या बायकोने[32] त्याच्या पाठीशी अगदी लकडा लावला होता. त्याला सोडल्यास परिस्थितीमध्ये मनासारखा बदल घडून येईल असे तिचे म्हणणे होते. तिला खूष करण्यासाठी दुसऱ्या मूर्तजाने फतेखानाची सुटका केली आणि त्याची नेमणूक पुन्हा वकील आणि पेशवा म्हणून केली. परंतु फत्तेखानाच्या अधिकार ग्रहणामुळे मोगलांच्या विरूद्ध चाललेल्या हालचालीत नवा जोम निर्माण होण्याच्या ऐवजी त्या थंडावल्या आणि या उलट आपल्याला बाजूला सारून दुसऱ्याला अधिकार दिल्यामुळे मुकर्रबखानाची मनस्थिती संत्रस्त झाली आणि तो आजमखानाला भेटला. त्याच्या मध्यस्थीने तो बादशाही चाकरीत शिरला. त्याला रूस्तमखान ही पदवी देण्यांत आली.[33]

## दुसऱ्या मूर्तजाला कैद आणि त्याचा झालेला खून

दुसऱ्या मुर्तजाबद्दल फतेखानाच्या मनांत असलेली अविश्वासाची भावना अजून दूर झालेली नव्हती. त्याने दुसऱ्या मूर्तजाला सिंहासनावरून काढून तुरूंगामध्ये बंदीस्त करण्याच्या संधीचा ताबडतोब फायदा घेतला. नंतर त्याने शहाजहानला आपण तुमच्या बरोबर निष्ठा बाळगण्यास तयार आहोत असे कळविले. शहाजहानकडून त्याला दिलासा देणारे असे उत्तर आले आणि आपली निष्ठा खरोखरीची आहे याचा पुरावा म्हणून त्याने त्याच्या कैदेत असलेल्या दुसऱ्या मूर्तजाला ठार मारावे असे त्याला सांगण्यात आले. यावर फतेखानाने दुसऱ्या मूर्तजाला विषाने भरलेला पेला बळजबरीने प्यावयास लावला आणि त्याला आलेला मृत्यु नैसर्गिक कारणामुळे आलेला आहे असे जाहीर केले. मूर्तजाच्या जागी त्याने हुसेन नावाच्या एका दहा वर्षाच्या मुलास गादीवर बसविले[34].

आता शहाजहानने फतेखानाला निजामशहाचे[35] सर्व जवाहीर आणि हत्ती आपल्या स्वाधीन करण्याचा हुकूम केला. परंतु या हुकूमाची तामीली

करण्याचे फतेखानाने लांबणीवर टाकले. या कारणास्तव बादशहाने रूस्तम-खान आणि वजीरखान यांना दौलताबाद जिंकून घेण्याचा हुकूम दिला. यामुळे फतेखान भयभीत झाला आणि त्याने आपल्या वर्तणुकीबद्दल माफी मागण्यासाठी म्हणून अबुल फते याची रवानगी केली. यानंतर थोड्याच काळाने अबदुलरसूल हा दरबारांत दाखल झाला आणि त्याने बादशहाला तीस हत्ती, नऊ घोडे आणि आठ लक्ष रुपये किंमतीचे जवाहिर नजर केले[१६] फतेखानाने खुतब्याचे वाचन बादशहाच्या नावे केल्यावर आणि नाणी देखील त्याच्या नावें पाडल्यानंतर शहाजहानचे समाधान झाले आणि त्याने ६ मार्च १६३२ रोजीं बुरहाणपूर[१७] सोडलें.

शहाजहानच्या उत्तरेकडील प्रयाणाबरोबर अहमदनगर राज्य जिंकून घेण्याच्या मोगलांच्या उद्दिष्टातील पहिला टप्पा संपुष्टांत आला. परंतु आतापर्यंत झालेली कार्यनिष्पत्ति ही स्थायी स्वरूपाची होती असे मात्र म्हणता येणार नाही. खान-जहानचे बंड मोडण्यांत आले होते, बालाघाट परत मिळविण्यांत आला होता, आणि मोगलांचे वर्चस्व पुन्हा स्थापन करण्यात आले होते. या गोष्टी जरी खऱ्या असल्या तरी खरी शांतता अजून स्थापन झालेली नव्हती आणि असंतोषाच्या ठिणग्या अजून देखील धुमसत होत्या. जुन्नर आणि आजूबाजूचे जिल्हे ज्याच्या ताब्यांत आहेत असा शहाजी हा एक होता. त्याची प्रवृत्ती मोगलांना अनुकूल होती असे म्हणता येण्यासारखे नव्हते आणि त्याशिवाय खुद्द फतेखानाचा प्रामाणिकपणा हा संशयातित नव्हता. दौलताबादचा ताबा त्याच्याकडे ठेवणे ही मोगलांच्याकडून झालेली फार मोठी अशी चूक होती आणि सरतेशेवटी आपले हितसंबंध सुरक्षित ठेवण्याचे दृष्टीने अहमदनगर राज्यांचे पुनरुज्जीवन करण्यासाठीं विजापूरची अजून देखील अहमदनगरला मदत करण्याची तयारी होती.

**शहाजहानच्या परत येण्याची कारणे**

तथापि शहाजहानला परिस्थितीचे पूर्णपणे आकलन झालेले होते याबद्दल शंका घेण्याला कोणतीही जागा नव्हती. दक्षिणेच्या सुभ्याची सुभेदारी त्याने आसफखान याला देऊ केली. त्यात त्याचा उद्देश दक्षिणेमध्ये ज्याचे वजन आहे अशा माणसाची तेथे नियुक्ति करण्याचा होता. परंतु आसफखानाने त्याला देऊ करण्यात आलेल्या पदाचा अस्विकार केला[१८]. अशा परिस्थितीत शहाजहानने महाबतखान या कसलेल्या शिपाईगड्याची मोगल सैन्याच्या सेनापति पदांवर आणि त्याचप्रमाणे दक्षिणेचा सुभेदार म्हणून निवड केली. शहाजहानने

उत्तरेकडे जाण्याचा जो निर्णय घेतला त्याला मुख्यत: दोन गोष्टी कारणीभूत झाल्या. एक म्हणजे दक्षिणेमध्ये दुष्काळाने घातलेल्या भयंकर थैमानामुळे त्याच्या साधन सामुग्रीत झालेली घट आणि त्याच्या सैनिकांना सोसावी लागलेली गैरसोय आणि दुसरी म्हणजे त्याला तीव्र दु:खाच्या खाईत लोटणारी घटना त्याची प्रियपत्नी मुमताज महाल हिचा मृत्यू ही होय.[३९] त्याला दक्षिणेबद्दल अतिशय तिटकारा आला आणि तेथे वास्तव्य करण्याची त्याला इच्छाच होईना. शहाजहान कोणतीही गोष्ट क्वचितच अर्धवट ठेवीत असे. परंतु ह्या प्रसंगी मनुष्यमात्राच्या अंगी असलेल्या मनोदौर्बल्याने त्याच्यावर मात केली.

**गाळण्याची शरणागति**

महाबत खान दक्षिणेमध्ये येईपर्यंत त्याचा मुलगा खान जमान याला बापाचे जागी काम करण्याचा हुकूम देण्यात आला. आपल्याकडे सोपविलेल्या अधिकाराबाबत खानजमान याने अतिशय चोख अशी दक्षता घेतली. बादशहा उत्तरेकडे गेल्यावर खानजमान याच्या नजरेस आणण्यात आले की गाळण्याचा किल्लेदार महमूदखान याने फत्तेखाना बरोबरील आपल्या निष्ठेचा त्याग केलेला आहे आणि आता मोगलांबरोबर ज्याने उघडउघड शत्रुत्व पुकारले आहे अशा शहाजीकडे गाळण्याचा किल्ला सुपूर्द करण्याचा त्याचा विचार आहे. यावर अलंग किल्ल्याचा मोगल किल्लेदार मीर कासीम हरवी याला खानजमान याने सांगितले की "तू गाळण्याचा किल्ला बादशाही फौजांच्या स्वाधीन करण्याबाबत महमूदखान याला प्रवृत्त कर. मीर कासीम याने महमूदखानाला अनेक अभिवचनांची प्रलोभने देऊ केली. यावर महमूदखानाने शहाजीच्या वकिलांना हाकलून दिले आणि आपले दोन मुलगे मुजफर आणि मनसूर याना आपला वकील काजी अबुलफझल याच्याबरोबर खानजमान याच्याकडे रवाना केले. खानजमान याने त्यांचे सन्मानपूर्वक स्वागत केले आणि त्याना मनसब देण्यांत यावी अशी त्याने दरबाराकडे शिफारस केली. शहाजहानने महमूदखानाची चार हजार जात आणि चार हजार स्वार या अधिकारावर नेमणूक केली. यानंतर खानजमानच्या सैनिकांनी गाळण्याचा किल्ला आपल्या ताब्यांत घेतला.[४०]

दक्षिणेत आल्यावर महाबतखानाला अतिशय गुंतागुंतीच्या अशा परिस्थितिशी तोंड द्यावे लागले. जेव्हा शहाजी शहाजहानला शरण आला तेव्हा फतेखानाच्या खाजगी मालमत्तेपैकी काही महाल त्याच्याकडे नेमून देण्यात आले होते.

परंतु जेव्हा फतेखानाने मोगलांकडे आपली शरणागती दिली तेव्हा त्याचा जमिनजुमला त्याच्याकडे पुन्हा लावून देण्यात आला.[४१] या नविन तजवीजीचा शहाजीला संताप आला आणि मोगल व फतेखान या दोघांविरूद्ध त्याच्या भावना दुखावल्या गेल्या. फतेखानाविरूद्ध प्रजेमध्ये जी असंतोषाची भावना होती. त्याचा फायदा घेऊन शहाजीने आदिलशहाच्या दरबारांतील एक वजनदार वजीर मुरारी पंडित याच्याबरोबर पत्र व्यवहार सुरू केला. त्याच्या मध्यस्थीने त्याने दौलताबादचा पाडाव करण्यासाठी मोठे सैन्य रवाना करण्यास आदिलशहाला उद्युक्त केले.[४२] शहाजी आणि आदिलशहा यांचे संयुक्त प्रयत्न आणि त्यांत भर म्हणून त्याच्या स्वतःच्या अधिकाऱ्यांमधील असंतोष यामुळे फतेखानाची घबराट उडाली. शत्रूच्या कचाट्यातून आपली आणि दौलताबादची सुटका करण्यासाठी त्याने महाबतखानाकडे याचना केली. महाबत खानाने ताबडतोब मदतीसाठी आलेल्या या हाकेला साद दिली आणि आपला मुलगा खानजमान याला फतेखानाच्या मदतीसाठी रवाना केले.

बादशाही फौजांची आगेकूच आणि त्यांना प्रतिबंध करण्यांत आलेले अपयश यामुळे आदिलशाही सेनापती रणदुल्लाखान याने फतेखानाबरोबर बोलणी सुरू केली. फतेखानाने आपला पक्ष बदलल्यास तीन लक्ष होन देण्याचे आणि किल्ल्याला भरपूर रसदीचा पुरवठा करण्याचे त्याने त्याला अभिवचन दिले. रणदुल्लाखानाने फतेखानाच्या मनावर असेही बिंबविण्याचा प्रयत्न केला की फतेखानाला मदत करण्याचे ऐवजी किल्ल्याचा ताबा स्वतःसाठी आपल्याकडे घेण्यास मोगल अधिक उत्सुक आहेत. फतेखानाचे मन वळविण्याच्या या प्रयत्नात रणदुल्लाखानाला यश प्राप्त झाले आणि फतेखान मोगलांपासून फुटून निघाला. फतेखानाची विश्वासघातांची ही वागणूक जेव्हा महाबतखानाच्या नजरेस आणून देण्यात आली तेव्हां त्याने रणदुल्लाखान आणि फत्तेखान यांच्या मधील पत्र व्यवहार मधल्यामध्ये अडकविण्याचा, निजामपूर येथे तळ देऊन असलेल्या शत्रूची पांगापांग करण्याचा आणि दौलताबादचा वेढा सुरू करण्याचा हुकूम खानजमान याला दिला.

दरम्यान आपल्या मुलाचा पाठपुरावा करण्यासाठी म्हणून महाबतखानाने फार मोठ्या प्रमाणावर आपली तयारी केली. त्याच्या अगोदर बालाघाटमध्ये आलेल्या अधिकाऱ्यांना जे अपयश आले होते त्यापासून त्याने धडा घेतला आणि त्याने जे पहिले पाऊल टाकले ते म्हणजे आपल्याला रसदीचा

पुरवठा होईल याची घेतलेली खबरदारी हे होय. ही गोष्ट सुलभ व्हावी म्हणून त्याने उत्तर हिंदुस्थानातील बंजारा जमातीच्या लोकांना हत्ती, घोडे आणि मानाचा पोशाख देऊन आपलेसे करून घेतले. त्यांच्या मदतीने त्या काळी धान्याची निर्यात करणारी दोन प्रमुख केंद्रे म्हणजे आग्रा आणि गुजरात यांजबरोबर त्याने अव्याहत असे दळणवळण जोडले.

आपल्या मनासारखी व्यवस्था पूर्ण झाल्यानंतर महाबतखानाने बुरहाणपूर सोडले आणि एक मार्च १६३३ रोजी तो दौलताबाद येथे दाखल झाला. किल्ल्याचा वेढा आता अधिक जोमाने जारीकरण्यात आला आणि मोक्याच्या ठिकाणी तोफांचे मोर्चे उभारण्यात आले. यामुळे घाबरून जाऊन फत्तेखानाने हुसेन निजामशहाला कालाकोट येथे हलविले, तो स्वतः महाकोट येथे राहिला आणि त्याने अंबरकोट व दौलताबाद किल्ल्याची इतर ठिकाणची तटबंदी यांची मजबूती केली. त्याच्या दक्षिणी अधिकाऱ्यांनी केलेला विश्वासघात आणि रणदुल्लाखान व शहाजी यांच्या हालचालीमुळे उडालेला गोंधळ याने डगमगून न जाता महाबतखानाने अंबरकोटवर निकराचा हल्ला करून त्याचा पाडाव केला. त्यानंतर त्याने महाकोटाविरुद्ध चाल केली.

मोगल सैन्याच्या हातून वारंवार पराभव झालेला असताना देखील रणदुल्लाखान आणि शहाजी यांनी किल्ल्यावरील शिबंदीला थोडीफार कुमक पोहोचविण्याचा एक आणखी निकराचा प्रयत्न केला. किल्ल्यावरील शिबंदीवर आता जवळजवळ उपासमारीची पाळी आलेली होती आणि त्याना मिळणारे अन्न म्हणजे मेलेल्या जनावरांची शिजवलेली कातडी हे होते. म्हणून रणदुल्लाखान आणि शहाजी यांनी किल्ल्याच्या दिशेने धान्यानी भरलेल्या तीन हजार गोणी घेऊन कूच केले. या धान्याची रवानगी त्यानी कर्नाटकी बंदुकचींच्या संरक्षणाखाली केली. धान्य घेऊन येणाऱ्या या रक्षकांवर हल्ला करून त्यांच्या बरोबर असलेली रसद पकडण्याचा हुकूम महाबतखानाने नसीरीखान याला दिला. या हल्लयाला प्रतिकार न करताच कर्नाटकी बंदुकचीनी पळ काढला आणि बादशाही फौजा धान्याचा सबंध साठा बरोबर घेऊन छावणीमध्ये परतल्या.

या सुमारास मुरारी पंडीत हा ताज्या दमाने सैन्य घेऊन विजापूरहून आला. त्याच्या आगमनामुळे रणदुल्लाखानाला उमेद आली आणि त्याने खडकी आणि दौलताबाद यांच्या दरम्यान धामधूम करण्यास सुरवात केली. त्याने मोगल सैन्याला हुलकावण्या देत तुकड्यातुकड्यांनी आपल्या मागावर

आणण्याचे आणि अशा गटागटांनी मागावर आलेल्या या तुकड्यांचा पराभव करण्याचे प्रयत्न केले. परंतु महाबतखानाच्या जागरूकतेमुळे बादशाही सैन्याचा रणदुल्लाखानाने टाकलेला या फासांतून बचाव झाला. दरम्यान महाकोट दरवाज्याच्या तटबंदीत सुरूंग भरण्याचे काम पुरे झाले आणि महाबतखानाने त्या सुरूंगाला बत्ती देण्याचे ठरविले. फतेखानाची यामुळे घाबरगुंडी उडाली आणि त्याने आपल्याला तहकुबी देण्यांत यावी अशी महाबतखानाकडे विनंती केली. परंतु महाबतखानाने फतेखानाला असे कळविले की तुमचा हेतु चांगला आहे हे दाखविण्यासाठी ओलीस म्हणून तुम्ही आपल्या मुलाला माझ्याकडे रवाना करावे. ह्या मागणीला मान्यता देण्यांत जेव्हां फतेखानाने चालढकल चालविली तेव्हा महाबतखानाने सुरूंग उडविण्याचा हुकूम दिला. या सुरूंगाच्या स्फोटामुळे एक बुरूज आणि पंधरा गज तटबंदी जमिनदोस्त झाली. तटबंदीला पडलेल्या या खिंडारांतून बादशाहीफौजांनी हल्ला चढविला आणि महाकोटचा बालेकिल्ला आपल्या ताब्यांत घेतला.

महाकोटचा पाडाव आणि किल्ल्यावरील शिबंदीला तिच्या हालअपेष्टां-तून दिलासा देण्यांत मुरारी पंडीत याला आलेले अपयश यामुळे फतेखान पूर्णपणे निराश झाला. त्यामध्येच रोगराईचा उद्रेक झाल्यामुळे मोगलांच्या हल्ल्याला आणखी कोणताही प्रतिकार करणे हे संभवतच नव्हते. म्हणून आपल्या हातून नुकतीच जी विश्वासघाताची वागणूक झालेली होती त्या बाबत क्षमा-याचना करण्यासाठी आणि किल्ला खाली करण्यासाठी एक आठवड्याची मुदत मागण्यासाठी फतेखानाने आपला मुलगा अबदुर्रसुल याला महाबतखा-नाकडे पाठविले. महाबतखानाने वरील विनंत्या मान्य केल्या इतकेच नव्हे तर किल्ला सोडून जाण्याचे कामी मदत म्हणून फतेखानाकडे पंधरा लक्ष रुपये पाठविण्याची व्यवस्था केली. त्या शिवाय महाबतखानाने फतेखानाच्या दिमती साठी हत्ती, उंट आणि इतर मालवाहू जनावरे रवाना केली. ठरल्या-प्रमाणे एका आठवड्यानंतर फतेखानाने किल्ला सोडला. १७ जून १६३३ रोजी बादशाही फौजांनी किल्ल्याचा ताबा घेतला.[४३]

यानंतर दौलताबादची व्यवस्था नसीरीखान, सय्यद मूर्तजा आणि इतर याजवर सोपवून महाबतखानाने जफरनगरकडे कूच केले. वाटेमध्ये त्याच्या फौजेच्या बगलेवर आदिलशाही फौजांनी घिरट्या घालून त्याला जेरीस आणले. जफरनगरच्या जवळ आल्यानंतर मुरारी पंडीताच्या वतीने तह

करण्यासाठी म्हणून फरहादखान हा महाबतखानाला भेटण्यासाठी आला. परंतु त्याची भेट घेऊन त्याचे बोलणे ऐकल्याशिवायच महाबतखानाने त्याची बोळवण केली.[४४] जफरनगर येथे त्याने आपल्या माणसाना काहीकाळ विश्रांती घेऊ दिली. दरम्यान दौलताबाद परत जिंकून घेण्याचा शत्रूने एक अखेरचा प्राणपणाने प्रयत्न केला. त्यानी असा विचार केला की नसीरीखान आणि त्याचे सैनिक आता दमलेले आहेत. त्याच प्रमाणे किल्ल्याच्या तटबंदीची मोड-तोड झालेली आहे. अशा परिस्थितीत त्यानी हल्ला केल्यास किल्ल्याचा सहजासहजी पाडाव होईल. परंतु नसीरीखान यावेळी त्याच्या कसोटीला पूर्ण-पणे उतरला आणि किल्ल्यामधून त्याने वारंवार शत्रूवर हल्ले चढवून त्याचे प्रचंड नुकसान केले. महाबत खानाने देखील जफरनगरहून कूच केले. त्यावर शत्रूने माघार घेतली.[४५]

**महाबतखानाची कार्यक्षमता**

दौलताबादवरील मोहीम आणि दौलताबादचा पाडाव या घटना म्हणजे मोगलानी अहमदनगर खालसा केले त्यातील दुसरी पायरी असे म्हणता येईल. यासाठी मोगलांनी केलेल्या हालचाली बराच काळ रेंगाळत्या. केव्हाकेव्हा मोगल सैन्यातील दक्षिणी अधिकाऱ्यांनी केलेल्या विश्वासघातकी वर्तनामुळे मोगलांची परिस्थिती अनेकदा मोठी बिकट झाली. परंतु महाबतखानाने दाखविलेली विलक्षण चिकाटी आणि त्याचा हिकमती स्वभाव यामुळे त्याने गंभीर संकटावर मात केली आणि प्रतिकूल परिस्थितीत असताना देखील विजय संपादन केले. या प्रसंगी त्याच्या अंगातील लष्करी कर्तृत्वाने कार्य-क्षमतेची मर्यादा गाठली. अतिशय चलाखी दाखवून त्याने धोक्याची ठिकाणे वेचून काढली, त्या ठिकाणांचा कडेकोट बंदोबस्त केला आणि शत्रूने योजलेले बेत अुधळून लावले. अनेक वेळा भयंकर संकटाविरुद्ध झगडण्याचा प्रसंग त्याच्यावर ओढावला परंतु परिस्थितीवरील आपला काबू त्याने कधीही सुटू दिला नाही. महाबत खानाने आपल्याबेतापासून ढळावे यासाठी मुरारी, रणदुल्लाखान आणि शहाजी यांनी आपल्या परीने होईल तितके शर्थीचे प्रयत्न केले. परंतु त्याने आपल्या समोर जे उद्दीष्ट ठेवले होते त्याला तो निग्रही पणाने घट्ट धरून राहिला. त्याला मिळालेले यश हे खरोखरच अद्वितीय समजले पाहिजे. कारण ते त्याने आपल्या स्वतःच्या प्रयत्नाने साध्य करून घेतलेले होते. दक्षिणेमध्ये इतका अलौकिक उत्साह यापूर्वी मोगल साम्राज्याच्या एकाही सेनापतीने दाखविला नव्हता.

एका आठवडयाच्या आतच दौलताबादचा पाडाव झाल्याची बातमी दरबारामध्ये कळविण्यात आली. ही बातमी ऐकून शहाजहानला अतिशय आनंद झाला. त्याने मानाचा एक पोशाख, रत्नजडीत तलवार, एक चांदीचा साज असलेला आणि एक सोन्याचा साज असलेला असे दोन घोडे, एक किनरवाबाची झूल असलेला हत्ती आणि एक हत्तीण या गोष्टी महाबतखानाकडे रवाना केल्या. एक मानाचा पोशाख, एक घोडा आणि एक हत्ती खानजमानकडे रवाना करण्यात आले; नसीरीखानाला खान दौरान असा किताब देण्यात येऊन त्याचा सन्मान करण्यात आला. इतर अधिकाऱ्यांना त्यांच्या गुणवत्तेप्रमाणे बढत्या आणि बक्षीशी देण्यात आली.

फतेखानाने पूर्वी केलेल्या विश्वासघातामुळे महाबतखानाला त्याच्या विषयी अविश्वास वाटत होता आणि म्हणून बुरहाणपूर येथे आल्यानंतर त्याने त्याच्यावर सख्त नजर ठेवली. त्या सुमारास इस्लामखान हा गुजराथेतून उत्तरेकडे जात होता. त्याच्या बरोबर फतेखानाला पाठविण्याची शहाजहानने महाबतखानाला आज्ञा केली. २१ सप्टेंबर १६३३ रोजी फतेखान आणि हुसेन निजामशहा हे आग्रा येथे येऊन पोहोचले. हुसेन निजामशहाला ग्वाल्हेरच्या किल्ल्यात कैद करून ठेवण्यासाठी सय्यदखानजहान याच्या स्वाधीन करण्यात आले. ग्वाल्हेर येथे निजामशाही घराण्यातील एक राजपुत्र बहादुर हा आपले दिवस मोजीत होता. अहमदनगरच्या पाडावानंतर त्याला कैद करण्यात आले होते. फतेखानाच्या बाबतीत त्याच्या गुन्ह्यांची त्याला क्षमा करण्यात आली, त्याच्या जहागिरी त्याच्याकडे परत सोपविण्यात आल्या आणि दरवर्षी दोन लक्ष रुपयांची नेमणूक त्याला करून देण्यात आली.[१]

दौलताबादचा मोगलांनी घेतलेला ताबा हा जरी मोगलांच्या दृष्टीने अद्वितीय असा विजय होता तरी अहमदनगरच्या पाडावाची निर्णायक पायरी मात्र त्यामुळे गाठली गेली असे म्हणता येणार नाही. त्यामळे मोगलानी नवीन जिंकलेल्या मुलुखांत ना शांतता आली किंवा सुव्यवस्था प्रस्थापित झाली. या उलट एखाद्या प्रदेशाचा लष्कराने ताबा घेतल्यावर अनुषंगाने जी संकट परंपरा त्या प्रदेशावर कोसळते त्या सर्वांचा अनुभव या नवीन जिंकलेल्या प्रदेशाला आला. त्या शिवाय सगळीकडे आपली उपस्थिती दाखविणाऱ्या आणि अतिशय चपळ अशा शत्रूच्या ताब्यांत या प्रदेशातील जमिनीचे लहान लहान तुकडे होते. पश्चिमेकडील जिल्हे विशेषतः जुन्नर, पुणे, चाकण आणि कोकण हे मोगल

अधिसत्तेच्या आवाक्या पलिकडचे होते, आणि याच प्रदेशांत मराठ्यांच्या भावी सत्तेच्या रोपांची मुहूर्तमेढ रोवली जात होती. दक्षिणेमध्ये उद्‌गीर आणि औसा ही ठिकाणे निजामशाही अधिकाऱ्यांच्या ताब्यांत होती, आणि ह्या ठिकाणांचा ताबा नवागतांच्या हाती देण्यांस ते बिलकूल राजी नव्हते. परंतु सर्व कटकटींचा केंद्रबिंदु एकेकाळी निजामशहाकडे असलेले परंतु आता आदिलशाही अधिकाऱ्यांना हाती असलेले परेंडा हे ठिकाण होते.[४७]

### शहाजीच्या हालचाली

परेंडा जिंकून घेण्याचा महाबतखानाने आणखी एक निकराचा प्रयत्न केला परंतु त्यात त्याला अपयश आले आणि भग्नहृदयी होऊन तो मरण पावला. यावर शहाजीने निजामशाही घराण्याचे पुनरूज्जीवन करण्यासाठी म्हणून आपल्या हालचाली परत सुरू केल्या. त्याला एका गोष्टीचा विशेष फायदा मिळाला आणि ती म्हणजे लष्करी दृष्टया बादशाही बाजूचा दुबळेपणा ही होय. राजपुत्र शुजा हा अगोदरच निघून गेलेला होता आणि खान दौरान हा माळव्याकडे परतला होता. दक्षिण्यांना काबूत ठेवणारा आणि त्यांच्या मनांत भिती निर्माण करील असा एकदेखील कार्यक्षम सेनानी दक्षिणेत नव्हता. मूर्तजाखान[४८] हा दौलताबादचा सुभेदार आणि अलावर्दीखान[४९] हा पायीन घाटचा सुभेदार होता. जरीं दोघाचीही वैयक्तिक शौर्याबद्दल ख्याती होती तरी दोघांपैकी कोणाचीही कसलेला सेनापती म्हणून गणना करता आली नसती. दुय्यम अधिकारांच्या जागांमध्ये त्यांनी विशेष उल्लेखनीय कामगिरी बजावली होती, परंतु पदसिद्ध सेनापती म्हणून कधीच नव्हे. त्यांच्या बरोबर तुलना करता शहाजी त्यांच्यापेक्षा अधिक हिकमती, नव्हे थोडा अधिक धाडसी होता. त्याशिवाय तो दक्षिणी होता आणि त्यामुळे त्याच्या देशबांधवांच्या सहिष्णुततेला तो यशस्वीपणे आवाहन करू शकत होता. याउलट दक्षिण्यांच्या दृष्टीकोनातून मोगल हे परके आणि आगंतुक होते.

शहाजीचा प्रधान हेतु दौलताबाद परत जिंकून घेण्याचा होता. म्हणून त्याने आजुबाजुचे महाल आपल्या ताब्यांत घेतले आणि नामधारी निजामशहाच्या तर्फे महसूल गोळा करण्यास सुरवात केली. किल्ल्याचे संरक्षण करण्याची आणि त्याचप्रमाणे शत्रूला किल्ल्याबाहेरून हुसकावून लावण्याची मूर्तजाखानाची परिस्थिती नव्हती. परंतु खान दौरान याला दक्षिणेत निर्माण झालेल्या आणीबाणीच्या परिस्थितीची बातमी लागतांच त्याने बुरहाणपूरकडे कूच केले. या शहराचा

ताबा त्याने माधोसिंग आणि मीर फतुल्ला यांजकडे सोपविला आणि त्याने दौलताबादकडे झपाट्याने कूच केले. तेथे तो २७ जानेवारी १६३५ रोजी येऊन पोहोचला. येथे त्याला बातमी कळली की शत्रूने रामदूदकडे माघार घेतलेली आहे. म्हणून दौलताबाद येथे विश्रांतिसाठी त्याने एक दिवस मुक्काम केला.

दुसऱ्या दिवशी त्याने शहाजीच्या माणसांच्या पाठलागाला सुरवात केली आणि त्यांना शिवगांव येथे गाठले. परंतु शहाजीची माणसे पांगली आणि त्यांनी पलायन केले. खानदौरान याने त्यांचा जारीने पाठलाग केला आणि त्यांची छावणी ताब्यांत घेतली. नंतर त्याने पाथ्रीकडे कूच केले आणि तेथून तो अहमदनगरकडे गेला. किल्ल्यावर त्याने दाणागोटा आणि वैरण यांची भरपूर पुरवठा करून तरतूद केली. काहीं कालावधीनंतर खानजमान याचे बालाघाटमध्ये आगमन झाल्याची आणि दौलताबादच्या दिशेने त्याच्या झालेल्या प्रगतीची बातमी त्याच्या कानावर घालण्यांत आली. जेव्हा त्याला त्याची नेमणूक पायीनघाटचा सुभेदार म्हणून झाल्याचे हुकूम मिळाले तेव्हां त्याने अहमदनगर सोडले आणि तो बुरहाणपूर येथे गेला[५].

परंतु अजूनतरी शहाजीचे सर्व अुपाय थकले नव्हते. त्याने पूर्वीइतक्याच धिटाईने मोगल प्रदेशांत नासधूस करण्याचे आपले काम चालूच ठेवले. या त्याच्या हालचालींत आदिलशहाकडून त्याला मदत आणि उत्तेजन मिळाले हे सांगण्याची काहीच गरज नाही. त्याशिवाय जुझारसिंग याचे बंड आणि बादशाही फौजांची बुंदेलखंडामध्ये रवानगी यामुळे शहाजीला मोकळे मैदान मिळाले. समकालीन बखरकारांनी त्याच्या हालचालींची तपशीलवार नोंद केलेली नाही. त्याने खूप धामधूम उडवून दिली, एवढेंच विधान ते करतात परंतु बादशहाचे लक्ष त्याच्या धामधुमीमुळे वेधून घेतले गेले आणि त्याला दक्षिणेकडे कूच करून जाणे भाग पडले. या गोष्टी दक्षिणेमधील परिस्थिती आणिबाणीची झाली होती आणि त्या परिस्थितीशी मुकाबला करणे हे खानजमानच्या ताकदीपलीकडचे होतें हे दर्शवितात.

२१ सप्टेंबर १६३५ रोजीं शहाजहान याने दोन उद्दिष्ट मनांत धरून आग्रा सोडले. त्यापैकी पहिले उद्दीष्ट बुंदेलखंडांत मोहीमेवर असणाऱ्या त्याच्या अधिकाऱ्यांमध्ये एकसूत्रता आणणे हे होते आणि दुसरे दौलताबादला भेट देऊन अहमदनगरच्या पाडावाचे काम पूर्ण करणे हे होते. नर्मदा नदीच्या किनाऱ्यावरील हिंदीया या ठिकाणाहून त्याने आदिलशहा आणि कुतुबशहा यांच्याकडे

आपले वकील रवाना केले. त्यांच्यातर्फे त्याने त्यांना कळविले कीं नवीन जिंकून घेतलेल्या प्रदेशांत मी शांतता प्रस्थापित करण्याचे प्रयत्न करीत आहे. त्या कामी तुम्ही सहकार्य न दिल्यास अथवा अडथळा करण्याचा प्रयत्न केल्यास त्याचे अतिशय भयानक असे परिणाम होतील. ४ जानेवारी १६३६ रोजीं याने नर्मदा नदी ओलांडली. बुरहाणपूर नजीक अलावर्दीखानाने सामोरे जाऊन त्याचे स्वागत केले. शहराच्या बाहेर शहाजहानने सौर वर्षाप्रमाणे आपला वाढदिवस साजरा केला आणि दौलताबादकडे कूच केले. दौलताबाद नजीक आल्यानंतर खानजमान त्याला सामोरा गेला. खानजमानने मुबारीजखान, राव छत्रसाल, पृथ्वीराज राठोड, राव हाथीसिंग, मालोजी भोसले, परसोजी आणि दानिशखान हबशी वगैरे दक्षिणी अधिकाऱ्यांची बादशहाला ओळख करून दिली.

### शहाजहानने आखलेल्या योजना

दौलताबाद येथे शहाजहानने आपल्या मोहिमेच्या योजना पक्क्या केल्या. एकंदर परिस्थितीची निकड लक्षांत घेऊन त्याने आपल्या सैन्याचे तीन विभाग केले. खान दौरान आणि राजा जयसिंग यांच्या हाता खाली १२ हजार सैनिकांची एक तुकडी विजापूर आणि गोवळकोंडा यांच्या संयुक्त सरहद्दीवर नजर ठेवण्यासाठी म्हणून याने कन्धार आणि नांदेडकडे रवाना केली. शत्रूकडून धोक्यात आलेल्या ठिकाणांना कुमक पोहोचविण्यासाठी आणि उद्‌गीर आणि औसा यांचा पाडाव करण्यासाठी कूच करून जाण्याच्या तयारीत राहण्याचा आणखी हुकूम या तुकडीला देण्यात आला. दुसऱ्या तुकडीची रवानगी खानजमान याच्या हाताखाली करण्यांत आली. या तुकडीला अहमदनगरवर चाल करून जाण्याचा, चांभार गोंदा आणि अष्टी हे शहाजीचे महाल कब्जांत घेण्याचा आणि आदिलशहाच्या मुलुखावर हल्ला करण्याबाबत पुढील हुकूमांची वाट पाहण्याचा हुकूम देण्यांत आला. शायस्ताखानाच्या हाताखाली असलेल्या तिसऱ्या तुकडीला शहाजीच्या सत्तेचे केंद्र असलेले जे जुन्नर ते जिंकून घेण्याचा आणि संगमनेर, नाशिक आणि त्रिंबक ही शहरे ताब्यात घेण्याचा हुकूम देण्यात आला.[५४]

### शहाजीची त्याच्या ताब्यातील ठिकाणावरून हकालपट्टी

त्या भागात असलेले अनेक किल्ले जिंकून घेण्यासाठी दोन हजार सैनिक बरोबर देऊन अलावर्दीखानाची शायस्ताखानाने उत्तरेच्या दिशेने रवानगी

करून आपली मोहीम उघडली. अलावर्दीखानानें चांदोर आपल्या ताब्यांत घेतले आणि हंबीरराव नावाच्या एका वजनदार मराठा सेनापतीला दोन हजार जात आणि एक हजार सवार या संख्येची मनसब आणि पन्नास हजार रुपये बक्षिसी देऊन आपल्या पक्षांकडे वळवून घेतले. त्यांच्यामदतीने अलावर्दीखानाने अनेक किल्ल्यांवरील शिबंदीला फूस लावून त्या किल्ल्यांचा पाडाव केला. या किल्ल्यांपैकी एका मध्ये निजामशाही कुटुंबातील काहीं मंडळींचे वास्तव्य होतें. या किल्ल्यांसमोर जेव्हां अलावर्दीखान येऊन उभा ठाकला तेव्हां त्यांनी पळून जाण्याचा प्रयत्न केला परंतु त्याना पकडण्यात आले.[११]

दरम्यान शायस्ताखानाने शहाजीच्या माणसांना संगमनेर मधून काढून लावले आणि त्या जिल्ह्यांतील रहिवाशांना शेती करण्याबद्दल उद्युक्त करून आणि संरक्षणाची हमी देऊन तेथे सुव्यवस्था प्रस्तापित केली. नंतर त्याने जुन्नरकडे कूच केले आणि शहाजीच्या माणसांकडून ते जिंकून घेण्यासाठी बाकरखानाची रवानगी केली. जुन्नर वरील दबाव कमी करण्यासाठी शत्रूने बाकरखानाला कोंकणच्या दिशेने हुलकावणी देत नेले परंतु त्यामुळे जुन्नर किल्ल्याच्या संरक्षण फळीत कच्चा दुवा निर्माण झाला. तेव्हां शायस्ताखान अहमदनगरमध्ये होता. त्याच्या कानावर जेव्हा ही गोष्ट आली तेव्हा त्याने जुन्नरचा पाडाव करण्यासाठी पाचशे सैनिकांची एक तुकडी रवाना केली. हा डाव यशस्वी झाला आणि बादशाही फौजांनी किल्ला जिंकून घेतला. परंतु या नंतर थोड्याच अवकाशांत शत्रूने बाकरखानाला हुलकावणी दिली आणि शत्रू सैनिक जुन्नर किल्ल्यासमोर आले. तेथून त्यांनी किल्ल्यावर असलेल्या शहाजीच्या कुटुंबीयांची सुटका करण्याचा प्रयत्न केला. यावेळी बादशाही फौजांवर फार मोठा दबाव पडलेला होता. परंतु शायस्ताखानाचे वेळीच आगमन झाल्यामुळे वेळ निभावून नेण्यांत बादशाही फौजा यशस्वी झाल्या. अशातऱ्हेने अहमदनगरच्या पश्चिमेकडील जिल्ह्यांत जरी मोगलांच्या परिस्थितीत बरीचशी सुधारणा झाली तरी ते पूर्णपणे संकट मुक्त झाले असे मात्र म्हणता येणार नाही.

## शहाजहानचे प्रयाण; औरंगजेबाची सुभेदारी

आदिलशहाकडून शरणागती मिळविल्यानंतर राजपुत्र औरंगजेब याची नियुक्ति दक्षिणेचा सुभेदार म्हणून करून शहाजहानने दौलताबाद सोडले.[५७] आपल्याला लक्ष देण्याइतक्या बऱ्याच गोष्टी दक्षिणेमध्ये आहेत असे राजपुत्राला

आढळून आले. शहाजीच्या हालचाली अजून मोगलांच्या आवाक्या पलीकडच्या होत्या आणि उद्गीर व औसा हे किल्ले शत्रुच्या हातात होते. विजापूर बरोबर तह झाल्यानंतर खान दौरान याने या किल्ल्यांचा ताबा शांततेच्या उपायांनी मिळविण्यासाठी म्हणून प्रयत्न केला. त्यात अपयश आल्यामुळे त्याने उद्गीर कडे चाल केली आणि १७ ऑगस्ट १६३६ रोजी किल्ल्याला वेढा दिला. त्याने किल्ल्याच्या तटबंदीखाली सुरुंग पेरले आणि त्यापैकी एकाला त्याने बत्ती दिली. त्यामुळे तटबंदीला जरी खिंडार पडले तरी आत घुसण्याच्या दृष्टीने त्याचा उपयोग नव्हता. इतर सुरूंग उडविण्याला तो उत्सुक नव्हता. कारण त्याला असे वाटले की मोगलांनी एकदम केलेल्या हल्ल्यांत किल्ल्यामध्ये असलेल्या दुसऱ्या इब्राहीम आदिलशहाच्या नातवाला त्यामुळे धोका पोहोचेल. याकारणास्तव त्याने किल्ल्यातील शिबंदीच्या एका प्रतिनिधीला बोलावून घेतले आणि त्याला आपली सर्व तयारी दाखविली. हा प्रतिनिधी किल्ल्यांत परत गेल्यावर त्याने किल्लेदाराला किल्ल्याच्या तटबंदीच्या झालेल्या भयानक अवस्थेबाबत सांगितले. यावर किल्लेदाराने शरणागती दिली. याच तंत्राचा उपयोग औसा येथे करण्यात आला. किल्ल्याचा किल्लेदार भोजराज याची हिंमत खचली आणि त्याने किल्ल्याची शरणागती दिली."[८]

**शहाजीचा बंदोबस्त**

शहाजीबाबत त्याचा बंदोबस्त करण्यासाठी राजपुत्र औरंगजेबाने खानजहान याची नेमणूक केली. शहाजीने बादशाही फौजांपासून जुन्नर, चाकण आणि पुणे ही ठिकाणे जिंकून घेतली होती आणि त्याच्या ताब्यातील असलेल्या प्रदेशांत त्याचे सामर्थ्य पहिल्यापेक्षाही अधिक होते. खानजहान याने जुन्नरकडे कूच केले आणि किल्ल्याला वेढा देण्यासाठी तेथे त्याने सैन्याची एक तुकडी ठेवली आणि तो स्वतः पुण्यामधून शहाजीला हुसकावून लावण्यासाठी कुच करून निघाला. खानजमान बरोबर सहकार्य करण्याची आदिलशहाने रणदुल्लाखान याला आज्ञा केली. "उत्तरेकडून आणि दक्षिणेकडून हल्ला होत असताना शहाजीने मोठ्या कौशल्याने सह्याद्री मधून कोकणांत माघार घेतली. तेथून त्याने पुन्हा पलट खाल्ली आणि त्याच घाटातून माघार घेत घेत तो पुन्हा देशावर येऊन पोहोचला. इकडे त्याचा पाठलाग करणारे सैन्य सह्याद्रीच्या पश्चिमेकडे अजूनही त्याला शोधितच राहिले." अखेर खानजमान याने शहाजीच्या हालचालींचा माग घेतला. शहाजीचा त्याने एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणाकडे पाठलाग केला. सरतेशेवटी शहाजीने माहुलीच्या किल्ल्याचा आश्रय घेतला.

मोगल आणि आदिलशाही यांच्या संयुक्त सैन्याने माहुलीच्या किल्ल्याला वेढा घातला. किल्ल्यावरील शिबंदीची संख्या फक्त दोनशे एवढी होती आणि हल्लेखोरांचा प्रतिकार करणे म्हणजे मूर्खपणा करण्यासारखे होते. तरी देखिल शहाजीने शत्रूला फसविण्याचे प्रयत्न केले. परंतु त्यात अपयश आल्यामुळे त्याने तहाची याचना केली. नामधारी निजामशहा आणि त्याच्या माणसांच्या अजून ताब्यात असलेले अहमदनगरमधील सहा किल्ले यांची शरणगती देण्याबद्दल त्याला सांगण्यांत आले. या अटींना त्याने मान्यता दिली. नंतर त्याला आदिलशहाच्या नोकरीत शिरण्याची परवानगी देण्यांत आली. आदिलशहाने त्याला पुणें आणि सूपा जहागिरीदाखल लावून दिले."[१९]

"अशातऱ्हेने चाळीस वर्षे चाललेल्या लढयानंतर दक्षिणेमधील एकंदर परिस्थितिमध्ये स्थिरतेचे वातावरण निर्माण झाले. बादशाही सत्ता तेथे निर्विवाद प्रस्थापित झाली आणि त्या सत्तेला आता कोणीही आव्हान देऊ शकत नव्हता. त्याच्या राज्याच्या सीमा निश्चितपणे आखल्या गेल्या आणि दक्षिणेकडील राज्यांवर त्याचे सार्वभौमत्व अधिकृत पणे स्थापन केले गेले. जरी औरंगजेबाच्या आठ वर्षांच्या सुभेदारीत कोणत्याही तऱ्हेच्या विधायक सुधारणा झालेल्या आपल्याला दिसून येत नसल्या तरी देखिल त्याच्या कारकिर्दीत सर्वसाधारणपणे देशातील एकंदर परिस्थिती शांततेची गेली. या कारकिर्दीत दोन मोहीमा झाल्या. पहिली मोहीम गोंड राजांकडून खंडणी वसूल करण्यासाठी खान दौरान याच्या हाताखाली झाली आणि दुसरी बागलाण जिंकून घेण्यासाठी मालोजी आणि महमद ताहिर खुरासानी यांच्या हाताखाली झाली. परंतु या मोहीमांमुळे राज्यांतील अंतर्गत सुरक्षिततेला कोणलाही धोका पोहोचला नाही"[११]. आपल्या अधिकाराच्या जागेवर असताना औरंगजेबाने दोन वेळा आग्रचाला भेट दिली. एकदा दिलरस बानू बेगम हिच्याबरोबरील त्याच्या विवाहासाठी १६३७ मध्ये आणि दुसऱ्यांदा त्याचीबहीण जहान आरा ही अतिशय भाजल्यामुळे तिला पहाण्यांसाठी म्हणून १६४४ मध्ये.

**दक्षिणेमधिल सुधारणा**

दक्षिणेमधील औरंगजेबाच्या सुभेदारीच्या दुसऱ्या कालखंडात तेथे प्रजेला हितकारक अशा सुधारणा करण्यात आल्या. या प्रांतांची आर्थिक परिस्थिती अतिशय शोचनीय अशी होती. एका पाठोपाठ झपाटयाने झालेल्या सुभेदारांच्या बदल्या आणि त्यांच्या पैकी काहींनी जबरदस्तीने

केलेली वसुली यामुळे देशांतील परिस्थिती अशा तऱ्हेने विनाशाप्रत पोहोचली होती. "शेतीला कोठल्याही तऱ्हेचे उत्तेजन देण्यांत आलेले नव्हते, शेतकरी वर्गाची कोणतीही काळजी घेण्यांत आलेली नव्हती आणि नविन जमीनी मशागती खाली आणण्यांत आलेल्या नव्हत्या. तर या उलट मशागती खाली असलेली पुष्कळशी जमीन जंगलांखाली गेलेली होती, शेतकऱ्यांच्या संख्येत आणि साधन सामुग्रीत घट झालेली होती आणि जमिनीपासून येणारा महसूल कमी झाला होता." यापैकी काहीं संकटांतून देशाची मुक्तता करण्याची कामगिरी राजपुत्राचा कर्तबगार दिवाण मुर्शिद कुलीखान याच्यावर पडली. त्याने आपले सर्वस्व पणाला लावून या कामगिरीला वाहून घेतले.

त्याने तोडरमल याची पद्धती दक्षिणेला लागू केली. त्याने केलेली पहिली गोष्ट म्हणजे ओसाड पडलेली खेडी पुन्हा वसविणे आणि त्यामध्ये दैनंदिन जीवन पुन्हा प्रस्थापित करणे ही होय. "सगळीकडे त्याने जमिनीची मोजणी करण्यासाठी ज्याच्या जमिनींची आखणी व्यवस्थित झालेली आहे त्यांची नोंदणी तयार करण्यासाठी आणि लागवडी खाली आणता येण्याजोग्या जमिनींची नोंद खडकाळ जमिनी व पाण्याचे ओघ यापासून वेगळी करण्यासाठी म्हणून समंजस अमीन आणि प्रामाणिक मोजणीदार यांच्या नेमणूका केल्या. ज्या खेड्याला प्रमुख नव्हता त्या ठिकाणी त्याने नवीन प्रमुखांची नेमणूक केली. ही निवड करताना त्याने अशी काळजी घेतली की शेतीला उत्तेजन देण्याची ज्यांची तयारी आहे आणि जे शेतकरीवर्गाबद्दल सहानुभूतीने विचार करतील अशांचीच नेमणूक त्या जागेवर केली जाईल. किबहुना अशा प्रमुखांची निवड करताना त्यांच्या स्वभावाचा कल वरील गोष्टींकडे आहे किंवा नाही याचाही त्याने विचार केला. गुरेढोरे, बी-बियाणे आणि शेतीला उपयोगी पडणाऱ्या इतर वस्तू विकत घेण्यासाठी त्याने अतिशय गरीब अशा शेतकऱ्यांना सरकारी खजिन्यातून कर्जे दिली. या प्रमाणे देण्यांत येणाऱ्या कर्जाची वसूली सुगीच्या वेळी हप्त्याहप्त्याने करण्यांत येई.[१२] अशा तऱ्हेने नवीन प्रांतांमध्ये जी सुधारणा करण्यात आली त्यामुळे विजापूर आणि गोवळकोंडा मोगल साम्राज्याला जोडण्याचा मार्ग मोकळा केला गेला असे म्हणण्यास काहीच हरकत नाहीं.

# तळटीपा

## प्रकरण सहावे

(१) बुरहाण-इ-मासीर, पान १९; फरिश्ता, खंड २, पान ९६.

(२) फरिश्ता, खंड २, पान १०५.

(३) दक्षिणेमधील सुलतानांनी केलेल्या एकजूटी विरूद्ध हुमायूनकडे मदतीची विनंती करण्यासाठी म्हणून पहिल्या बुरहाण निजाम शहाने रास्ती-खान याची रवानगी केली.

(४) अकबर नामा, खंड ३, पान १०८; बदाऊनी, खंड २ (लोब), पान १७४.

(५) पहिल्या बुरहाणने बहादुरशहाच्या नावे खुत्व्याचे वाचन केले होते (फरिश्ता, खंड २, पान १०७).

(६) याबाबत अबुलफजल पुढील प्रमाणे उद्‌गार काढतो, "शहेनशहाचे तत्त्व सर्वसामान्य बाबींवर निकडीच्या बाबींना प्राधान्य देण्याचे होते. या तत्त्वानुसार दक्षिण जिंकून घेण्याचे काम त्याने पुढे ढकलले. पूर्वेकडील प्रान्त जिंकून घेण्यात आणि तेथिल बंडखोरांना वठणीवर आणण्यात त्याने आपली सर्व शक्ती पणास लावली (अकबरनामा, खंड ३, पान १०९).

(७) E. B. Havell, Aryan Rule in India, Chapter XX.

(८) बुरहाण-इ-मासीर, पान १०९.

(९) फरिश्ता, खंड २, पान १४४; फुतूहात-इ-आदिलशाही (पान १८३) आणि तजकिरत-उल-मुलूक (पान १३५ ब) या दोन्ही ग्रंथामधील वृत्तांताप्रमाणे बुरहाण पहिल्या प्रथम आश्रयासाठी विजापूर येथे गेला.

(१०) अकबरनामा, खंड ३, पाने ९०९ आणि ९८२.

(११) अकबरनामा, खंड ३, पाने १०४५-४८.

(१२) ही घटना म्हणजे 'सलीमचे बंड' ही होय.

(१३) मलिक अंबरच्या अभ्युदयासाठी पहा तजकिरत उल् मुलूक, पाने २३४–३८; फुतुहात-इ-आदिलशाही, पाने २६६ ब–७२

(१४) फुतूहात-इ-आदिलशाही, पान २९४ आणि पान ३२५

(१५) फुतूहात-इ-आदिलशाही, पान ३२५

(१६) फुतूहात-इ-आदिलशाही, पान ३२५; इकबालनामा, पान २८३.

(१७) इकबाल नामा, पान २८४.

(१८) लाहोरी, खंड १, पान १९९.

(१९) कजवीनी, पान १७५; लाहोरी, खंड १ पान २५७.

(२०) कजवीनी, पान १८९ ब; लाहोरी, खंड १, पाने २९३-९४.

(२१) लाहोरी, खंड १, पान २९३

(२२) कजवीनी, पान १९४ ब; लाहोरी खंड १, पान ३१०.

(२३) कजवीनी, पाने २०९ब-२११; लाहोरी खंड १, पाने ३३९-४३.

(२४) आदिलशहाबद्दल आपल्या मनांत सदिच्छा आहे हे सिद्ध करण्यासाठी शहाजहानने धारूर आपल्या स्वाधिन करावे अशी मागणी रणदुल्लाखानाने केली. या बाबत झालेल्या वाटाघाटींच्या तपशीलवार माहिती साठी पहा कजवीनी, पाने २११ ब-१२; लाहोरी, खंड १, पाने ३४४-४६.

(२५) लाहोरी, खंड १, पान ३५६.

(२६) कजवीनी, पोन २१३ ब; आसफखानाकडून आलेल्या सुचनेनुसार आजमखानाने या बाबतीत पाऊल टाकले असे विधान लाहोरी करीत नाही (लाहोरी, खंड१, पान ३५६).

(२७) कजवीनी, पान २१४.

(२८) कजवीनी, पान २१४; लाहोरी, खंड १, पानें ३५७-५८.

(२९) कजवीनी, पाने २१४ ब–१५; लाहोरी, खंड १, पाने ३५८-६०,

(३०) कजवीनी, पान २१६ आणि पाने २२७–२२८ ब; लाहोरी, खंड १, पाने ३७४–७७.

(३१) कजवीनी, पान २२३; लाहोरी, खंड १, पान ३६७.

(३२) फुतूहात-इ-आदिलशाही, पान ३२५ ब.

(३३) कजविनी, पाने २२९–२९ बी; लाहोरी, खंड १, पाने ३७८–७९.

(३४) कजवीनी, पान २३८ ब, लाहोरी, खंड १, पान ४०२; फुतूहात-इ-आदिलशाही, पाने २२४ ब–२५ ब; हदिकत-उस्-सलातीन, पाने २४३ ब–२४४; तबातबाई, पान ४ ब.

(३५) लाहोरी, खंड १, पान ४०२; कजवीनी, पान २३९.

(३६) लाहोरी, खंड १, पाने ४०९–१०; कजवीनी, पान २४१; पाने २४४ब–४५.

(३७) लाहोरी, खंड१, पान ४०२; कजवीनी, पान २४७; हदीकत-उस-सलातीन, या ग्रंथातील हकीकती प्रमाणे फतेखानाने शरणागति दिल्यानंतर त्याला पंज हजारी म्हणजे पाच हजाराचा अधिकारी करण्यात आले. (पान २४९ आणि पान २५० ब).

(३८) कजवीनी (पान २४८). फुतूहात-इ-आदिलशाही या ग्रंथाचा कर्ता असे सांगतो की जेव्हा बादशहाने अलावर्दीखानाची रवानगी आसफखानाला बोलावून आणण्याकरीता आणि दक्षिणेच्या सुभेदार म्हणून त्याची नेमणूक झाल्याचे त्याला कळविण्याकरीता विजापूर येथे केली तेव्हा आसफखान हा निरोप घेऊन जाणाऱ्याजवळ खाजगी रित्या म्हणाला, की "मुलतान लाहोर येथील आणि इतकेच काय परंतु आता बादशहा ज्या जहागीरी मला नेमून देण्याचा विचार करीत आहे त्यावर पाणी सोडण्याची माझी तयारी आहे. परंतु दरबारापासून दूर रहाणे मला शक्य नाही." जेव्हा अलावर्दीखानाने ही गोष्ट शहाजहानचे कानावर घातली तेव्हां त्याने आपले हुकूम रद्द केले आणि महाबत खानाची त्याने दक्षिणेच्या सुभेदारीवर नेमणूक केली. (फुतूहात, पान ३२४) महाबत खानाची नेमणूक ही आजमखानाच्या नालायकीमुळे झाली असे विधान लाहोरी याने केले आहे (खंड १, पान ४२४).

(३९) लाहोरी, खंड १, पान ४२२; कजवीनी, पान २४७.

(४०) कजवीनी, पाने २५५-५६ ब; लाहोरी, खंड १, पाने ४४१-४४.

(४१) कजवीनी, पान २७८ ब; लाहोरी, खंड १, पान ४९७.

(४२) कजवीनी, पान २७८ब; लाहोरी, खंड १, पान ४७९.

(४३) कजवीनी, पानें २७९-९९; लाहोरी, खंड १, पाने ४९६-५३१.

(४४) लाहोरी, खंड १, पान ५३२; कजवीनी, पान २९८ब.

(४५) लाहोरी, खंड १, पान ५३२; कजवीनी, पान २९८ब.

(४६) कजवीनी, पाने २९९, ३०२ ब, लाहोरी, खंड १, पाने ५३३, ५४०.

(४७) लाहोरी, खंड १, भाग २ रा, पान ३३, कजवीनी, पान ३१९.

(४८) मासिर-उल्-उमरा, खंड ३, पाने २७९-८५.

(४९) मासिर-उल्-उमरा, खंड १, पाने २०७-१५.

(५०) कजवीनी, पाने ३३६-३७; लाहोरी, खंड १, भाग २, पानें ६८-७०.

(५१) लाहोरी, खंड १, भाग २, पाने १०४-५; कजवीनी, पाने ३४९ ब–५०.

(५२) लाहोरी, खंड १, भाग २, पान १३०.

(५३) लाहोरी, खंड १, भाग २, पाने १३५.

(५४) लाहोरी, खंड १, भाग २, पाने १३५-३६; कजवीनी, पाने ३६३ ब-३६४ ब.

(५५) लाहोरी, खंड १, भाग २, पाने १४६-४८; कजवीनी, पाने ३६८ ब- ७०.

(५६) लाहोरी, खंड १, भाग २, पाने १४९-५०, कजवीनी, पाने ३७० -७१ ब.

(५७) लाहोरी, खंड १, भाग २, पाने २०२, २०५; कजवीनी, पाने ३७०-७१ ब.

(५८) लाहोरी, खंड १, भाग २, पाने २१७-२१; कजवीनी, पाने ३९१-९२ब.

(५९) लाहोरी, खंड १, भाग २ पाने २२५-३०; कजवीनी, पाने ३९४ ब ३९७ब; Sarkar, History of Aurangzib, Vol. I, p. 48; Kincaid and Parasnis, History of the Maratha People, Vol. I pp. 117-21.

(६०) Sarkar, History of Aurangzib, Vol. I, p. 41

(६१) Sarkar, History of Aurangzib, Vol. I, pp. 49-54.

(६२) Sarkar, History of Aurangzib, Vol. I, pp. 191-94; मासिर–उल्-उमरा, खंड, ३, पाने ४९३-५००.

# प्रकरण सातवे

## विजापुर आणि गोवळकोंडा

**विजापुरच्या आदिलशाही बरोबर अकबराचे संबंध**

बहमनी साम्राज्याचे तुकडे झाल्यावर ज्या काही शाह्या अस्तित्वात आल्या त्यामध्ये विजापुरची आदिलशाही ही अतिशय बलाढ्य होती. अहमदनगरची निजामशाही ज्या सुमारास स्थापन झाली त्याच सुमारास युसुफ आदिलशहा याने आदिलशाहीची स्थापना केली. आदिलशाहीचे अस्तित्व सुमारे २०० वर्षे टिकले. विजापुरचा तिसरा सुलतान अली आदिलशहा याच्या कारकीर्दीत विजापुरचा मोगलांबरोबर संबंध आला. मोगलांचा वकील ख्वाजा अबदुल्ला हा दक्षिणेतुन १५७९ मध्ये परतल्याची अबुलफजल आपल्या ग्रंथात नोंद घेतो आणि असेही सांगतो, "जरी आदिलशहाने योग्य प्रकारे हुकुमांचे पालन करण्यांत कसुर केली तरी दक्षिणेतील इतर सुलतानांप्रमाणेच त्याने वकिलातीकडे धोरणी मुत्सद्दी आणि निवडक भेटी रवाना करण्यात कोणतेही अनमान केले नाही. अकबर बादशहा याने त्याच्याकडे हकीम गीलानी याला आदिलशहाचे हितपर अशा सल्ला मजकुराचे पत्र देऊन ख्वाजा अबदुल्ला बरोबर रवाना केले आणि या सल्ल्याप्रमाणे न वागल्यास त्याच्यावर मोगलांबरोबर युद्ध करण्याचा प्रसंग ओढवेल अशी ताकीद आदिलशहाला देण्याचा बादशहानी हकीम गीलानी याला आदेश दिला."[1] हकीम गीलानी हा विजापुरकडे गेल्यावर त्याला स्वतः अली आदिलशहा हा सामोरा गेला, आणि मोठ्या इतमामाने त्याने

त्याच्याबरोबर विजापुर शहरात प्रवेश केला. हकीम गीलानी नंतर विजापुरकडे आलेला मोगलांचा दुसरा वकील म्हणजे ऐनउलमुल्क शिराजी हा होय. याचाही तितक्याच इतमामाने आदर-सत्कार करण्यात आला.

हकीमअली याला आदिलशहाने त्याला योग्य अशा भेटी देऊन निरोप दिला. परंतु त्याचा सहकारी मात्र १५८१ पर्यंत म्हणजे ज्या वर्षी अली आदिलशहाचा खुन झाला[२] तो पर्यंत विजापुर येथेच होता.

### अकबर बादशहाचा मुलगा दानियाल याचा दुसऱ्या इब्राहीम आदिलशहाच्या मुलीबरोबर विवाह

अली आदिलशहाच्या मृत्यूनंतर दुसरा इब्राहीम आदिलशहा हा विजापुरच्या गादीवर आला. त्याची कारकीर्द बरीच मोठी म्हणजे एकंदर ४७ वर्षे झाली. या कारकीर्दीच्या उत्तरार्धात विजापुरचा मोगलांबरोबर अधिक घनिष्ट असा संबंध आला. याला कारण घडले ते म्हणजे या काळात मोगल साम्राज्याची दक्षिणेच्या बाजूने जी वाढ झाली हे होय. इ. स. १६०० मध्ये अकबर बादशहाने सरमदी[३] याला दुसऱ्या इब्राहीमच्या दरबारात पाठविले. यानंतर तीनच वर्षांनी राजपुत्र दानीयाल याचा विवाह[४] आदिलशहाच्या मुलीबरोबर झाला. मोगल सम्राटाबरोबर अशा तऱ्हेने संबध प्रस्थापित करून त्याच्या बरोबर आपली कीती मैत्री आहे हे दाखविण्याचा आदिलशहाने प्रयत्न केला तरी देखिल मोगलांबरोबर चाललेल्या लढ्यात मलीक अंबर[५] हा पळून विजापूरकडे आश्रयाला गेला असता त्याला सर्वतोपरी सहाय्य करण्याचा मोह दुसऱ्या इब्राहीम आदिलशहाला टाळता आला नाही. निजामशाही राजवटीची पुन्हा स्थापना करण्याचे अहमदनगरचा हबशी सरदार मलीक अंबर याचे जे अटीतटीचे प्रयत्न चालले होते त्या मध्ये इब्राहीम आदिलशहाने त्याची बाजू घेतली आणि त्याला प्रोत्साहन दिले, असे रास्तपणे गृहीत धरल्यास त्यामध्ये काहीच चूक होणार नाही. आदिलशहाने मलीक अंबरच्या संबंधात जे धोरण स्वीकारले ते निश्चितपणे मुत्सद्दीपणाचे होते यात काहीच शंका नाहीं.

### जहांगीर आणि दुसरा इब्राहीम आदिलशहा

जहांगीर बादशहाच्या कारकीर्दीत मोगल आणि आदिलशहा यांच्यामधील राजनैतिक संबंधांचे स्वरूप अतिशय आस्थिर असे होते. सुरवातीच्या काळात बादशाही आक्रमणाला पायबंद घालण्याचे मलीक अंबर याचे जे प्रयत्न चालले

होते त्यामधे आदिलशहाने सातत्याने मलीक अंबर बरोबर हातमिळवणी केली. साहाजिकच दक्षिणेच्या सुभेदारीवर नेमणूक झाल्यानंतर शहाजहान जेव्हा प्रथम दक्षिणेत आला तेव्हा त्याने प्रथम जी गोष्ट करण्याचे ठरविले ती म्हणजे दक्षिणेमधील सत्तांची युती मोडून काढणे ही होय. त्याने मलीक अंबर याला एकाकी पाडले आणि त्याला शरण आणले. परंतु दक्षिणेमधून तो परतल्यावर पुन्हा तेथील परिस्थिती मूळ पदावर आली. या गुंतागुंतीच्या परिस्थितीतून मार्ग काढण्याची जबाबदारी पुन्हा त्याच्यावरच पडली.

मलीक अंबर याचा अभ्युदय आणि अहमदनगर राज्याचे पुनरूज्जीवन यामुळे ताबडतोब होणाऱ्या मोगल आक्रमणापासून विजापुरची सुटका झाली. परंतु त्यामुळे अहमदनगर आणि विजापूर यांच्यामध्ये मैत्रीचे संबध निर्माण होण्यात कोणतीही चालना मिळाली नाही. जेव्हा शहाजहान याने आपल्या बापाविरूद्ध बंड केले तेव्हा दक्षिणेत त्याच्या पाठलागावर महाबतखान आणि राजपुत्र परवीज हे आले. त्यावेळी विजापुर आणि अहमदनगर ही दोन्ही राज्ये जवळ-जवळ युद्धाच्या तयारीने उभी ठाकली होती. त्याच प्रमाणे दोन्ही राज्ये मोगलांबरोबर मिळते जुळते घेण्यास उत्सुक होती. महाबतखानाचा मलीक अंबर याच्यावर विश्वास नसल्यामुळे त्याने दुसऱ्या इब्राहीमकडे स्नेहाची बोलणी लावली. परिणामी इब्राहीम आदिलशहाने मोगलांबरोबर आक्रमक आणि बचावात्मक अशा तऱ्हेचा तह केला.[६]

यानंतर काही काळाने शहाजहान याने बंगाल आणि बिहार मध्ये धामधूम केली. बंडखोराचा समाचार घण्यासाठी महाबतखान आणि राजपुत्र परवीज यांना उत्तरेकडे परतण्याचा हुकूम देण्यात आला. मलीक अंबरच्या दृष्टीने ही संधी होती. त्याने आदिलशाही राज्यावर आक्रमण केले, त्या राज्याच्या मुलूखात प्रवेश केला आणि बिदरची लूटालूट केली. तेथून त्याने झपाट्याने विजापुरकडे कूच केले, नौरसपुरची लूटालूट केली आणि किल्ल्याच्या वेढ्याला सुरवात केली. परतु विजापुरचा सरदार महमद लारी हा मोगल दख्खन मध्ये ५००० फौज घेऊन गेला होता, तो लगोलग आपले नवीन दोस्त जे मोगल त्यांना बरोबर घेऊन दाखल झाला. त्याने मलीक अंबर याला माघार घेण्यास भाग पाडले. यानंतर झालेल्या पाठलागात मलीक अंबर याने पलट खाल्ली, महमद लारी याचा पराभव करून त्याला ठार मारले, आणि विजापुरी सैन्याची पांगापाग केली.[७] मोगलांवर देखील अन्नधान्याच्या टंचाईमुळे जवळ-जवळ असाच

प्रसंग ओढवला. मलीक अंबर याने पुन्हा विजापुरवर आक्रमण केले, आणि सोलापुरवर हल्ला केला.[८] या सुमारास राजपुत्र परवीज आणि महाबतखान हे दक्षिणेत परतले होते, आणि म्हणुन मलीक अंबर याने विजापुरपासून माघार घेतली. जुन्नर येथे रहात असताना शहाजहान याने दुसऱ्या इब्राहीम बरोबर स्नेहपूर्ण पत्रव्यवहार चालू ठेवला. अधुनमधून दुसऱ्या इब्राहीमने शहाजहानकडे द्रव्य, अन्नधान्य आणि साधनसामुग्री यांची पाठवणी केली.[९] दुसरा इब्राहीम हा बुधवार, सप्टेंबर १२,१६२७ रोजी मरण पावला.

## दुसऱ्या इब्राहीमचा मृत्यु आनि महमदचे राज्यारोहण

त्याच्या मृत्युनंतर त्याच्या उमरावानी वारसाच्या प्रश्नासंबंधी चर्चा केली. अखेर राजमाता बडी साहिब हिच्या अनुमतीने महमद आदिलशहा याची सुलतान म्हणून द्वाही फिरविण्यात आली. शहाजहान आणि महमद कुतुबशहा यांच्याकडून अभिनंदनपर संदेश आले. शहाजहान याने अफजलखान याची आणि कुतुबशहाने शेख महमद ताहिर याची रवानगी केली.[१०] दुसऱ्या मुर्तजाने वकील पाठविण्याचे टाळले. त्याने पाळलेली मुग्धता ही अनिष्ट सुचक होती कारण त्याने जेव्हा आपल्या मुग्धतेला वाचा फोडली तेव्हा त्याचा उद्देश आदिलशाही सिंहासनावर हक्क सांगणारा प्रतिस्पर्धी उमेदवार राजपुत्र दरवीश महमद याला आपला पाठींबा देण्याचा होता. त्याने मोठ्या सैन्यासहित विजापुरवर आक्रमण केले आणि इखलासखानाच्या हाताखलील आदिलशाही सैन्याचा संपूर्ण पराभव केला.[११]

## आदिलशहा आणि दुसरा मूर्तजा यांच्यामध्ये प्रस्थापित झालेली शांतता

दोन सुलतानांमधील कलहाची बातमी जेव्हा शहाजहान याच्या कानावर गेली तेव्हा त्याने तह घडवून आणण्यासाठी शेख मुईन उद्दीन याला पाठविले. दोन्ही राज्यांच्या प्रतिनिधींची विजापुर येथे मुस्तफाखानाच्या वाड्यात भेट झाली. परंतु सोलापुरच्या प्रश्नावरून दोन्ही पक्षामधील वाटाघाटी कुंठीत झाल्या. कारण सोलापुरचा ताबा विरुद्ध बाजूकडे जाऊ देण्यास दोन्ही पक्षांची तयारी नव्हती. आदिलशाही प्रतिनिधी अबुल फतह हा चिडखोर स्वभावाचा होता. त्याने तिटकारा येऊन मसलतींचा त्याग केला आणि बैठक मोडली. अशा तऱ्हेने शेख मुईन उद्दीन याची वकिलात असफल झाली आणि अहमदनगर आणि विजापुर यामधील तणाव पूर्वीइतकाच कायम राहिला.[१२] परंतु आदिलशहाने बादशाही वकीलाचा त्याच्या इतमामाप्रमाणे आदरसत्कार केला आणि बादशहासाठी त्याच्याकडे मौल्यवान भेटी दिल्या.[१३]

### मुस्तफा खान : मोगलांचा एक पक्षपाती

दरम्यान खान जहान याच्या बंडामुळे शहाजहानला दक्षिणेत येणे भाग पडले. त्याने अहमदनगरमध्ये आपल्या सर्वंकष मोहिमेची सुरवात केली. मोगलांबाबतचा दृष्टीकोन काय असावा याबाबत विजापुरच्या दोन्ही बलाढ्य पुढाऱ्यांमध्ये मतभद होते. मुस्तफाखानाचा कल मोगलांकडे होता आणि तो निजामशहाचा कट्टर वैरी होता. याचे कारण त्याचा सासरा महमद लारी याला मलीक अंबर याने ठार मारले होते. म्हणून त्याने मोगलांच्या सहकार्याने अहमदनगरचा संपूर्ण नाश करावा अशी भूमिका मांडली. परंतु रणदुल्ला खान आणि इतर काही प्रतिष्ठीत अमीर यांचा या भूमिकेला विरोध होता. त्यानी मुस्तफाखानाच्या मताशी महमद आदिलशहा याने सहमत होऊ नये म्हणून त्याचे मन वळविण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यावेळेपुरते का होईना मुस्तफा खानाने आपल्या विरोधकांवर मात केली. सुलतानाने रणदुल्ला खानाला सरहद्दीकडे कूच करून बादशाही फौजानी मदत मागितल्यास त्याना मदत देण्याच्या तयारीत राहण्याचा हूकूम केला[१४]

### रणदुल्ला आणि आजमखान यांच्यामधील वाटाघाटी.

आजमखान याने धारूर जिंकून घेतल्यानंतर, निजामशाही राज्याचा जो मुलुख बादशहाने आदिलशहाकडे मुखत्यारी दाखल सोपविला होता तो जिंकून घण्यासाठी काय बेत आखावा याबद्दल चर्चा करावी म्हणून रणदुल्ला-खान आणि त्याचा बाप फरहादखान यानी आजमखानाची मुलाखत मागितली. त्यांच्या उद्देशाची प्रामाणिकता पडताळून पाहण्यासाठी आजमखानाने निजामशाही सैन्याच्या पाठलागात आपल्याला मदत करण्याबद्दल त्याना कळविले आणि तो धारूर येथे त्यांच्या येण्याची वाट पहात थांबला. त्याचप्रमाणे त्यांचे संशय दूर व्हावे म्हणून आजमखानाने आपल्या भेटीसाठी जेव्हा ते येईल तेव्हा त्यांना ५०० संरक्षक सैनिक आणण्याची परवानगी दिली. धारूर येथे ते आल्यावर आजम खानाने त्यांचे सन्मानपूर्वक स्वागत केले आणि त्यांना २४ घोडे आणि २४ मानाचे पोशाख भेटीदाखल दिले.[१५]

### रणदुल्ला खानाच्या मागण्यांना नकार

वरील औपचारिक भेटीनंतर झालेल्या बैठकीत, निजामशाही मुलुखातील पांच किल्ल्यांपैकी एक म्हणून धारूर आपल्या ताब्यात देण्याची

रणदुल्ला खानाने आजमखानाला विनंती केली. हा किल्ला आदिलशहाला देण्याचे बादशहाने वचन दिलेले होते. परंतु आजमखानाने या विनंतीचा अव्हेर केला. पहिले कारण त्याने असे दिले की निजामशहाबरोबर झालेल्या त्याच्या संघर्षात त्याच्या बरोबर सहकार्य करण्यात रणदुल्ला खान अपयशी ठरला. दुसरे कारण त्याने असे दिले की सद्य परिस्थितीत धारूरचा ताबा मोगलांच्याकडे असणे हे अतिशय महत्वाचे होते. परंतु शत्रुच्या विरूद्ध त्याच्या-कडून यापुढे होणाऱ्या कारवायात त्याच्या कडून सहकार्य मिळाल्यास त्याची विनंती दरबाराकडे पाठविण्याचे वचन आजमखानाने दिले.[१६] परंतु मोगलांना कसलीही मदत करण्याची रणदुल्ला खानाची इच्छा नव्हती आणि परिणामी बैठकीचा विचका झाला.

## रणदुल्ला खान आणि मुकर्रबखान यांच्यामधील तह

पुन्हा जेव्हा मुकर्रब खानाचा पाठलाग करीत आजमखान शहागड येथे आला तेव्हा त्याने शत्रुला बालाघाट पार करण्यास प्रतिबंध करण्याबद्दल रणदुल्ला खान याला सांगितले परंतु आपल्याजवळ सैन्याचा तुटवडा आहे या सबबीवर रणदुल्ला खानाने आपले अंग काढून घेतले, आणि असे उत्तर पाठविले की आपण तयारी करण्यासाठी नळदुर्गकडे जात आहोत आणि आपल्या सरकारकडून पुढील आदेश येईपर्यंत तेथे थांबून रहाणार आहोत.[१७]

दरम्यान मुकर्रबखान याच्याकडून त्याला भुरळ घालणारी अशी सांगी आली की मी मोगलांविरूद्ध मदत दिल्यास त्याबदली आपण सोलापूर तोडून देण्यास तयार आहोत.[१८] हे होईतोपर्यंत मुस्तफाखानाचे वजन कमी झाले होते आणि त्याच्यामध्ये व खवासखानामध्ये गैरसमज निर्माण झाले होते. रणदुल्ला-खानाला ही संधी होती. त्याने मुकर्रब खानाच्या अटी स्वीकारण्या-बद्दल खवास खानाचे मन वळविले. या बदललेल्या वातावरणाचा ताबडतोब परिणाम झाला. तो असा की विजापुरहून शेख मुईन उद्दीन हा भेटी घेऊन येत होता त्याला अटकाव करण्यात आला आणि बिदर येथे कैदेत टाकण्यात आले. खवासखानाने बादशाही वकीलाच्या सर्व चीजवस्तू हिरावून घेतल्या. पळून जाऊन त्याने अखेर आपला जीव वाचविला.[१९]

## रणदुल्लाखान बेसावध मोगलांवर अचानक छापा घालतो

फतेखानाच्या हाती सत्ता आल्यानंतर रणदुल्लाखानाने आजमखानाकडे तहाच्या योजनेसंबधी पुन्हा बोलणी सुरू केली. त्याने त्याला असे वचन दिले

की आपल्या धन्याच्या दुष्कृत्याबद्दल त्याला क्षमा करण्यात आली तर तो मोगलांविरुद्ध कधीही जाणार नाही आणि शेख मुईन उद्दीन याला बादशहा-साठी असलेल्या देणग्यासहित बिदर सोडण्यास परवानगी देईल[२०]. रणदुल्लाखान ग्वाही देऊन सांगत असल्याप्रमाणे वागण्याची त्याची तयारी आहे किंवा नाही हे पाहण्यासाठी आजमखानाने भालकीच्या दिशेने कूच केले आणि रणदुल्ला खानाचा वेगळाच काही उद्देश असल्याचे आढळून आल्यास भालकी लुटण्याचा त्याने बेत केला. परंतु आजम खान आपली छावणी मांजरा नदीच्या तीरावर ठोकत असतांना रणदुल्लाखानाने त्याच्यावर अचानक धाड घातली आणि बहादूर-खानाच्या हाताखाली असलेल्या एका तुकडीवर तो तुटून पडला. बहादूरखान हा जखमी होऊन कैद झाला. भालकीहून दोन मुक्कामांच्या अंतरावर घाईघाईने माघार घेणे आजमखानाला भाग पडले. पावसाळा घालविण्यासाठी आजमखान नांदेडच्या दिशेने परत फिरला.[२१] सारांश रणदुल्लाखानाबरोबर चाललेल्या वाटा-घाटी निष्फळ ठरल्या व मोगल आणि विजापुर यांच्या संबंधामधील तणाव तसाच राहिला.

### विजापुरवर स्वारी करण्याचा आसफखानाचा हुकूम

फतेखानाच्या शरणागतीनंतर शहाजहानला आदिलशहाकडे लक्ष देणे शक्य झाले. ३ डिसेंबर १६३१ रोजी त्याने विजापुरवर हल्ला करण्यासाठी जवळजवळ सर्व सैन्यानिशी आसफखानाची रवानगी केली. हे सैन्य नुकतेच अहमदनगरच्या मोहिमेत गुंतलेले होते. कंधारपासून भालकी पर्यंत मोगल सैन्याच्या प्रगतीत खंड पडला नाही. भालकी येथे तेथील शिबंदीने प्रतिकार केला तो सहजतया मोडून काढण्यात आला.[२२] कमलापूर येथे आसफखानाला आदिलशहाकडून आलेला रिजकुल्ला हा जासुद भेटला. त्याने आणलेल्या पत्रात आदिलशहाने आपल्या वर्तनाद्दल पश्चाताप प्रकट केला होता. क्षमेची विनंती केली होती आणि खंडणी देण्याचे वचन दिले होते. परंतु रिजकुल्ला हा आदिलशहाचा अधिकृत जासुद नसल्यामुळे आसफखानाने त्याच्या शिष्टाईला फारसे महत्व दिले नाही आणि त्याला तडकाफडकी निरोप दिला.[२३] विजापुरकडील कूच पुन्हा सुरू करण्यात आली. वाटेमध्ये बादशाही फौजानी गुलबर्गा शहर लुटले आणि तेथील रहिवाश्यांची कत्तल केली.[२४] भिमा नदीवर आसफखानाने आपल्या सैन्याची पाहणी केली तेव्हा सैन्याची संख्या तीस हजार एवढी होती.

### बादशाही फौजांची अव्याहत प्रगती

बादशाही फौजानी नौरसपूर आणि शाहापूर यांच्यामधे आपली छावणी दिली आणि विजापूरच्या वेढयाला सुरवात केली.[२५] वेढा देण्याऱ्या फौजा आणि शिबंदी यांच्या मधे दररोज चकमकी होऊ लागल्या. किल्ल्यामधून होणाऱ्या सततच्या भडीमारामुळे मोगलांची पुढील प्रगती रोखली गेली. दरम्यान काही आदिलशाही अधिकाऱ्यांनी हल्लेखोरांबरोबर शांततापूर्ण समेट व्हावा म्हणून वाटाघाटी सुरू केल्या. पहिल्याप्रथन प्रथम शेख डबीर हा मोगलांकडे आला. त्याने खवासखानाच्या वृतीने विशिष्ट योजना सादर केल्या परंतु त्यांचा तडकाफडकी अव्हेर करण्यात आला. यावर विजापूरी उमरावानी मोगलांबरोबर तहासाठी मध्यस्थी करण्याबद्दल मुस्तफाखान याला गळ घातली कारण, त्याचे मोगलांपाशी थोडेफार वजन आहे अशी सर्वसाधारण समजूत होती.[२६]

### शांततेसाठी वाटाघाटी

वस्तूस्थिती अशी होती की मुस्तफाखानाचा आसफखानाबरोबर या अगोदरच पत्र व्यवहार सुरू झाला होता. त्याने पुष्कळ वेळा पाठींबा देण्याची अफाट वचन देखील दिली होती. एका प्रसंगी त्याने आपला दत्तक घेतलेला मुलगा आलीरिजा ह्याच्यातर्फे असा निरोप पाठविला की आपल्या खंदकामधून बादशाही फौजांना किल्ल्यात प्रवेश करू देण्याची त्याची तयारी आहे. दिलेल्या या शब्दाला आपण पाळु अशा तऱ्हेच्या शपथा अनेक वेळा घतल्या असतांना देखील त्याने आपला शद्ब फिरविला.[२८] त्याच्या दुटप्पीपणामुळे आसफखानाचा त्याच्यावरील विश्वास उडाला आणि त्याने असा आग्रह धरला की तहाच्या अटी पक्या करण्यासाठी खुद्द मुस्तफाखान आणि खैरियतखान आल्याखेरीज आपण कोणताही करारनामा करणार नाही. त्याप्रमाणे रात्रीच्या वेळी दोघेजण किल्ल्याबाहेर आले. त्यांना घेण्यासाठी नसिरिखान हा आला.[२९]

### मुस्तफाखान अटी निश्चित करतो

बराच काळपर्यंत वाटाघाटी चालल्यानंतर असे ठरले की आदिलशहाने अंशत: रोखीमध्ये आणि अंशत: जडजवाहीर आणि इतर मौल्यवान वस्तू यांच्या रूपाने खंडणी म्हणून चाळीस लक्ष रुपये द्यावे. वरील अटींचा समावेश असणारा करारनामा तयार करण्यात आला. यावर योग्य ते शिक्कामोर्तब करण्यासाठी आणि आपल्या धन्याची त्याला मान्यता मिळविण्यासाठी मुस्तफाखान हा किल्ल्याकडे परतला. हा करारनामा परत आणण्यासाठी आसफखानाचा एक अनुचर

अबदुर रिहान हा मुस्तफाखानाबरोबर गेला. आपल्या सदिच्छेचे निदर्शक म्हणून पूर्वी एका प्रसंगी त्याच्या अधिकाऱ्याने पकडलेल्या बहादुरखान आणि युसुफखान यांना आदिलशहाने पुन्हा मोगलांच्या हवाली केले.[३०]

**खवासखानाचा अटी स्वीकारण्यास नकार**

परंतु जेव्हा मुस्तफाखानाने तहाच्या अटी खवासखानाला दाखविल्या तेव्हा त्याने त्या मान्य करण्याचे नाकारले. त्याच्या ह्या भूमिकेला इतर अनेक सरदारांनी आपला पाठींबा दिला. खवासखानाने अदबुररिहान याला दोन दिवस पर्यंत अडकवून ठेवले आणि नंतर त्याच्याच बरोबर निरोप पाठविला की करारनाम्यावर दस्तखत झाल्यावर त्याची रवानगी आपण आपल्या प्रतिनिधी मार्फत करू. जेव्हा त्यांचे आगमन झाले तेव्हा त्यानी नव्या अटी सादर केल्या. आसफखानाने त्यांचा स्वीकार केला. त्यानी दुसऱ्या दिवशी करारनामा पाठविण्याचे अभिवचन दिले.[३१]

**खवासखानाची युक्ती**

परंतु वाटाघाटी लांबविण्यात खवासखानाचा उद्देश आपल्याला अधिक वेळ मिळावा आणि मोगल छावणीतील परिस्थितीबद्दल त्याला जी बातमी मिळाली होती त्याबाबत माहिती गोळा करणे हा होता. जेव्हा त्याची बादशाही सैन्याचे दुबळेपण कशामध्ये आहे याबद्दल खात्री पटली तेव्हा त्याने आपला शब्द मोडला आणि शहराममध्य खरेदी करण्यासाठी म्हणून प्रवेश केलेल्या मोगल सैनिकांवर हल्ला केला.[३२]

**आसफखानाच्या चुका**

आदिलशहा बरोबर तह करण्यासाठी आसफखानाला जी उत्सुकता होती त्याचे कारण टंचाईमुळें दुर्दशा झालेल्या त्याच्या अनुयायांचे जे हाल होत होते त्याबद्दल त्याला वाटणारी चिंता हे होते. आपल्याला पुरवठा चालू राहील याबद्दल योग्य ती व्यवस्था न करता त्याने अतिशय मूर्खपणाने शत्रुच्या देशाच्या अगदी अंतर्भागी चाल केली होती. एकदा का होईना त्याचे सेनापतीपद कसास लागले आणि त्याने आपल्या कर्तत्वाचे अतिशय भोंगळ असे प्रदर्शन केले. बादशाही फौजा येण्याचे अगोदर आदिलशहाने आजूबाजूचे जिल्हे पूर्ण पणे उध्वस्त केले होते आणि म्हणून वेढयाच्या काळात धान्य पैदा करणे त्याना अतिशय कठिण गेले. टंचाई इतकी भयानक होती की एक शेर

एका रुपयाला विकला जात होता आणि चारा तर जवळ-जवळ मिळतच नव्हता.[३३] ही परिस्थिती खवासखानाचा दृष्टीकोन बदलण्यास कारण ठरली आणि मोगल सैन्याच्या सामर्थ्याची उपेक्षा करण्यास तिने त्याला उद्युक्त केले.

### आसफखानाची माघार

जेव्हा खवासखानाचे जासुद मोगल छावणी सोडून जात होते तेव्हा त्यांच्याबरोबर गेलेल्या मुस्तफाखानाच्या एका माणसाने एक चिठी टाकली. या चिठीत त्याने खवासखानाच्या दुटप्पी वर्तनाची माहीती आसफखानाच्या निदर्शनास आणली होती.[३४] अशा परिस्थितीत आपण छावणी मोडणे आणि ज्या जिल्ह्यात सैनिकांच्या अन्नधान्याची सोय करता येईल तिकडे माघार घेणे आसफ खानाला भाग पडले. वाटेत मोगलांनी अनन्वित अत्याचार केले. ज्या ज्या शहरामधून ते गेले ती शहरे त्यांनी उध्वस्त केली आणि लुटली आणि स्त्रीया आणि मुले यांना त्यांनी सरसकट गुलाम केले.[३५] सारांश आपला सुड निरपराध लोकांवर उगवित आणि पाठीमागे दुःख आणि उदासिनता यांची सावट ठेवीत विजापुरी सैन्याकडून पाठलाग होत होत ते बीड येथे पोहोचले.[३६] मोगलांच्या आक्रमणाची अशा तऱ्हेने वाताहात झाली आणि आदिलशहा नमविला गेला नाही.

### परेंडा जिंकून घेण्याची महाबतखानाची महत्वाकांक्षा

यानंतर दक्षिणेचा सुभेदार म्हणून महाबतखानाची नेमणूक करून बादशहाने उत्तरेकडे कूच केले. त्याच्या दौलताबादच्या वेढ्यात रणदुल्लाखान, शहाजी आणि इतर य.नी त्याला सतत जेर केले होते. परंतु तो किल्ला जिंकून घेतल्यानंतर परेंडा ताब्यात घेण्याच्या महत्वाकांक्षेने त्याला घेरले. हा किल्ला सुरवातीला निजामशहाच्या ताब्यात होता. त्याचा किल्लेदार आकरिजा[३७] याने १६३२ मधे तो आदिलशहाच्या स्वाधीन केला. महाबतखानाने बादशहाला लिहीले की दौलताबादच्या पाडावामुळे दक्षिणेमधील सत्तात घबराट आणि वैफल्य निर्माण झाले आहे आणि विजापुरला नमविण्याची ही योग्य संधी आहे. त्याने पुढे असेही लीहीले की आपले सैनिक दमलेले आहेत आणि म्हणून जर का ही मोहीम हाती घेण्यासाठी ताज्या दमाची फौज देऊन एखाद्या राजपुत्राला नियुक्त करण्यात आले तर विजय हा खात्रीने निश्चित आहे.[३८]

महाबतखान याचे आडाखे पूर्णपणे चुकलेले होते हे संशयातित आहे. त्याने नुकतीच जी एक कामगिरी पार पाडली होती—आणि दौलताबादचा

पाडाव ही काही निश्चितच कमी महत्वाची कामगिरी नव्हती – त्यामुळे त्याच्या मनात निर्माण झालेली समाधानाची भावना पराकोटीला गेली होती. त्यामुळे विजापुरच्या सामर्थ्याचा त्याने कमी अंदाज बांधला आणि खुद्द अहमदनगरमध्ये जी अशांतता धुमसत होती तिकडे त्याने पूर्ण दुर्लक्ष केले. बादशहा विषयी बोलावयाचे झाल्यास दक्षिणेमधील खऱ्या परिस्थितीची त्याला जाणीव नव्हती आणि म्हणून खुद्द दक्षिणेतच असलेल्या माणसाने आणि विशेषतः हा मनुष्य महाबतखान असल्यामुळे परिस्थिती बद्दलचे जे निदान केले त्यावर त्याने विश्वास ठेवला. त्याशिवाय मोगलांच्या साम्राज्यवादी धोरणाबरोबर महाबतखानाची महत्वाकांक्षा ही जुळणारी असल्यामुळे त्याने केलेल्या विनंतीचा स्वीकार करण्यात शहाजहान याने अनमान केले नाही.

### राजपुत्र शुजा याची दक्षिणेत रवानगी

या विनंतीनुसार राजपुत्र शुजा याला दहा हजार जात आणि दहा हजार सवार या अधिकारावर बढती देण्यात आली आणि त्याची रवानगी मोठमोठ्या अधिकार पदावर असलेल्या व्यक्तींना बरोबर देऊन दक्षिणेत करण्यात आली. बादशहाने व्यक्तीशः त्याला सुयश चिंतले आणि रथ किंवा हलक्याश्या बैलगाडीतून राजवाड्यातून प्रयाण करण्याची त्याला आज्ञा दिली. राजपुत्राबरोबर जे अमीर आणि मनसबदार गेले त्यामधे ज्यांचा उल्लेख केला पाहिजे ते म्हणजे सय्यदखानजहान, राजा जयसिंग, राजा विठ्ठलदास, अल्लावर्दीखान आणि रशीद खान अन्सारी राजपुत्राच्या सेनासंभारात एक हजार अहदी, एक हजार बंदुकधारी आणि मोठ्या संख्येने पायदळी सैनिक होते. मोहीमेच्या खर्चासाठी शाही खजिन्यातून अडीच लक्ष रुपयांची रक्कम आगाऊ देण्यात आली होती आणि माळव्याच्या खजिन्यावर आणखी दीड लक्ष रुपयांचे बेचनपत्र दिलेले होते.[३९]

### राजपुत्र शुजा परस्पर परेंड्याकडे जातो

जेव्हा राजपुत्र शुजा दक्षिणेत आला तेव्हा वाटेतच महाबतखानाने त्याची भेट घेतली आणि परस्पर परेंड्याकडे चाल करून जाण्याचा त्याला सल्ला दिला.[४०] मलकापूरहून खान जहान याची रवानगी विजापूरच्या सरहद्दीवर असलेल्या जिल्ह्यांची लूटमार करण्यासाठी करण्यात आली. यामधे मोगलांचा उद्देश विजापूरकरांजवळील दाणागोटा हिरावून घेऊन परेंड्याकडे कुमक पाठविण्यास त्याना प्रतिबंध करण्याचा होता.[४१] बूरहाणपूर बरोबरचे आपले दळण-

वळणाचे मार्ग सुरक्षित राहावेत यासाठी महाबतखानाने जफरनगर, जालनापूर, शहागड आणि बीड येथे चौक्या स्थापन केल्या, आणि प्रत्येक चौकीच्या व्यवस्थित संरक्षणासाठी सैनिकांची तुकडी ठेवली.[४२]

### शहाजीच्या हालचाली

मोहिमेत दुर्दैवाने सुरवातीपासूनच अडचणी निर्माण होत गेल्या. शहाजीने निजामशहाचा एक नातलग शोधून काढला आणि सुलतान म्हणून त्याचे नावे ग्वाही फिरवली.[४३] अशा तऱ्हेने भूतपूर्व निजामशाही राजघराण्याबद्दल ज्यांना थोडाफार आदर वाटत होता आणि मोगलांविरुद्ध ज्याना आकस वाटत होता त्या सर्वांना शहाजीने आपल्या निशाणाखाली जमा केले आणि मोगलांची दक्षिणेमधून हकालपट्टी करण्याचा त्याने चंग बांधला. विजापूर बरोबर दोस्तीचे संबध असल्यामुळे परेंड्यावरील दबाव कमी व्हावा या दृष्टीने साहजिकच त्याने आपल्या हालचालींची आखणी केली. त्याने जफरनगर येथे मोगलांची फळी तोडण्याचा प्रयत्न केला परंतु शहाजीला परतवून लावण्यासाठी, जुन्नरपर्यंत त्याचा पाठलाग करण्यासाठी, चांभारगोंदा येथील त्याचे घर उध्वस्त करण्यासाठी आणि संगमनेरहुन त्याच्यावर परिणामकारक दबाव ठेवण्यासाठी राजपुत्राने तीन हजार सैनिक देऊन खवास खान याची रवानगी केली.[४४]

### खानजमानचे अपयश

खान जमान हा परेंडा येथे आला आणि किल्ल्यापासून दोन मैल अंतरावर जिल्हयांतून वैरण आणि गवत आणण्यासाठी त्याने आपली माणसे पाठविली. त्याने आपल्या अधिकाऱ्यांमध्ये हुकमती वाटून दिल्या. अल्लावर्दी खानाकडे त्याने तटबंदी खाली सुरूंग पेरण्याचे आणि तोफांचे मोर्चे तयार करण्याचे काम सोपविले. अल्लावर्दी खानाच्या माणसांवर तोफांचा मारा करून त्यांच्या प्रगतीत अडथळे आणण्याचा प्रयत्न शिबंदीने केला परंतु त्यांच्या जवळील मोठया तोफांच्या आच्छादनाखाली त्यानी आपली प्रगती चालू ठेवली. तरी देखील यश मिळण्याची अपेक्षा पूर्वीइतकीच दूर राहिली. खानजमान याच्या प्रयत्नांना भरीवपणा आणण्यासाठी महाबतखान याने राजा विठ्ठलदास याला पाठविले परंतु परिस्थितीत सुधारणा झाली नाही.[४५]

### बादशाही छावणीत आवश्यक वस्तुंचा तुटवडा

सरतेशेवटी महाबतखानाने स्वत: मलकापूर सोडले आणि राजपुत्राबरोबर परेंड्याकडे कूच केली. आपली माघारीची वाट सुरक्षित ठेवण्यासाठी

आणि शिबंदीला कुमक पोहोचण्यास प्रतिबंध व्हावा यासाठी त्यानी किल्ल्यापासून थोडचा अंतरावर आपली छावणी दिली. परंतु एकाच ठिकाणावर मोगलांनी गर्दी केल्यामुळे फार मोठ्या अडचणी निर्माण झाल्या. महाबतखानाने सर्व प्रकारची सावधगिरी बाळगल्यानंतर देखील बादशाही छावणीत आवश्यक वस्तुंचा तुटवडा पडला आणि म्हणून दूर अंतरावर वैरण आणण्यासाठी तुकडयांची रवानगी करणे भाग पडले. यामुळे आपल्या गनिमीकाव्याच्या युद्ध तंत्राचा उपयोग करण्याची, बादशाही तांडयाना अटकाव करण्याची आणि उपासमारीने भुके मरण्याची मोगलांवर पाळी आणण्याची संधी शत्रुला मिळाली.

**महाबतखानाचे शिकस्तींने मलायन**

एका प्रसंगी तर शत्रुच्या जवळ-जवळ दहा हजार सैनिकांनी महाबतखानाची कोंडी केली. त्याच्या आघाडीचे नेतृत्व असलेल्या महेशदास राठोड आणि रघुनाथ भट्ट यांची हल्लेखोरांबरोबर भीड पडली आणि त्यातील एकूण एक माणूस मारला गेला. या नुकसानीमुळे महाबतखानाची मोठी चमत्कारिक परिस्थिती झाली. परंतु नशिबाने खान दौरान त्याच्या मदतीसाठी वेळेवर आला. त्याच्या आगमनामुळे शत्रु नाउमेद झाला, त्यांची फळी मोडली आणि त्यांने पलायन केले.[४७] शत्रुकडून असे अचानक हल्ले वारंवार होत असत. या हल्ल्यांचा बादशाही फौजांना सतत जाच होवू लागला.

**परेंडयावरील शिबंदीचा शौर्याचा प्रतिकार**

त्याशिवाय किल्यावरील शिबंदी आपली कामगिरी अतिशय जागरूकपणे पार पाडीत होती. त्यानी तटबंदीखाली भरण्यात आलेला प्रत्येक सुरूंग शोधून काढला आणि या सुरूंगातील दारू तरी काढुन टाकली[४८] किंवा ती पाण्यात भिजवून तरी टाकली. काही काळानंतर अल्लावर्दीखानाच्या मोर्चामधील एक सुरूंग पुरा करण्यात आला आणि शिबंदीच्या लक्षात येणार नाही अशा तऱ्हेने तो भरण्यात आला. राजपुत्राच्या समक्ष त्याचा स्फोट करण्यात आला आणि जरी त्या सुरूंगाने एक बुरूज उडवून दिला तरी तटबंदीला आत घुसण्याइतके खिंडार त्यामुळे पडले नाही. या अपयशाने वेढा घालून बसलेल्या सैनिकांच्या उत्साहावर विरजण पडले आणि असाच प्रयत्न पुन्हा करून बघण्याची आशा अतिशय दुरावली.[४९]

यात भर म्हणून की काय महाबतखान आणि खान दौरान यांच्यामध्ये कटूपणा निर्माण झाला. खान दौरान हा नेहमी महाबतखानाची सुटका केल्याची

बढाई मारत असे.[५०] महाबतखान हा चिडखोर बनला आणि आपल्या अशिष्ट वर्तनाने त्याने इतर अधिकाऱ्यांना देखील दुखावले. ते सर्व एकजुटीने त्याच्या विरूद्ध गेले आणि त्याच्या बेतांत मोडता घालण्याची कोणतीही संधी त्यांनी सोडली नाही. अशा परिस्थितीत यशाविषयी निराशा होऊन त्याने राजपुत्राला वेढा उठविण्याचा सल्ला दिला. त्यानुसार बादशाही फौजांनी आपली छावणी मोडली आणि बुरहाणपुरकडे माघार घेतली.[५१]

### महाबतखानाचा मृत्यु

दौलताबाद येथे मिळालेल्या नेत्रदिपगक विजयानंतर परेंडा येथे आलेल्या अपयशाने महाबतखानाचा अतिशय पाणउतारा झाला. बादशहाने अतिशय कडकपणे त्याची निर्भत्सना केली आणि सर्व सैन्यासहीत ताबडतोब परतण्याचा राजपुत्र शुजा याला हुकूम दिला.[५२] महाबतखानाचे अगोदरच उतारवय झालेले होते आणि या उघड-उघड झालेल्या मानहानीचा त्याच्या प्रकृतीवर गंभीर परिणाम झाला. त्याला नाडीव्रणाची व्यथा होती आणि हे दुखणे आता विकोपाला गेले त्याचा मुलगा खान जमान याच्या दरबाराकडील पलायनामुळे तो अधिकच उदासिन झाला आणि अखेर-अखेर त्याच्या मनाचा तोल जाऊ लागला. त्याला आत्मसंयमन करता येईनासे झाले आणि परेंडा किल्ल्याविरूद्ध पुन्हा प्रयत्न करण्यासाठी म्हणून तो बुरहाणपुरच्या बाहेर छावणी देऊन राहिला. परंतु त्याच्या वाढत्या दुर्बलतेमळे तो अधिक विषण्ण झाला आणि अशाच बेभान मनस्थितीच्या भरात त्याने चार हजार अश्रफी आपल्या सेवकामध्ये वाटून टाकल्या, त्याला मिळालेल्या लूटीतील शिल्लक त्याने सीलबंद केली आणि तिची दरबाराकडे रवानगी केली. यानंतर लवकरच त्याच्या मृत्यबरोबर त्याच्या यशस्वी परंतु शोकपर्यवसायी अश्या जीवनाची अखेर झाली. ही घटना ऑक्टोबर १६३४ मध्ये घडली.[५३]

### विजापूरमधील अस्वस्थता

त्याच्या मृत्युमुळे दक्षिणेमध्ये अतिशय गोंधळाची परिस्थिती निर्माण झाली आणि शहाजीने आपल्या हालचाली पुन्हा एकदा सुरू केल्या. परंतु विजापुरकडून आक्रमण झाल्याची कुठेही नोंद नाही. याचे कारण शोधण्यास आपल्याला दूर जाण्याची जरूरी नाही. या सुमारास मस्तफाखान आणि खवासखान या दोघांच्या पक्षोपक्षीय भांडणाने विजापूर मधील वातावरण अस्वस्थतेचे होते. खवासखानाने राज्यकारभाराचा ताबा आपल्याकडे घेतला होता

आणि प्रत्येकाबरोबर त्याचे दोन हात होत होते. त्याचा उजवा हात म्हणजे मुरारी पंडीत हा होता. खवासखानाचा त्याच्यावर पूर्ण विश्वास होता आणि तो त्याला अतिशय मानीत असे. सुलतान त्याच्या हातातील निव्वळ बाहुले बनला आणि त्याने सांगितल्या प्रमाणे हुकुमांवर आपली दस्तखत करू लागला. अखेर बादशाही शिक्का आपल्या हाती सोपविण्याबद्दल मुस्तफाखानाला हुकूम करावा यासाठी त्याने महमद आदिलशहाचे मन वळविले. हा शिक्का दुसऱ्या इब्राहीमच्या कारकिर्दीपासून मुस्तफाखानाच्या ताब्यात होता. त्याने जेव्हा या गोष्टीस नकार दिला तेव्हा खवासखानाने त्याला कैद करवीले.[५४]

### शहाजहानला खूष करण्याचे खवासखानाचे प्रयत्न

जेव्हा शहाजहान याचे बुंदेलखंडामध्ये आगमन झाले आणि त्याच्या दक्षिणेवर चाल करून जाण्याच्या नियोजीत बेताची खबर खवासखानाला मिळाली तेव्हा त्याने अतिशय किंमती असे नजराणे देऊन शेख डबीर याला मोगल दरबाराकडे पाठविले. यामध्ये तीस हजार होन इतक्या किंमतीचा एक नीलमणी होता. परंतु जेव्हा खवासखानाचे अरेरावीचे वर्तन बादशहाच्या नजरेस आणून देण्यात आले तेव्हा त्याने वकीलाची भेट घेण्यास नकार दिला.[५५] हिंदिया येथून शहाजहान याने आदिलशहाला पाठविण्यासाठी एक फर्मान तयार केले आणि ते मक्रमतखान याच्याबरोबर रवाना केले.[५६] या फर्मानातील मजकूर अतिशय चित्तवेधक आहे, कारण त्यामध्ये धाकदपटशा आणि सौजन्य, मनधरणी आणि ताकीद यांचे चमत्कारीक मिश्रण आहे. या मजकुरातून विजापूरबाबतच्या शहाजहान याच्या धोरणाने कसा आकार घेतला, आदिलशहाला सवलती देण्याची त्याची कशी इच्छा होती आणि जरूर पडल्यास आपली इच्छा बळाच्या जोरावर लादण्याची त्याची कशी तयारी होती याचे हुबेहुब चित्रण आपल्याला बघावयास मिळते.

### खवासखानाचा अधःपात आणि खून

परंतु हे जे काही व्यवहार झाले त्यांची सविस्तर माहिती देण्याचे अगोदर विजापूरच्या इतिहासातील ज्या काही घटनांनी त्यांच्या मोगलांबरोबरील संबंधांवर प्रभाव पाडला त्यांची नोंद घेणे जरूर आहे. मुस्तफाखान याला कैद केल्यावर खवासखान याने अतिशय अनिर्बंध अशा वागणुकीला सुरवात केली. त्याच्या विरूद्ध असंतोषाची झपाट्याने वाढ होत गेली आणि सिद्दी-रिहान याच्या नेतृत्वाखाली एका पक्षाने त्याला उघड उघड विरोध करण्यास

सुरवात केली. हाच सिद्दी रिहान पुढे इखलासखान म्हणून मान्यता पावला. रणदुल्ला खान याच्या सक्रीय पाठींब्याने सिद्दीरिहान याने खवासखानाचा खून घडवून आणला आणि मुरारी पंडीत या त्याच्या आवडत्या सल्लागाराची त्याच मार्गाने रवानगी केली.[५८] खवासखानाच्या खूनाच ताबडतोब परिणाम झाला आणि तो म्हणजे मुस्तफाखानाची सुटका आणि पेशवा म्हणून झालेली त्याची नेमणूक. परंतु काही काळ तरी विजापूर दरबारातील वातावरण अविश्वास आणि संशय यानी भरलेले राहिले.

### मक्रमतखान याचा अहवाल

जेव्हा मक्रमतखान हा विजापूर येथे येऊन पोहोचला तेव्हा त्याला तेथे चमत्कारीक परिस्थिती असल्याचे आढळून आले. तरीसुद्धा महमद आदिलशहा याने त्याचे सन्मानपूर्वक स्वागत केले आणि त्याला घेण्यासाठी तो बडखेड येथे आला. दरम्यान मुस्तफाखानाने परत अधिकारावर आल्यावर आपला जावई अबुलहसन याला आदिलशहाच्या हातून नुकतेच जे विश्वास-घाताचे वर्तन झाले होते त्याबद्दल बादशहाकडे क्षमा मागण्यासाठी पाठविले. त्याच्या बरोबर रणदुल्ला खानाचा प्रतिनिधी काज़ी अबु सैद हा गेला. आसफखानाच्या तर्फे वकीलांना बादशहा समोर रूजू करण्यात आले. विजापूरहून त्यांनी जे नजराणे आणले होते ते त्यानी बादशहा समोर ठेवले.[५९]

### विजापुरची नासधूस आणि मानहानी

परंतु मक्रमतखान याने सादर केलेला अहवाल हा प्रतिकुल होता. कारण विजापूरी उमरावांमधे शत्रुत्वाची भावना असलेली त्याला दिसून आली होती. यामुळे शहाजहान याच्या मनात बदल झाला आणि त्याने आपल्या अधिका-ऱ्यांना विजापूरवर हल्ला करण्याचा हुकूम दिला[६०] आदिलशहाच्या हृदयात धडकी भरविण्याचा जर का मोगलांचा उद्देश असला तर मोगलांच्या तिन्ही सेनापतीनी[६१] लूटारू कृत्ये करून विजापूरच्या दुर्दैवी प्रदेशात जी जाळपोळ आणि कत्तली केल्या यामुळे त्यांचा हेतू पूर्ण पणे साध्य झाला. मुस्ताफाखान आणि रणदुल्ला खान या दोघामधे बादशहाबरोबर तह घडवून आणण्याबाबत आता एकवाक्यता निर्माण झाली. त्यांनी आपापल्या प्रतिनिधींना मोगलांबरोबर ताबडतोब तह घडवून आणण्याबाबत सूचना दिल्या. परंतु जेव्हा आसफखानाने आदिलशाही वकिलांना बादशहाच्या समक्ष नेले तेव्हा त्याने आदिलशहाच्या दुटप्पी धोरणाबद्दल अतिशय कडवटपणे तक्रार केली. या

सुमारास अदिलशहाचे ४ वकील मोगल दरबारात वास्तव्य करून होते. ब-ाद शहाचा संताप इतक्या पराकोटीला पोहोचला की खवासखानाने दरबारात पाठविलेल्या शेख डबीर आणि शहा दाऊद यांना ठार मारण्याचा त्याने हुकूम दिला. परंतु आसफखानाने मध्यस्थी केल्यामुळे त्यांच्या जीवावरचे संकट टळले.[६३]

**अबुलहसन याचे शांतता प्रस्थापित करण्याचे प्रयत्न, तह**

बादशहाच्या संतापाने घाबरून न जाता अबुल हसन याने त्याची सर्व बाबतीत समजूत घालण्याचे आणि त्याचे समाधान करण्याचे आपले प्रयत्न चालू ठेवले. सरतेशेवटी शहाजहान याने विजापूर बरोबर तह करण्यास आपली मान्यता दिली आणि तहाच्या अटींचा मसुदा तयार करण्यात आला. त्यानुसार आदिलशहाने मोगलांचे सार्वभौमत्व मान्य करावयाचे होते, तहाबद्दल पेशकश म्हणून वीस लक्ष रुपये द्यावयाचे होते, गोवळकोंड्याबरोबर शांततेचे संबंध ठेवावयाचे होते, आणि कुतुबशहा बरोबरील भांडणांच्या संबंधात, बादशहाच्या मध्यस्थी करता अशी भांडणे सादर करावयाची होती. त्याशिवाय वरील अटींनुसार शहाजहान याने विजापूरच्या सरहद्दी निश्चित केल्या आणि निजामशाही प्रदेशाचा काही भाग आदिलशहाला तोडून दिला. अखेरची अट अशी होती की दोन्ही पक्षांनी परस्परांच्या अधिकाऱ्यांना परस्परांपासून फितवावयाचे नव्हते. या अटींनुसार शहाजीने जुन्नर आणि त्रिंबक यांचा ताबा न दिल्यास त्याला शरण आणण्याचे कामी आदिलशहाने मोगलांबरोबर सहकार्य करण्याचे कबूल केले महमद आदिलशहाने जेव्हा या अटींना आपली मान्यता दर्शविली तेव्हा शहाजहान याने ६ मे १६३६ रोजी एक विधीयुक्त फर्मान पाठविले. या फर्मानावर हिंगूळात बुडविलेल्या बादशहाच्या पंज्याचा ठसा उमटविण्यात आलेला होता. परमेश्वर आणि महमद पैगंबर यांना आवाहन करून त्या फर्मानात ज्या अटी नमुद करण्यात आलेल्या होत्या त्या पुऱ्या करण्याचे बादशहाने वचन दिले होते. त्याचवर्षीच्या जुलै महिन्याच्या ११ तारखेला विजापुरहून भेटी घेऊन मक्रमतखान आला.[६४]

**शहाजहान याने आदिलशहाच्या वागणुकीवर घेतलेला आक्षेप आणि त्याबाबतचा पहिलाच प्रसंग**

अतःपर महमद आदिलशहाच्या मृत्युपर्यंत मोगल आणि आदिलशाही दरबार यांच्या मधील संबध सर्वसाधारणपणे शांततेचे राहिले. तथापी दोन प्रसंग असे निर्माण झाले की शहाजहान याला आदिलशहाला ताकीद द्यावी

लागली. इ. स. १६४२-४३ मध्ये मुस्तफाखानाच्या सत्तेत झालेल्या अमर्याद वाढीमुळे संतापून जाऊन आदिलशहाने त्याला कैद केले. यामुळे शहाजहान नाखूष झाला कारण मुस्तफाखान हा मोगलांचा पक्षपाती होता. या कारणास्तव शहाजहान याने आदिलशाही वकील मिरजा रज्जब याला अडकवून ठेवले आणि मुस्तफाखानाची सुटका करण्याचा हुकूम आदिलशहाला देण्यासाठी त्याच्या बरोबर मिरजा मुजफ्फर हूसेन खवाफी याला पाठविले. जेव्हा बादशाही वकील विजापूर येथे पोहोचला तेव्हा महमद आदिलशहा याने बादशहाच्या आज्ञांचे पालन केले आणि मुस्तफा खानाची पूर्वीच्या जागेवर पुन्हा नेमणूक केली.[६५]

### शहाजहान याने आदिलशहाच्या वागणुकीवर घेतलेला आक्षेप आणि त्याबाबतचा दुसरा प्रसंग

मोगल सम्राटाचे आज्ञापालन करून महमद आदिलशहा याने जो तह प्राप्त करून घेतला तो त्याच्या देशाला फारच लाभदायक ठरला. उत्तरेकडून आक्रमण होण्याच्या काळजीतून मुक्त झाल्यामुळे आदिलशहाने दक्षिण-कर्नाटक जिंकून आपल्या राज्याच्या मर्यादा वाढविल्या. "अशा तऱ्हेने त्याच्या कारकीर्दीत विजापूरच्या राज्याने विस्तार, सामर्थ्य आणि मोठेपणा यांची कमाल मर्यादा गाठली. साऱ्या भारतीय उपखंडात अरबी समुद्रापासून ते बंगालच्या उपसागरापर्यंत त्याचे राज्य पसरलेले होते."[६६] शहाजहान याने या वस्तूस्थितीला मान्यता दिली आणि १६४८ मध्ये त्याला शहा ही पदवी दिली.[६७] नव्याने झालेल्या या सन्मानामुळे विजापूरच्या सुलतानाचा दिमाख वाढला. किल्ल्याच्या बाहेर एका भव्य प्रासादात त्याने दरबार भरविण्यास सुरवात केली, उघड्या मैदानात तो हत्तींच्या झुंजी पाहु लागला आणि आपल्या प्रमुख उमरावाला त्याने खान-खानान ही पदवी बहाल केली.[६८] यावर शहाजहान याने त्याला ताकीद वजा असे एक पत्र लिहले. महमद आदिलशहाने कसलाही विरोध न दाखविता माघार घेतली आणि त्याने सुरू केलेली उद्धटपणाची प्रथा सोडून दिली.[६९] शहाजहानचा आदिलशहावर नाखूष होण्याचा हा दुसरा प्रसंग होता.

### औरंगजेबाची विजापूरवर स्वारी

४ नोव्हेंबर १६५६ रोजी महमद आदिलशहा हा मरण पावला. त्याच्या मागून त्याचा मुलगा अली हा गादीवर आला. राजपुत्र औरंगजेब या सुमारास दक्षिणेचा सुभेदार होता. त्याची लोभी नजर विजापूरवर पडली.

नव्या सुलतानाचा जन्म संशयास्पद कुळात झालेला आहे आणि साऱ्या राज्यात अतिशय गोंधळाची परिस्थिती आहे या सबबींवर त्याने विजापूरच्या राज्यावर स्वारी करण्याची परवानगी देण्यासाठी आपल्या बापाचे मन वळविले. शहाजहान याने अशी इच्छा प्रकट केली की औरंगजेबाने "मीर-जुम्ला याला बरोबर घेऊन विजापूरच्या सरहद्दीकडे कूच करून जावे आणि शक्य झाल्यास सारे राज्य जिंकावे; नाहीतर १६३६ च्या तहाप्रमाणे जुन्या अहमदनगर राज्याचा जो भाग विजापूरला तोडून देण्याचे आला होता तो जिंकून घ्यावा आणि जर का विजापूरने दीड कोट रुपये नुकसान भरपाई दिल्यास, बादशहाच्या नावे नाणी पाडून त्याचे सार्वभौमत्व मान्य केल्यास आणि विजापूरमधील व्यासपीठांवरून बादशहाच्या विरूदावलींचे सार्वजनिक रित्या पठण केल्यास विजापूरच्या प्रदेशाला त्याने कोणत्याही प्रकारे धोका पोहोचवू नये" जर का दुसऱ्या प्रकारात दिलेले पर्याय प्रत्यक्षात अमलात आणले गेल्यास औरंगजेबाने त्याच्या निशाणाखाली जे प्रचंड सैन्य जमा झालेले होते त्याचा उपयोग गोवळकोंडा जिंकण्याचा कामी करावयाचा होता. राजपुत्राने मोहीमेची सुरवात बऱ्याचशा आदिलशाही अधिकाऱ्यांना भरपूर लाच चारून आपल्याकडे फुस लावून केली. त्यानंतर त्याने विजापूर राज्यात प्रवेश केला आणि बीदरला वेढा दिला. किल्ल्याचे रक्षण सिद्दी-मर्जान याने मोठ्या शौर्याने केले. परंतु अचानक झालेल्या स्फोटामुळे तो जेव्हा जबर जखमी झाला तेव्हा त्याच्या अनुयायांनीं माघार घेतली. यानंतर ज्या ठिकाणाला मोगलांनी वेढा दिला ते म्हणजे कल्याणी. चार महिने वेढ्यात टिकाव धरल्यानंतर हेही ठिकाण पडले. विजापूरचा मार्ग आता खुला झाला होता परंतु अचानक औरंगजेबाला युद्ध बंद करण्याचा हुकूम मिळाला आणि त्याने आदिलशहाबरोबर तह केला. या तहाप्रमाणे आदिलशहाने बादशाहाने ठरविलेली नुकसान भरपाईची रक्कम देण्याचे आणि बीदर, कल्याणी, परेंडा, निजामशाही कोकणातील सर्व किल्ले आणि वांगीचे इतर जिल्हे मोगलांना तोडून देण्याचे कबूल केले.[७०]

**गोवळकोंडा**

बहमनी घराण्याची राजनिष्ठा झुगारून देणारा सुलतान कुलीकुतुबशहा हा शेवटचा अधिपती होता.[७१] त्याने ज्या राजघराण्याची स्थापना केली त्या घराण्याने त्यातील सुलतानाच्या शौर्य आणि साहस या गुणांवर मान्यता मिळविली नसली तरी देखील शांततापूर्ण सहजीवनाचा विकास घडवून आणल्याच्या श्रेयावर त्या घराण्याला निश्चीत अधिकार सांगता येईल.

त्या घराण्यातील बहुतेक सुलतान चैनीच्या जीवनाला चटावलेले होते. आणि यामधेच त्यानी त्यांचे शेजारी आणि त्यातल्या त्यात मोगल बादशहा यांच्या बरोबर जे अतिशय दुबळे आणि शरणागतासारखे धोरण स्वीकारले त्याचे स्पष्टीकरण मिळते. या घराण्याच्या इतिहासात कुतुबशाही सुलतानांनी अतिशय नेत्रदीपक असे लष्करी विजय मिळविल्याचे आपल्याला फारसे आढळून येत नाही. तर या उलट लढाईच्या मैदानातून गोवळकोंड्याच्या सुलतानानी पलायन केल्याचे प्रसंगच आपल्या नजरेस येतात. असे जरी असले तरी या घराण्याच्या इतिहासात असे काहीतरी अगम्य आहे की त्यामुळे आपल्याला त्याबद्दल सहानुभूतिबरोबर कौतुक देखील वाटते.

**मोगलांबरोबरील संबंध**

अकबराचा समकालीन महमद कुलीकुतुबशहा हा होता. हा या घराण्यातील पाचवा सुलतान. जरी दक्षिणेतील इतिहासकार अकबराबरोबरील त्याच्या संबंधाची नोंद ठेवीत नाही, तरी देखील अकबरनामा या ग्रंथात गोवळकोंड्याकडून भेटी मिळाल्याचा अधून-मधून उल्लेख आहे.[७२] तसे बघितले तर ही गोष्ट इतकीशी महत्वाची नाही कारण मध्ययुगीन कालखंडातील सम्राटांमधे परस्परांत मैत्रि दाखल भेटींची देवाण घेवाण करण्याची जी एक रूढ प्रथा होती तीचाच वरील गोष्ट म्हणजे एक भाग होता. यामधून ताबेदारीचा स्वीकार अथवा सार्वभौमत्वाला मान्यता या गोष्टी सूचित होत नाही. जहांगीर बादशहाच्या कारकिर्दीत प्रथम महमद कुली आणि त्याचा वारस महमद कुतुबशहा यानी मोगलांविरूद्ध मलीक अंबर याचा सातत्याने पाठपुरावा केला. विजापूरने त्याच्याकडे आपल्या सैन्याची रवानगी केली तशी न करता त्यानी त्याला प्रामुख्याने द्रव्याची मदत केली. राजपुत्र शहाजहान याने दोन वेळा जो दबाव आणला त्यामुळे महमद कुतुबशहा याला निजामशहाचा पक्ष सोडावा लागला. वस्तुस्थिती अशी होती की दक्षिणेच्या राजकारणात स्वतःला गुंतवून घेण्याच्या महमद कुतुबशहा हा अगदी विरूद्ध होता.

दुर्दैवाने महमद कुतुबशहाच्या कारकीर्दीची सविस्तर नोंद आपल्याला उपलब्ध नाही आणि आपल्या माहितीचे एकमेव साधन म्हणजे समकालीन मोगल इतिहासकार हे होत. परंतु या राज्याच्या अंतर्गत इतिहासावर त्यांच्याकडून फारसा प्रकाश टाकला जात नाही. मोगलांबरोबरील संबंधाबाबत एकच महत्वाची घटना आहे आणि ती म्हणजे १६२१ मध्ये महमद कुतुबशहाने २०

लक्ष रुपये दाखल देण्यास दिलेली कबुली हे होय. कुतुबशहाचा हा वाटा अधिकात अधिक होता कारण विजापुरला एक लक्ष ऐंशी हजार आणि अहमदनगरला फक्त एक लक्ष वीस हजार द्यावे लागणार होते. एका वर्षानंतर राजपुत्र शहाजहान याने जेव्हा बंड केले तेव्हा गोवळकोंड्याच्या सुलतानाने त्याला आपल्या प्रदेशातून ओरिसाकडे जाऊ दिले आणि इतकेच नव्हे तर त्याला द्रव्याची मदत दिली.[७३]

## अबदुल्ला आणि शहाजहान

३१ जानेवारी १६२६ रोजी महमद कुतुबशहा मरण पावला आणि त्याचे जागी त्याचा साडे अकरा वर्षाचा लहान मुलगा अबदुल्ला हा गादीवर आला. कालानुगतीक चालत आलेल्या प्रथेनुसार समकालीन सम्राट गादीवर आलेल्या नव्या सुलतानाचे अभिनंदन करण्यासाठी दुतांना पाठवित असत. दुसऱ्या इब्राहीम आदिलशहाने शहा अबुल हसन याला पाठविले आणि दुसऱ्या मुर्तजा निजामशहाने शहा मीर जाफर याची रवानगी केली. जरी शहाजहान अजून बादशहा झाला नव्हता तरी भूतपूर्व सुलतानाने त्याला दिलेल्या मदतीबद्दल कृतज्ञतेचे निदर्शक म्हणून त्याने इखलासखान कजवीनी याला गोवळकोंड्याकडे पाठविले. तेथे त्याचे सन्मानपूर्वक स्वागत झाले आणि योग्य त्या शिष्ठाचार पालनानंतर त्याला परत जाण्याची परवानगी देण्यात आली.[७४] सुलतानाच्या अज्ञानपणात राज्याचा कारभार हा अधिकाऱ्यांच्या सल्लागार मंडळाकडून चालविण्यात येत असे. या अधिकाऱ्यांमध्ये परस्परांबद्दल मत्सराची भावना होती. महमद कुतुबशहाच्या मृत्युनंतर शहा महमद याला पेशवा म्हणून नेमण्यात आले परंतु एकट्याने जबाबदाऱ्या पार पाडणे त्याच्या कुवती पलीकडचे असल्याने त्याच्या बरोबर काम पाहण्यासाठी म्हणून शेख महमद याला नेमण्यात आले.

## अज्ञानपणातील राज्यकारभार

त्याला सहायक पेशवा हा किताब आणि डबीर ही अधिकाराची जागा देण्यात आली. मन्सुर या निरक्षर हबशाला मीर जुमला म्हणून नेमण्यात आले. त्याने ब्राम्हणांना आश्रय दिला आणि अर्थविषयक बाबींचा कारभार संपूर्णपणे त्यांच्यावर सोपविला.[७५] या नेमणुकांचा उल्लेख केलेला आहे याचे कारण त्यांचा कुतुबशहा आणि मोगल बादशहा यांच्या संबंधावर अप्रत्यक्ष असा परिणाम झालेला आहे.

### मुहीउद्दीन याची वकीलात

गादीवर आल्यानंतर शहाजहान याने शेख मुही-उद्दीन याला गोवळ-कोंड्याकडे पाठविले. तो राजधानीजवळ आल्यानंतर मीर कासीम याने त्याचे स्वागत केले. कुतुबशाही दरबारात त्याचे वास्तव्य असताना त्याच्यामधे आणि शहा महमद याच्यामधे गैरसमज निर्माण झाले. शहा महमद याने त्याला योग्य अशी वागणूक दिली नाही. लवकरच त्याची बडतर्फी झाली आणि त्याच्या जागी शेख महमद याला नेमण्यात आले. शेख महमद हा लायक आणि तितकाच कावेबाजही होता. दरबारी रिती-रिवाजांचे काटे-कोरपणे पालन व्हावे अशा मताचा तो होता. ही गोष्ट शेख मुही-उद्दीन याला नापसंत होती. त्याने शेख महमद याच्या बरोबर शिष्टाचाराला न साजेशी वागणूक केली. त्याच्या वर्तनाबद्दल तक्रारवजा असे पत्र शेख महमद याने आसफखान याला लिहिले आणि परिणामी शेख मुहीउद्दीन याची आसफ-खानाने खरडपट्टी काढली.[७६] जेव्हा शहाजहान हा दक्षिणेत आला तेव्हा गोवळ-कोंड्याहून भेटी घेऊन शेख मुहीउद्दीन हा वफाखानाबरोबर परतला. या भेटी बादशहाला २३ मार्च १६३१ रोजी नजर करण्यात आल्या.[७७]

### कुतुबशहाला वाटलेली भिती : खेडपारचा पाडाव

दक्षिणेत फार मोठ्या सैन्याची उपस्थिती आणि विशेषत: नसीरीखानाने कंधारला दिलेला वेढा यामुळे कुतुबशहा भयभीत झाला. त्याने मोगलांच्या आक्रमणाविरुद्ध आपल्या सरहद्दीवर गस्त घालण्यासाठी म्हणून आदमखान हबशी, ऐन-उल-मुल्क आणि अल्लाकुली तुर्क सरदार यांची रवानगी कौलासकडे केली. परंतु दोन्ही बादशहा मध्ये असलेल्या मैत्रिच्या संबंधात बिघाड होईल अशी काहीही घटना या भागात झाली नाही. या उलट ओरिसाचा लढाऊ वृत्तीचा सुभेदार बाकरखान नज्म सानी याने डिसेंबर १६३० मध्ये मन्सुरगडचा किल्ला आपल्या ताब्यात घेतला. यावरून असे दिसते की त्याला कुतुबशाही प्रदेशात आणखी पुढे मुसंडी मारावयाची होती. १६३१ च्या सुरवातीला त्याच्या विरुद्ध पाठविण्यात आलेल्या काही अधिकाऱ्यांचा त्याने पराभव केला. परंतु अबदुल्लाने ही गोष्ट शहाजहान याच्या निदर्शनास आणली तेव्हा त्याने सीमेवरून परत फिरण्याचा बाकरखान याला हुकूम दिला.

### शहा-अली-बेग याची गोवळकोंड्याकडे रवानगी

शहाजहान याने लवकरच वफाखान याला निरोप दिला आणि त्याच्याबरोबर शहा-अली-बेग या एकहजारी मनसबदारी रवानगी केली. वाटेत वफाखान

हा मरण पावला. त्यावेळी त्याचे वय ऐंशी वर्षांचे होते. शहा-अली- बेग हा एकटाच हैद्राबादकडे निघाला.[८०] राजधानी जवळ फसीहुद्दीन महमद याने त्याचे स्वागत केले. २४ नोव्हेंबर १६३१ रोजी त्याला शहाचे भेटीस नेण्यात आले. त्याने शहाजहानकडून बरोबर आणलेले पत्र कुतुबशहाला दिले. या पत्रात शहाजहान याने फार मोठया रकमेची आणि त्याचप्रमाणे काही रत्नांची कुतुबशहाकडे मागणी केली होती. अबदुल्ला किंवा तसे पाहिले तर त्याचे सल्लागार या मागण्या पुऱ्या करण्यांच्या विरुद्ध होते. परंतु त्याचवेळी त्यांच्या मनात मोगल बादशहाच्या लष्करी सामर्थ्याबद्दल दहशत देखील होती. कुतुबशहाच्या नशीबाने या सुमारास मोगलांचे सारे सैन्य आसफखानाच्या हाताखाली विजापूरच्या मोहिमेत गुंतलेले होते. या हालचालीं मधून काय निष्पन्न होतें यावर कुतुबशहा मोठया उत्कंठेने नजर ठेवून होता. त्याने मोगल वकीलाला निरनिराळीं वचने देऊन गुंतवून ठेवले आणि त्याला परत पाठविण्याबद्दल शहाजहानकडून वारंवार हुकूम येत असताना देखील त्याने त्याला अटकावून ठेवले. परंतु जेव्हा विजापूरमधे मोगल सैन्याची दाणादाण झाल्याच्या बातम्या त्याला मिळाल्या तेव्हा त्याने मोगल वकील शहा-अली-बेग याची कोणतेही शिष्टाचार पालन न करता हकालपट्टी केली.[८१]

### गोवळकोंड्यामधील उत्सव समारंभ आणि इतर घटना

शहाजहान जेव्हा उत्तरेकडे परतला तेव्हा तो प्रसंग गोवळकोंड्यामधे मोठे उत्सव समारंभ करून साजरा करण्यात आला.[८२] या नंतरच्या चार वर्षात मोगलांकडून फारच थोडा इस्तक्षेप झाला. अबदुल्लाची इच्छा देखील स्वतःला अलिप्त ठेवण्याची होती आणि जेव्हा दौलताबादला महाबतखानाने वेढा दिला त्यावेळी दौलताबादवरील दबाव कमी करण्याच्या त्याच्या प्रयत्नात आपल्याशी सहकार्य करावे असे जेव्हा त्याला महमद आदिलशहा याने सांगितले तेव्हा त्याने मुग्धता स्वीकारली.[८३] तर या उलट मोगल विरोधी धोरणाबद्दल कुप्रसिद्ध असलेल्या खवासखानाचा पाडाव होण्याच्या कारस्थानात कुतुबशहाने मोठया हिरीरीने भाग घेतला. त्याच प्रमाणे जेव्हा अबदुल्ला खान फिरोज जंग आणि खान दौरान हे जुजहारसिंग याचा पाठलाग करीत गोवळकोंडा राज्याच्या सरहद्दीपाशी आले आणि मृत बंडखोराच्या हयात असलेल्या नातेवाईकांना हवाली करण्याची मागणी त्यांनी केली तेव्हा कुतुबशहाने मागणी मान्य केली. परंतु कुतुबशहाची ही शरणागती भीतीच्या पोटी निर्माण झाली होती कारण दौलताबादकडे शहाजहान याने चाल केल्याची बातमी गोवळकोंड्यांपर्यंत पोहोचली होती.[८४]

## कुतुबशहा आणि मोगल यांच्यामधील संबंधांमधे झालेला बदल

सारांश आपल्याला असे आढळून येईल की दुसऱ्या कोणत्याही गोष्टी पेक्षा मोगल आणि कुतुबशहा यांच्यामधील राजनैतिक संबंधांवर भीतीचा प्रभाव अधिक होता. परंतु ते युग लष्करशाहीचे होते आणि अश्या युगात दुसरी कोणतीच गोष्ट अपेक्षीत नव्हती. भांडणाचा निकाल तलवारीच्या मध्यस्थीने लावून घेण्यास कुतुबशहा हा अतिशय नाखूष होता आणि ते दुष्ट विधिलीखीत चुकविण्याचा त्याने नेहमी द्रव्याच्या मदतीने प्रयत्न केला. परंतु जेव्हा एकदा गोवळकोंड्याची संपत्ती शहाजहानच्या नजरेत भरली तेव्हा त्याच्या मागण्या अधिकाधिक वाढत गेल्या आणि त्याच्या धमक्यांना अधिक तीव्रता आली. परंतु त्याच्या दक्षिणेमधील दुसऱ्या आगमनाबरोबर दोन्ही राज्यामधील संबंधांच्या इतिहासात एक नवीन पायंडा पडणार अशी चिन्हे दिसू लागली. अजून पर्यंत आपल्या सार्वभौमत्वाच्या अधिकृत मान्यतेबरोबर कुतुबशहा कडून अधून मधून पाठविल्या जाणाऱ्या भेटींवर शहाजहान खूष होता. परंतु आता त्याला काहीतरी अधिक पाहीजे होते.

## गोवळकोंड्याच्या सार्वभौमत्वाचे स्वरूप

या ठिकाणी गोवळकोंडा राज्याचे राजकीय स्थान काय होते याबद्दल थोडासा उल्लेख केल्यास ते अनुचित ठरणार नाही. पहिला सुलतान कुली-कुतुबशहा हा आपल्या नावे खुत्ब्याचे वाचन करीत असे आणि त्याने शिया धर्माची राज्यधर्म म्हणून स्थापना केलेली होती. त्याच्या वारसांनी त्याच प्रथेचे अनुकरण केले. विजापूर किंवा अहमदनगर यांच्या सुलतानांप्रमाणे गोवळकोंड्याचा संबंध इराणबरोबर १७ व्या शतकाच्या सुरवातीपर्यंत आला नाही. गोवळकोंडा येथे इराणच्या वकीलाचे १६०३ मधे आगमन झाल्याचे आपल्याला वाचावयास मिळते. त्याने महमद कुली-कुतुबशहा याच्यासाठी ताज आणला. कुतुबशहाने इराणच्या शहाला आपले अभिवादन सादर करण्यासाठी प्रथम कंबर-अली आणि नंतर मेहदी कुली सुलतान तालीश याला पाठविले.[६४] यापुढे दोन्ही दरबारात वारंवार वकीलांची देवाण घेवाण झाली. दोन्ही सत्तामधे हे जे घनिष्ट संबध निर्माण झाले त्याचा एक परिणाम झाला आणि तो म्हणजे गोवळकोंड्यामधे शहाच्या नावाचा खुत्ब्यामधे समावेश झाला. हा बदल केव्हा झाला हे निश्चीत पणे सांगता येणार नाही परंतु शहाजहान याने त्याबद्दल जेव्हा तक्रार केली तेव्हा ही प्रथा अस्तित्वात होती. थोडक्यात गोवळकोंडा राज्याची ऐहिक आणि अध्यात्मिक निष्ठा ही इराणचा शहा आणि

मोगल बादशहा यांच्यामधे विभागली गेली होती. अशा प्रकारची परिस्थिती शहाजहान याला असह्य झाली. पहिली गोष्ट म्हणजे तो स्वतः सुन्नी होता आणि म्हणून त्याच्या मांडलीक राज्यांमधे ज्या धार्मिक तत्वांचे तो अनुकरण करीत होता ती तत्वे जारी करणे आणि महमद पैगंबर याचे सहचारी आणि पहिले तीन खलिफा यांना शिवीगाळ होणार नाही हे पाहणे त्याचे

### आपला धर्म जारी करण्याचा शहाजहानचा प्रयत्न

कर्तव्य होते. दुसरी गोष्ट म्हणजे एकीकडे मोगल बादशहाचे सार्वभौमत्व मान्य करावयाचे आणि दुसरीकडे इराणच्या शहाच्या नावे खुत्व्याचे वाचन करावयाचे हा एक राजकीय विरोधाभास होता. मोगलांची सत्ता ही हिंदुस्थानात अतिशय प्रबळ अशी होती आणि म्हणून इतर सर्व सत्तांनी त्या सत्तेसमोर गौण असणे अपरिहार्य होते. त्या काळातील राजकीय मतप्रणाली ही अशी होती. अश्या परिस्थितीत अतिरिक्त प्रादेशीक निष्ठेचे अस्तित्व प्रत्यक्षात सहन होणे कसे शक्य होते ? परंतु या बाबतीत आश्चर्याचा भाग असा होता की या तत्वाची अंमलबजावणी फक्त अबदुल्ला कुतुबशहाच्या बाबतीत करण्यात आली आणि महमद आदिलशहाच्या अशाच तऱ्हेच्या वर्तनाची कोणतीही दखल घेण्यात आली नाही. याचे कारण शोधण्याला फार दूर जाण्याची गरज नाही. कुतुबशहा हा दुबळा आणि आज्ञापालन करणारा होता आणि त्याच्या दुर्बलतेचा फायदा घेण्यात आला.

### शहाजहानच्या मागण्या

त्या बरहुकूम जेव्हा शहाजहान नर्मदा नदीच्या दुसऱ्या बाजूला हिंदीया येथे आला तेव्हा त्याने अबदुल्ला लतीफ गुजराती याला गोवळकोंडयाकडे पाठविले. त्याच्याबरोबर जे पत्र देण्यात आले होते त्यातील मजकूर उद्बोधक आहे. पत्राची सुरवात गोवळकोंडयातून शिआपंथ रद्द करण्याच्या औपचारिक मागणीने करण्यात आलेली होती. बादशहा पुढे म्हणतो की सुन्नीपंथीय सम्राट या नात्याने धर्मभ्रष्टतेचा नायनाट करणे हे त्याचे कर्तव्य आहे. इतके लिहून त्याने अबदुल्ला याला असा आदेश दिलेला आहे की त्याने पैगबराच्या सहकाऱ्याना होणाऱ्या शिवीगाळीवर बंदी घालावी आणि अशी शिवीगाळ करण्याचा आग्रह धरणाऱ्यांना शिक्षा करावी. अबदुल्ला याने या आदेशाचे पालन न केल्यास त्याचा प्रदेश ताब्यात घेणे हे कायद्याला विहीत आहे असे आपण समजू. खुत्व्याच्या संदर्भात बादशहाने पुढील प्रमाणे लिहीले. "तू जर स्वतःला माझा अनुयायी समजतोस तर इराणच्या बादशहाकडे

वळण्याची गरज तुला का वाटते"? आणि पत्राच्या अखेरीला बाकी राहीलेल्या खंडणीची मागणी केलेली असून तिची पूर्तता जवाहीर, दागदागिने आणि दाक समुद्र आणि बिसर्ग या सारखे हत्ती वगैरे पाठवून करावी असे सुचविले आहे. वरील भेटीच्या वस्तू दरबारामधे केव्हा पोहचविल्या जाव्यात या बाबत निश्चीत वेळ सुचविण्यात आलेली असून त्याप्रमाणे न झाल्यास तू आणि तुझे प्रजाजन यांच्यावर जे संकट कोसळेल त्याबद्दल तुझी कृतीच जबाबदार राहील, अशी धमकी देण्यात आली आहे.

**अबदुल्ला आपल्या निष्ठेचा पुरावा सादर करतो**

परंतु हे फर्मान निघण्याचे अगोदरच अबदुल्लाने आपल्या आज्ञाधारक वृत्तीबद्दल पुरावा दिलेला होता. अबदुल्लाखान फिरोजजंग आणि खान दौरान हे जूजहार सिंग याचा पाठलाग करीत गोवळकोंड्याच्या सरहद्दीवर आले होते आणि त्यानी अबदुल्लाकडे आश्रयार्थ आलेल्या त्याच्या नातेवाईकांना आपल्या स्वाधीन करण्यात यावे अशी मागणी केली होती. आपल्या निष्ठेचा पुरावा म्हणून ही मागणी कुतुबशहाने मान्य केली होती.

अबदुल्लाने त्याला आलमखान याच्याबरोबर रवाना केले. त्याने बुरहाणपूर नजीक त्याना शहाजहानच्या समक्ष नेले. यामुळे बादशहा अतिशय खूष झाला आणि त्याने आलमखान याला एक घोडा आणि मानाचा पोशाख देवून निरोप दिला.[44] याच्यानंतर शहाजहानकडे पाठविण्यात आलेला आणखी एक वकील म्हणजे मुल्ला तकीयाइ शिराजी हा होय. याला अतिशय जलद् कूच करून जाण्याचा आणि मोगल बादशहाला भेटी अर्पण करण्याचा हुकूम देण्यात आला. त्याने शहाजहान याची दौलताबाद येथे भेट घेतली.[45]

**बादशाही वकीलाचे स्वागत**

५ फेब्रुवारी १६३६ रोजी शेख अबदुल्ला लतीफ हा गोवळकोंड्याच्या सरहद्दीवर आला आणि तेथे त्याला करीमखान हा भेटला. वाटेत आणखी पुढे गेल्यावर मीर मुईउद्दीन मुश्रीफ याने त्याचे स्वागत केले आणि तो काही अंतरापर्यन्त त्याच्याबरोबर गेला. हैदाबादजवळ शीख महमद ताहिर हा त्याला सामोरा गेला आणि त्याने त्याला त्याच्या राहण्यासाठी नियुक्त केलेल्या निवासस्थानाकडे नेले. ११ फेब्रुवारी रोजी त्याची अबदुल्ला कुतुबशहाबरोबर भेट करवून देण्यात आली. अबदुल्लाने वकीलाचा मोठ्या थाटामाटाने

पाहुणचार केला आणि नुसत्या शब्दांनी त्याला खुलविण्यास सुरवात केली.[१०] दरम्यान खान दौरान हा गोवळकोंड्याच्या सरहद्दीवर येवून दाखल झाला आणि त्याने येथील काही जिल्ह्यांची नासधूस केली. यामुळे कुतुबशहा भयभीत झाला. त्याने सरहद्दीचे रक्षण करण्यासाठी बऱ्याचशा अधिकाऱ्यांची रवानगी केली आणि गोवळकोंड्याचा किल्ला आणि आजूबाजूची इतर ठाणी यांची डागडुजी करण्याचा हुकूम दिला. त्याचप्रमाणे या सर्व ठिकाणी बंदुका आणि दारूगोळा यांचा भरपूर पुरवठा करण्याबद्दल त्याने आदेश दिले. तोफांचे मोर्चे बांधणे आणि त्यात सुधारणा करणे या कामासाठी त्याने कुशल अशा गोलंदाजांची नेमणूक केली आणि मोगलांचे आक्रमण झाल्यास शिबंदीला पुरवठा व्हावा या हेतूने अन्नधान्याचे भरपूर साठे करून ठेवण्यात आले. गोवळकोंड्याकडे जाणारे सर्व रस्ते बंद करण्यात आले आणि त्यांचे रक्षण करण्यासाठी पहारेकऱ्यांची नियुक्ती करण्यात आली.[११]

**अबदुल्लाकडून शहाजहान याच्या आज्ञेचे पालन**

परंतु मोठ्या प्रमाणावर करण्यात आलेल्या या लष्करी तयारीचे शहाजहान याला यत्किंचितही भय वाटले नाही आणि त्याने आपल्या मागण्या, विशेषत. खुत्ब्यामधे त्याचे नाव इराणच्या शहाच्या नावाऐवजी घालण्याची त्याची मागणी, पुऱ्या व्हाव्या याबद्दल आग्रह धरला. बराच काळ का कूं केल्यानंतर अबदुल्लाने शाही आज्ञा मान्य करण्याचे कबूल केले. परंतु लोकांकडून होणाऱ्या निंदेतून पळवाट काढण्यासाठी त्याने काजी आणि उलेमा यांची एक सभा त्यांचा सल्ला घेण्यासाठी बोलवली. त्यानी एकमताने असा सल्ला दिला की निष्कारण होणारा रक्तपात टाळण्यासाठी बादशहाने लादलेली अट कितीही तिरस्कारार्ह असली तरी स्वीकारावी.[१३] या सल्ल्यानुसार शहाजहान याच्या नावाचा खुत्ब्यामधे समावेश करण्यात यावा अशी अबदुल्ला याने आज्ञा दिली आणि अबदुल लतीफ याचे गोवळकोंड्यामधे वास्तव्य असेपर्यंत आपल्या आज्ञांचे पालन होत आहे किंवा नाही हे पाहण्यासाठी प्रत्येक शुक्रवारी त्याने मशीदीत जाण्याचा उपक्रम चालू केला. यामुळे बादशहाचे समाधान झाले आणि त्याने गोवळकोंड्याच्या हद्दीपासून परत फिरण्याचा खान दौरान याला हुकुम दिला.[१४]

**तहाच्या अटी**

२६ मे १६३६ रोजी अबदुल्ला याने अबदुल लतीफ गुजराथी याला निरोप दिला आणि त्याच्याबरोबर शेख महमद ताहिर याला पाठविले. त्याने

एक लेखी करारनामा सादर केला. त्यात पुढील प्रमाणे अटी होत्या :

१) मशीदीमध्ये म्हटल्या जाणाऱ्या प्रार्थनात पैगंबराच्या चार सहकाऱ्यांच्या नावांचा स्पष्ट उल्लेख असावा, खुत्व्याचे वाचन बादशहाच्या नावे केले जावे आणि नाण्यावर बादशहाच्या मुद्रेचा ठसा उमटविण्यात यावा.

२) बादशहाच्या राज्यरोहणाच्या नवव्या वर्षापासून अबदुल्ला याने दोन लक्ष होन वार्षिक खंडणीदाखल द्यावे आणि ही रक्कम त्याने दक्षिणेच्या सुभेदारीवर जो राजपुत्र असेल त्याच्याकडे किंवा बादशहाने नियुक्त केलेल्या दुसऱ्या कोणत्याही अमीराकडे पोहोचती करावी. त्याशिवाय बादशहाच्या कारकीर्दीच्या ८ व्या वर्षाच्या अखेर पर्यंत अबदुल्लाकडून येणे असलेल्या बत्तीस लक्ष रुपयांची एकंदर खंडणीपैकी शिल्लक राहिलेली आठ लक्ष रुपयांची रक्कम चालू वर्षाच्या म्हणजे ९ व्या वर्षाच्या दोन लक्ष होनासहित अबदुल्लाने बादशहाकडे पोहोचती करावी. त्याचप्रमाणे गोवळकोंडा आणि शाहीदरबारयामधील किमतीमुळे पडणारी फरकाची रक्कमही अब्दुल्लाने आपल्या प्रतिनिधी बरोबर ताबडतोब शाही खजिन्यात भरणा करावी. हीच पद्धत नंतरच्या वर्षातही चालू ठेवण्यात यावी या गोष्टीचा देखिल या अटीत समावेश करण्यात आला.

३) अबदुल लतीफ याच्या समक्ष कुराणाची साक्ष ठेवून शपथ घेतल्याप्रमाणे अबदुल्लाने बादशहाशी सातत्याने राजनिष्ठा राहण्याचे कबूल केले, आणि या अटीनुसार त्याच्याकडून वर्तन न झाल्यास त्याचा प्रदेश जिंकण्याचा बादशहाला सर्वतोपरी अधिकार राहील ही गोष्ट या अटीत नमुद करण्यात आली.

४) जर का विजापूरकडून आक्रमण झाले तर बादशाही प्रतिनिधीने अबदुल्लाला मदत करावी आणि याउलट जर का आदिलशहाने त्याला विशिष्ट रक्कम देणे भाग पाडले तर तितक्या रकमेएवढीच रक्कम शाहीखंडणीतुन वजा करण्यात यावी.[५५]

**वरील घटनांचे विश्लेषण**

या सर्व अटी कडक होत्या हे सांगणे नकोच. अबदुल्ला आणि त्याचे सल्लागार यानी भेकडपणे जी शरणागती दिली त्याला कारण निव्वळ त्यांचा भ्याडपणा हे होते. वस्तुस्थिती अशी होती की कुतुबशहा हा त्याचा समकालीन व

शेजारी आदिलशहा याच्यापेक्षा अधिक प्रकारे हुकूमांचे पालन करणारा होता. तरी देखील आदिलशहाबरोबर ज्या अटींवर तह करण्यात आला त्या अटी अधिक सौम्य होत्या. विजापूर मधील ज्या धार्मिक प्रथा होत्या त्याबाबत शहाजहानकडून कोणताच हस्तक्षेप झाला नाही आणि विजापूर-वर नियमित अशी खंडणी लादण्यात आली नाही. एकंदरीत अबदुल्ला कुतुबशहा पेक्षा महमदआदिलशहाला अधिक योग्यतापूर्वक वागणूक देण्यात आली. कुतुबशहाला प्रसंगी आपली इज्जत आणि धार्मिक समजुती यांचा बळी देऊनही मोगल बादशहाला खूष करण्यात कसलीही दिक्कत वाटत नसे. परंतु खरी गोष्ट अशी होती की या अटी संगीनीच्या जोरावर कुतुबशहाकडून बळजबरीने मान्य करून घेण्यात आल्या होत्या.

**अबदुल्लाकडून शहाजहानला आलेला नजराणा**

दौलताबाद येथे वकीलांचे आगमन होई पर्यंत शहाजहान याने मुक्काम केला. जेव्हा ते शहराजवळ आले तेव्हा त्यांना छावणीचा कोतवाल शहा-अली-बेग मिर्जा जान कुली आणि अफजलखान हे तिघे सामोरे गेले. आपल्या धन्याकडून आणलेल्या भेटी शेख ताहिर याने बादशहाला नजर केल्या. या भेटीत जवाहिर, मौल्यवान रत्ने, शहाजहानच्या नावे पाडण्यात आलेल्या काही हजार अश्रफी आणि रुपये, शंभर हत्ती आणि सोन्याचे जीन असलेले पन्नास घोडे अश्या एकंदर ६ लक्ष रुपये किंमतीच्या वस्तू होत्या. कुतुबशाही वकीलाला शहाजहानच्या घुसलखान्यात निमंत्रीत केले जाण्याचा अतिशय दुर्लभ असा मान मिळाला. या ठिकाणी शहाजहानने त्याला आपल्या जवळील जवाहीरांचा संग्रह दाखविला. कुतुबशहाचा वकील मांडुपर्यंत बादशाही छावणी बरोबर गेला. तेथे त्याला परत जाण्यासाठी रजा देण्यात आली. त्याच्याबरोबर बादशहाने राजा ताहिर याला पाठविले. तो वाटेत बुरहाणपूर येथे मरण पावला. त्याच्या जागी ख्वाजा जाहीद याला नेमण्यात आले. हे दोघेजण गोवळकोंडा येथे १६३६ च्या डिसेंबर महिन्याच्या अखेरीला किंवा थोडे नंतर पुढील वर्षाच्या जानेवारीच्या सुरवातीला पोहोचले. बादशहाच्या वतीने ख्वाजा जाहीद याने सोन्याची झूल चढविलेला एक हत्ती, ५० कापडाचे खण, मोत्यांची एक माळ आणि पाचू, सुंदर चौकटीत बसविलेली शहाजहानची प्रतिमा आणि तहाच्या अटी कोरण्यात आलेली एक सोन्याची लेख-शिला अशा गोष्टी अबदुल्ला कुतुबशहाला नजर केल्या. काही काळानंतर बादशाही वकील गोवळकोंडयाहून परतला.[६६]

## तहाच्या मसुद्याची कलमे

वर उल्लेखिलेल्या सोन्याच्या लेखशिलेवर कोरण्यात आलेला तहाचा मजकूर हा अतिशय उद्बोधक आहे कारण त्यामधे समावेश करण्यात आलेल्या अटी ह्या पाळल्या जाण्याऐवजी अधिकवेळा मोडल्या गेल्या. ह्या अटी थोडक्यात पुढील प्रमाणे होत्या. "तुम्ही आमच्या आज्ञांचे पालन केलेले असल्यामुळे आणि सुन्नी पद्धतीनुसार खुत्बा वाचल्याने आणि आमच्या नावे नाणी पाडल्याने आणि त्याचप्रमाणे ही पद्धत चालू ठेवण्याचे वचन दिल्याने आणि त्याशिवाय ठरलेली वार्षिक खंडणी पाठविविण्याचे आणि ह्या खंडणीबरोबर निजाम उल्-मुल्क याला तुमच्याकडून जे आठ लक्ष रुपये जात त्याच्या बरोबरी इतकी रक्कम म्हणजे दोन लक्ष होन देण्याचे कबूल केल्यामुळे या तहाप्रमाणे आम्ही तुमच्या सर्व अपराधांची तुम्हांला क्षमा करीत आहोत आणि तुम्हाला तुमचा प्रदेश परत करीत आहोत. त्याशिवाय परमेश्वर आणि त्याचा प्रेषित महंमद पैगंबर याची शपथ घेऊन आम्ही तुम्हाला असे वचन देतो की, जो पर्यंत तुम्ही आणि तुमचे वारस वरील अटींचे पालन करीत राहाल तोपर्यंत आम्ही, आमची मुले आणि वारस तुमच्या देशाची कोणत्याही प्रकारची नुकसानी करणार नाही आणि या लेखशिलेवर कोरण्यात आलेल्या अटींविरुद्ध कसल्याही तऱ्हेची कृती केली जाणार नाही"[१७] परंतु मोगलांच्या गोवळकोंडया बरोबरील संबंधांचा पुढील इतिहास बघितल्यानंतर असे दिसून येईल की या सर्व अटींची मोगल सम्राटांकडून एखाद्या कागदाच्या कपट्यापेक्षा अधिक गणना होणार नव्हती.

## औरंगजेब आणि अबदुल्ला

या नंतरची आठ वर्षे दक्षिणेच्या राज्यकारभाराची सुत्रे राजपुत्र औरंगजेब याच्या हाती होती. त्याच्या एकंदर धोरणावरून त्याचे भविष्यकालीन बेत काय असावेत याची स्पष्टपणे कल्पना येते. औरंगजेबाने आपला स्वतःचा प्रतिनिधी सतत गोवळकोंडा येथे ठेवला. त्याला आणि त्याचप्रमाणे त्याच्या धन्याला खूष ठेवण्याची खबरदारी अबदुल्ला याला घ्यावी लागत असे.

औरंगजेबाचा पहिला प्रतिनिधी बंदा रीजाई होता. अबदुल्लाने त्याला अतिशय सन्मानपूर्वक वागविले आणि आपल्या उमरावांनाही त्याच्याबरोबर तशाच प्रकारे वागण्याचा हुकूम केला. बंदा रीजाई याने खूप संपत्ती जमा केली आणि तो अतिशय डोईजड झाला. त्या शिवाय

अबदुल्लाने राजपुत्राला देण्यासाठी त्याच्या जवळ दिलेल्या संपत्तीचा त्याने बऱ्याच वेळा अपहार देखील केला. सरतेशेवटी कुतुबशहाने त्याच्या विरुद्ध तक्रार केली. औरंगजेबाने त्याला परत बोलाविले आणि त्याला तुरूंगात टाकले. त्याच्या जागी काजी अजीज ह्याची नेमणूक झाली.[९८]

राजपुत्र औरंगजेब याने दक्षिणेच्या सुभेदारीचे अधिकार हाती घेतल्यानंतर केवळ एका वर्षानंतर जी एक घटना घडली ती त्याच्या महत्वाकांक्षी आणि दुसऱ्यावर अधिकार चालविणाऱ्या स्वभावाची निदर्शक आहे. १६३७ मधे अबदुल्ला कुतुबशहाने मुल्ला मुकीम याला दौलताबाद येथे राजपुत्राला भेटण्यासाठी आणि आपल्यातर्फे त्याला चांदीची झूल चढविलेले तीन हत्ती आणि इतर किरकोळ भेटी देण्यासाठी पाठविले. परंतु या सर्व गोष्टी आपल्या अपेक्षेपेक्षा कमी दर्जाच्या आहेत म्हणून औरंगजेबाने त्या स्वीकारण्यास नकार दिला. परिणामी आणखी दोन हत्ती, ठरलेल्या खंडणीपैकी एक लक्ष होन आणि बादशहाला पाठविण्यासाठी त्याने खास राखून ठेवलेला एक मोठा हिरा अशा गोष्टी औरंगजेबाकडे पाठविणे अबदुल्लाला भाग पडले. या वेळी राजपुत्राचे समाधान झाले आणि त्याने भेटींचा स्वीकार केला. सारांश सर्व प्रकारच्या आणि कसल्याही क्षुल्लक सबबीवर गोवळकोंड्याच्या सुलतानाला पिळून काढण्यात आले.[९९]

## मीर अफीजुल्ला याची वकीलात

१६३७ च्या जुलै महिन्याच्या सुरवातीला बादशहाचा वकील मीर अफीजुल्ला हा गोवळकोंडा येथे आला. नेहमीप्रमाणे त्याचे मोठ्या सन्मानपूर्वक स्वागत करण्यात आले. २८ जुलै रोजी त्याची सुलतानाबरोबर भेट झाली. त्याने बादशहाच्या वतीने अबदुल्ला कुतुबशहा याला चांदीचा मुलामा चढविलेली कांही भांडी नजर केली. कुतुबशहाचा पेशवा शेख महमद याने अफीजुल्ला याला मोठ्या थाटाची मेजवानी दिली. शहाजहान याच्या आदेशाप्रमाणे पुढील नोव्हेंबर महिन्यात त्याला परत जाऊ देण्यात आले. कुतुबशहाने त्याला बादशहासाठी ४००० होन आणि ६० रती वजनाइतका एक हिरा दिला. परंतु दुर्दैवाने अबदुल्लाचा वकील मीरजामहमद जौहार याचा मृत्यू झाल्यामुळे मीर अफीजुल्ला हा अडकून पडला आणि १६३८ च्या जानेवारी महिन्याच्या सुरवातीपर्यंत त्याला निघता आले नाही. त्याच्याबरोबर आता मीर्जा नासिर हा गेला. पुन्हा १६४० च्या मार्चमध्ये शहाजहान कडून शफीआ

हा वकील म्हणून आला आणि १० महिन्याच्या वास्तव्यानंतर डिसेंबरमधे त्याला परतण्याची परवानगी देण्यात आली. मीर फसीहूद्दीन हा त्याच्याबरोबर राजपुत्र औरंगजेब याला भेटण्यासाठी गेला आणि त्याने औरंगजेबाला देण्यासाठी दोन लक्ष होन आणि इतर किमती नजराणे बरोबर घेतले.[१००]

निजाम उद्दीन महमद याने अबदुल्ला कुतुबशहा याचा लिहिलेला आपला इतिहास १६४० पर्यंत आणून संपविला आहे. यानंतर गोवळकोंडा राज्याबद्दल मिळणारी माहिती ही अतिशय त्रोटक आहे. परंतु एक गोष्ट उघड दिसते की दिल्ली आणि हैद्राबाद या दोन दरबारातील संबंध अधिकृतरित्या जरी स्नेहाचे असले तरी प्रत्यक्षात मात्र ते सलोख्याचे नव्हते. खंडणीची बाकी राहिल्याबद्दल वारंवार तक्रारी होत होत्या आणि थकबाकी दिली न गेल्यास कडक कारवाईच्या धमक्या दिल्या जात होत्या. अशा परिस्थितीत जेव्हा शायस्ताखान हा दक्षिणेचा सुभेदार होता आणि त्याने जेव्हा अबदुल्ला याला त्याच्याकडील बाकीबद्दल आठवण दिली तेव्हा अबदुल्लाने त्याला लिहिले. "थकलेली बाकी फेडून टाकण्याबद्दल मी काळजी घेईन. या पत्राबरोबर मी दोन लक्ष होन पाठवित आहे आणि उरलेली रक्कम मी लवकरच चुकती करीन"[१०१] एक गोष्ट या ठिकाणी नमुद करणे आवश्यक आहे आणि ती म्हणजे ही थकबाकी साठत जाण्याचे कारण म्हणजे वारंवार बदलणारा विनीमयाचा दर हे होते.[१०२]

## औरंगजेबाची दुसरी सुभेदारी

जेव्हा औरंगजेब दुसऱ्या वेळी १६५३ मधे दक्षिणेच्या सुभेदारीवर आला तेव्हा त्याने कुतुबशहाबाबत अतिशय कडक धोरण स्वीकारले. त्याने त्याला थकबाकी ताबडतोब चुकती करण्यास सांगितले अथवा त्या ऐवजी त्याने आपल्या राज्याचा काही भाग तोडून द्यावा अशी मागणी केली. वार्षिक दोन लक्ष होन इतक्या खंडणीचा बोजा पुरेसा भारी नव्हता म्हणून की काय राजपुत्राने आता विनिमयाच्या दरात फरक पडल्यामुळे मागील सर्व वर्षांची जी बाकी निघत होती ती ताबडतोब देण्यात यावी अशी कुतुबशहाकडे मागणी केली. अशा तऱ्हेने कुतुबशहाच्या डोक्यावर आणखी २० लक्ष रुपये खंडणीचा बोजा लादण्यात आला. मोगलांना कुतुबशहाबद्दल तक्रार करण्यास आणखी एक कारण मिळाले आणि ते म्हणजे कुतुबशहाने मोगलांच्या परवानगीशिवाय कर्नाटक जिंकून घेतला हे होय. या सर्वावर कडी म्हणजे मीर जुम्ला याचे प्रकरण होते.

साहजिकच या अमर्याद मागण्या अबदुल्ला कुतुबशहा याच्याकडून पुऱ्या होणे शक्य नव्हते आणि परिणामी त्याला बादशहा आणि राजपुत्र या दोघांचाही रोष ओढवून घ्यावा लागला. खरा पेचप्रसंग ओढवला तो जेव्हा मीर जुम्ला याच्या आज्ञाभंगाच्या वर्तनामुळे कुतुबशहाने २१ नोव्हेंबर १६५५ रोजी मीर जुम्ला याच्या कुटुंबातील मंडळी आणि त्याचा मुलगा महमद अमीन याना कैद केले. तेव्हा औरंगजेबाने तावडतोब या घटनेची खबर आपल्या बापाला दिली आणि गोवळकोंड्याबरोबर युद्ध करण्याची परवानगी देण्याबद्दल विनंती केली. बादशाही आज्ञा आपल्याला येणारच असे गृहीत धरून औरंगजेबाने आपला मुलगा महमद सुलतान याच्या हाताखाली नांदेड येथे सैन्याची जमवाजमव केली. दरम्यान त्याने आपल्या बापाकडून आलेली फर्माने अबदुल्ला कुतुबशहाकडे पाठवून मीर जुम्ला याच्या कुटुंबातील मंडळीना सोडण्याचा त्याला हुकूम केला आणि त्याला असा आदेश दिला की मीर जुम्ला याची नेमणूक पाच हजारी मनसबदार म्हणून झाल्यामुळे तो बादशाही दरबाराकडे येण्यासाठी निघाल्यास त्याला कोणतीच हरकत करू नये. कुतुबशहाने या हुकूमांकडे दुर्लक्ष केले. तेव्हा औरंगजेबाने आपल्या मुलाला गोवळकोंड्यात घुसण्याची आज्ञा दिली. महमद अमीन याची सुटका करण्यात आली आणि त्याला राजपुत्राकडे पाठविण्यात आले तरी देखील राजपुत्र महमद याने आपली आगेकूच चालू ठेवली आणि तो हैद्राबादला पोहोचला. शहराची लूटालूट करण्यात आली आणि ते उध्वस्त करण्यात आले.

अबदुल्ला याने गोवळकोंड्याकडे पळ काढला आणि स्वतःला किल्ल्यात कोंडून घेतले. राजपुत्र महमद याला आपली शरणागती देण्यासाठी आणि तहाची याचना करण्यासाठी अबदुल्ला दररोज त्याच्याकडे आपले वकील पाठवी. परंतु औरंगजेब तेथे येवून पोहोचेपर्यंत राजपुत्राला काहीही करता येणे शक्य झाले नाही. औरंगजेब ६ फेब्रुवारी १६५६ रोजी तेथे येऊन पोहोचला आणि त्याने गोवळकोंड्याच्या वेढ्याला सुरवात केली. दरम्यान एकीकडे औरंगजेबाचे मन वळविण्यासाठी अबदुल्लाने आपल्या प्रयत्नांची पराकाष्टा केली तर दुसरीकडे बादशहा आणि त्याचा वारसपुत्र दारा यांना आपल्याकडे वळवून घेण्याचा तितकाच शिकस्तीचा प्रयत्न त्याने केला. अखेर गोवळकोंड्याचे राज्य खालसा करावे अशी परोपरीची विनंती औरंगजेबाने केली असताना देखील शहाजहान याने

त्याला युद्ध थांबविण्याचा आणि तह करण्याचा हुकूम दिला. म्हणून ३० मार्च रोजी बादशहाच्या हुकूमानुसार औरंगजेबाने गोवळकोंड्याचा वेढा उठविला. १६५६ मध्ये दोन्ही राज्यांमधे जरी तह झाला होता तरी देखील गोवळकोंडा आणि दिल्ली यांच्या मधील कलहाची कारणे मात्र राहिली आणि औरंगजेबाने गादीवर आल्यानंतर आपले साम्राज्यवादी धोरण तडीला नेण्यासाठी या कारणांचा भरपूर उपयोग करून घेतला.

# तळटीपा

## प्रकरण ७ वे

(१) अकबरनामा, खंड ३, पान ३८८.

(२) फरिश्ता, खंड २, पान ४८.

(३) अकबरनामा, खंड ३, पान ११७१.

(४) अकबरनामा, खंड ३, पान १२३९; तजकिरत- उल्-मुलूक, पाने २२५ ब-२२७; फुतूहात -इ- आदिलशाही, पान २५०.

(५) मोगलांनी अहमदनगर जिकून घेतल्यानंतर बराच काळपर्यंत मलिक अंबर याने विजापूर येथे वास्तव्य केले असे फुतूहातचा कर्ता म्हणतो. (पान २६१ ब)

(६) फुतूहात, पाने २८६-९५; बेनी प्रसाद, 'History of Jahangir',पान ३८७.

(७) बेनी प्रसाद, 'History of Jahangir', पाने ३८९-९०, फुतूहात -इ- आदिलशाही, पाने २८६ब-२९४.

(८) बेनी प्रसाद, 'History of Jahangir' पाने ३८९-९०; फुतूहात इ-आदिलशाही, पाने २८६ब-२९४.

(९) फुतूहात -इ आदिलशाही, पान २९४.

(१०) फुतूहात-इ-आदिलशाही, पान २९७ ब आणि पान ३१५; ब सातीन-उस-सलातीन, पान ४१.

(११) फुतूहात-इ-आदिलशाही, पाने ३१५-१९

(१२) फुतूहात-इ-आदिलशाही, पाने ३२१-२१ब

(१३) फुतूहात-इ-आदिलशाही, पान ३२१ब; कजवीनी, पान २१३ ब; लाहोरी, खंड १, पान ३५६.

(१४) बसातीन -उस-सलातीन, पान ४५ (ब)

(१५) पहा प्रकरण ६, तळटीप २४.

(१६) कजवीनी, पान २१२ब.

(१७) कजवीनी, पान २१३; लाहोरी, खंड १, पान ३५५.

(१८) कजवीनी, पान २१३ ब; लाहोरी, खंड १, पान ३५८.

(१९) लाहोरी, खंड १, पान ३७९; कजवीनी, पान २१३ ब, बसातीन-उस-सलातीन मधे असे विधान केले आहे की विजापूर बरोबर झालेल्या तहाच्या अटींचा भंग करून बादशाही फौजांनी धारूरवर जो हल्ला केला या कारणास्तव मुईनउद्दीन याला अटकाव करून ठेवण्यात आले. (पान ४६); हदीकतच्या कर्त्याने बादशाही फौजांनी विजापूरच्या सरहद्दीवर लुटालुट केल्यामुळे आणि मुइनउद्दीन याच्या खर्चासाठी कुतुबशहाने द्रव्य पाठविल्यामुळे मोगल वकीलास अटकाव करण्यात आला असे विधान केले आहे. (पान २४८ ब)

(२०) कजवीनी, पान २२९ ब; लाहोरी, खंड १, पान ३७९.

(२१) कजवीनी, पान २३०; लाहोरी, खंड १, पाने ३८०-८१.

(२२) लाहोरी, पाने ४११-१२; कजवीनी, पान २४२.

(२३) कजवीनी, पान २४२ ब.

(२४) कजवीनी, पान २४२ ब; लाहोरी, खंड १, पान ४१३; हदीकत-उस-सलातीन, पान २४९.

(२५) कजवीनी, पान २४२ ब; लाहोरी, खंड १, पान ४१३; हदीकत उस-सलातीन, पान २४९.

(२६) कजवीनी, पान २४३ ब; लाहोरी, खंड १, पान ४१४.

(२७) फुतूहात - इ-आदिलशाही, पान ३२३ ब; हदीकत - उस-सलातीन २४९.

(२८) कजवीनी, पान २४३ ब-४४; लाहोरी, खंड १, पाने ४१४-१६, फुतूहात-इ-आदिलशाही, पान ३२३ ब.

(२९) कजवीनी, पान २४३ब - ४४; लाहोरी, खंड १, पाने ४१४-१६; फुतूहात इ-आदिलशाही, पान ३२३ ब.

(३०) कजवीनी, पान २४३ब -४४; लाहोरी, खंड १, पाने ४१४-१६; फुतूहात-इ-आदिलशाही, पान ३२३ ब.

(३१) कजवीनी, पान २४३ब-४४; लाहोरी, खंड १, पाने ४१४-१६; फुतूहात -इ-आदिलशाही, पान ३२३ब.

(३२) कजवीनी, पान २४३ब - ४४; लाहोरी, खंड १, पाने ४१४-१६; फुतूहात-इ-आदिलशाही, पान ३२३ब.

(३३) लाहोरी, खंड१, पान ४१६; कजवीनी पान २४४.

(३४) पहा तळटीप २८.

(३५) फुतूहातचा कर्ता असे म्हणतो की आसफखानाच्या अपयशामुळे शहाजहानची त्याच्यावर बरीच खप्पामर्जी झाली परंतु आसफखानाने बादशहाला मौल्यवान नजराणे आदा करून खूष केले (पान ३२४).

(३६) बसातीनमधिल वृत्तान्तानुसार मुरारी पंडित याने मोगल सैन्याचा पाठलाग केला असे आहे (पान ४६).

(३७) पहा प्रकरण ६, तळटीप ४७.

(३८) लाहोरी, खंड १, पान ५३७; कजवीनी, पान ३००.

(३९) कजवीनी, पाने ३००ब-३०१; लाहोरी, खंड१, पाने ५३७-३९.

(४०) लाहोरी, खंड १, भाग २, पान ३४; कजवीनी, पान ३१९ ब.

(४१) लाहोरी, खंड १, भाग २, पान ३५; कजवीनी, पाने ३१९ ब २०.

(४२) लाहोरी, खंड१, भाग२, पान ३५; कजवीनी, पान ३१९ ब २०.

(४३) लाहोरी, खंड १, भाग २, पान ३६; कजवीनी, पान ३२०.

(४४) लाहोरी, खंड १, भाग २, पान ३६; कजवीनी, पान ३२०.

(४५) कजवीनी, पान ३२० ब; लाहोरी, खंड १, भाग २, पाने ३६-३९.

(४६) कजवीनी, पान ३२० ब; लाहोरी, खंड १, भाग २, पाने ३६-३९.

(४७) कजवीनी, पाने ३२१ ब-२२; लाहोरी, खंड १, भाग २, पाने ३९-४२.

(४८) लाहोरी, खंड १, भाग २, पान ४५; कजवीनी, पान ३२४.

(४९) कजवीनी, पाने ३२४-२५; लाहोरी, खंड १, भाग २, पान ४५.

(५०) कजवीनी, पाने ३२४–२५; लाहोरी, खंड १, भाग २, पान ४५.

(५१) कजवीनी, पाने ३२४–२५; लाहोरी, खंड १, भाग २, पान ४५.

(५२) लाहोरी, खंड १, भाग २, पान ४७; कजवीनी, पान ३२५ब.

(५३) कजवीनी (पान ३३२ ब) आणि लाहोरी (पाने ५९–६० भाग २, खंड १) अगदी सारांशाने महाबतखानाच्या मृत्यूचा उल्लेख करतात. लाहोरी मोतमदखानाच्या 'शांतता प्रस्थापित झाली' या लघुकवनाचा उलेख करतो. या थोर सेनानीच्या आयुष्याच्या सविस्तर माहितीसाठी पहा मासिर-उल-उमरा, खंड ३, पाने ३८५–४०७; हदीकत-उस् सलातीन, पाने २६५–६६.

(५४) फुतूहात-इ-आदिलशाही, पाने ३३२–३४ब.

(५५) फुतूहात-इ-आदिलशाही, पान ३३१; परंतु कजवीनी (पान ३५५) आणि लाहोरी (खंड १, भाग २, पान ११७) असे सांगतात की दरबारांत त्याचे चांगले स्वागत झाले आणि शहाजहानने त्याचा मानमरातब देखिल केला.

(५६) लाहोरी, खंड १, भाग २, पाने १२६-३०.

(५७) फुतूहात इ-आदिलशाही, पाने ३३५-४१; हदीकत-उस्-सलातीनचा कर्ता असे सांगतो की खवासखानाचा नाश आणि मृत्यू घडवून आणण्यांत अबदुल्ला कुतूबशहा हा देखिल सहभागी होता (पाने २६७ ब-७०).

(५८) लाहोरी, खंड १, भाग २, पान १४४; कजवीनी पान ३६८.

(५९) कजवीनी, पान ३६७ ब; लाहोरी, खंड १, भाग २, पान १४३.

(६०) कजवीनी, पान ३६८; लाहोरी, खंड १, भाग २, पान १४४.

(६१) या सेनानीच्या हालचालींच्या माहितीसाठी पहा, कजवीनी, पाने ३७१-७७ आणि लाहोरी, खंड १, भाग २, पाने १५१-६५.

(६२) त्यांची नावे शहा दाऊद, शेख डबीर, काजी अबु सैद आणि अबुलहसन अशी होती.

(६३) फुतूहात-इ आदिलशाही, पान ३४८ब.

(६४) कजवीनी, पाने ३८१-३८३ ब; लाहोरी, खंड १, भाग २, पाने १६७-७४; फुतूहात-इ-आदिलशाही, पाने ३४९-५१.

(६५) फुतूहात-इ-आदिलशाही, पाने ३९९-४००ब; मीर रज्जब याचे आगमन आणि मुजफ्फर हुसेन याजबरोबर त्याचे प्रयाण याचाच फक्त उल्लेख लाहोरी करतो (खंड २, पाने ३३५-३३६).

(६६) Sarkar, History of Aurangzib, Vol. I, p. 255.

(६७) Sarkar, History of Aurangzib, Vol. I, p. 255.

(६८) Ibid, p. 256.

(६९) Ibid, pp. 256-58.

(७०) Ibid, p. 262.

(७१) कुतूबउल्मुल्क याने अहमदबहरी आणि आदिलखान यांच्या सांगण्यावरून स्वातंत्र्याची घोषणा केली असा उल्लेख तारीख महमद कुतुबशाही या ग्रंथात आहे. (पान २५)

(७२) अकबरनामा, खंड ३, पाने ४४०,९०९,९९०,११७१ आणि १२५६.

(७३) Beni Prasad, History of Jahangir p. 335

(७४) हदीकत-उस्-सलातीन, पान २०९.

(७५) हदीकत, पान २११.

(७६) हदीकत, पान २३१.

(७७) कजवीनी, पान २२ब; हदीकत, पान २३७; लाहोरी, खंड१, पाने ३६६-६७.

(७८) हदीकत, पान २४९ब.

(७९) हदीकत, पाने २३७ब-३८; कजवीनी, पाने २०६-७; लाहोरी, खंड १, पाने ३३२–३४.

(८०) हदीकत, पान २४९ब.

(८१) हदीकत, पाने २५०-५१.

(८२) हदीकत, पाने २५१–५३.

(८३) हदीकत, पान २६४ब.

(८४) हदीकत, पाने २६८–७०.

(८५) हदीकत, पान २७२; लाहोरी, खंड १, भाग २, पान १३९.

(८६) तारीख महमद कुतुबशाही, (Add. 6542) पान १६७–८.

(८७) कजवीनी, पाने ३६१ब-२ब.

(८८) हदीकत, पान २७२.

(८९) हदीकत, पान २७२; कजवीनी, पान ३६७.

(९०) कजवीनी, पान ३६८; हदीकत, पान २७२ ब.

(९१) हदीकत, पान २७३.

(९२) मोगल वकीलाच्या निदर्शनास ह्याप्रमाणे चाललेली लष्करी तयारी आल्यानंतर त्याने शहाजहान बादशहाला अबदुल्लाने पाठविलेल्या नजराण्यावरच समाधान न मानण्याचा सल्ला दिला असे हदीकतचा लेखक म्हणतो (पान २७३ब)

(९३) हदीकत, पान २७४.

(९४) हदीकत, पान २७४ब.

(९५) कजवीनी, पान ३६८; ३८२ब-८३ ब; हदीकत, पाने २७२–७७.

(९६) कजवीनी, पान ३८८ब; लाहोरी, खंड१, भाग२, पान २१०.

(९७) लाहोरी, खंड १, भाग २, पाने २१०–११.

(९८) हदीकत, पान २८५.

(९९) हदीकत, पान २८४ब.

(१००) हदीकत, पाने २८५–८६.

(१०१) मरासिलात-इ-कुतुबशाही, पाने ५–३.

(१०२) या सुंदोपसुंदीची यथोचित कल्पना आपल्याला समकालिन पत्रव्यवहारावरून विशेषत: मरासिलात-इ-कुतुबशाही या ग्रंथात अबदुल्लाची जी काही पत्रे सापडतात त्यावरून येते.

(१०३) अधिक तपशिलासाठी पहा, Sarkar,' History of Aurangzib', Vol. 1, Chapter X.

## प्रकरण आठवे

# ट्रान्स ऑक्सियाना

### बडया मोगल सम्राटांची महत्वाकांक्षा

१६व्या आणि १७ व्या शतकामधे हिंदुस्थानामधील मोगल सम्राटांची कल्पनाशक्ति आपल्या वाडवडिलांच्या ताब्यातील प्रदेश पुन्हा जिंकुन घेण्याच्या स्वप्नानी चेतवली गेली. त्यांच्या धमन्यामधे तीमूरचे रक्त वहात असल्या कारणाने कायदेशीर वारसा हक्काने ट्रान्स ऑक्सियाना आपलाच आहे असे ते मानीत. उत्तरेकडील रखरखीत प्रदेशावर मात्र त्यानी आपली वखवखलेली नजर कधीच टाकली नाही. समकंद आणि बोखारा परत मिळविण्यासाठी आपल्या धार्मिक सद्सद्विवेक बुद्धीचे बलिदान करण्यापर्यंत बाबरची मजल गेली.[१] हुमायूनच्या कार्याची व्याप्ती बदख्शानच्या पलीकडे गेली नाही. अकबराला सामना देण्याचा प्रसंग आला तो प्रतापशाली अबदुल्ला खान उजबेग याच्याबरोबर. काबुलच्या सुभ्याच्या सरहद्दीपलीकडे एवढीदेखील हालचाल करणे त्याला शक्य झाले नाही. आणि जेव्हा दक्षिणेमधील युध्दानंतर त्याला संधी मिळाली तेव्हा त्याच्या मुलाच्या बंडाने त्याचे सारे लक्ष वेधून घेतले. जहांगीरने आपल्या बापाच्या महत्वाकांक्षेचा वारसा उचलला.[२] परंतु व्यवहारिक कल्पनाशक्तिचा त्याच्यामधे अभाव होता. पहिल्या प्रथम खुश्रावचे बंड आणि नंतर अंतर्गत घडामोडीत त्याची झालेली गुंतवणूक यामुळे उत्तरेकडे आपल्या प्रदेशाची

वाढ करण्याची कोणतीही योजना जवळजवळ अशक्यप्राय होती. म्हणून त्याच्या कारकिर्दीत ट्रान्स ऑक्सियानाच्या सुलतानाबरोबर मित्रत्वाच्या संबंधाचे पालन करण्यात आले.

## अस्त्राखान जमात

ट्रान्स ऑक्सियानावर त्यावेळी अस्त्राखान जमातीचे राज्य होते. चेंगिज खानाच्या वंशजाची ही जमात म्हणजे एक शाखा होती. जवळ जवळ दोनशे वर्षे ते अज्ञात वासात असल्यासारखे होते. "अखेरीस आपापसातील कलह किंवा त्यापेक्षाही अधिक म्हणजे रशियन सरदारांचे वाढते सामर्थ्य यामुळे त्याना वसाहतीसाठी नवा प्रदेश शोधणे भाग पडले. परिणामी यार महमद खान याने आपला मुलगा जानी खान याला बरोबर घेऊन ट्रान्स ऑक्सियानाकडे स्थलांतर केले.[3] इथे शायीबानीद इस्कंदर खान याने त्याचे आगत स्वागत केले आणि आपली मुलगी जुहरा खानिम[4] हिचा विवाह यार महमद याच्याबरोबर १५६७ मध्ये लावून दिला. यानंतर नव्याने मानलेल्या आपल्या देशाच्या राजकारणामध्ये अस्त्राखानी जमात मिसळून गेली. त्यांच्या नशिबाची अनेक परिवर्तने झाल्यावर यार महमद याचा पणतु १६११ मध्ये समरकंदच्या सिंहासनावर आरूढ झाला. राजकीय सत्ता प्राप्त करून घेतल्यानंतर इमाम कुली याने आपला भाऊ नजर महमद याला मोठी सांभाळून वागणूक दिली आणि बाल्खच्या प्रांताची मुखत्यारी त्याच्याकडे सोपविली.[5]

## इमाम कुलीचा जहांगीरकडे प्रस्ताव

जेव्हा शहा अब्बास पहिला याने कंदहार काबीज केले (१६२२) तेव्हा इमाम कुली याने मोगल दरबारांत अबदुर्र रहीम ख्वाजा याची रवानगी केली. जर कदाचित् राजपुत्र शहाजहानला कंदहार जिंकून घेण्याच्या मोहिमेवर पाठवावयाचे झाल्यास त्या मोहिमेत आपण सहकार्य करण्यास तयार आहोत हे दर्शविण्याचा इमाम कुली याचा उद्देश होता. त्याशिवाय दोन्ही सैन्यानी संयुक्तपणे खुरासान जिंकून घेण्याची योजना देखील इमाम कुली याने जहांगीरपुढे मांडली. त्याने असा प्रस्ताव मांडला की या मोहिमेत भाग घेणाऱ्या दोन्ही पक्षात खुरासानची विभागणी व्हावी. परंतु या योजनेला मूर्त स्वरूप कधीच प्राप्त झाले नाही. अबदुर्र रहीम याचे लाहोर येथेच वास्तव्य झाले आणि जहांगीरच्या मृत्युनंतर तेथे ज्या घटना घडून आल्या त्या त्याने आपल्या डोळ्यानी समक्ष पाहिल्या. शहाजहानच्या राज्या-

रोहणानंतर तो आग्रा येथे आला. तेथे त्याचे सन्मानपूर्वक स्वागत झाले. नवीन बादशहाच्या मनात त्याच्याबद्दल इतक्या आदराचे स्थान होते की त्याच्या शिफारसीवरून बादशहाने अबदुल्ला खान फिरोजजंग याला त्याच्या अपराधाची क्षमा केली आणि त्याची त्याच्यापूर्व पदावर पुन्हा नियुक्ती केली.[१]

## नजर महमदची काबुलवर स्वारी

इमाम कुली हा शांतताप्रीय असा राज्यकर्ता होता. मोगल बादशहाबरोबरील संबंधात बिघाड येईल अशी कोणतीही गोष्ट त्याने केली नाही. परंतु त्याचा भाऊ नजर महमद हा एका बेफाम अशा महत्वाकांक्षेने भारलेला होता. त्याच्या महत्वाकांक्षेच्या पूर्तीसाठी बाल्खच्या मांडलीक राज्याचा मुलुख हा अतिशय अपुरा होता. परंतु आपल्या मोठ्या मनाच्या भावाच्या किंवा सामर्थ्यवान अशा पर्शियाच्या शहाबरोबर उघडउघड टक्कर घेण्याचे धारीष्ट त्याला नव्हते. परंतु हिंदुस्थानच्या राजकीय वातावरणात एकाएकी निर्माण झालेल्या वादळाने आपल्या प्रादेशिक विस्तार वादाच्या धोरणाचा पाठपुरावा करण्याची अतिशय उत्कृष्ट अशी संधी त्याला प्राप्त झाली. जहांगीरचा मृत्यू आणि त्यानंतर शाहरीयार आणि दावर बक्ष या दोघांमधे वारसा हक्कासाठी झालेला कलह यामुळे मोगल दरबारांत अतिशय गोंधळाची परिस्थिती निर्माण झाली. त्याशिवाय या सुमारास सरहद्दीवरील टोळीवाल्यांकडून मोगल सैन्यावर जो भयंकर प्रसंग गुजरला होता त्यामुळे काबुलमधे बादशाही इभ्रतीला फार मोठा कमीपणा आलेला होता. या परिस्थितीमुळे नजर महमद याला काबूल जिंकुन घेण्यासाठी अतिशय योग्य संधी आहे असे वाटले. त्याच्या या विचाराविरुद्ध त्याचा मोठा भाऊ इमाम कुली याची इच्छा आणि उपदेश ही होती.

त्याने आपला मुलगा अबदुल अजीज याला त्याचा शिक्षक अबदुर्र रहमान बी याच्याबरोबर पुढे रवाना केले. ते जूहाकवर चाल करून गेले आणि त्यानी तेथील मोगल सेनापती खंजर खान याला अचानक गाठले. परंतु त्याने मोठ्या धिमेपणाने किल्ल्याची संरक्षण व्यवस्था संघटीत केली आणि जेव्हा उजबेगांची आघाडीची तुकडी दरवाजासमोर येऊन उभी ठाकली तेव्हा तो किल्ल्याबाहेर पडला आणि त्याने त्याना पळवून लावले. दुसऱ्या दिवशी म्हणजे ८ मे १६२८ रोजी नजर महमद हा मुख्य सैन्यानीशी आपल्या मुलाला येऊन मिळाला आणि त्याने किल्ल्यावर अचानक हल्ला करून तो घेण्याचा अयशस्वी प्रयत्न केला. त्याला आलेल्या अपयशामुळे तो चिडला आणि त्याने आपल्या

काही अधिकाऱ्यांची निर्भत्सना केली. पुन्हा एकदा त्याने आपल्या सैन्याची अनेक तुकडयामधे योजना केली आणि किल्ल्यावर हल्ला चढविला. परंतु खंजर खानाने त्याचे प्रचंड नुकसान करून त्याला पिटाळून लावले. जुहाक येथे आणखी कालापव्यय करणे हे त्याच्या दृष्टीने अनिष्ट असल्यामुळे काबुलचा पाडाव होईपर्यंत जुहाक जिंकून घेणे त्याने लांबणीवर टाकले. त्याने किल्ल्याचा वेढा उठविला, आणि पुढे कूच केले.

जेव्हा त्याला घोरबंद आणि चारीकारान रस्ता बंद असल्याचे आढळून आले तेव्हा त्याने अतिशय झपाटयाने सियाहसंगच्या मार्गे आगेकूच केले. त्याने दगाफटका आणि बळाचा उपयोग करून पमघान मधे प्रवेश केला आणि कसलीही दयामाया न दाखवता संबंध जिल्ह्यात लुटालुट केली. त्यानंतरच्या कूचीमधे तो काबुलपासून जवळजवळ दहा मैलावर येऊन पोहोचला. या ठिकाणाहून त्याने बादशाही अधिकाऱ्यांच्या नावे पत्रे पाठविली. त्याने त्याना आकर्षक बक्षीसांची लालूचतर दाखविलीच परंतु भयंकर सूड उठविला जाईल अशा धमक्याही त्याबरोबर दिल्या. त्याचे जासूद नजर ख्वाजा आणि कुलबाबा यांची दिल्लीदरवाजाजवळ शिबंदीच्या प्रतिनिधींनी भेट घेतली. त्यानी पत्रातल्या मजकुराची टर उडविली, त्यानी जी भूमिका घेतली होती त्या भूमिकेपासून रेसभरही ढळण्यास नकार दिला, आपल्या बादशहाजवळील एकनिष्ठेची पुन्हापुन्हा ग्वाही दिली, आणि त्यानी उजबेग जासुदांबरोबर त्यांच्या धन्याला देण्यासाठी असा निरोप दिला की त्याने तावडतोब आपल्या देशाकडे परत फिरावे, तो परत न फिरल्यास आमच्या मदतीला जे बादशाही सैन्य अतिशय जलद गतीने येत आहे त्या सैन्याच्या हस्ते त्याच्यावर अतिशय भयानक असा प्रसंग ओढवेल.

परंतु या धमकीचा नजर महमद याच्यावर थोडासादेखील परिणाम झाला नाही. कारण हिंदुस्थानातून कुमक येण्याचे अगोदरच आपली कारवाई पुरी करण्याचे त्याचे उद्दीष्ट होते. किल्ल्याला वेढा देण्यासाठी त्याने काबूल शहराच्या दिशेने कूच केले. २९ मे १६२८ रोजी त्याच्या सैन्यातील टेहेळे हे फत्ते कालव्याच्या कडेपाशी आणि बीबी माहरू येथे येऊन पोहोचले. परंतु बादशाही फौजांनी दीह-इ-अफघानान या टेकडीवर आणि मेहदी ख्वाजा याच्या कबरीपाशी ठाण मांडून त्यांचा मार्ग रोखून धरला. संबंध दिवसभर दोन्ही पक्षामधे चकमकी होत राहिल्या. संध्याकाळी मोगल किल्ल्याकडे परतले.

आता आपल्याला मार्ग मोकळा मिळाला आहे म्हणून नजर महमद यान शहरात प्रवेश केला आणि किल्ल्याच्या उत्तरेला असलेल्या अबदुर रहमान बेग तरनाबी याच्या घरामधे आपला मुक्काम दिला.

दुसऱ्या दिवशी सकाळी त्याने किल्ल्यासभोवार खंदक खणून वेढ्याला सुरवात केली. किल्ल्यावरील शिबंदीने तोफांचा प्रचंड भडीमार करून आक्रमकांमधे घबराट निर्माण करण्याचा प्रयत्न केला परंतु हल्लेखोरांनी मोठ्या निर्भयपणे आपले मोर्चे पुढे नेले. सरतेशेवटी ते खंदकाच्या अगदी जवळ येऊन पोहोचले आणि त्यांनी किल्ल्यावर हल्ला चढविण्यासाठी तोफांचे मोर्चे उभारले. यामुळे किल्ल्यावरील शिबंदी भयभीत झाली कारण वेढा पडल्यास त्याला तोंड देण्याइतपत त्यांची तयारी नव्हती. ठाण मांडून जागा लढवता येईल इतकी माणसे किंवा साधनसामुग्री किल्ल्यावर नव्हती आणि दिवसेदिवस परिस्थिती अधिक आणिबाणीची होत चालली. अखेर एके दिवशी ख्वाजा अबुल हसन याचा एक अनुयायी मीर मूसा हा किल्ल्याबाहेर पडला, आणि त्याने महमद बाकी बी कलमाक याच्या मोर्च्यांवर हल्ला करून अनेक उजबेगांना ठार मारले आणि त्यानी उभे केलेले तोफांचे मोर्चे जमिनदोस्त केले.

### शहाजहानने योजलेले उपाय

दरम्यान काबुलला पडलेल्या वेढ्याची बातमी मोठ्या त्वरेने दरबाराकडे कळविण्यात आली. २७ जून १६२८ रोजी बादशहाने शिबंदीच्या मदतीला जलदीने जाण्याचा महाबत खानाला हुकूम दिला. दरम्यान काबुलचा नवा सुभेदार लष्कर खान आपल्या कामाचा ताबा घेण्यासाठी निघाला होता, त्याला वाटेत ही बातमी कळली. तेव्हा त्याने जलद गतीने कूच केले आणि तो पेशावर येथे येऊन पोहोचला. त्याने आपला मुलगा सजावर खान याला सैन्याची एक तुकडी देऊन पुढे पाठविले आणि जफर खान याला त्याच्याबरोबर जाण्यास सांगितले. काही काळानंतर लष्कर खान त्यांच्या पाठोपाठ निघाला. परिस्थितीचे गांभीर्य ओळखून महाबत खान येण्याची वाट न पहाता तो तसाच जलालाबादकडे निघाला आणि तेथून तो निरूला येथे पोहोचला. येथे जफर खानाची माणसे त्याला येऊन मिळाली. त्यानी त्याला थोडीशी विश्रांती घेण्याचा सल्ला दिला. परंतु ही सूचना त्याने विचारात घेतली नाही आणि तो तसाच गंदमककडे कूच करून गेला. आपली व्यवस्था पूर्ण करण्यासाठी तेथे त्याने दोन दिवस मुक्काम केला.

काबुलपासून चौवीस मैलावर बरीक आब येथे बादशाही फौजा आल्याचे कानावर आल्यानंतर नजर महमद याने वेढ्याचे काम टाकले, आणि लष्कर खानाबरोबर युद्ध करण्यासाठी त्याने बिग्रामकडे माघार घेतली. बाल्खच्या अधिपतीबरोबर दोन हात करण्यासाठी लष्कर खान हा अतिशय उत्सुक होता. तो तावडतोब पुढे पाठविलेल्या सैन्याच्या तुकडीला येऊन मिळाला. लष्कर खानाच्या प्रगतीमुळे नजर महमद हा भयभीत झाला, आणि अखेरीस का होईना त्याला त्याच्यावर ओढवलेल्या भयंकर परिस्थितीची जाणीव झाली. तो एका परक्या देशात होता आणि त्याच्याजवळील सैनिक म्हणजे आपल्याला मोठ्या प्रमाणावर लूट मिळणार आहे ह्या आशेने त्याच्याभोवती जमा झालेले भाडोत्री गुंड होते. वेढ्याला सुरवात झाल्यानंतर काही काळानेच त्यांच्यापैकी अनेकजण आपली हाव भागविण्यासाठी इतःस्तत: फैलावले होते आणि परिणामी नजर महमद याच्या हाताखाली असलेल्या सैनिकांच्या संख्येत गंभीर अशी घट पडलेली होती. अशा तुटपुंज्या अनुयायांनिशी मोगलांच्या शिस्तबद्ध सैन्याबरोबर लढा देणे म्हणजे निश्चित संकटाला आमंत्रण देण्यासारखे होते. त्याशिवाय जुहाकच्या ठाण्याचा अजुन पाडाव झालेला नव्हता. कदाचित् त्याचा पराभव झाल्यास त्याचा माघारीचा मार्ग तेथील शिबंदीने बंद पाडला असता. म्हणून नजर महमद याने युद्धाचा धोका न पत्करण्याचे ठरवले, आणि २८ ऑगस्ट १६२८ रोजी त्याने आपल्या देशाकडे माघार घेतली. त्यानंतर एका आठवड्याने लष्कर खानाने काबुलमधे प्रवेश केला.[८]

नजर महमद याने घेतलेल्या माघारीची बातमी महाबत खान याला सिरहिंद येथे कळविण्यात आली. दरबाराकडून पुढील आदेशाची वाट पहात त्याने तेथे मुक्काम केला. बादशहाने त्याला परत फिरण्याचा आणि मृत बादशहाच्या जनान खान्यातील लाहोर येथील स्त्रियांबरोबर संरक्षणासाठी म्हणून मुतकिद खान याला पाठविण्याचा हुकूम दिला. आक्रमकांनी काबुल येथील रहिवाशांवर केलेल्या अत्याचारांचे दुःख कमी करण्यासाठी तेथील गरीब आणि गरजू याना वाटण्यासाठी बादशहाने एक लक्ष रुपये रवाना केले.

नजर महमद याने जरी काबुल घेण्याचा निष्फळ प्रयत्न केला तरी शहाजहान याने त्याचा भाऊ इमाम कुली याच्याबरोबर स्नेहाचे संबंध जोडण्याचे आपले प्रयत्न चालूच ठेवले. त्यानुसार ३ नोव्हेंबर १६२८ रोजी

त्याने बोखारा येथील दरबारात वकिलातीच्या कामगिरीवर हकीम हाजिक याची रवानगी केली. त्याच्या बरोबर पैगंबरवासी अबदुर्रहीम ख्वाजा याचा मुलगा महमद सिद्दीक ख्वाजा हाही गेला. त्यांच्याबरोबर पाठविण्यांत आलेल्या नजराण्याची किंमत दीड लक्ष रुपये होती, आणि त्यामधे जडावाचे रत्नखचित दागिने आणि हिंदुस्थानातील उत्कृष्ट अशा इतर वस्तुंचा समावेश होता. आणखी तीस हजार रूपये सिद्दीक ख्वाजा याला देण्यात आले आणि दहा हजार रुपये त्याचा चुलता हसन ख्वाजा याच्यासाठी पाठविण्यात आले.

**इमाम कुलीकडे वकीलाची रवानगी**

इमाम कुली याला पाठविलेल्या पत्रात पैगंबरवासी बादशहा जहांगीर याला इमाम कुली याने पाठविलेल्या पत्राचा, अबदुर्र रहीम ख्वाजा याला झालेल्या खोळंब्याचा, त्याच्या आग्रा येथील आगमनाचा आणि त्याच्या मृत्यूचा उल्लेख आढळतो. या पत्रांत पुढे असेही म्हटले आहे की गादीवर आल्यानंतर ताबडतोब वकील पाठविण्याची बादशहांची इच्छा होती. परंतु ख्वाजाचा अचानक मृत्यु झाल्यामुळे आणि काहीही कारण नसताना नजर महमद याने काबुलवर हल्ला केल्यामुळे बादशहाला वकीलाची खानगी करता आली नाही. परंतु बादशाही फौजानी नजर महमद याचा हल्ला परतवून लावल्यानंतर नजर महमद याच्या अविचारी कृतीने जर काही गैरसमजूत झाली असेल तर तिचे निराकरण करण्यासाठी आणि दोन्ही घराण्यात मित्रत्वाच्या संबंधाची पुन्हा स्थापना करण्यासाठी आपण हकीम हाजिक याची रवानगी करीत आहोत असेही बादशहाने या पत्रात पुढे म्हटले होते.[१]

शहाजहानची ही कृती आणि ह्या प्रसंगी त्याने धारण केलेला पवित्रा ही अतिशय मुत्सद्देगिरीची होती. उत्तर सीमेवर ह्यावेळी शांततेची जरूरी होती. नजर महमद याने आपल्या साहसी वागणुकीची पुनरावृत्ती करावी अशी त्याची इच्छा नव्हती. मोगल आणि ट्रान्स ऑक्सियानाचे सुलतान यांच्यामधे पूर्वापार चालत आलेल्या मैत्रीच्या संबंधावर भर देऊन आणि इमाम कुली याच्याबरोबर शिष्टाचाराने पत्रव्यवहार करून शहाजहान याने नजर महमद हा पूर्णपणे दोषी आहे असे त्याचे चित्र त्याच्याच देशबांधवांसमोर उभे करण्याचा विचार केला, आणि अशा तऱ्हेने बोखाऱ्याच्या दरबाराची सहानुभुति अथवा पाठींबा त्याला मिळणार नाही असा डाव त्याने टाकला. दुसरे म्हणजे शहाजहानच्या अशा कृतीमधे नजर महमद याला एक तऱ्हेची धमकी

अभिप्रेत होती. याचे धमकीवजा प्रात्यक्षिक म्हणून बादशाही फौजानी अस्त्राखानी याचे बमीयान[१०] हे ठाणे १६२९ च्य. मे महिन्यात काबीज केले.

### नजर महमद आणि मोगल बादशहा याच्यामधे शांतता

या पवित्र्याचा बरवर परिणाम असा झाला की नजर महमद याची हालचाल थंडावली आणि मोगल बादशहाबरोबरील आपल्या संबंधात त्याने जवळ जवळ नकारात्मक असे धोरण अवलंबिले. कालांतराने त्याने मोगल बादशहाबरोबर पुन्हा मैत्रीचे संबंध जोडले. याला काय कारण घडले असावे हे उघड होत नाही. १६३२ मधे त्याने वक्कास हाजी याची रवानगी केली. त्याच वर्षाच्या जुलै महिन्याच्या आठ तारखेला तो मोगल दरबारात येऊन दाखल झाला. आग्रा शहराच्या बाहेर त्याचे मोतमिद खानाने स्वागत केले आणि बादशहा जवळ त्याचा परिचय करून दिला. आपल्या सुलतानाच्या वतीने वकिलाने शहाजहानला घोडे, उंट आणि बाल्ख प्रांतामधील इतर वस्तु असा एकंदर पंधरा हजार रुपये किंमतीचा नजराणा भेटी दाखल दिला. त्याच दिवशी बादशहाने त्याला एक मानाचा पोशाख आणि रत्नाने मढविलेली चार हजार रुपये किंमतीची तलवार देणगी म्हणून दिली.[११]

### तरबियत खानाची वकीलात

पुढील वर्षी १६३३ च्या फेब्रुवारी महिन्यात शहाजहान याने नजर महमदच्या दरबारांत आपल्यातर्फे परतीचा वकील म्हणून तरबियत खान याला पाठविले. नजर महमद याला शहाजहानने जे पत्र लिहिले त्यामधे दक्षिणेमधील मोगलांना मिळालेल्या विजयांचा आणि तेथील खुप किल्ले जिकून घेतल्याचा थोडासा उल्लेख आहे. पुढे शहाजहान गादीवर आल्याबद्दल उशीराने का होईना परंतु त्याचे अभिनंदन केल्याची पोच त्याने दिली आहे आणि काबुलवर केलेल्या आक्रमणाबद्दल वकीलाने जी तोंडी माफी मागितली तिचा स्वीकार केल्याचे कळविले आहे. परंतु त्याचवेळी आपण गादीवर आल्याचे ऐकल्यानंतर नजर महमद याने केलेल्या असमर्थनीय कारवाईबद्दल आणि आपल्याच धर्मबांधवांच्या देशाबाबत अशा तऱ्हेचे धोरण स्वीकारल्याबद्दल त्याची कानउघाडणी केलेली आहे. वरील पत्राला ताजा कलम म्हणून शहाजहान याने हुगळीच्या पाडावाचा वृत्तांत दिला आहे.[१२]

### शहाजहानची काबुलला भेट

त्यानंतरच्या पुढील सहा वर्षात दोन्ही दरबारात वारंवार वकीलांची देवाणघेवाण झाली. १६३९ च्या फेब्रुवारी महिन्यात काबुलला भेट देण्यासाठी

शहाजहान याने लाहोरहून कूच केले. असे म्हणतात की यामधे त्याचा खरा उद्देश ट्रान्स ऑक्सियानाकडे जाण्यासाठी असलेले रस्ते आणि दळणवळणाची साधने याबद्दल माहिती मिळविण्याचा होता.[१३] त्याने आपल्यापुढे राजपुत्र दारा याला मोठे सैन्य आणि वेढ्यासाठी उपयोगात येणारा तोफखाना देऊन पाठविले. नौशहरा येथे बादशहाने आपल्या सैन्याची पहाणी केली. आपल्या सैन्याची संख्या ५०,००० इतकी भरते असे त्याला आढळून आले. काबुल येथे आल्यानंतर त्याने काही सरहद्दीवरच्या टोळ्याना वठणीवर आणण्याचा सैदखान याला हुकूम दिला. या टोळीवाल्याना कहमर्दचा सुभेदार पलंगतोष याने नजर महमद याचे वतीने आपल्या बाजुला वळवून घेतले होते. सहाजिकच काबुल येथे शहाजहानचे वास्तव्य आणि त्याने घेतलेला आक्रमक पवित्रा यामुळे इमाम कुली आणि नजर महमद हे दोघेजण भयभीत झाले. त्यानी आपल्यातर्फे आपली नम्रता दर्शविण्यासाठी वकीलांची खानगी केली आणि खुरासान जिंकण्यासाठी आपण सहकार्य देण्यास तयार आहोत असे शहाजहानला कळविले.[१४] परंतु अजून निर्णायक अशी कृती करण्याचा समय प्राप्त झाला नव्हता, आणि म्हणून निरोप घेऊन आलेल्या जासुदांना योग्य ती उत्तरे देऊन शहाजहान १५ ऑगस्ट १६३९ रोजी लाहोर येथे परतला.

## ट्रान्स ऑक्सियानामधील राजकीय बदल

परंतु पुढील कांही महिन्यात ट्रान्स ऑक्सियानाच्या राजकीय बाबतीत अतिशय वेगाने बदलणाऱ्या घटना घडून आल्या. अस्त्राखान जमातीबाबत मोगल सम्राटांच्या भूमिकेत जो फेरफार पुढे घडून आला तो समजण्याच्या दृष्टीने या घटनांची दखल घेणे जरूर आहे. बराच काळपर्यंत त्यादेशात आपली सत्ता गाजविल्यानंतर इमाम कुली याला डोळ्याच्या विकाराने घेरले आणि परिणामी त्याला त्वरीत आंधळेपण आले. इमाम कुलीच्या या राजवटी-सारखी राजवट कोणालाही लाभली नव्हती. आपल्या भावाचे दुर्दैव हे नजर महमद याच्या दृष्टिने एखाद्या सुसंधी सारखे होते. त्याने राज्यकारभार चाल-विण्याचे कामी आपली मदत देण्याची तयारी आहे असे आपल्या भावाला लिहून कळविले. आपल्या भावासाठी निवृत्त होण्याच्या कल्पनेला इमाम कुलीचा विरोध नव्हता. परंतु जेव्हा त्याने आपल्या अधिकाऱ्यांचा सल्ला घेतला तेव्हा त्यानी नजर महमद याच्या विषयी अतिशय द्वेषाची अशी भावना प्रकट केली. यावर इमाम कुलीने काही काळ थांबण्याविषयी आपल्या भावाला लिहून कळविले.

परंतु नजर महमद अधिरा झाला होता. त्याने आपल्या भावाने पाठविलेल्या जासूदाला बंदिस्त केले आणि आपला मुलगा अबदुल अजिज याला हिसार आणि समरकंद यांचा पाडाव करण्यासाठी रवाना केले. या दोन्ही ठिकाणांचा ताबा घेतल्यावर त्याला असे वाटले की बोखाऱ्याच्या आपल्याबरोबर शत्रुत्व बाळगून असलेल्या उमरावांना वठणीवर आणणे हे अतिशय सोपे जाईल. परंतु उत्साहाच्या पहिल्या भरात बोखाऱ्यातील उमरावांनी नजर महमद याच्या बेताना तोंड देण्यासाठी इमाम कुली याला समरकंद येथे आणले. दुर्दैवाने हिसारचा लवकरच पाडाव झाला. परिणामी आंधळ्या इमाम कुलीच्या पाठीराख्यांचा उत्साह फुटलेल्या फुग्यातील हवा जशी निघून जाते तसा नाहिसा झाला. त्यांच्यापैकी अनेकजणांना नजर महमद याने आपल्या बाजूला वळवून घेतले आणि इमाम कुली अगदी एकाकी पडला. आपल्या भावाला शरण जाण्याखेरीज दुसरा मार्ग त्याला उरला नाही. ३१ ऑक्टोबर १६४१ रोजी नजर महमद याचे नावे खुत्बा वाचण्यात आला.

३ दिवसानंतर इमाम कुली आपल्या मक्केच्या तीर्थयात्रेसाठी निघाला. त्याची इच्छा हिंदुस्थानच्या मार्गाने जाण्याची होती परंतु नजर महमद याने या गोष्टीला संमती न दिल्याने त्याने खुरासानचा मार्ग घेतला. परंतु नजर महमद याचा नीचपणा या ठिकाणी संपला नाही. त्याने आपल्या भावाची सर्व चीज वस्तु हरण केली, त्याची बायको आय खानुम हीला बंदिस्त केले आणि इमाम कुली मर्व्ह येथे पोहोचेपर्यंत त्याला उसंत दिली नाही. अखेर त्याने पर्शियाच्या शहाकडे आपल्यातर्फे जासूद पाठविले आणि त्यांच्यातर्फे इमाम कुली याला मदत न करण्याविषयी त्याला विनवणी केली. परंतु शहाने त्याच्या विनंतीकडे दुर्लक्ष केले, आपल्याकडे आलेल्या निराश्रितांचे स्वागत केले, त्याला चांगली वागणूक दिली आणि त्याच्या मनातील हेतू साध्य करून देण्यांत त्याला मदत केली. "आपल्या वयाच्या ६२व्या वर्षी मेदिना येथे त्याला मरण आले."[३५]

गादीवर आल्यानंतर काही काळातच नजर महमद याला असे कळून चुकले की जरी त्याच्या भावाच्या राज्याचा वारसा त्याच्याकडे आला असला तरी त्याच्या भावाची जी लोकप्रियता तेथील रहिवाशांमध्ये होती त्या लोकप्रियतेचा वारसा मात्र त्या राज्याबरोबर त्याच्याकडे आला नाही. राज्यकारभार करताना त्याने ज्या कडक उपायांचा अवलंब केला त्यामुळे त्याच्या

अप्रियतेत अधिकच भर पडली. त्याने नालायक अधिकाऱ्यांना त्यांच्या अधिकारावरून काढून टाकले आणि जहागिरीची पद्धत नाहीशी करून त्याठिकाणी त्या बदली रोख रक्कम देण्याच्या पद्धतीची स्थापना करण्याचा प्रयत्न केला. त्याशिवाय त्याने सयूरघाल आपल्या ताब्यात घेतल्या आणि अशा तऱ्हेने काही धार्मिक पुढाऱ्यांच्या भावना दुखावल्या. त्याच्या विरूद्ध असंतोषाची अतिशय झपाट्याने वाढ होऊ लागली परंतु त्याच्या विरूद्ध निर्माण झालेली अशांतता ही भूमीगतच राहिली. जेव्हा त्याने ख्वारीजम देशाचा राजा इस्फंदयारखान याचा मृत्यू झाला तेव्हा तो देश जिंकण्यासाठी आपल्या सैन्याची रवानगी केली, तेव्हा ह्या अशांततेचा स्फोट झाला. इस्फंदयार खान याचा मुलगा बहराम सुलतान याचा अतालीक बाकीयूज याने ताबडतोब ताश्कंद येथे बंडाचे निशाण उभारले. त्याच्या सबंध राज्यात वावटळी प्रमाणे पसरणाऱ्या बंडाची ही घटना म्हणजे जणू काही एक निशाणीच ठरली. नजर महमद याने आपला दिवाणबेगीअब्दूर रहमान याची रवानगी बंडखोराला वठणीवर आणण्यासाठी केली. तो ताश्कंद येथे पोहोचला आणि त्याने विश्वासघाताने किल्ल्याचा तावा घेतला. यावर बाकीयूज याने खोजंद मध्ये प्रवेश केला आणि इमामकुली याचा नातू संजर याची त्याने खान म्हणून द्वाही फिरवीली. आता नजरमहमद याने बंडखोरांचा मोड करण्यासाठी अब्दूल अजीज याला पाठविले. अबदुल अजीज याने खोजंदकडे कूच केलें आणि १५ दिवस खोजंदला वेढा दिला. या सुमारास त्याच्या अनुयायामध्ये अशांततेचे वातावरण निर्माण झाले. बोखाऱ्याच्या सैनिकांनी बंडखोरांबरोबर हातमिळवणी केली आणि अबदूलअजीज याने त्यांचे प्रतिस्पर्धी बाल्खचे सैनिक यांना बडतर्फ करावे आणि स्वतःची बोखाऱ्याचाखान म्हणून द्वाही फिरवावी अशी त्याच्याकडे मागणी केली. अबदूल अजीज याने नाखुषीने का होइना या मागण्या मान्य केल्या. १६४५ च्या एप्रिल मध्ये त्याच्या नावे औरीटीपा येथे खुत्वा वाचण्यात आला. यानंतर तो समरकंद येथे परतला.

### अबदूलअजीज याचा अधःपात

या घटना नजरमहमद याच्या कानावर कारशी येथे घालण्यात आल्या. परंतु अबदूल अजीज आणि त्याचे अनुयायी यानी बोखारा शहर लुटून उध्वस्त केलेले असल्यामुळे नजरमहमद हा आश्रयासाठी बाल्ख येथे गेला. बोखारा व समरकंद यांचा खान म्हणून जे अधिकार त्याला प्राप्त झाले होते तरीदेखील अबदूलअजीज याचे समाधान झाले नव्हते. आपल्या बापाकडून अधिकाधिक

प्रदेश त्याला हिसकावून घ्यावयाचा होता. या नुसार त्याने हिसार आणि चारजु यांचा ताबा घेण्यासाठी सैन्याची रवानगी केली. नजरमहमद याने सुभानकूली आणि अब्दूर्र रहीम यांची याठिकाणावरील दबाव कमी करण्यासाठी रवानगी केली. दरम्यान मोगलांनी कहमर्द काबीज केल्यामुळे त्याच्यापुढे आणखी एक संकट उभे राहिले आणि त्याने मोगलांबरोबर लढण्यासाठी सुभानकुली आणि अबदूर्र रहमान यांना परत बोलाविले.[१६]

## शहाजहान याने आगेकूच करण्याचा दिलेला हुकूम

ट्रान्स ऑक्सियाना येथे बंडाचा जो स्फोट झाला होता त्याकडे मोगल बादशहा द्वेष मिश्रीत आनंदाने पहात होता. आपले वडलोपार्जीत राज्य पुन्हा मिळविण्याची पूर्व तयारी म्हणून त्याने बदकशान जिंकून घेण्याची योजना आखली. त्यानुसार २८ मार्च १६४५ रोजी त्याने असालतखान याला काबुल येथे जाण्याचा आणि अमीर-ऊल्-अमरा अली मर्दानखान याच्याबरोबर विचार विनीमय करून जरुर ती व्यवस्था करण्याचा हुकूम दिला. अमिर-उल्-अमरा याला मदत करण्यासाठी बहादूरखान, रूस्तूमखान, कुलीजखान, नजाबतखान, नजर बहादूर, रायसिंग वगैरे अनेक अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्यात आली. कोणत्यावेळी आणि कशा पद्धतीने हल्ला करावयाचा त्याबाबत सर्व अधिकार अमीर-ऊल्-अमरा याच्याकडे सोपविण्यात आले.[१७]

## मोगल कहमर्द जिंकतात आणि गमावतात

१६४५ च्या जून महिन्याच्या सुरवातीला घोरबंदचा ठाणेदार खलील बेग हा काबुल येथे आला. त्याने कहमर्दचा पाडाव होण्याची शक्यता असालतखान याच्या नजरेस आणून दिली. त्याचे कारण त्याने असे सांगितले की, हिसारचा बचाव अवदुल अजीजखान याच्यापासून करण्यासाठी कहमर्दचा सेनापती तारदी अली कूतघान हा सुभान कुली याच्या मदतीसाठी गेलेला आहे आणि त्यामुळे शिबंदीची ताकद बरीच कमी झालेली आहे. असालतखानाने अमीर-ऊल्-अमरा याच्या संमतीने एक हजार घोडेस्वार खलीत बेग याच्या दिमतीला दिले. त्याने कहमर्दवर चाल केली आणि विशेष कष्टाशिवाय ते ताब्यात घेतले. परंतु त्याच्या अननुभवीपणामुळे आणि गर्वामुळे किल्ल्यावर पुरेशी शिबंदी ठेवण्याची योग्य ती काळजी त्याने घेतली नाही. तेथे त्याने फक्त पन्नास घोडेस्वार आणि काही बंदुकची ठेवले आणि तो स्वत: जुहाक येथे परतला. दरम्यान नजरमहमद याला मोगल आक्रमणाची

खबर मिळाली आणि हे आक्रमण मोडून काढण्यासाठी त्याने आपल्या अधिकाऱ्यांची रवानगी केली. अबदूर रहमान आणि तारदि अली याने किल्ल्यावरील तुटपुंज्या शिबंदीची हकालपट्टी केली आणि किल्ल्याचा ताबा घेतला. माघार घेणाऱ्या सैनिकांवर त्यांनी हल्ला केला आणि त्यांच्यापैकी अनेकांना जखमी केले.

### असालतखानाचा अयशस्वी प्रयत्न

असालतखान याला कहमर्दच्या पाडावानंतर घडलेल्या घटनांची काहीच माहिती नव्हती. कहमर्दचा जो झपाट्याने पाडाव झाला त्या उत्साहाच्या भरात बदक्शान मधील मोहिमेची सुरुवात करण्यासाठी म्हणून त्याने दोन ऑगस्ट १६४५ रोजी काबुल सोडले. एका आठवड्यानंतर अलीमर्दानखान हा आपल्या सैनिकांसहीत त्याला येवून मिळाला. हिंदुस्थानमधून आणखी कुमक येवून पोहोचण्यास उशीर लागेल असा विचार त्याने केला आणि म्हणून या मदतीची वाट देखील त्याने बघितली नाही. वाटेमधे त्याना कहमर्दचा पाडाव झाल्याची खबर मिळाली. परंतु त्यानी तसेच घोरबंदकडे कूच केले. येथे त्याना खलील बेग येवून भेटला आणि त्याने बदक्शानकडे जाणारे चिंचोळे रस्ते आणि रसद व दाणागोटा यांचा तुटवडा यामुळे मोहीम चालविणे हे कसे अशक्य आहे ते त्यांच्या निदर्शनास आणून दिले. त्यात आणखी हिवाळ्याच्या आगमनामुळे बादशाही सेनापतींची आणखीनच घाबरगुंडी उडाली. अशा परिस्थितीत सरहद्दीवरच्या काही जिल्ह्यात लुटालुट केल्यानंतर मोगल सैन्य काबुलला परतले.

### जगतसिंग याचे साहस

काही काळानंतर मोगलांची गेलेली इज्जत परत मिळवण्याचा धाडसी-प्रयत्न राजा जगत्सिंग याने केला. अमीर-ऊल-अुमरा याची परवानगी घेवून १५ ऑक्टोबर १६४५ रोजी त्याने काबुल सोडले आणि तूल खिंडीच्या मार्गाने त्याने खोस्तमधे प्रवेश केला. नंतर त्याने सराबकडे कूच केले परंतु प्रचंड हिमवृष्टी झाल्याने तेथे त्याचा तीन दिवस खोळंबा झाला. तेथील रहिवाश्यांच्या सल्ल्यानुसार त्याने सराब आणि इंदराब या गावांच्यामधे एक जागा मुक्रर केली आणि तेथे एक लाकडी किल्ला उभारून एक दगडाची भिंत त्याच्या सभोवार बांधली. पाण्याचा भरपूर पुरवठा व्हावा म्हणून त्याने त्या ठिकाणी दोन विहीरी खणल्या. वरील तयारी जेमतेम पुरी होत आहे न होत आहे तोच राजा जगत्सिंग याला तेथून उठवून लावण्यासाठी कफ्श कलमाक हा तेथे मोठे

सैन्य घेवून हजर झाला. परंतु राजा जगत्सिंग याने मोठ्या शौर्याने लढा दिला, किल्ल्याचे संरक्षण केले आणि शत्रुची हकालपट्टी केल्यानंतर तो पंजशीर येथे परतला.[१८]

**नजरमहमद याचा आपल्या ताब्यातील प्रदेशाचे रक्षण करण्याचा प्रयत्न**

दरम्यान नजरमहमद याच्यावर मोठा बाका प्रसंग ओढवला होता आणि त्याची परिस्थिती अधिकाधिक आणिबाणीची होत चालली होती. वस्तुस्थिती अशी होती की, ट्रान्स ऑक्सियाना मध्ये शांतता आणि सुरक्षितता यांचा जवळजवळ लोप झाला होता. लुटारूंच्या भटकणाऱ्या टोळ्यांनी साऱ्या देशाला संत्रस्त केले होते. सर्वत्र लुटालुट करणाच्या नादात त्यानी कोणाच्या वयाकडे किंवा धर्माकडे बघितले नाही आणि साधीसुधी माणसे आणि दुष्ट यांना सारखीच वागणुक दिली. हिसार येथे त्यानी सय्यद इब्राहीम या एकांतात राहाणाऱ्या दरवेशाची त्याच्या चारशे बाल विद्यार्थ्यांसमवेत कत्तल केली आणि निर्लज्जपणे कुराणाच्या प्रती जाळल्या. चेंगीजखानाचे युग जणुकाही पुन्हा अवतरले आहे असा भास झाला. तरी देखील नजरमहमद याने हिसार मिळविण्याचा अखेरचा प्रयत्न केला आणि आपले सारे सैन्य तेथे रवाना केले. त्याचा मुलगा अबदुल अजीज यानेही आपल्या प्रदेशावरील ताबा राखण्यासाठी तोच मार्ग स्विकारला.

दोन्ही विरोधी फौजांनी हिसारच्या किल्ल्यापासून काही मैल अंतरावरच आपापला तळ दिला. दोन्ही फौजांमध्ये अनिर्णीत असे युद्ध लढले गेले. या युद्धानंतर दोन्ही बाजुकडील सर्वसामान्य सैनिकात अतिशय विलक्षण अशी दोलायमान परिस्थिती निर्माण झाली आणि काही काळ तरी ट्रान्स ऑक्सियानाचा अखेरीस खान कोण आहे याबद्दलच निर्णय अनिश्चित झाला. दोन्ही पक्षांचे जे आधारस्तंभ होते त्यानी आपापल्या प्रमुखांना ताबडतोब त्या ठिकाणी येण्याचे आवाहन केले. या चढाओढीत जो जिंकेल त्याला राज्य-सिंहासन मिळावे असा जणुकाही संकेत ठरला. अब्दूल अजीज याने अतिशय घाईघाईने हिसारकडे कूच केले आणि बहुसंख्य सैन्याने त्याच्यापाशी राज-निष्ठेची शपथ घेतली. त्याच्या मित्राने दिलेल्या अतिशय सावधगिरीच्या सल्ल्यामुळे नजरमहमद हा बाल्खमध्ये अडकून पडला आणि त्याने आपली संधी गमावली. आपल्या नवीन अनुयायांच्या मदतीने अब्दुल अजीज याने तिरमिजला वेढा दिला. या ठिकाणी त्याच्याकडे बाल्खमधील काही प्रमुख

ख्वाजा नजरमहमद याच्याकडून शांततेच्या वाटाघाटीसाठी आले. आपल्या बापाच्या ताब्यात बाल्ख राहू देण्यास अब्दुल अजीज याने संमती दिली आणि तो बोखारा येथे गेला. परंतु दोघांमध्ये झालेला हा तात्पुरता तह होता आणि आपल्या सुरक्षिततेबद्दल भिती वाटल्यामुळे नजरमहमद याने शहाजहान याला आपल्याला मदत करण्यासाठी येण्याबद्दल निमंत्रण केले.[१९]

## नजरमहमद याचा वकील

११ जानेवारी १६४६ रोजी त्याचा वकील नजर बी याने शहाजहान याची भेट घेतली. त्याने आपल्या धन्याकडून आणलेले पत्र आणि बादशहाला देण्यासाठी नजरमहमद याने पाठविलेल्या भेटी शहाजहानला नजर केल्या. पत्रातील मजकुर वाचल्यानंतर शहाजहान अंतर्यामी अतिशय खुष झाला. कारण बलवानांच्या विरुद्ध दुर्बलाना आपण मदत कसे करतो हे जगाला दाखविण्याची त्याच्या दृष्टीने ही एक संधी होती. परंतु त्याच वेळी त्याच्या राजघराण्याने बराच काळ बाळगलेली महत्वाकांक्षा, की जी महत्वाकांक्षा त्याचा विख्यात पूर्वज अकबर याला पुरी करणे शक्य झाले नाही, ती आज पुरी झाल्याचे त्याला दिसत होते. अतिशय उदात्त अशा हेतूंच्या आवरणाखाली त्याच्या साम्राज्यवादी धोरणाला आता वाव मिळणार होता. आणि या गोष्टीच्या अपेक्षेने त्याला अपरिमीत आनंद झालेला होता. परंतु तीमूरचा प्रदेश जिंकुन घेण्याच्या मार्गात ज्या काही अडचणी होत्या त्या संबंधी त्याने बांधलेले आडाखे त्याच्या कमनशीबाने संपूर्णपणे चुकीचे ठरले. नुसत्या मोठेपणाच्या कल्पनेनेच त्याची दृष्टी धुंद होवून गेली.

## शहाजहान याचे उत्तर

त्याने नजरमहमद याला अतिशय तत्परतेने उत्तर पाठवून त्याच्या पत्राची पोच दिली. परंतु पत्रातील मजकुराच्या संदिग्धपणाबद्दल आणि ट्रान्स ऑक्सियाना मधील खरीखुरी राजकीय परिस्थिती काय होती याबाबत मौन बाळगल्याबद्दल त्याने तक्रार केली. परंतु बाल्ख खेरीज सोडून नजरमहमद याच्याकडे त्याचा कोणताच प्रदेश उरला नाही आणि त्याच्या देशात भयंकर अशी अंदाधुंदी माजलेली आहे हे कळल्यावर, त्या दोघांमध्ये बराच काळ जी मैत्री चालत आलेली होती त्यामुळे आणि दोघामधील धर्मसाधर्म्यामुळे नजरमहमद याच्या मदतीला कूच करून जाणे हे आपले कर्तव्य आहे असे शहाजहान याला वाटले. त्यानुसार त्याने लाहोर सोडले आणि तो काबुल

येथे येवून पोहोचला. तेथून त्याने आपला मुलगा राजपुत्र मुराद याची प्रचंड सैन्य देवून बदक्शानमध्ये प्रवेश करण्यासाठी, तेथील लुटारूंचा उच्छाद करण्यासाठी आणि नजरमहमद याच्याकडून पुढील आदेशांची वाट बघण्यासाठी नियुक्ती केली. सारांश नजरमहमद याने मदतीसाठी जे आवाहन केले होते त्याला प्रतिसाद[२१] देण्यामध्ये शहाजहान याने अपेक्षेपेक्षादेखील अधिक तत्परता दाखविली.

## मुराद याची मोहीम

तसे पाहिले तर शहाजहान याला त्याक्षणीतरी आपल्या यशाबद्दल कसलाही संदेह वाटत नव्हता. वकीलाचे आगमन झाल्याबरोबर त्याने मोठ्या प्रमाणावर तयारी करण्याचा हुकूम दिला. नशीबाने त्या सुमारास साम्राज्यामध्ये संपूर्ण शांतता नांदत होती. राजपुत्र मुराद याच्याकडे या मोहीमेचे नेतृत्व सोपविण्यात आलेले होते. त्याच्या हाताखाली ५०००० घोडस्वार आणि बंदुकची, हातगोळे फेकणारे आणि गोलंदाज धरुन १०००० पायदळी सैनिक इतक्यांचा समावेश होता. जवळजवळ साम्राज्यातील सर्व नामांकित सेनानींना त्याच्या मदतीसाठी नियुक्त करण्यात आले होते, आणि सबंध सैन्याची विभागणी रूढ पद्धतीनुसार सात विभागात करण्यात आलेली होती. सैन्याच्या मध्यभागाचे नेतृत्व राजपुत्राकडे असून त्याच्या मदतीला अली मर्दानखान, नजाबतखान वगैरे सरदार होते. उजव्या बाजुला कुलीजखान, शहाबेगखान, राजा देवीसिंग बुंदेला वगैरे सरदार होते, तर डावीकडे रूस्तुमखान, दौलतखान वगैरे सरदार होते. सैन्याची डावी फळी असालतखान, राजा जयसिंग, राजा राजरूप वगैरेंच्या नेतृत्वाखाली होती तर डाव्या फळीचे नेतृत्व खलील उल्लाखान, राजा पहाडसिंग आदी सरदारांकडे होते. सैन्याच्या आघाडीचे नेतृत्व बहादुरखान, विठ्ठलदास, राव छत्रसाल हाडा आदी सरदारांकडे होते. सैन्याची मध्यआघाडी मिरजा नवरोज आणि लहरास्पखान आदी सरदारांच्या हाताखाली होती. मध्य आघाडी सोडल्यास सैन्यामधील अधिकाऱ्यांची एकूण संख्या २२०८ एवढी होती. या प्रचंड अशा सैन्याला काबुलकडे कूच करून जाण्यासाठी ६ फेब्रुवारी १६४६ रोजी हुकूम देण्यात आला.

नेहमीच्या पद्धतीनुसार बादशहाने सैन्याच्या हालचाली करण्यासंबंधीच्या योजनेबाबत अतिशय तपशिलवार सूचना दिल्या. या सैन्याने खक्करच्या प्रदेशातून कूच करावयाचे होते आणि अटक व हसन अब्दालच्या मार्गे

पुढे जावयाचे होते. कारण या दोन जिल्ह्यामध्यें अन्नधान्य आणि चारा यांचा भरपुर पुरवठा होता.

## सैन्याला देण्यात आलेल्या सूचना

वसंतऋतूच्या सुरवातीला काबुलचा रस्ता जाण्यायोग्य झाल्यावर राजपुत्र आणि सैन्याच्या एका विभागाने पेशावर मार्गाने कूच करावयाचे होते आणि दुसऱ्या विभागाने खालच्या बंग देशाच्या मार्गाने जावयाचे होते. या दोन विभागांचा मिलाफ काबुल येथे झाल्यावर कुलीजखान, खलील उल्ला आणि मिरजा नवरोज याने कहमर्द आणि घोरी यांचा पाडाव करावयाचा होता. तेथून संपूर्ण सैन्याने बदक्शान मध्यें प्रवेश करून तो प्रांत जिंकावयाचा होता आणि तेथून नंतर बाल्खमध्ये प्रवेश करावयाचा होता.

सैन्याला या ज्या सूचना दिलेल्या होत्या त्या शहाजहान याचा खरा उद्देश काय होता तो उघड करतात. शहाजहान याने आपल्या मनात जरी संपूर्ण ट्रान्स ऑक्सियाना नाही तरी निदान बदक्शान तरी ताब्यात घेण्याचे ठरविले होते हे अगदी उघड आहे. नजरमहमद याच्या हाती बाल्ख राहू देण्यास तो कदाचित राजी होता परंतु त्याच्या बदल्यात नजरमहमद याने मोगल सम्राटांचे सार्वभौमत्व मान्य करावे अशी त्याची अपेक्षा होती. परंतु त्याच्या अधिकाऱ्यांची उदासीनता आणि राजपुत्राचा अविचारीपणा यामुळे त्याच्या साऱ्या बेतावर पाणी पडले.

## मुरादची नाराजी

परंतु दुर्दैवाने राजपुत्र मुराद हा सुरवातीपासूनच ह्या मोहिमेविषयी आपल्या बापाइतका उत्साही नव्हता. त्याने सावकाशपणे कूच करण्यास सुरवात केली. त्यामुळे झपाट्याने कूच करून जाण्याबद्दल शहाजहानला त्याला तंबी द्यावी लागली.[२२] १५ मे १६४६ रोजी तो काबुल येथे येवून पोहोचला आणि नऊ दिवसानंतर त्याने तूलच्या रस्त्यातुन बर्फ काढून टाकण्यासाठी बहादूरखान आणि असालतखान याच्या हाताखाली एका सैन्याच्या तुकडीची रवानगी केली. २६ मे रोजी त्याने काबुल सोडले आणि तीन मजलांइतकी कूच केल्यानंतर तो चारीकारान येथे आला. येथून त्याने कुलीजखान आणि इतर यांची रवानगी घोरी आणि कहमर्द यांचा पाडाव करण्यासाठी केली आणि तो स्वतः बदक्शानकडे जाण्यासाठी निघाला.

### कुलीजखानाला मिळालेले यश

कुलीजखान आणि त्याच्या हाताखालील सैनिक यांनी एका अरुंद रस्त्यातून आपली कूच चालू ठेवली. या रस्त्यातून सैन्याच्या सबंध तुकडीला एकत्र चाल करून जाणे अशक्य झाल्यामुळे या तुकडीचे अनेक बारीक बारीक भाग पाडण्यात आले. हे सैन्य घोरबंद येथे येवून पोहोचले, त्यानी पंजशीरच्या खोऱ्यात प्रवेश केला आणि १३ जून रोजी काबुलची सरहद्द ओलांडली. सरहद्दीवर बाल्खमधून येणाऱ्या काही व्यापाऱ्यांकडून कुलीजखान याला असे कळले की, कहमर्द येथील शिबंदीला कूच करून येणाऱ्या बादशाही सैन्याबद्दल कसलीही माहिती नाही. यावर कुलीज खानाने त्यांच्यावर अचानक हल्ला करण्यासाठी अहदी आणि बंदुकची यांची एक तुकडी खलीलबेग याच्या हाताखाली रवाना केली. कोणाच्याही नजरेस न पडता खलीलबेग हा किल्ल्याजवळ येवून पोहोचला आणि भयाने गर्भगळीत झालेल्या शिबंदीने त्याला शरणागती दिली. १६ जून रोजी कूलीजखान तेथे आला. दोन दिवस त्या ठिकाणी मुक्काम केल्यावर त्याने घोरीच्या दिशेने धडक मारली. फारसा प्रयास न करता हे ठिकाण काबीज करण्यात आले.

### मुरादचे पुढे कूच करून जाणे

दरम्यान राजपुत्र मुराद तुल खिडीच्या रोखाने पुढे सरकला आणि त्याने असालतखानाच्या हाताखाली एका टेहेळणीपथकाची रवानगी केली. असालतखान हा टेकडी चढून गेला परंतु त्याला उतारावर जवळजवळ दीड गज जाडीचा बर्फ साचल्याचे आढळून आले. यावर अलीमर्दान खानाच्या सैनिकांना रस्ता साफ करण्याचा आणि त्यामधून ओझ्याने लादलेला उंट जावू शकेल इतका तो रुंद करण्याचा हुकूम देण्यात आला. हे काम अतिशय संथ गतीने चालले आणि बादशाही फौजांनी डोंगर पार करून सराबमध्ये प्रवेश केला तेव्हा १५ जून ही तारीख उजाडली होती. या ठिकाणी राजपुत्राकडे आश्रय मागण्यासाठी खुश्राव हा आला. असालतखान याने त्याचे स्वागत केले आणि नंतर तो राजपुत्र मुराद याला भेटला. मुरादने त्याची दरबाराकडे रवानगी केली.

सबंध फौजेने आता एकत्रीतपणे कूच करण्यास सुरवात केली. सराब आणि दीह-इ-ताजिकान त्यानी पार केले आणि ते नारिन येथे पोहोचले. येथून असालतखानाच्या हाताखाली एका तुकडीला पुढे घुसण्याचा आणि शत्रुकडून

कुंदूज हा किल्ला हिसकावून घेण्याचा हुकूम देण्यात आला. शहामहमद कुतघान याने मोगलांची होत असलेली प्रगती पाहुन जिल्ह्यामधे सर्वत्र लुटालूट केली आणि बायकामुलांची कत्तल करून किल्ला सोडून दिला. असालतखानाचा मार्ग आता पूर्णपणे मोकळा होता आणि त्याने २२ जून रोजी कुंदूज आपल्या ताब्यात घेतले. किल्लेदार म्हणून बादशहाने राजा राजरुप याची नेमणूक केली आणि लोकांना उत्तेजन देण्यासाठी आणि टोळीवाल्यांच्या लुटालुटीमुळे झालेल्या नुकसानीची भरपाई करण्यासाठी त्यांच्यामध्ये पंचवीस हजार रुपये वाटण्याचा हुकूम त्याने दिला.

## शहाजहान याच्या मुरादला सूचना

अशा तऱ्हेने बदक्शान हा प्रांत बादशाही फौजांच्या ताब्यात आला आणि ते बाल्खच्या पूर्व सरहद्दीवर येवून पोहोचले. याठिकाणी राजपुत्र मुराद याला बादशहाकडून एक पत्र आले. नजरमहमद याला त्याने अतिशय उदार अशी वागणूक द्यावी आणि तो जर नम्रतेने आणि शरणागतासारखे वागल्यास बाल्ख प्रांत त्याला परत द्यावा असे बादशहाने लिहिले होते. त्याशिवाय समर्कंद आणि बोखारा यांचा ताबा मिळविण्यासाठी नजरमहमद याने युद्ध करण्याची इच्छा दाखविल्यास राजपुत्राने त्याला सर्वतोपरी सहाय्य करावे असे बादशहाने कळविले होते. अशा तऱ्हेने बादशहाने आपल्या मुलाला शक्य झाल्यास बाल्खचा ताबा घेण्याची आणि व्यवहार्य असल्यास ऑक्ससच्या पलीकडे आपल्या फौजा नेण्याची प्रच्छन्न अशी सूचना दिली होती. राजपुत्राला पाठविलेल्या पत्राबरोबर नजरमहमद याला लिहिलेले एक पत्र पाठविण्यात आलेले होते आणि हे पत्र त्याच्याकडे पोहोचते करण्यात यावे असा हुकूम करण्यात आलेला होता.

## मुराद याची बाल्खमधील प्रगती

यानुसार जेव्हा राजपुत्र मुराद आणि अलीमर्दान खान हे खुल्म येथे आले तेव्हा त्यानी इशाकबेग याला बादशहाचे पत्र घेवून नजरमहमद याच्याकडे पाठविले. वरकरणी आनंद झाल्याचे दाखवत नजरमहमद याने इशाकबेग याचे स्वागत केले परंतु प्रत्यक्षात मात्र पत्रातील मजकुर वाचल्यानंतर त्याचे मनस्वास्थ्य बिघडले. तसे बघितले तर त्याची हिम्मत खचून जाण्याइतकी अतिशय गंभीर परिस्थिती होती. आपल्याला मदत करण्यासाठी म्हणून त्याने मोगल बादशहाला बोलावणे केले होते. परंतु त्याला ज्यामुळे धक्का बसला ती गोष्ट

म्हणजे त्याच्या अडचणीचा फायदा घेण्याचा प्रयत्न मोगल बादशहा करीत आहे असे त्याला आढळून आले. बदक्शानचा ताबा मोगलांनी घेतल्यावर त्याचे डोळे उघडले आणि मोठे सैन्य घेवून राजपुत्र मुराद याने केलेली प्रगती बघितल्यावर तो काही मैत्रीच्या हेतूने येत नाही याबद्दल त्याची खात्री पटली. परंतु खरी गोष्ट अशी आहे की, थोड्या फार अंशी का होईना तो निष्कारण घाबरून गेला होता. त्याचे जे सल्लागार होते त्यांची मोगलांबद्दल शत्रुत्वाची भावना होती आणि त्यानी त्याला जो धोका होता त्याचे स्वरूप निष्कारण मोठे करून सांगितले. तो जर बाल्खमध्ये राहिला असता तर त्याच्या पलायनामध्ये त्याला जो त्रास आणि मानहानी सोसावी लागली त्यापैकी थोडीफार तरी टाळता आली असती.

**नजरमहमद याची झालेली त्रेधा**

इशाकबेग याने नजरमहमद याच्या दरबारात जी घबराट उडालेली होती ती पाहिली इतकेच नव्हे तर त्याच्या अनुयायांपैकी काहीजण मोगलांबद्दल तुच्छतेने बोलत होते तेही त्याच्या कानावर आले. म्हणून त्याने राजपुत्राला तावडतोब बाल्खमध्ये येण्याची विनंती केली. वाटेमध्ये नजरमहमद याने पाठविलेल्या चुचाकबेग आणि इतर यानी राजपुत्र मुराद याची भेट घेतली आणि नजरमहमदने दिलेले पत्र त्यानी मुरादला दिले. ह्या पत्रात नजरमहमद याने मक्केला जाण्याच्या आपल्या तयारीसाठी तीन दिवसांची मुदत देण्यात यावी अशी विनंती केलेली होती. परंतु नजरमहमद याने ही काहीतरी लबाडी केली आहे अशी राजपुत्र आणि अलीमर्दान खान यांची खात्री पटली आणि म्हणून त्यानी सरळ बाल्खकडे कूच केले आणि शहरापासून चार मैल अंतरावर आपली छावणी दिली. ह्या ठिकाणी त्यांना इशाकबेग येवून भेटला आणि त्याना जो निरोप पाठविला होता त्याचीच पुन्हा त्याने री ओढली. यानंतर थोड्या काळाने बहराम आणि सुभानकुली हे दोघे जण बाल्खमधील काही अुमरावांना घेवून राजपुत्राला भेटण्यासाठी आले. मुराद याने त्यांचा योग्य तो आदरसत्कार केला.

२ जुलै गुरुवार रोजी राजपुत्राने बाल्खकडे कूच करून जाण्यास सुरुवात केली. त्याने रूस्तुमखान आणि मीरकासीम ह्यांच्या हाताखाली तोफखाना पुढे पाठविला आणि त्याना बाल्खच्या किल्ल्यांत प्रवेश करण्याचा हुकूम केला. राजपुत्राने शुतर्खवार दरवाज्याच्या समोर असलेल्या चारताकच्या जिल्ह्यात

आपला तंबू ठोकला आणि आपल्या सैनिकांना जागत राहण्यासंबंधी इशारा दिला. राजपुत्राला येऊन भेटण्यासंबंधी नजरमहमद याचे मन वळविण्यासाठी पुन्हा एकदा इशाकबेग याला त्याच्याकडे पाठविले. परंतु मोगल सैन्याच्या आक्रमक पवित्र्याने तो घाबरला आणि त्याने किल्ल्यामधून गुप्तपणे पळून जाण्याचे ठरविले. आपल्या हालचाली कोणाच्याही नजरेस येवू नयेत आणि आपला कोणी संशय घेवू नये म्हणून शक्य तेवढी काळजी त्याने घेतली. आपले मुलगे सुभानकुली आणि कतलाक महमद यांना घेवून तो किल्ल्याच्या एका दरवाज्याकडे त्याला नेता येईल तेवढा खजीना बरोबर घेवून निघाला. जरी रुस्तुमखानाने किल्ल्यात प्रवेश केला होता तरी किल्ल्याच्या आठही दरवाज्यावर पहारेकरी ठेवणे त्याला शक्य नव्हते. यापैकी एका दरवाज्यावर नजर महमद याच्याच माणसाकडे रखवालीचे काम होते आणि त्या दरवाजातूनच नजरमहमद याने पळ काढला.

### मोगलांकडून बाल्खवर ताबा

त्याच्या पलायनाची बातमी शहरामध्ये पसरली आणि या बातमीन शहरात खूपच घबराट पसरली. शहरामधील बंडखोर मंडळी ही बेताल बनली आणि त्यानी लुटालुट व जाळपोळ करण्यास सुरुवात केली. नजरमहमद याच्या खजीन्याचा बराच मोठा भाग त्यानी जबरदस्तीने ताब्यात घेतला. परंतु दुसऱ्या दिवशी खलील उल्लाखान आणि मुल्तफतखान यानी शहरात थोडीफार शांतता प्रस्थापित केली आणि ऊजबेग टोळीवाल्यांच्या तावडीतून एक कोटी वीस लक्ष रुपये इतक्या किंमतीचे जड जवाहिर आणि दागिने, पंचवीस हजार घोडे आणि तीनशे ऊंट वाचविले. हे सर्व नजरमहमद याच्या मालकीचे होते. बहराम आणि अब्दुर रहीम या त्याच्या दोन मुलांना त्यांच्या कुटुंबियांसहित लहरास्प याच्या हवाली करण्यात आले. शहराचा कोतवाल म्हणून शुकरूल्ला अरब याची नेमणुक करण्यात आली. ७ जुलै १६४६ रोजी राजपुत्राने शहरात प्रवेश केला. काही काळानंतर तिरमीजचा किल्लाही पाडाव झाला आणि अशा तऱ्हेने संपूर्णबाल्ख प्रांत मोगलांच्या ताब्यात आला.

### नजरमहमद याचा पाठलाग

नजरमहमद याच्या पलायनाची बातमी कळल्याबरोबर राजपूत्र मुराद याने बहादूरखान आणि असालत खान यांना त्याच्या पाठलागावर जाण्याचा हुकूम दिला. त्यानी त्याला शबरघान येथे गाठले आणि घनघोर

युद्धानंतर त्याचा पराभव केला. त्याने अन्दखुदकडे पलायन केले. वाटेमध्ये त्याच्या काही अनुयायांनी सुभानकुली याच्यासह त्याला सोडले आणि ते बोखाऱ्याकडे निघाले. अन्दखुद येथे पोहोचल्यानंतर नजर महमद याला ३०० सैनिकांची एक तुकडी येऊन मिळाली. त्याना बरोबर घेऊन त्याने मर्व्ह-कडे प्रयाण केले. त्याने खुरासाणमध्ये प्रवेश केला आणि तो मशहदला पोहोचला. तेथील सुभेदार मुर्तजाकुलीखान याने त्याचे स्वागत केले परंतु १५ दिवसा नंतर त्याला जेव्हा आढळून आले की नजरमहमद याचा उद्देश मैमना येथे परतण्याचा आहे तेव्हा त्याने त्याच्या घरावर पहारा करावयाचे ठरविले. या गोष्टीचे नजर महमद याला अतिशय दुःख झाले आणि शहाकडच्या औपचारीक पत्राची वाट न पाहता तो इस्फहानकडे निघाला.

### शहाजहानला झालेला आनंद

दरम्यान शहाजहानच्या कानावर बाल्खचा ताबा मोगलांकडे आल्याची बातमी पडली तेव्हा त्याला अतिशय आनंद झाला आणि त्याने आठ दिवस उत्सव करण्याचा हुकूम दिला. समर्कंद आणि बोखारा यांचा आता निश्चित पाडाव होणार असे त्याला वाटले. दरबारी मंडळीनी त्याचे अभिनंदन केले आणि ह्या प्रसंगाला अनुरुप अशा तऱ्हेचे काव्य करण्यासाठी त्यांच्यामध्ये अहमअहमीका लागून राहिली. सर्वात उत्कृष्ठ काव्य नसीराई शिराजी याचे होते आणि बादशहाने त्याची अतिशय प्रशंसा केली. ज्या अधिकाऱ्यांनी साहसाने आणि निश्चयाने आपापली कर्तव्ये पार पाडलेली होती त्याना बक्षीसी देण्याचा बादशहाने हुकूम केला. बादशहाने बहादूर खान, असालतखान, महेश-दास राठोड, रूपसिंग, रामसिंग राठोड यांच्या कामगिरीची विशेष वाखाणणी केली. त्याना मोठ्या दर्जाच्या मनसबी देण्यात आल्या. त्याचप्रमाणे इतर अनेकांना बक्षीसे आणि बढत्या देण्यात आल्या.

### मुराद याची बाल्खमधून परत फिरण्याबद्दलची विनंती

परंतु हे उत्सव समारंभ पुरे होत आहेत तोच आणि नव्याने काबीज केलेल्या प्रदेशामध्ये सुव्यवस्था प्रस्थापित होत आहे न होत आहे तोच राजपुत्र मुराद याच्याकडून जी एक विनंती आली ती इतकी चमत्कारीक होती की बादशहा त्यामुळे अतिशय विस्मयचकीत आणि संत्रस्त झाला. बाल्खमध्ये असलेल्या आपल्या एका अधिकाऱ्याच्या हाती तेथील ताबा सोपवून बाल्ख-मधून आपल्याला परत येण्याची परवानगी असावी अशी विनंती करणारे

एक पत्र मुरादने आपल्या बापाकडे पाठविले. अशा तऱ्हेची गैरवाजवी विनंती केल्याबद्दल बादशहाने अतिशय कडक शब्दात मुरादची निर्भत्सना केली आणि तो ज्या ठिकाणी होता तेथेच राहाण्याचा आणि त्या देशाचा राज्यकारभार पाहाण्याचा हुकूम त्याने त्याला दिला. त्याने त्याला आणखी असे कळविले की समर्कंद आणि बोखारा यांचा पाडाव झाल्यानंतर ट्रान्स ऑक्सियाना या प्रांताचा सुभेदार म्हणून तुझी नेमणूक करण्याची आपली इच्छा आहे. परंतु त्याच्या उज्वल भविष्याबद्दल शहाजहान याने त्याला जे कळविले होते त्याचा त्याच्या मनावर कसलाही परिणाम झाला नाही. मुराद हा अजून तरूण आणि तापट डोक्याचा होता आणि सतत कष्टाचे जीवन जगण्याची किंबहुना असे जीवन आपल्याला जगावयास लागणार आहे याची कल्पना सहन करण्याची पात्रता त्याच्या अंगी नव्हती.

राजपुत्र मुराद याने पुन्हा आपली विनंती सादर केली आणि तुम्हाला एकदा येऊन भेटल्याखेरीज आपण बाल्खमध्ये स्वस्थपणे राहु शकणार नाही असे आडमुठेपणाने त्याने शहाजहानला कळविले. बापाकडून उत्तराची वाट देखील न पाहता त्याने बहादूरखान, आणि असालत खान यांना शबरघान येथून परत बोलविले इतकेच नव्हे तर त्यांच्या मदतीसाठी तेथे गेलेल्या खलीलउल्ला खानालाही परत बोलविले. बाल्खचा राज्य-कारभार त्यांच्या हाती सोपविण्याचा आणि दरबारात परतण्याचा राजपुत्राचा निश्चय झालेला होता. त्याच्या ह्या निश्चयात त्याला बऱ्याच अधिकाऱ्यांचे उत्तेजन होते आणि हे अधिकारी असे होते की अनातिथ्यशील असलेल्या देशात चाकरी करण्यास ज्यांच्या मनाचा कल नव्हता. त्याला कारण म्हणजे त्या देशातील वारंवार बदलणारी ह्या आणि त्याच बरोबर भटक-णाऱ्या लुटारू टोळयांच्या धाडी. त्या शिवाय या अधिकाऱ्यांपैकी बहुतेकांची अशी समजुत झाली होती की बाल्खमधील मोहीम ही अगदी तात्पुरत्या स्वरूपाची आहे. परंतु जेव्हा त्यांना असे कळुन चुकले की बादशहाचा बेत त्याना तेथे कायम ठेवण्याचा आहे तेव्हा ते बिथरले आणि त्यानी तक्रारी करण्यास सुरवात केली.

## सादुल्ला खान याची शिष्टाई

शहाजहान याने राजपूत्राचे मन त्याच्या मूर्खपणाच्या बेतापासून वळ-विण्यासाठी आणि अधिकाऱ्यामध्ये बंदोबस्त आणि शिस्त प्रस्थापित करण्यासाठी सादुल्लाखान ह्याची रवानगी केली. परंतु राजपुत्र मुराद याने

आपला दुराग्रह कायम ठेवला आणि सादुल्लाखान याने जो सल्ला दिला त्याची अवहेलना केली. राजपुत्राला सेनापती पदावरून दूर करण्यात आले आणि बाल्खच्या राज्यकाभारासाठी नवी व्यवस्था करण्यात आली. बाल्खचा ताबा घेण्यासाठी बहादूर खान आणि असालत खान यांची नेमणूक करण्यात आली आणि त्याच्या हाती अमर्याद सत्ता देण्यात आली. बदक्शानची सुभेदारी स्वीकारण्यास नजाबतखान याने नकार दिल्यामुळे कुलीजखान याची त्या प्रातांवर नेमणूक करण्यात आली आणि अंदखुदचा ताबा घेण्याचा हुकूम रूस्तुम खान याला देण्यात आला. बाल्खमध्ये प्रसारात असलेली हिणकस आणि बनावट नाणी रद्द करण्यात येऊन त्यांच्या जागी नवी आणि शुद्ध नाणी पाडण्यात आली. आपण ह्या ठिकाणी कायम राज्यकरण्यासाठी आलेले आहोत याची खात्री स्थानिक रहीवाशांना पटावी म्हणून सर्वप्रकारची उपाय योजना करण्यात आली. सादुल्लाखानाने त्याच्यावर सोपविण्यात आलेली कामगिरी २२ दिवसात पार पाडली आणि ६ सप्टेंबर रोजी तो काबूलला परतला.[२५] ह्या ठिकाणी मोगल सम्राटाने राजनीतीचा जो वाकडा मार्ग स्विकारला त्याबद्दल चार शब्द लिहिल्यास ते अयोग्य ठरणार नाही. बदक्शानचा प्रांत पाडाव करून जिंकावा ही शहाजहानची आकांक्षा होती आणि नजर महमद याचे पर्शियाच्या शहाबरोबर मैत्रिचे संबंध आहेत ह्या गोष्टीची त्याला जाणीव असल्यामुळे त्याने शहाने याबाबतीत तटस्थ रहावे म्हणून जाननिसारखान ह्याची शहाकडे रवानगी केली.[२६]

### मोगल राजनीतीवर अभिप्राय

दुसरा शहाअब्बास याच्या राज्य रोहणाबद्दल त्याचे अभिनंदन करण्याच्या मिषाखाली त्याने जाननिसारखान याची रवानगी केली. जाननिसारखान हा इस्फहानच्या वाटेवर असताना वर वर्णन केलेल्या घटना बाल्खमध्ये घडल्या आणि नजर महमद हा मोगलांच्या ताब्यात आपला प्रदेश सोडून देऊन पळून गेला. धारण केलेल्या बुरख्याचे स्वरूप कायम ठेवण्यासाठी नजर महमद याला पर्शियामध्ये भेटण्याकरता म्हणून एक पत्र देऊन शहाजहान याने मिरअजीज याची रवानगी केली.

या पत्रातील मजकुराची दखल घेणे हे या ठिकाणी यथायोग्य ठरेल. पत्राच्या सुरूवातीला राजपुत्र मुराद हा बाल्ख जवळ आल्यानंतर त्याच्या भेटीला नजर महमद याने सुभानकुली आणि बहराम सुलतान याना इतर

जेष्ठ अधिकाऱ्यांबरोबर पाठविले त्याचा उल्लेख आहे. पत्राचा दुसरा परिच्छेद माफीवजा दुसऱ्या शब्दात लिहीलेला आहे तो अतिशय उद्बोधक असा आहे. "जेव्हा राजपुत्राने बाल्खच्या समोर आपली छावणी दिली तेव्हा त्याचे तरुणवय आणि अनुभवाचा अभाव व त्याचप्रमाणे त्याच्याबरोबर असलेल्या जेष्ठ मंडळींचा आळशीपणा आणि निष्काळजीपणा यामुळे आपला किल्ल्यात मुक्काम असताना रूस्तुम खानाने किल्ल्यामध्ये प्रवेश करण्यासारख्या अशा काही घडु नये अशा गोष्टी घडल्या. ह्या गोष्टीमुळे तुम्हाला अतिशय दुःख आणि भिती वाटली असल्यास तें मी समजू शकतो आणि ते ऐकून मला अतिशय खेद होत आहे... परंतु तुम्ही आमच्याकडे परत याल आणि इतर कोठेही जाणार नाही अशी माझी अपेक्षा होती... परतु संकल्पापेक्षा प्रारब्ध हे अधिक बलवत्तर असते. बाल्ख मधील बंडखोरी करणाऱ्या लोकांचा बिमोड करावा आणि तो प्रांत तुमच्या स्वाधिन करावा आणि इतकेच नव्हे तर ट्रान्स ऑक्सियाना आपण पुन्हा जिंकून घ्यावा अशी जेव्हा तुमच्या मनाला इच्छा होईल त्यावेळी तुम्हाला मदत करण्यासाठी माझे सैन्य तुमच्या दिमतीस घ्यावे अशी माझी इच्छा होती". शहाजहान याने पत्राचा समारोप मित्रभाव प्रदर्शित करून केला आहे आणि नजर महमद ह्याच्या कुटुंबीय मंडळींना नजरमहमद सांगेल त्या ठिकाणी पाठविण्याची त्याने तयारी दाखविली आहे.

परंतु नजर महमद याच्याबद्दलची मैत्रीची भावना आणि त्याच्याबद्दल व्यक्त केलेली काळजी यांचे स्वरूप केवळ औपचारिक होते. खरी वस्तुस्थिती अशी होती की परिस्थितीने जी पलट खाल्लेली होती त्याचा बादशहाला अतिशय आनंद झालेला होता. वर जे पत्र उद्धृत केलेले आहे त्याची विचारसरणी पाहता आपण जर असे अनुमान काढले की नजर महमद पर्शियामध्ये पळुन गेल्यामुळे त्याचा देश आपण ताब्यात घेणे समर्थनीय ठरते असा शहाजहान याने विचार केला तर त्यात काहीच चूक होणार नाही. शहाजहानने पत्रात उल्लेख केला आहे तो भूतकाळातील त्याच्या थोर विचारसरणीचा. परंतु भविष्यकाळामध्ये घडणाऱ्या गोष्टींबद्दल त्याने कसलीही आशा दाखविलेली नाही. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास शहाजहानला जर खरोखरच मनाचा उदारपणा दाखवावयाचा असता तर त्याला आताही नजर महमद याला स्पष्टपणे कळविता आले असते की जर तु परत आलास तर तुझा देश तुझ्या परत स्वाधीन करण्यात येईल.

परंतु त्याने अधिकाधिक वचन जे दिले ते नजर महमद याच्या कुटुंबातील मंडळींना परत पाठविण्याचे. शहाजहान याने अर्सलान बेग याच्यातर्फे दुसऱ्या शहाअब्बास याला जे पत्र पाठविले त्यामध्ये त्याचा दुटप्पीपणा उघडकीस येतो.

**बाल्खमधील अडचणी**

बाल्ख आणि बदक्शान हे प्रांत जिकून घेणे हे त्यातल्या त्यात सोपे होते. परंतु या प्रदेशावर राज्यकारभार करणे ही जो समस्या होती त्या समस्येने मोगल अधिकाऱ्यांची कार्यक्षमता पणास लावली. सबंध राष्ट्र त्याच्या विरुद्ध हातात शस्त्र घेऊन उभे ठाकलेले त्याना आढळून आले आणि संख्याबळ आणि शिस्त यामध्ये वरचढ असताना देखील कपट कलेत निष्णात असलेल्या उजबेग टोळीवाल्यांना ताब्यात ठेवणे त्याना शक्य झाले नाही. त्यानी जी नाकी उभारली होती ती उजबेगांच्या हल्ल्याच्या सतत दडपणाखाली होती. इतकेच नव्हे तर बादशाही सैन्याच्या अनेक विभागांना वेढयाच्या परिस्थोतीत जीवन जगण्याची पाळी आली होती. शत्रूबरोबर त्यांच्या वारंवार लढाया होत परंतु या चकमकी कधीही निर्णायक ठरत नसत. अधूनमधून या ज्या चकमकी होत त्यांची सविस्तर हकीकत देण्याची जरी आवश्यकता नसली तरी एकंदर परिस्थितीचे यथार्थ आकलन होण्यासाठी या चकमकींची थोडक्यात रूपरेखा देण्यास काहीच हरकत नाही.

मोगलांच्या ताब्यातील काबूलचा प्रांत हा हिंदूकुश पर्वताच्या रांगेपर्यंत पसरलेला होता. या प्रांताचे सीमेवरील नाके पर्वतराजींच्या पलीकडील बमियान हे होते. बाल्ख आणि बदक्शान यांचा पाडाव झाल्यामुळे मोगल साम्राज्याच्या सीमा या ऑक्सस नदीचा दक्षिण किनारा आणि तशाच पुढे आबि पंजापर्यंत भिडल्या होत्या. बाल्खचा प्रांत हा सपाट आणि मैदानी प्रदेश होता. तर बदक्शान मधे अधूनमधून टेकडया पसरलेल्या होत्या आणि या टेकडयांच्या उतारांवर जोरदार प्रवाह असलेले ओढे धावत होते. या दोन प्रांतांच्या संरक्षणासाठी बादशाही अधिकाऱ्यांनी जी तरतूद केलेली होती ती डावपेचांच्या दृष्टिने अतिशय अपुरी होती. जवळजवळ पूर्णपणे समांतर असणाऱ्या दोन ओळीत मोगलांनी आपली तीन ठाणी प्रस्थापित केली. एक ठाणे हजरत इमाम पासून बदक्शानच्या पश्चिम सीमा ओलांडून हिंदूकुश मधिल खंजान आणि इन्द्राब पर्यंत गेलेले होते; आणि दुसरे जरा कमी पसरलेले ठाणे अन्दखुदहून सुरू होऊन शबेरघान मधून जातजात बुंद-इ-तुर्कीस्तानच्या रांगामधील सरखुल

येथे पोहाचले होते. बुंद-इ-तुर्कीस्तानच्या रांगापलीकडे अगदी पश्चिमसीमेवरील मोगलांचे ठाणे म्हणजे मैमनाचे होते. अशा तऱ्हेने बाल्खचा प्रांन्त या दोन ओळींच्यामधे बंदिस्तपणे घेरला गेलेला होता.

मोगल सैन्याच्या मांडणीमधील जो कच्चा दुवा होता तो म्हणजे जरी मोगलांनी पश्चिम सरहद्द सुरक्षित राहील याबद्दल आणि त्याचप्रमाणे अंतर्गत शांततेबद्दल जरूर ती उपाययोजना केलेली असली तरी देखील त्यानी त्यांची उत्तरेकडील अतिशय मर्मभेद्य संरक्षण फळी म्हणजे ऑक्सस नदी तिच्या संरक्षणाकडे यत्किंचितही लक्ष पुरविले नव्हते. तेथे मजबूत अशी ठाणी फारच थोडी होती. आकचा, खुल्म आणि कुंदूज ही ठाणी तसे पाहिले तर बरीचशी दक्षिणेच्या बाजूला होती. सारांश उजबेग आणि इतर भटक्या जमातींच्या इतस्तत: भटकणाऱ्या टोळ्यांना बाल्खमधे शिरण्याचा आणि मोगल अधिकाऱ्यांना जेरीस आणण्याचा मार्ग मोकळा होता. त्याशिवाय नवीन जिंकलेल्या प्रदेशातील रहिवासी हे स्वत: देखिल शांतताप्रिय अथवा कायद्याचेही पालन करणारे नागरिक नव्हते. त्यांचे नव्याने आलेल्या राज्यकर्त्यांपेक्षा त्यांच्या उत्तरेकडील भाईबंधांबरोबर अधिक साम्य होते.

### टोळीवाल्यांचा उठाव

बादशाही अधिकाऱ्यांकडून वरील प्रमाणे कारवाया जरी चालू होत्या तरी त्यांचे हाल चालूच होते. कुंदूजचा पाडाव पुरा होत आहे न होत आहे तोच उजबेगांच्या एका टोळीने त्या ठाण्यावर हल्ला चढविला. हा हल्ला राजा राजरूप याने परतवून लावला. यानंतर त्यांच्या तडाख्यात सापडले ते अंदखूदचे ठाणे. या ठाण्यावर अशाच एका टोळीने हल्ला चढविला. हा हल्ला रूस्तुमखानाने परतवून लावला. अशा तऱ्हेने मोगलांनी उभारलेल्या दोन्ही संरक्षक रांगातील जवळजवळ प्रत्येक ठाणे उजबेगांच्या दबावाखाली तरी आले किंवा त्यानी ते लुटले तरी. पश्चिमेकडे त्यानी थेट शबेरघानपर्यंत आणि पूर्वेकडे खंजनपर्यंत आपल्या लुटमारीचे सत्र नेले. त्यानी बाल्खच्या अगदी सीमेपर्यंत कूच केले आणि रूसताख, कुंदूज आणि खानाबाद या बदक्शानच्या उत्तर जिल्ह्यातील गुरेढोरे वारंवार पळविण्याचा उपक्रम सुरू केला. अतिशय भयानक अशी थंडी आणि अशा थंडीसमवेत अनुषंगाने येणाऱ्या इतर गोष्टी यामुळे बादशाही फौजांच्या अडचणीत आणखी भर पडली. त्याशिवाय त्यांच्या शत्रूप्रमाणे अतिशय जलद हालचाली करणे त्याना जमत नव्हते आणि परिणामी शत्रूच्या थोड्या

फार माणसाना ठार करण्यापलीकडें इतर कोणतीही कारवाई त्यांच्या हातून होत नव्हती

**सरसेनापतीपदाची उणीव**

मोगलांनी संरक्षणाची जी व्यवस्था केली होती त्यामधे आणखी एक दोष होता आणि त्याचा त्यांच्या एकंदर संघटनेवर फार मोठा परिणाम झाला. हा दोष म्हणजे सैन्याचे सर्वाधिकार असलेल्या सरसेनापतीची नेमणूक झालेली नव्हती. बहादूरखान, असालतखान, कुलीजखान, आणि रूस्तुमखान या सर्वांचा दर्जा जवळजवळ सारखा होता, आणि व्यक्तिशः त्यांच्यापैकी प्रत्येकजण हा जरी शूर, कार्यक्षम आणि मेहेनती होता तरी सर्वांनी एकत्र येऊन एकादी समान योजना आखण्याचे त्याना कधिच जमले नाही. शहाजहानला या गोष्टींची पूर्णपणे जाणीव होती आणि म्हणूनच मुरादने तिकडे रहावे याबद्दल त्याने आग्रह धरला. अली मर्दान खान याची सर सुभेदार म्हणून त्याला-नेमणूक करता आली असती, परंतु बाल्खच्या रहिवाशांमधे तो कितपत लोकप्रिय होईल याबद्दल शंकेला जागा होती. शेवटी, अखेरचा उपाय म्हणून त्यान संपूर्ण प्रदेश निरनिराळ्या अधिकाऱ्यांमधे वाटण्याची योजना अमलात आणली. पण ही योजना अपयशी ठरली. अशा परिस्थितीत आपली सर्व फौज बाल्ख-मधून काढून घेणे आणि तो देश आणि त्याचे नशिब असे म्हणून स्वस्थ बसणे हा मार्ग शहाजहानच्या दृष्टिने शहाणपणाचा ठरला असता. परंतु महत्वाकांक्षेच्या पोटी दूरदर्शिपणा आणि सावधगिरी या गोष्टींकडे त्याने दुर्लक्ष केले आणि प्रतिष्ठेच्या खोट्या कल्पनेला बळी पडून आपल्या वाडवडिलांच्या पूर्वापार ताब्यात असलेल्या प्रदेशावर आपला ध्वज फडकावित ठेवण्यासाठी त्याने अतिशय निकराचे प्रयत्न केले.

यानुसार त्याने बाल्खमधे शांतता पुन्हा प्रस्थापित करण्यासाठी राजपुत्र औरंगजेब याची मोहिमेच्या नेतेपदी नेमणूक केली.[२९] बादशहाने अतिशय मोठ्या प्रमाणावर मोहिमेची तयारी केली, मोठमोठ्या रकमा काबूलकडे रवाना केल्या आणि इशाऱ्याचा पहिला शब्द येताच कूच करण्याची तयारी असावी या हेतूने पेशावरपासून काबूलपर्यंत मोक्याच्या सर्व ठिकाणी त्याने प्रचंड सैन्याची जमवाजमव केली. राजपुत्राने ७ एप्रिल १६४७ रोजी काबूलहून प्रयाण केले आणि कहमर्दच्या दिशेने कूच केले. दर्रा-इ-गज येथे कुतलुक महमद खानाच्या अधिपत्या खालील अल्राखानींनी त्याचा जाण्याचा मार्ग अडवून धरला. पण थोडयाशाच चकमकी-

नंतर त्याना उधळून लावण्यात आले. बादशाही फौजांची प्रगती रोखून धरण्याच्या हेतूने त्यानी त्यांच्या बगलेसभोवार घिरट्या घालण्याचा उपक्रम सतत चालू ठेवला परंतु राजपुत्र औरंगजेब आणि अली मर्दान खान यांनी यशस्वीपणे त्याना परतवून लावले आणि आपल्या इप्सिताकडे आगेकूच चालू ठेवली. २५ मे रोजी ते बाल्ख येथे पोहोचले.

अबदुल अजीज खान याची सत्ता आता ट्रान्स ऑक्सियानामधे मजबूतपणे स्थिरावली होती. त्याच्या कानावर जेव्हा दक्षिणेकडून मोगलांचे प्रचंड सैन्य चाल करून येत असल्याची बातमी पडली तेव्हा त्याने बाल्खमधून मोगलांना हुसकावून लावण्यासाठी एक मोठा प्रयत्न करण्याचा निश्चय केला. त्याने एक लाख वीस हजार इतक्या प्रचंड सैन्याची जमवाजमव केली आणि ऑक्सस नदीवर आपला तळ दिला. मोगलांची प्रगती रोखून धरण्यासाठी त्याने एका सेनाविभागाची कुतलुक महमद याच्या हाताखाली रवानगी केली आणि बेग उघली याच्या हाताखालील दुसऱ्या एका सेनाविभागाला, नदी ओलांडून अकचाकडे कूच करण्याचा आणि बाल्ख व अन्दखूदचे सीमेवरील ठाणे यांच्यामधोमध आपला तळ देण्याचा त्याला हुकूम दिला. बेग उघली याने कलीफ येथे नदी ओलांडल्याचे जेव्हा बहादुरखानाच्या कानावर पडले तेव्हा त्याला हुसकावून लावण्यासाठी त्याने कूच केले परंतु राजपुत्र औरंगजेबाने त्याला परत बोलविले.

३१ मे १६४७ रोजी शत्रू ठाण मांडून बसलेल्या त्याच्या नव्या मोर्चापासून त्याला हुसकावून लावण्यासाठी राजपुत्राने आपल्या सर्व सैन्यासहित कूच केले. बादशाही सैन्याच्या हालचाली अतिशय सावध गिरीने चाललेल्या होत्या· बहादूरखान हा आघाडीवर होता. "हत्तीवर बसलेला औरंगजेब याच्याकडे सेनेच्या मध्यभागाचे नेतृत्व होते आणि सैन्याच्या या मधल्या फळीने सामानसुमान आणि बाजारबुणगे यांना आपल्या पोटांत घेतले होते. सैन्याची पिछाडी अली मर्दान खान याने सांभाळली होती. तोफखाना पाठीशी असलेल्या पायदळी बंदुकचीनी सैन्याच्या आगेकुचीचा मार्ग मोकळा करण्याचे काम जारी ठेवले होते. आवतीभोवती घिरट्या घालणाऱ्या उजेबेगांबरोबर सातत्याने लढत मोगल फौजा पुढे घुसल्या आणि दर्रा-इ-गज येथे पराभव झाल्यानंतर बेग उघली याला जाऊन मिळालेल्या कुतलुक महमद याची छावणी त्यानी लुटली. परंतु शत्रूने बादशाही फौजेच्या डाव्या फळीवर हल्ला केला. या फळीचे सेना-

पतिपद वृद्ध आणि दुबळचा अशा सईदखान बहादूर जफर जंग याच्याकडे होते. उजबेगांच्या दबावाखाली बादशाही फौजेची फळी फुटली. परंतु औरंग-जेब ऐन मोक्याचे वेळी त्यांच्या मदतीसाठी आल्यामुळे या सेनाविभागाचा संपूर्ण नाश होण्यापासून बचाव झाला.

अतिशय भयंकर हालअपेष्टा होत असताना देखिल मोठया चिकाटीने मोगल फौजेने आपली आगेकूच चालू ठेवली. अली मर्दानखान याचे कौशल्य व सेनानेतृत्व यामुळे अनेक आपत्तींपासून मोगलसैन्य सहीसलामत सुटले. अखेर मोगल फौजा पाशाईजवळ येऊन पोहोचल्या. तेथे औरंगजेबाने शत्रूच्या छावणीचा जबरीने ताबा घेतला आणि शत्रूने जबरीने पकडून कैदेत ठेवलेल्या शेतकरी लोकांची सुटका केली. दरम्यान बाल्खवर हल्ला करण्यासाठी सुभान कुली याने मोठया फौजेनिशी कूच केले. त्याला तोंड देण्यासाठी जून ५ ला औरंगजेबाने पाशाईहून माघार घेतली आणि दोन दिवसानंतर बोखाऱ्याच्या सर्व सामर्थ्यानिशी आलेल्या सैन्याला तो भिडला. बोखाऱ्याच्या सैन्यात अबदुल अजीज, सुभान कुली, बेग उधली आणि इतर प्रमुख सेनानी हजर होते. त्यानी बादशाही फौजेच्या तीन मोक्याचे ठिकाणांवर आपल्या हल्ल्याचा रोख ठेवला. परंतु पुन्हा एकदा मोगलांना त्यांचा तोफरवाना आणि त्यांची वरचढ शिस्त यामुळे विजयश्रीने माळ घातली आणि जून ११ रोजी औरंगजेब सुरक्षितपणे बाल्खला परतला.

राजपुत्र औरंगजेब याची धीरगंभीर चिकाटी बघितल्यानंतर शत्रूच्या हृदयात भितीने धडकी भरली आणि अबदुल अजीज याने तहाच्या वाटाघाटी व्हाव्यात अशी इच्छा प्रकट केली. "औरंगजेबाला चिरडून टाकण्याच्या त्याच्या आशा आकांक्षाना मूठमाती मिळाली होती. राजपुत्राच्या अंगी जे असामान्य साहस वास करीत होते त्याचा मनात भरणारा असा पुरावा त्याने प्रत्यक्ष आपल्या डोळयानी पाहिला होता. कारण एक दिवस युद्ध अगदी ऐन भरात आलेले असताना संध्याकाळचे नमाज पढण्याची वेळ येऊन ठेपली. औरंगजेबाने आपली चटई जमिनीवर पसरली, गुढघे टेकून तो वाकला आणि आजूबाजूला चाललेली धामधूम आणि धुमश्चक्री यांची कसलीही तमा न बाळगता त्याने शांतपणे आपले नमाज पढण्याचे काम पुरे केले. सबंध मोहिमेच्या काळात तो जसा चिलखत आणि शिरस्त्राण याशिवाय होता तसाच तो यावेळीही होता. या दृश्याकडे बोखाऱ्याचे सैन्य विस्मयचकित

होऊन एकटक पहात होता. ते पाहून अबदुल अजीज याने औरंगजेबाची अतिशय मुक्त कंठाने प्रसंशा करून युद्ध थांबविले आणि तो उद्गारला की अशा माणसाबरोबर युद्ध करणे म्हणजे आत्मनाशाला निमंत्रण देण्यासारखे आहे.

परंतु तहाची बोलणी करण्यास ज्या परिस्थितीने अबदुल अजीज याला भाग पाडले त्याला कारण औरंगजेबाचे निव्वळ शौर्यच झाले असे नाही. अबदुल अजीज याच्या स्वतःच्या फौजेत बव्हंशी भटक्या जमातीमधिल टोळीवाल्यांचाच भरणा होता आणि मोगलांबरोबरील लढाईत त्याला अपयश आलेले दिसताच त्यांनी त्याच्यापासून पोबारा केला. विशेषतः तुर्कोमानानी आपले घोडे विकले आणि ऑक्सस नदी पलीकडे त्यानी पळ काढला. म्हणून अबदुल अजीज याने बोखारा हे आपला धाकटा भाऊ सुभान कुली याला परत देण्यात यावे असा प्रस्ताव औरंगजेबापुढे मांडला. औरंगजेबाने हा प्रश्न आपण बादशहाकडे निर्णयासाठी पाठवू असे जेव्हा त्याला वचन दिले तेव्हा अबदुल अजीज हा आपल्या देशाकडे जाण्यासाठी परत फिरला. दरम्यान बाल्खच्या भूतपूर्व सुलतानाने अशाच तऱ्हेची विनंती शहाजहानकडे रवाना केली.

नजर महमद याने शबेरघानहुन माघार घेतल्यानंतर इस्फहानकडे कूच केले. तेथे त्याचे शहाने मोठ्या शाही इतमामाने स्वागत केले. आपल्या पाहुण्याच्या सन्मानार्थ दुसऱ्या अब्बासने अनेक मेजवान्या दिल्या आणि नजर महमद याने आपली व्यथा विसरावी म्हणून आपल्या परीने सर्व प्रयत्न केले. परंतु आपल्याशी दगाबाजी करणाऱ्या आपल्या माणसावर सूड उगविण्या-साठी नजर महमद हा अतिशय उतावीळ झाला होता आणि त्याने आपल्याला मदत देण्यासाठी शहाची वारंवार मनधरणी केली. यावर दुसऱ्या शहा-अब्बास याने त्याच्याबरोबर खुरासानी आणि इराकी फौजा देऊन सारूखान तावीश याची रवानगी केली. दरम्यान नजर महमद याला काही उजबेग प्रमुखानी मित्रत्वाचे पाठविलेले संदेश मिळाले आणि म्हणून त्याने पर्शियन सेनाप्रमुखाला पाठीमागे ठेऊन मेर्व्हकडे कूच केले. या शहराचा सुभेदार अली कुली खान याच्याबरोबर त्याचे वितुष्ट असल्यामुळे त्याने शहरात प्रवेश न करता मेर्व्हपासून आठ मैल अंतरावर आपली छावणी दिली.

येथे त्याला कफ्श कलमाक हा येऊन मिळाला. त्याने त्याला बोखा-ऱ्याकडे घाईघाईने कूच करून जाण्याविरुद्ध आणि त्याला पकडण्याची इच्छा असलेल्या त्याच्या उजबेग मित्रांच्या कपटी बेताविरूद्ध इशारा दिला.

यामुळे बोखाऱ्याकडे कूच करून जाण्याचा बेत नजर महमद याने सोडून दिला आणि कफ्श कलमाक बरोबर त्याने माउचाककडे कूच केले. तेथे कलमाक जमातीचे लोक मोठ्या संख्येने त्याच्या अधिपत्याखाली गोळा झाले. आपल्या या दोस्तांच्या सहाय्याने त्याने मोगलांना त्यांच्या चैचाकटू आणि मैमना या ठाण्यावरून हुसकावून लावण्याचा अनेकवार प्रयत्न केला. परंतु प्रत्येक वेळी त्याना पराभव पत्करावा लागला. औरंगजेब प्रचंड सैन्यानिशी चाल करून येत आहे ह्या बातमीने त्याचा धीर सुटला. नजर महमद याने त्यामुळे वेलचिराघच्या दिशेने माघार घेतली. तथापि जेव्हा त्याला कळले की मोगल हल्लेखोरांना परतवून लावण्यासाठी अबदुल अजीज हा कूच करून जात आहे तेव्हा त्याने बाल्खवर अचानक हल्ला करण्यासाठी कुतलुक महमद याला काही फौज हाताखाली देऊन रवाना केले. परंतु त्याचे सैनिक अबदुल अजीज याच्या माणसाना जाऊन मिळाले.

साहजिकच अशा परिस्थितीत अबदुल अजीज आणि औरंगजेब यांच्यामधिल लढ्याची परिणती काय होते याच्याकडे डोळे लावून बसण्याशिवाय नजर महमद याला दुसरा काहीच मार्ग उरला नाही. आपल्या मुलाच्या पदरात अपयश पडलेले बघितल्यानंतर नजर महमद याने आपला देश पुन्हा आपल्या ताब्यात परत मिळावा यासाठी वाटाघाटींना सुरवात केली. बाल्खवर आपला ताबा ठेवणे अशक्य आहे याबद्दल आता शहाजहान याची खात्री पटली होती. बराच विचारविनिमय केल्यानंतर त्याने नजर महमद आणि त्याचा मुलगा सुभान कुली या दोहोपैकी नजर महमदच्या बाजूने आपला कौल देण्याचे ठरविले. परंतु त्याअगोदर पहिल्या प्रथम नजर महमद याच्याकडून क्षमायाचना आणि संपूर्ण शरणागती मिळवावी असा हुकूम बादशहाने औरंगजेबाला दिला. तथापि नजर महमद याने वाटाघाटी निष्कारण लांबविल्या आणि आजारीपणाचे सबबीवर त्यासाठी आपल्या नातवंडाना पाठविले व स्वत: जाण्याची टाळाटाळ केली. औरंगजेबाला यावरच समाधान मानून घ्यावे लागले कारण थंडीची चिन्हे दिसू लागली होती आणि त्याच्या सैन्यापुढे दुष्काळ आवासून उभा होता. अशा परिस्थितीत ३ ऑक्टोबर १६४७ रोजी त्याने बाल्खमधून माघार घेतली.

**नजरमहमद याचे अखेरचे दिवस**

नजर महमद याचे पुढे काय झाले हे याठिकाणी थोडक्यात सांगण्यास काहीच हरकत नाही. आपले राज्य जरी त्याने परत मिळविले तरी त्यानंतर

फार काळ काही त्याला त्याचा मुलगा अबदुल अजीज याने शांतता लाभू दिली नाही. काही काळपर्यंत बाल्खचे प्रजाजन त्याच्याशी राजनिष्ठ राहिले. परंतु सातत्याने चालू असलेल्या भांडणांचा अखेर त्याना कंटाळा आला आणि ते त्याचा पक्ष सोडून त्याच्या मुलाला जाऊन मिळाले. सरते शेवटी नजर महमद याने सिंहासनासाठी चाललेल्या झगड्यातून अंग काढून घेण्याचे ठरविले आणि आपल्या आयुष्याचे अखेरचे दिवस तरी शांततेने घालविता यावे यासाठी मेदिना येथे जाण्याचा त्याने मनाशी निश्चय केला. आपल्या मुलाबाळां-बरोबर पुन्हा मनमिळवणी व्हावी आणि त्याना आपले आशीर्वाद द्यावे अशी त्याची इच्छा होती. परंतु पितृवात्सल्याच्या भावनेच्या त्याच्याकडून होणाऱ्या या अविष्काराला प्रतिसाद देण्याला सुभान कुली याने नकार दिला. निरा-शेमुळे मनोभंगाचे दुःख बरोबर घेऊन नजर महमद याने आपल्या यात्रेला सुरवात केली. परंतु वाटेत १६५० मधे सिमनान येथे तो मरण पावला. जोपर्यन्त बाल्खमधे त्याच्या हातात सत्ता होती तोपर्यन्त त्याने मोगल सम्राटाबरोबर स्नेहपूर्ण सबंध ठेवले. त्याच्या दरबारातून मोगलांकडे वकिलांचे आगमन झाल्याचे उल्लेख आपल्याला सातत्याने मिळतात.

## उपसंहार

या नंतरच्या ट्रान्स ऑक्सियानाच्या इतिहासाला मोगल दरबार आणि त्याची धोरणे यांच्या दृष्टिने फारसे महत्व उरत नाही. बाबर याने ट्रान्स ऑक्सियाना हा देश जिंकण्याचे जे साहस केले त्यानंतर तीमूरच्या ताब्यातील मूळचा प्रदेश आपल्या साम्राज्याला जोडण्याचा त्यानंतर झालेल्या मोगल बादशहांपैकी शहाजहान याने केलेला हा पहिलाच विचार पूर्वक प्रयत्न होता असे म्हणावे लागेल. हा प्रयत्न फसला याचे पहिले कारण म्हणजे जरी शहाजहान याला त्याबाबत अतिशय कळकळ होती तरी शहाजहान याचे बहुसंख्य अधिकारी इतक्या लांबच्या प्रदेशात आणि अतिशय जीवघेण्या अशा हवामानात आपले आयुष्य घालविण्याच्या नुसत्या कल्पनेलाच विरोध करीत होते. हे अधिकारी आणि बाबरचे अधिकारी यांच्यामधील विरोधाभास हा यामुळे अतिशय उघडपणे दिसून येतो. बाबरचे अधिकारी हे चामड्याचा कोट अंगावर घालून लढणारे कणखर असे योद्धे होते आणि हिंदुस्तानच्या अत्यंत उष्ण अशा मैदानी प्रदेशात आपण आपले शारीरिक सामर्थ्य गमावून बसू याची त्यांना सारखी भिती वाटत होती. या गोष्टीमुळेच शहाजहान याच्या अधिकाऱ्यांचे अतिशय समर्पक असे वर्णन मलमलीच्या झग्यामध्ये

दडलेली निस्तेज चेहऱ्याची माणसे असे केलेले आपल्याला आढळते. बाल्खचा प्रांत आपल्या ताब्यात ठेवण्यात मोगलाना अपयश आले याचे आणखी एक कारण म्हणजे तेथील लोकांची सहानुभूती जेते म्हणून मोगलांना आपल्याकडे वळवून घेता आली नाही. ट्रान्स ऑक्सियानाचे रहिवाशी अजून मानवी संस्कृतीच्या भटक्या अवस्थेत होते आणि म्हणूनच ते आपल्या पुढाऱ्यांना हेकेखोरपणे चिकटून राहिले. याच भूमिकेवरून शहाजहान याने बदक्शान प्रांताचे सरकार नजाबतखान याला देऊ केले कारण या प्रांतावर त्याच्या पूर्वजांनी पूर्वी राज्य केलेले होते. मोगलांना अपयश येण्याचे शेवटचे कारण म्हणजे उजबेग आणि छगताई या जमातींमध्ये जे पिढीजात वैर चालत आलेले होते त्यामुळे बादशाही फौजांना हाती शस्त्र घेऊन उभ्या ठाकलेल्या साऱ्या राष्ट्राला तोंड द्यावे लागले. सहाजिकच त्यांचा तेथे फार काळ टिकाव लागू शकला नाही. सारांश आपले स्वप्न प्रत्यक्षात उतरविण्याच्या प्रयत्नात मोगल बादशहाला फार मोठी किंमत द्यावी लागली.

# तळटीपा

## प्रकरण ८ वे

(१) Rush Brook Williams, 'An Empire Builder of the Sixteenth Century' p. 102

(२) R. B., Vol. I, p. 89

(३) हस्तर खानाच्या प्रदेशाचा ताबा रशियनांनी घेतल्यानंतर यार महमद हा ट्रान्स ऑक्सिथानाकडे निघून आला असे विधान लाहोरीने केले आहे (खंड १, पान, २१७); Vambery, 'History of Bnokhary' p. 305

(४) Vambery; p. 305, Howarth, 'History of the Mongols', Vol. II, Div. II, p. 744

(५) कजवीनी, पान १६२.

(६) कजवीनी, पाने १५० आणि १५१; लाहोरी, खंड १, पान १९३.

(७) पहा प्रकरण ५.

(८) कजवीनी, पाने १५५-५८; लाहोरी, खंड १, पाने २०६-१५.

(९) कजवीनी, पाने १६५-१६७ ब; लाहोरी खंड१, पाने २६०–६१.

(१०) कजवीनी, पान १७६ ब; लाहोरी, खंड१, पान २०१.

(११) कजवीनी, पान २५१ ब; लाहोरी, खंड१, पान ३१.

(१२) कजवीनी, पान २६५; लाहोरी, खंड १, पाने ४६५-७२.

(१३) लाहोरी, खंड २, पान १३९.

(१४) लाहोरी, खंड २, पान १५४.

(१५) लाहोरी, खंड २, पाने २५२-५६; नजरमहमदखानाच्या इमाम कुली बरोबरच्यावागणुकीची तुलना ताहिर वहिदने जोसेफच्या भावांबरोबर केली आहे (पान२६). तो पुढे असे सांगतो की इमाम कुली याला मदत न करण्याबद्दल नजर महमद याने शहाला केलेली विनंती झिडकारून लावण्यांत आली (पान १६). इमाम कुली याच्या अधःपतनाबद्दल अशाच तऱ्हेची हकीकत खुल्द-इ-वरीनमधे आपल्याला आढळते (पाने १६५-६८). इमामकुली याचे पर्शियामधे झालेले आगमन आणि त्याचे तेथे झालेले आदरातिथ्य याचा उल्लेख वली कुली शामलू हा देखील करतो.

(१६) लाहोरी, खंड २, पाने ५३४-५६.

(१७) लाहोरी, खंड २, पान ४१६.

(१८) लाहोरी, खंड २, पाने ४५६-५८.

(१९) हा दृष्टिकोन पर्शियाच्या इतिहासकारांनी उचलून धरला आहे. पहा खुल्द-इ-बरीन, पान १८३; ताहिर वहीद, पान ५६ ब; कासिस, पान ५२ ब.

(२०) लाहोरी, खंड २, पान ४७९.

(२१) लाहोरी, खंड २, पाने ५३०-३२.

(२२) लाहोरी, खंड २, पान ५०२.

(२३) लाहोरी, खंड २, पाने ५२०-२५,.

(२४) लाहोरी, खंड २, पाने ५२५-५५.

(२५) लाहोरी, खंड २, पाने, ५५६–६५.

(२६) लाहोरी, खंड २, पान ४९२.

(२७) लाहोरी, खंड २, पाने ५७२-७७.

(२८) लाहोरी, खंड २, पानें ६१३–२४, ४६२–५८

(२९) औरंगजेबाच्या बाल्खवरील मोहिमेसाठी पहा. Sarkars' 'Aurangzib', Vol. I, Chapter V.

## प्रकरण नववे

# पर्शियाबरोबरील संबंध

ज्यावेळी आपण मोगल सम्राटांच्या परदेशी धोरणाबद्दल चर्चा करतो त्यावेळी त्यामधे मोगलांचे ट्रान्स-ऑक्सियाना आणि पर्शिया या दोन देशाबरोबरील संबंध आपल्याला अभिप्रेत असतात. यापूर्वीच्या प्रकरणांत ट्रान्स ऑक्सियानबरोबरील संबंधाचे वर्णन करण्यात आलेले आहे. आता आपण मोगलांच्या पर्शियाबरोबरील संबंधींची चर्चा करू. पर्शियाबरोबरील संबंधाबाबत आपल्याला असे दिसून येईल की जरी चगताई सम्राटांनी पर्शियाबरोबरील संबंधात दोस्ती आणि सदिच्छा या भावना प्रकट केल्या आणि या भावनाना पर्शियाच्या सफवीद सम्राटांनी तशाच तऱ्हेने प्रतिसाद दिला, तरी देखील या दोन्ही घराण्यांतील सम्राट परस्परांबद्दल मत्सर आणि अविश्वास बाळगून होते हे दाखविण्यास भरपूर पुरावा उपलब्ध आहे. पर्शियाच्या दरबाराच्या बाबतीत बोलावयाचे झाल्यास हिंदुस्थानच्या सम्राटांच्या भपकेबाज पदव्यांना मान्यता देण्याचे त्यानी शक्यतोवर टाळले, आणि त्यांच्याबरोबरील संबंधात आपण जणूकाही त्यांचे आश्रयदातेच आहोत असा अविर्भाव त्यानी आणला. समकालीन पत्रव्यवहारात शहा इस्माईल याने बाबर बादशहाला दिलेल्या मदतीचा आणि शहा तहमास्प याने हुमायूनला जे संरक्षण दिले त्याचा त्यानी वारंवार उल्लेख केलेला आहे. याउलट मोगल सम्राट हे पर्शियाच्या

सम्राटांपेक्षा आपण कोणीतरी श्रेष्ठ आहोत असे मानीत, कारण त्यांच्या राज्याची व्याप्ति अधिक होती आणि लौकिकांत त्यांच्या जवळील संपत्ती ही पर्शियन सम्राटांपेक्षा जास्त होती. गुप्त माहिती मिळविण्याचा दोन्ही दरबारांना जो छंद लागलेला होती त्यापेक्षांही दोन्ही राज्याराज्यांमधे वारंवार वकिलातीची जी देवाणघेवाण होत असे त्या पाठीमागचे खरे कारण दोन्हीं पक्षांची परस्परांना आपल्या वैभवाने दिपवून टाकण्याची इच्छा हेच होते.[१]

**कंदहारचा प्रश्न**

सफवीद आणि चगताई घराण्यांतील मैत्रीच्या संबंधात अधुनमधून बिघाड होण्याला कारण म्हणजे कंदहारचा ताबा मिळविण्यासाठी दोन्ही राज्यांमधे होणारे झगडे हे होते. शहा इस्माईल याचा कंदहारवर डोळा होता परंतु बाबर याने त्याचा ताबा घेतला.[२] हुमायुनच्या मृत्युनंतर निर्माण झालेल्या धामधुमीच्या काळांत तहमास्प याने कंदहारचा ताबा घेतला, परंतु अकबराने लबाडीच्या मार्गाने कंदहार परत जिंकून घेतले.[३] सफवीद सम्राटांपैकी ज्याचा सर्वश्रेष्ठ म्हणून उल्लेख करता येईल असा जो पहिला शहा अब्बास हा जेव्हा गादीवर आला तेव्हा त्याने कंदहार परत जिंकून घेणे हे आपल्या राजनितीचे ध्येय ठेवले. न्याय्य भाषा वापरून आणि वारंवार आपल्यातर्फे जासूद पाठवून त्याने आपला समकालीन मोगल सम्राट जहांगीर याच्या मनातील संशयाचे निराकरण केले आणि आपल्या सद्हेतूबद्दल व विश्वासू पणाबद्दल त्याची खात्री पटविली. त्याचा वकील झंबल बेग हा मोगल दरबारांत वास्तव्य करून असताना देखील कंदहारची संरक्षण व्यवस्था कमकुवत आहे याचा त्याने फायदा घेतला आणि अचानक कंदहारवर हल्ला केला आणि ते शहर काबीज केले. या जखमेवर आणखी मीठ चोळण्याच्या उद्देशाने म्हणून की काय त्याने जहांगीरकडे एक पत्र पाठवून आपल्या वागणुकीचे समर्थन केले आणि आपण केलेल्या कारवाईची कारणे सांगितली.[४]

**पहिला शहा अब्बास आणि शहाजहान यांच्यामधील गुप्त संबंध**

यानंतर काही काळपर्यंत दोन्ही दरबारामधील संबंध बिघडल्यासारखे झाले; परंतु राजपुत्र शहाजहान आणि पहिला शहा अब्बास .यांच्यामधील गुप्त आणि अनाधिकृत पत्रव्यवहार चालूच राहिला. शहाजहानने पाठविलेले शेवटचे पत्र हे त्याने आपल्या बापाला शरणागती दिल्यानंतरचे होते. तथापि राजपुत्र परवीज याच्या मृत्यूची बातमी जेव्हा शहाच्या कानावर आली तेव्हा

जहांगीर बादशहाच्या दु:खामधे त्याचे सांत्वन करण्यासाठी म्हणून आपल्यातर्फे वकील पाठविण्याचा विचार त्याने केला. या कामगिरीवर[५] जाण्यासाठी म्हणून त्याने तख्त बेग याची नेमणूक केली; परंतु पर्शियाहून वकील निघण्याचे अगोदर जहांगीरच्या मृत्युची बातमी येऊन थडकली. त्यानंतर मोगल साम्राज्यामधे निर्माण झालेली गोंधळाची परिस्थिती जेव्हा पहिल्या शहा अब्बास याच्या कानावर आली तेव्हा त्याने शहाजहानकडे बहरी बेग याला एक पत्र देऊन रवाना केले आणि शहाजहान याला जरूर असल्यास मदत करण्याची आपली तयारी असल्याचे त्याला कळविले. आग्रा शहराच्या बाहेर मुतकीद खान याने वकीलाचे स्वागत केले आणि ५ जुलै १६२९ रोजी त्याची बादशहाबरोबर मुलाखत करून देण्यात आली.[६]

### महमद अली बेग आणि मीर बर्क

बहरी बेग हा हिंदुस्थानच्या वाटेवर असताना पहिला शहा अब्बास याचा ९ जानेवारी १६२९ रोजी माजंदरान येथे मृत्यु झाला. त्याच्यानंतर दुर्दैवी सफी मिर्जा याचा मुलगा आणि शहा अब्बास याचा नातू साम मिर्जा हा गादीवर आला. नव्या बादशहाने नंतर आपल्या राज्यारोहणाचे वेळी आपल्या बापाचीच पदवी घेतली. इतिहास त्याला शहा सफी याच नावाने ओळखतो. तत्कालीन मान्यता पावलेल्या शिष्टाचाराप्रमाणे शहाने शहाजहानच्या राज्यारोहणाबद्दल त्याचे अभिनंदन करण्यासाठी म्हणून आपल्यातर्फे लवकरात लवकर वकील पाठविण्याची त्वरा केली. या कामासाठी त्याने महमद अलीबेग याची निवड केली आणि त्याला आग्र्याकडे रवाना केले. त्याच्याबरोबर जे पत्र होते ते नेहमीप्रमाणेच स्तुतीने भरलेले आणि ज्या मधिल शब्दांना कसलाही अर्थ नाही अशा भपकेबाज वाक्प्रचारानी नटलेले होते.[७] दरम्यान शहाजहानच्या कानावर शहा अब्बास याचा मृत्यु झाल्याची बातमी आली होती. त्याने अगदी वरील तऱ्हेचीच कामगिरी पार पाडण्यासाठी मीर बर्क याला पर्शियाकडे रवाना केले.[८] वाटेमधे दोन्ही वकील कदाचित् परस्परांजवळून गेले असण्याची शक्यता संभवते.

### शहाजहानचे शहाला पत्र

आपल्या पत्रामधे शहाजहान याने बहरी बेग याचे आगमन झाल्याचे कळविले होते. त्याचप्रमाणे गादीवर आल्याबद्दल त्याने शहा सफी याचे अभिनंदन करून मृत बादशहाबरोबर असलेल्या आपल्या मैत्रीच्या संबंधाचा

आणि आपल्या स्वतःच्या राज्यारोहणाचा त्याने या पत्रात उल्लेख केला होता. हे सांगताना त्याने आपले प्रतिस्पर्धी आणि शत्रु यांचाही अल्पसा उल्लेख केला होता. नंतर मृत शहाने त्याला मदत देण्याची जी तयारी दाखविली होती त्याला उत्तर म्हणून की काय त्याने शहा सफी याला स्वतःची सत्ता मजबूत करण्यासाठी म्हणून मदत देण्याची आपली तयारी आहे असेही शहाजहानने शहाला लिहिले. पत्राच्या शेवटी त्याने शहाला मैत्रीचा सल्ला देऊन पत्राचा समारोप करताना अशी सुचना केली की शहाने आपल्या आज्याच्या पावलांवर पाऊल ठेवूनच राज्यकारभार करावा. या सुमारास शहा हा तुर्क लोकांबरोबर उद्भवलेल्या कटकटीत गुंतला असल्यामुळे त्याची भेट घेण्यासाठी मीर बर्क याला इफहान येथे थांबावे लागले. तेथे शहा परतल्यानंतर हिंदुस्थानच्या वकीलाने आपल्या बादशहाकडून आणलेल्या भेटी शहापुढे ठेवल्या. आपल्या पत्रात शहाजहान याने आपल्या दुताची शक्य तेवढ्या लवकर पाठवणी करावी अशी जरी शहाची विनंती केली होती तरी देखील मीर बर्क याला पर्शियन दरबारात एक वर्षापेक्षा अधिक काळ अडकवून ठेवण्यात आले.[९]

**महमद अली बेग याचे स्वागत**

जेव्हा महमद अली बेग हा आग्रा येथे आला तेव्हा शहाजहान खान जहान लोधी याच्या बंडाचा बिमोड करण्यासाठी दक्षिणेत गेल्याचे त्याला आढळून आले. परंतु बादशहाला त्याचे आगमन झाल्याचे कळल्याबरोबर त्याने महमद अली बेग याच्या दक्षिणेच्या प्रवासाची व्यवस्था केली. कारण तो स्वतः आग्रा येथे परत जाईपर्यंत अली बेग याला तटकळत ठेवण्याची त्याची इच्छा नव्हती. मक्रमत खान याला बुरहाणपुर येथून मानाचा एक पोशाख देऊन रवाना करण्यात आले आणि अली बेग वाटेत ज्या ठिकाणी भेटेल तेथे त्याला तो पोशाख अर्पण करण्याचा आदेश त्याला देण्यात आला. महमद अली बेग याच्याबरोबर मांडूपर्यंत सोबत म्हणून जाण्याचा आणि माळव्याचा सुभेदार मोतकद खान याच्याकडे त्याच्या इतमामाची व्यवस्था करण्यासाठी त्याला सोपविण्याचा आदेश मक्रमत खान याला देण्यात आला.[१०]

काही काळ मांडू येथे विश्रांति घेतल्यानंतर महमद अली बेग याने दक्षिणेच्या प्रवासाला सुरवात केली. बुरहाणपूरजवळ त्याचे अफजलखान आणि सदिक खान यानी स्वागत केले. जेव्हा त्याला बादशहाच्या भेटीसाठी नेण्यात

आले तेव्हा त्याने शहाचे पत्र मोगल बादशहाच्या हवाली केले. त्याच दिवशी शहाजहानने वीस हजार रुपये किंमतीची बक्षीसे त्याला दिली. यानंतर सहा दिवसांनी महमद अली बेग याने पर्शियाहून आणलेल्या तीन लक्ष रुपये किंमतीच्या भेटीच्या वस्तू शहाजहान याला अर्पण केल्या. पर्शियन वकिलावर मुक्त हस्ताने शहाजहान याने देणग्यांची खैरखैरात केली, आणि आपल्या मोठेपणाचा प्रभाव त्याच्यावर पडावा म्हणून त्याला किंमतवान अशी भेट देण्याचा एकही प्रसंग त्याने वाया जाऊ दिला नाही. १९ सप्टेंबर १६३१ पर्यंत महमद अली बेग हा बुरहाणपुर यथे राहिल्यानंतर परतण्याची तयारी करण्यासाठी म्हणून आग्रा येथे जाण्याबद्दल त्याला सांगण्यात आले. परंतु ३० जून १६३२ मधे मीर बर्क परत येइपर्यंत महमद अली बेग याला परत जाण्याची परवानगी देण्यात आली नाही.[11]

### कोशंजच्या जमिनदारांचे मोगल दरबारांत आगमन

दरम्यान कंदहार येथे एक प्रसंग घडून आला. या प्रसंगामुळे प्रत्यक्षात जरी नाही तरी कदाचित मोगल सम्राट आणि शहा यांच्यामधील दोस्तीच्या संबंधात बिघाड होण्याची शक्यता होती. पहिल्या शहा अब्बास याने कंदहार जिंकून घेतल्यापासून शीर खान तरीन हा कोशंजचा सुभेदार होता. त्याला शहा अब्बास हा मोठ्या सन्मानाने वागवीत असे. शहा अब्बास ह्याच्या मृत्यु-नंतर शीर खान हा शीरजोर झाला आणि त्याने हिंदुस्थान आणि पर्शिया यामध्ये प्रवास करणाऱ्या प्रवाशांवर हात टाकण्यास सुरवात केली. त्याला शासन करण्याच्या संधीची कंदहारचा सुभेदार अली मर्दान खान हा वाटच पहात होता. जेव्हा १६३०–३१ मधे सीवी मधे लुटालुट करण्यासाठी त्याने कोशंज सोडले तेव्हा अली मर्दान खान याने एक हजार सैनिक घेऊन कोशंज-वर चाल केली आणि ते ताब्यात घतले. शीर खान याने त्याच्याबरोबर फार मोठी निकराची लढाई दिल्यानंतर दोकीकडे पलायन केले. नंतर तो मुलतानचा सुभेदार अहमद बेग याच्याकडे गेला. त्याने त्याच्यातर्फे एक अर्ज दरबाराकडे पाठविला गेला. तो मंजूर करण्यात आला. शीर खान याने १३ मार्च १६३२ रोजी बादशहाची भेट घेतली. बादशहाने त्याला पंजाबमधे जहागीर नेमून दिली.[12]

### पर्शियाकडे सफ्दर खान याची रवानगी

पर्शियन दरबारात परत पाठवणीसाठी वकील म्हणून सफ्दर खान याची निवड करण्यात आली. १६ मे १६३३ रोजी त्याने आग्रा सोडले. त्याच्याजवळ

शहाला देण्यासाठी म्हणून चार लक्ष रुपये किंमतीच्या भेटी देण्यात आल्या होत्या. दरबारामधे वागण्याच्या पद्धती बाबत त्याला सुचना देण्याची शहाजहान याने अतिशय बारकाईने काळजी घेतली. शहाला जे पत्र द्यावयाचे होते त्याचा मसुदा अफजल खान याने तयार केला होता. या पत्रामधे शहाजहान याने महमद अली बेग याची वकिलात आपल्याकडे आल्याचे कळविले होते, त्याचप्रमाणे कर्तबगार माणसे जवळ बाळगण्याची जरूर असल्याचे शहाला सुचित केले होते, बादशहाची कर्तव्ये काय असतात हे त्याला विशद करून सांगितले होते आणि पत्राचा शेवट खानजहान याच्या बंडाचा झालेला बिमोड, कुतुबउलमुल्क याची शरणागति, आदिलशहा विरूद्ध मोहीम, हुगळीचा पाडाव, आणि पोर्तुगीजांचा नायनाट या गोष्टीचा उल्लेख करून केला होता. नेहमीप्रमाणेच वकीलाला शक्य तितक्या लवकर परत पाठविण्याची विनंतीही या पत्रात केली होती.[13]

### वकीलाचे पर्शियामधील स्वागत

जेव्हा सफ्दर खान इस्फहान येथे येऊन पोहोचला तेव्हा शहा सफी याने नुकतीच आपली इरान विरूद्धची यशस्वी मोहीम संपविलेली होती.[14] काशान येथे वकीलाची शहाबरोबर भेट करवून देण्यात आली. परंतु शहाजहान याने सुचित केलेल्या वेळेपेक्षा अधिक काळ त्याला दरबारात अडकवून ठेवण्यात आले. परंतु पर्शियन दरबारातील त्याच्या वास्तव्याने एक महत्वाचे कार्य सिद्धीस गेले. तो एखाद्या छायेसारखा शहा सफी याच्या पाठीशी राहिला आणि जहांगीरच्या कारकिर्दीत झंबल बेग याने जी कामगिरी हिंदुस्थानात पार पाडली, तशीच कामगिरी सफ्दर खान याने आपला धनी जो मोगल सम्राट त्याच्यासाठी पार पाडली. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे झाल्यास त्याने शहा सफी याची राजकीय उद्दीष्टे कोणती आहेत याबद्दल इथ्थंभूत बातमी शहाजहान याच्याकडे पोहोचवली.

### पहिला शहा अब्बास याच्या मृत्युनंतर घडलेल्या गोष्टी

पहिला शहा अब्बास याच्या मृत्युमुळे पर्शियामधे अंतर्गत आणि बहिर्गत शांततेचे निर्माण झालेले वातावरण पूर्णपणे मोडून पडले आणि पर्शियाच्या शत्रूनी आपल्या आक्रमक बेतांना पुन्हा उजाळा देण्यास सुरवात केली. पश्चिमेच्या बाजूला तुर्कस्थानचा लढाऊ सुलतान चौथा मुराद आणि पूर्वेला उजबेग आणि अस्त्राखान जमातीचे लोक यांचा पर्शियाला सतत धोका होता. उजबेग

आणि अस्राखान जमातिच्या लोकानी केलेले हल्ले खूरासानच्या सुभेदारांनी वारंवार परतवून लावले होते परंतु चौथा मुराद हा मात्र अतिशय बलाढ्य आणि अतिशय चिवट असा होता. १६३० मधे त्याने कुर्दीस्थानमधे प्रवेश केला, एका पर्शियन सैन्याचा त्याने पराभव केला आणि हमदान जिंकून घेतले. पुढील वर्षी त्याने बगदाद विरूद्ध जी मोहीम केली तीमधे त्याल अपयश आले. चार वर्षानंतर (१६३५) त्याने इखानच्या ताबा घेतला. अर्थात शहाने पुढल्या वर्षीच्या वसंत ऋतूमधे ते पुन्हा जिंकून घेतले.[१५]

परंतु इखान जिकल्यानंतर पश्चिम सीमेवरील युद्ध मात्र त्यामुळे बंद पडले नाही. थोड्याच कालावधिनंतर कुर्दीस्थानचा सुभेदार अहमद बेग खान अर्दलान याने बंड केले आणि तुर्की लोकांच्या मदतीने त्याने खूप धामधूम उडवून दिली. परंतु पर्शियन सैन्याच्या एका तुकडीने बंडखोर आणि त्याचे तुर्कीमदतनीस यांचा पराभव केला. या लढाईत अहमद बेग खान हा ठार झाला. या घटनेच्या पाठोपाठ चौथ्या मुरादचा बगदादवरील संभाव्य हल्ला, उजबेगांची खुरासानवरील स्वारी आणि इखान जिंकून घेण्याचा तुर्क लोकानी केलेला अयशस्वी प्रयत्न वगैरे बातम्या आल्या.[१६] वरील राजकीय दुर्घटना म्हणजे शहा सफी याला फार मोठी चिंता निर्माण करणाऱ्या गोष्टी होत्या आणि त्यामुळे त्याच्या दरबारात निश्चितच बराच गोंधळ निर्माण झाला असावा. दरबारातील बदलणाऱ्या सर्व परिस्थितीबद्दल सफ्दर खानाने आपल्या बादशहाला सविस्तरपणे लिहून कळविले.

जेव्हा शहा सफी आपल्या शत्रूबरोबर मुकाबला करण्यात गुंतला होता तेव्हा त्याच्या दरबारात मिरजा हुसेन ह्या हिंदुस्थानातील एका वकीलाचे आगमन झाले.[१७] त्याने जे पत्र आपल्याबरोबर आणले होते त्यामधून शहाला दौलताबादचा पाडाव, जुजहारसिंग याच्या बंडाचा बिमोड, विजापूरवरील स्वारी, आदिलशहाची शरणागति, त्याने वीस लक्ष रुपये देण्याचे दिलेले आश्वासन आणि कुतुबशहाने मोगलाना खंडणी म्हणून दिलेली चाळीस लक्ष रुपयांची रक्कम वगैरे बातम्या कळल्या. आपल्या पत्राच्याशेवटी शहाजहान याने औरंगजेब याची दक्षिणेचा सुभेदार म्हणून झालेली नेमणूक आणि स्वतःचे आग्रा येथे पुनरागमन या गोष्टींचा उल्लेख केला होता. पत्रामधे ज्या तऱ्हेचा सूर होता त्यावरून आपल्याला असे दिसते की पर्शियन दरबारात मिरजाहुसेन याची रवानगी करण्याचा उद्देश हिंदुस्थानचा बादशहा हा

शहा बरोबर मित्रत्वाची भावना बाळगून आहे याबद्दल शहाला आश्वासन देण्याचा होता. परंतु या वकीलातीचा खरा उद्देश सफदर खान याने ज्या बातम्या पाठविल्या होत्या त्यांचा खरेखोटेपणा पडताळून पाहाण्याचा होता.

**अली मर्दान खान याला वाटलेली भिती**

प्रत्यक्ष वस्तुस्थितीत आपल्याला असे दिसून येते की या सुमारास काही हिंदुस्थानी अधिकाऱ्यानी विशेषत: कुलिज खान याने कंदहारच्या शरणागतिबद्दल अली मर्दान खान याच्या बरोबर बोलणी सुरू केली होती. पर्शियाचा नवा वजीर सारू तकी याच्या कडक राज्यकारभाराबद्दल अली मर्दान खान याला अतिशय भीती वाटली. त्याच्याकडून महसूलाची जी फार मोठी बाकी येणे होती त्याबद्दलची हकिगत सारू तकी याने शहाच्या नजरेस आणली. आपल्या बाजूचे समर्थन करण्यासाठी अली मर्दान खान याला दरबारात हजर होण्याचा हुकूम करण्यात आला. परंतु त्याने टाळा टाळ करण्यास सुरवात केली आणि वेगवेगळ्या सबबी देण्यास सुरवात केली. जेव्हा त्याच्यावर आणखी दडपण आणण्यात आले तेव्हा त्याने उघडउघड प्रधान मंत्र्यावरील आपला अविश्वास प्रकट केला. परंतु त्याने असे वचन दिले की आपल्याला मोकळे सोडल्यास दर वर्षी आपण बारा हजार तुमान वसूली दाखल देण्यास तयार आहोत. त्याने आपला मुलगा महमद अली बेग याला दरबारात पाठविले. परंतु त्यामुळे शहाचे समाधान झाले नाही. कंदहारच्या सुभेदाराविरूद्ध कडक उपाययोजना करण्याचे लांबणीवर टाकावे अशी सुचना जानीखन कुर्ची बाशी याने केली असताना देखील शहाने अली मर्दान खानाकडून त्याचे अधिकार काढून घेण्यास सियायूश कोल्लार आकासी याला रवाना केले आणि शक्य होईल त्या मार्गांनें अली मर्दान खान याला दरबाराकडे रवाना करण्याचा हुकूम त्याला दिला.

**मोगल अधिकाऱ्यांकडे मदतीची याचना**

कंदहारसमोर सियायूश खान जेव्हा प्रचंड सैन्य बरोबर घेऊन उभा ठाकला तेव्हा अली मर्दान खान हा जीवावर उदार झाला. त्याच्या कटकटीत भर म्हणून की काय किल्यावरील शिबंदी एकजूटीने त्याच्याबरोबर निष्ठा बाळगुन नव्हती. शिबंदीपैकी काही किजल बाशी शिपाई हे त्याला सोडून सियायूशला जाऊन मिळाले. अशा परिस्थितीत प्रतिकार करण्याचा प्रश्नच उद्भवत नव्हता. शहा आपल्यावर सूड घेईल या भीतीने

कंदहारचा एक प्रमुख जमिनदार मलिक मूघदूद याने मोगलांची मदतीसाठी याचना करण्याबद्दलची केलेली सुचना त्याने अत्याग्रहाने स्विकारली. त्यानुसार त्याने आपल्यावर जो आणिबाणीचा प्रसंग कोसळला आहे त्यामधे आपल्या मदतीला येण्याची विनंती करण्यासाठी म्हणून मूघदूदचा भाऊ कामरान याला गझनीचा अधिकारी ऐवजखान काकशाल आणि काबुलचा सुभेदार सैद खान यांच्याकडे रवाना केली. त्याचप्रमाणे त्याने शहाजहान यालाही पत्र लिहून वचन दिले की कंदहार किल्ल्याचा ताबा घेण्यासाठी तेथे पुरेसे सैन्य देऊन एखाद्या अधिकाऱ्याची रवानगी करण्यात आल्यास आपण कंदहारची शरणागति देऊ. परंतु नंतर जेव्हा अली मर्दान खान याची परिस्थिती अधिक बिकट झाली तेव्हा त्याने सैद खान आणि कूलीजखान यांच्याकडेच अधिक कळकळीने आपल्याला मदत करण्याबद्दल विनंती केली.

## कंदहारची शरणागति

१४ फेब्रुवारी १६३८ रोजी ऐवज खानाने एक हजार स्वार बरोबर घेऊन गझनीहून कूच केले आणि बारा दिवसात तो कंदहारला पोहोचला. अली मर्दान खान याने त्याला ताबडतोब किल्ल्यात घेतले. नंतर त्याने २८ फेब्रुवारी रोजी शहाजहानच्या नावे खुत्ब्याचे वाचन केले आणि दरबाराकडे नविन पाडलेल्या नऊ मोहरा पाठवून दिल्या. त्याबरोबरच त्याने आपण शहाजहानला शरण आल्याचे एक पत्र पाठवून ऐवज खान याचे किल्ल्यात आगमन झाल्याचे त्याला कळविले. दरम्यान सैद खान याने काबुलहून कूच केले आणि तो किलात घिलजई येथे पोहोचला. या ठिकाणाची शरणागति त्याने स्विकारली आणि तेथून त्याने कंदहारकडे कूच केले. ऐवज खानानंतर चार दिवसांनी तो तेथे जाऊन पोहोचला.

## किल्ल्यावरील शिबंदीत निर्माण झालेल्या कटकटी

दरम्यान किल्ल्यावरील शिबंदीमधे एका नविन कुरबुरीला सुरवात झाली. त्यांच्यापैकी काही जणाना अली मर्दान खान याने केलेल्या कारवाईचा अतिशय संताप आला आणि त्याने सियायूश बरोबर गुप्त पत्रव्यवहार सुरू केला. शत्रुत्वाची भावना मनात बाळगून असलेल्या या पक्षाचे पुढारीपण कंदहारचा काजी महमद अमीन याच्याकडे होते. त्याने ऐवज खानाचा विश्वासघाताने खून करण्याची व त्याचे मस्तक शहाकडे रवाना करण्याची सूचना अली मर्दान खान याला केली. त्याने केलेल्या युक्तीवादाचा अली मर्दान खानावर

बराच प्रभाव पडला असावा असे दिसते. यानंतर काही काळाने मशहद कुली नावाचा दुसरा एक अधिकारी अली मर्दान खान याच्याकडे आला. अली मर्दान खानाने जेव्हा आपल्या मनातील संघर्षाबद्दल त्याला सांगितले तेव्हा गोष्टी इतक्या थराला गेल्यानंतर आता आपल्या दृष्टिकोनात बदल करणे कसे निरर्थक आहे याबद्दल मशहद कुली याने अली मर्दान खानाची खातरजमा केली. त्या दिवशी रात्री अली मर्दान खान हा अतिशय शांतपणे निद्राधिन झाला, आणि दुसऱ्या दिवशी सकाळी त्याने किल्ल्याचा ताबा यथाविधी बादशाही फौजांकडे सोपविला.[२२] परंतु सियायश याची उपस्थिती ही अली मर्दानखान याच्या मनाला हादरा देत होती, आणि तो काबुल आणि मुलतान येथून येणाऱ्या कुमकेची मोठ्या अस्वस्थतेने वाट पहात होता.

### शहाजहानला झालेला अपरिमीत आनंद

जेव्हा कुलीज खान आणि सैद खान यांची बातमी पत्रे आणि अली मर्दान खान याची पत्रे शहाजहान याला मिळाली तेव्हा त्याचा आनंद मनात मावेना. दक्षिणेमधे त्याला मिळालेल्या घवघवित विजयानंतर कंदहारची शरणागति ही घटना म्हणजे आपल्याला यशाच्या शिखरावर नेणारी आहे असे त्याने मानले. त्याने काबुलच्या खजिन्यातून पांच लक्ष रुपयांची रक्कम घेऊन तावडतोब अली मर्दान खान याच्या मदतीला जाण्याची सैद खान याला तातडीची आज्ञा केली. यापैकी एक लक्ष रुपये त्याने अली मर्दान खान याला द्यावे, दोन लक्ष रुपये त्याने स्वतःसाठी ठेवावे आणि उरलेले दोन लक्ष रुपये त्याने इतर नोकराचाकरात वाटावे असेही त्याला सांगण्यात आले. त्याशिवाय त्याचा भाऊ मलीक मूघदूद आणि अली मर्दान खान याचे इतर अनुयायी यांना भरपूर बक्षीसी देण्याबद्दलही त्याला आदेश देण्यात आला.[२३]

### कंदहारच्या बचावाची शहाजहानने केलेली व्यवस्था

कंदहारच्या संरक्षणाची व्यवस्था पुरी करण्यासाठी बादशहाने कुलीज खान याला पांच हजार जात आणि पांच हजार सवार या अधिकाराच्याजागी बढती दिली आणि किल्ल्याच्या संरक्षणाची व्यवस्था त्याच्याकडे सोपविली. कदाचित पर्शियन सैन्याने कंदहार परत जिंकून घेण्याचा प्रयत्न केल्यास किल्ल्यावरील शिबंदीला मदत म्हणून त्याने भक्करचा सुभेदार यूसुफ महमद खान ताश्कंदी आणि सैस्तानचा सुभेदार जान निसार या दोघाना कंदहारकडे

कूच करून जाण्याचा हुकूम दिला. आणखी बंदोबस्तादाखल म्हणून त्याने राजपूत्र सुजा याला बारा हजार जात आणि आठ हजार सवार या अधिकाराच्याजागी बढती दिली आणि त्याची रवानगी काबुलकडे केली. जर का शहा सफी याने कंदहार विरूद्ध मोहीम स्वतःच्या अंगावर घेतली तर कंदहारकडे कूच करून जाण्याचा त्याला हुकूम देण्यात आला. अन्यत: खान दौरान, जयसिंग, अमरसिंग, गजसिंग, माधोसिंग, लहरास्प वगैरे अधिकाऱ्यांना पाठविण्याबद्दल त्याला सांगण्यात आले. या सैन्याला रसदीचा पुरवठा करण्याची व्यवस्था करण्याबाबत पंजाबचा सुभेदार वजीर खान याला सुचना देण्यात आल्या.

## पर्शियन सैन्याची पिछेहाट

यावेळी कंदहारबाबत परिस्थिती अशी होती की तेथे गेल्यानंतर सैद खान याने तेथील स्थितीचे समालोचन केले. किल्ल्यावरील शिबंदीमधे संशयाचे आणि शत्रूत्वाचे जे वातावरण होते त्याचा उगम सियायूश याच्या उपस्थितीत आहे या गोष्टीकडे त्याचे ताबडतोब लक्ष गेले. त्याने बाहेरील शत्रूला त्याच्या जागेवरून काढून लावण्याचा आणि सुव्यवस्था प्रस्थापित करण्याचा बेत आखला. आपला मुलगा आणि अलीमर्दान खान याना किल्ल्यामधे ठेवून एक एप्रिल रोजी त्याने किल्ल्याबाहेर कूच केले. शत्रूविरूद्ध लढाई देण्याच्या संपूर्ण तयारीने तो चाल करून आला आणि दोन्ही पक्षाच्या आघाडीवरील संरक्षक दले परस्परांस भिडून युद्धाला सुरवात झाली. बादशाही फौजांचे सेनापतिपद राजा जगतसिंग याच्याकडे होते. त्याने हल्लेखोरांच्या जोरदार हल्ल्याला ठामपणे प्रतिकार केला आणि त्याना माघार घेण्यास भाग पाडले. यानंतर दोन्ही सैन्ये सर्वदूर एकमेकाशी भिडली. या लढाईत अली मर्दान खान याच्या अधिकाऱ्यांच्या नेतृत्वाखाली असलेली मोगल सैन्याची उजवी फळी कोसळून पडली. परंतु सैद खान याचे वेळेवर आगमन झाल्यामुळे परिस्थिती निभावून गेली. मोगल सैन्य पुन्हा एकवटले आणि त्यानी शत्रूचा हल्ला परतवून लावला. दोन्ही फौजांतील युद्ध समाप्त झाले. सियायूशने हलमंद ओलांडून पळ काढला. बादशाही सैन्याने त्याचा पाठलाग केला आणि त्याची सबंध छावणी ताब्यात घेतली. यानंतर सैद खान कंदहारकडे परतला आणि त्याने बादशहाकडे आपला अहवाल रवाना केला. बादशहाने त्याला बिस्त आणि जमिदावर काबीज करण्याचा हुकूम दिला.[२४]

### पर्शियाहून यादगर बेग याचे आगमन

कंदहारचा ताबा घेतल्यानंतर याप्रमाणे जोरदार कारवाया चालल्या असताना सफ्दर खानाबरोबर पाठविण्यात आलेला शहा सफी याचा वकील यादगार बेग हा मोगल दरबारात येऊन पोहोचला. त्याने आपल्याबरोबर जे पत्र आणले होते त्यामधे शहा सफी याने तुर्कस्थानच्या बलाढ्य सुलताना-कडून इरवान जिंकून घेण्यात त्याला मिळालेल्या यशाचे मोठ्या तोऱ्यात वर्णन केलेले होते.[२५] आग्रा येथे नेहमी प्रमाणेच वकिलाचे त्याच्या इतमामाप्रमाणे स्वागत करण्यात आले. परंतु वकिलाबरोबर सफ्दर खान हाही आला होता असा उल्लेख दरबारी इतिहासकार करीत नाहीत.

### सफ्दरखान याचे आगमन

असे दिसते की शहा सफी याचा दृष्टीकोन आणि त्याची तयारी याबाबत माहिती करून घेण्यासाठी तो पर्शियामधे रेंगाळला असावा. तो जेव्हा कंदहार येथे आला तेव्हा त्याने कंदहारचा पाडाव झाल्यामुळे शहाला कसा भयंकर संताप आला आहे याबद्दल सांगितले. त्याचप्रमाणे तो पुढे असेही म्हणाला की शहाने असे उद्गार काढले की एकवेळ इरवान अथवा बगदाद माझ्या हातून गेली तरी चालतील परंतु कंदहारचा पाडाव कधीच भरून निघणार नाही, आणि परत ते जिंकून घेण्यासाठी वाटेल ते प्रयत्न करण्यास मी मागेपुढे पहाणार नाही. सफ्दर खान याने सैद खान याला पुढे असेही सांगितले की एका प्रचंड सैन्याची पाठवणी करण्याचा शहाचा उद्देश आहे.[२६] परंतु मोगलांचे नशीब बलवत्तर होते म्हणून चौथ्या मुरादने बगदाद जिंकून घेतल्यामुळे शहा सफी याला त्याच्या पश्चिम सरहद्दीवरून डोके वर काढण्यास देखील वेळ झाला नाही. आणि जेव्हा तुर्कस्थानबरोबर तह केल्यानंतर तो जेव्हा कंदहार येथे परतला तेव्हा काही करण्याची वेळ निघून गेली होती. याचे कारण मोगलांची बाजू तेथे आता अधिक मजबूत झाली होती. तरी देखील शहाने रूस्तम खान याला खुरासानकडे कूच करून जाण्याचा आणि मोहिमेसाठी सैन्य जमा करण्याचा हुकूम दिला. परंतु ही योजना प्रत्यक्षात येण्याचे अगोदर २ मे १६४२ रोजी शहा मरण पावला.

### मिरजाहुसेन याची पर्शियामधील वकीलात

या ठिकाणी मिरजाहुसेन याच्या वकिलातीबद्दल दोन शब्द लिहिणे जरूर आहे. पर्शियाच्या दरबारामधे त्याचे मोठ्या आदराने स्वागत

करण्यात आले. शहा सफी याने शहाजहान याच्या पत्राला लवकरच उत्तर रवाना केले. त्याने मोगल सम्राटाचा उल्लेख 'चुलता' असा केला, त्याच्या यशाबद्दल आपला आनंद व्यक्त केला, परंतु दक्षिणेमधील सुलतानांचा उल्लेख करण्याचे मात्र त्याने टाळले.[२७] हा अनुल्लेख सांकेतिक असाच समजला पाहिजे याचे कारण विजापूर आणि गोवळकोंडा या दोन्ही राज्यांबरोबर शहाचे संबंध सलोख्याचे होते आणि मोगल बादशहाकडून त्याला जो धाकदपटशा दिला जात होता तो त्याला आवडत नव्हता. आपली नापसंती दर्शविण्याचा मुत्सद्दीपणाचा एकमेव मार्ग म्हणजे त्या विषयाचा कसलाही उल्लेख टाळणे हाच होता. हिंदुस्थानामधील पर्शियन वकील यादगार बेग आपल्या देशाकडे १६३९ मधे परतला. त्याने आपल्या बादशहाकरता जे पत्र नेलेले होते त्यामधे शहाजहानने कंदहारच्या घटनेबद्दल समर्थन केलेले होते, आणि शहाची माफी मागितलेली होती. त्याचप्रमाणे त्याने ती घटना विसरून जाण्याबद्दल शहाला विनंती केली होती.[२८] परंतु यापुढच्या काळात मोगल आणि सफवीद दरबारातील परस्पर संबंध हे मित्रत्वाचे राहिले नाहीत यात काहीच शंका नाही.

**अब्बास दुसरा**

शहा सफी त्याच्यानंतर दुसरा शहा अब्बास हा गादीवर आला त्यावेळी तो केवळ अकरा वर्षांचा एक मुलगा होता. त्याच्या अज्ञान वयात राज्याचा कारभार वजीर सारू तकी याच्या हाती होता. पर्शियाचे दैव बलवत्तर असल्यामुळे या सुमारास देशाच्या बाह्य शत्रुनी कोणत्याही तऱ्हेचा उठाव केलेला नव्हता. सुलतान मुराद याचा मृत्यु झाला होता आणि त्याच्यानंतर गादीवर आलेला इब्राहिम हा त्याच्या बापा इतका महत्वाकांक्षी नव्हता. उजबेग हे त्यावेळी आपल्या अंतस्थ भांडणात गुंतलेले होते. सहाजिकच कंदहार विरुद्ध मोहीम उघडण्यास ही अतिशय सुयोग्य वेळ आहे असा विचार सारु तकी याने केला. त्याने शहाच्या मृत्युनंतर इतस्ततः विखुरलेल्या सैन्याला एकत्रीत करण्याचा हुकूम रुस्तमखान याला दिला. जेव्हा या तयारीची खबर शहाजहानकडे पोहोचली तेव्हा त्याने या प्रसंगाला तोंड देण्यासाठी मोठे सैन्य घेऊन कूच करून जाण्याचा राजपुत्र दारा याला हुकुम दिला. यावर सारुतकी याने मोठ्या शहाणपणाने आपला बेत सोडून दिला.

### जान निसार खान याची पर्शियाकडे रवानगी

काश्मीरहून परतल्यानंतर बाल्खवरील मोहीमेवर देखरेख करण्यासाठी काबुलला जाण्याच्या उद्देशाने ज्यावेळी शहाजहान लाहोर येथे मुक्काम करून होता तेव्हा त्याने २६ मार्च १६४६ रोजी जान निसार खान याला वकील म्हणून पर्शियाकडे रवाना केले. शहा सफी याच्या मृत्युनंतर शहाजहानकडून आलेली ही पहिली वकीलात होती. ही वकिलात शहाजहानने पाठविली त्यामधे कंदहार मोगलांनी घेतल्यानंतर शहाबरोबर तुटलेले संबंध मैत्रीच्या नात्याने जोडावेत अशी शहाजहानची इच्छा असल्याचे निदर्शक होती. त्याशिवाय अस्त्राखान घराण्याच्या प्रकरणात दुसरा अब्बास शहा तटस्थ राहील याची काळजी घेणे जरूर होते कारण मोगल सम्राटाला ट्रान्स ऑक्सियाना या देशाबाबत त्याने आखलेल्या योजना तडीस नेण्यासाठी या गोष्टीची जरूरी होती. दुसरा शहा अब्बास सिंहासनावर आला त्याकरता त्याचे अभिनंदन करण्याचे निमित्त काढून वकिलाची रवानगी करण्यात आली. तसे पाहिले तर या निमित्तात काहीच अर्थ नव्हता.

### पत्राधील मजकूर

जान निसार खान याने शहा करता एक मोठे लांबलचक पत्र शहाजहान-कडून नेले. समकालीन राजनीती काय होती हे पहाण्याचे दृष्टीने हे पत्र अतिशय मनोरंजक असे आहे. या पत्रामधे आपल्याला सांत्वन आणि अभिनंदन व उपदेश आणि क्षमायाचना याचे अतिशय विचित्र असे मिश्रण झाल्याचे आपल्याला आढळून येते. या पत्राच्या अलंकारीक भाषाप्रणालीत आपल्याला सगळीकडे आपमतलबी बेतांचा जोरदार प्रवाह वाहाताना दिसतो. त्या काळात प्रचलित असलेल्या पद्धतीनुसार पत्राची सुरवात परमेश्वर आणि परमेश्वराचा प्रेषित याच्या स्तुतीने झालेली होती. त्यानंतर शहा सफी याच्या मृत्युबद्दल दुःखाची भावना व्यक्त करणारे काही शब्द होते. त्यामधे शहाजहान म्हणतो की सफ्दरखानाच्या तर्फे आपण पाठविलेल्या पत्रात जो सल्ला दिला होता त्याकडे दुर्लक्ष केल्यामुळे शहा सफी याला मरण आले. यानंतरचा मजकूर शहा-अब्बास गादीवर आल्याबद्दल त्याच्या अभिनंदनपर आहे. यानंतर पत्राचा मुख्य मसुदा आणि कंदहारच्या प्रकरणाचा उल्लेख आहे. "प्रत्येकाला ही गोष्ट माहीत आहे की अली मर्दान खानाने आमच्या दरबाराला जी शरणागति दिली ती परिस्थितीने भाग पाडल्यामुळे. ही शरणागति अली मर्दान खानाने स्वेच्छेने दिलेली नव्हती." त्याच्या कृतीचे समर्थन करून त्याचे कारण भूतपूर्व

शहाने केलेली अतिरेकी वागणूक हे होय असे विधान करून शहाजहान शहाला अशी विनंती करतो की अली मर्दान खानाचा मुलगा जो अजून पर्शियामध्ये आहे त्याची शहाने हिंदुस्थानात रवानगी करावी. पत्राच्या शेवटी शहाजहान याने स्नेहपूर्वभावाने शहापुढे मदतीचा आणि सहाय्याचा हात पुढे केला आहे. जान निसार खान याच्या वकिलातीला यश मिळाले यात काहीच शंका नाही.[११]

परंतु पर्शियाच्या बादशहाला गप्प बसावयाला कारण शहाजहानने टाकलेला मैत्रीचा पवित्रा हे मात्र निश्चित नव्हते. त्याच्या निष्क्रीयतेचे खरे कारण त्याच्या देशातील राजकीय परिस्थिती हे होते. दुसरा शहा अब्बास अजून अज्ञान होता आणि अज्ञानाच्या राज्यकारभाराच्या काळात देशापुढे ज्या समस्या उभ्या राहिल्या त्यामुळे प्रभावी अशा परराष्ट्रीय धोरणाचा पाठपुरावा करणे अशक्य होते. मुख्य वजीर सारु तकी हा राज्यामधील सर्वसूत्रे आपल्या हाती एकत्रीत करण्याच्या प्रयत्नात होता आणि आपल्या प्रतिस्पर्ध्यांना तो एकापाठोपाठ दूर करीत होता. त्याने रुस्तम खान आणि त्याचे भाऊ व तोफखान्याचा प्रमुख मीर फतुल्ला याना ठार मारले. अनेक अधिकाऱ्यांबरोबर त्याचे मतभेद झाल्यामुळे त्याच्या सांगण्यावरून त्याना बडतर्फ करण्यात आले. सरतेशेवटी त्याच्याविरूध्द असंतोष झपाट्याने वाढत गेला आणि १ ऑक्टोबर १६४५ रोजी त्याचा खून करण्यात आला.

**बाल्खच्या मोहिमेनंतर शहाजहान याचे दुसरा शहा अब्बास याला पत्र**

अशा तऱ्हेने शहाजहान याला ट्रान्स ऑक्सियाना मधील आपल्या हालचाली कसलाही अडथळा न होता पार पाडता आल्या आणि त्याने बाल्खवर स्वारी केली. बाल्खचा सुलतान नजर महमद याने पर्शियाकडे पलायन केले आणि शहाकडे संरक्षणाची याचना केली. आपल्याला प्राप्त झालेल्या विजयानंतर शहाजहान याने अर्सलान बेग याच्या हस्ते दुसरा शहा अब्बास याला पत्र पाठविले.[१३] या पत्रात त्याने ट्रान्स ऑक्सियानामधील आपल्या मोहिमेचे वर्णन केले होते, आणि त्याबद्दल समर्थन केले होते. त्याने असे लिहिले की त्या देशात मुसलमानांवर जुलुम जबरदस्ती केली जात होती. त्यांचे जिवित आणि अब्रु याच्या संरक्षणासाठी तो लाहोर सोडून काबुलला आला होता आणि त्याने राजपुत्र मुराद याची रवानगी बाल्ख जिंकण्यासाठी केली होती. शहाजहान याने आपल्या पत्राचे शेवटी जे शब्द लिहिले आहेत त्याचा उल्लेख करणे आवश्य आहे. "बाल्ख आणि बदकक्षान यांचा पाडाव झाला ही त्या परमेश्वराची धन्य होय. ज्या परमेश्वराच्या पायाशी आम्ही नेहमी प्रार्थना करतो तो परमेश्वर

ह्या विजयापासून आम्हाला परमसुख मिळेल असे करो आणि आम्हाला समरकंद आणि बुखारा यावर ताबा मिळेल असे वरदान देवो." परंतु ट्रान्स ऑक्सियानामधील विजय जितका झंजावाती होता तितकाच तो क्षणभंगुर ठरला. ऑक्टोबर १, १६४७ पर्यंत मोगलाबरोबर शत्रुत्वाची भावना बाळगून असलेल्या त्या देशातून माघार घेणे मोगलाना भाग पडले.

### मोगल सैन्याच्या प्रतिष्ठेला आलेला बाध

बाल्खमधे मोगलांना जे अपयश आले त्यामुळे ट्रान्स ऑक्सियानामधील त्यांच्या लष्करी प्रतिष्ठेला जबरदस्त असा फटका बसला. अतिशय जलद गतीने एकापाठोपाठ हाती घेण्यात आलेल्या या दोन मोहिंमानी मोगल सैन्यातील शिपाई दमून गेले आणि तेथील त्रासदायक हवेने त्यांची हिम्मत खचून गेली. त्याशिवाय १६४८ मधे दुसरा शहा अब्बास हा वयात आला आणि राज्यकारभाराची सूत्रे त्याने आपल्या हाती घेतली. तो शूर आणि महत्वाकांक्षी होता, काहीतरी विलक्षण अशी कामगिरी करून आपल्या कारकिर्दीची सुरवात मोठ्या झगमगाटाने झाली आहे असे दर्शविण्याची त्याची इच्छा होती आणि हिंदुस्थानच्या सम्राटाबरोबर तलवारीचे दोन हात खेळूनच आपल्याला आपल्या वैभवाच्या कमानीची उंची वाढविता येईल याबद्दल त्याची खात्री पटली होती. स्वतःची प्रतिष्ठा टिकवून धरावयाची असल्यास कंदहार जिंकून घेण्याचा प्रयत्न करणे हाच एकमेव मार्ग होता आणि मोगल सैन्याची जी दमछाक झालेली होती त्याचा आपल्याला मोठा फायदा उठवता येईल असे त्याला वाटत होते.

### कंदहार जिंकून शहाने केलेली तयारी

शहाने आपली तयारी मोठ्या गुप्तपणे केली आणि आपल्या तयारीची बातमी हिंदुस्थानात पोहोचणार नाहीं ह्या विषयी त्याने जरूर तेवढी सर्व खबरदारी घेतली. त्याच्या दरबारात उपस्थित असलेल्या दोन मोगल वकीलाना त्याने निरोप दिला. नंतर त्याने आपल्या राज्याच्या पश्चिम आणि ईशान्य सीमा यांच्या सुरक्षिततेबद्दल स्वतःची खातरजमा करून घेतली. नजर महमद, उरंजचा अबुल घाझी खान आणि सुलतान इब्राहीम यांच्याकडून त्याच्या दरबारात जे वकील आले त्यामुळे त्याच्या शांततापूर्ण बेताविषयी त्याची खात्री पटली आणि आपल्या योजना कसलाही अडथळा न येता आपल्याला पार पाडता येतील या विषयी तो निश्चित झाला. या गोष्टीनंतरच मोगलांबरोबरच्या भावी संघर्षासाठी आपली सर्व साधनसामुग्री एकत्रीत आणणे त्याला शक्य झाले.

आपल्या थोर पूर्वजांच्या पावलावर पाऊल टाकूनच दुसरा शहा अब्बास याने शहाकुली बेग याच्या हस्ते शहाजहान याला एक पत्र रवाना केले. या पत्रात मोगल बादशहाने बाल्ख नजर महमद यांच्याकडे सोपविल्या-बद्दल त्याची तारीफ केली होती आणि त्याबरोबरच मोठ्या युक्तीने कंदहार आपल्या ताब्यात परत करण्याबद्दल शहाजहान याला विनंती केली होती. या विनंतीला काय उत्तर मिळणार हे शहाला पूर्णपणे माहित होतें आणि त्या अपेक्षेनेच त्याने संपूर्ण लष्करी तयारी करण्याचा हुकुम दिला होता. त्याने मोक्याचे जागी सामानसुमान आणि अन्नसामुग्री यांचा भरपूर साठा करून ठेवला, अनेक मोठ्या तोफा लढाईसाठी तयार करून ठेवल्या आणि हुकुम मिळताच कोणत्याही क्षणीं कूच करून जाईल अशा प्रचंड सैन्याची जमवाजमव केली. त्याच्या कारकिर्दीमधील ही पहिलीच लष्करी मोहीम होती आणि म्हणून अपयशाचा धोका टाळण्यासाठी सर्व तऱ्हेची बारीक सारीक काळजी त्याने घेतली होती. अपेक्षा केल्याप्रमाणेच मोगल बादशहाने शहाची मागणी फेटाळून लावली. यावर शहाने कंदहारकडे कूच केले. १६ डिसेंबर १६४८ रोजी तो तेथे येऊन पोहोचला आणि तावडतोब त्याने किल्ल्याला वेढा देण्याचा हुकूम दिला.

**कंदहारचा पाडाव होऊ नये यासाठी शहाजहानचा प्रयत्न**

दुसरा शहा अब्बास याच्या कंदहार जिंकून घेण्याच्या उद्देशाच्या बातमीने मोगल दरबारात मोठी धामधूम उडवून दिली. शहाजहानचा बेत ताबडतोब काबुलकडे कूच करून जाण्याचा आणि परिस्थितीवर मात करण्याचा होता. परंतु कडक थंडीच्या संकटाला तोंड द्यावयाला त्याचे वजीर घाबरले होते आणि म्हणून त्यानी शहाजहान याला त्याच्या या योजनेविरुद्ध सल्ला दिला. परिणामी दिल्लीहून दरबार हलल्यानंतर कंदहारकडील घडामोडीबाबत पुढील बातमी कळावी म्हणून लाहोर येथे मुक्काम करण्यात आला. काबुलचा सुभेदार अली मर्दान खान याने संभाव्य हल्ल्याला तोंड देण्यासाठी म्हणून पाच हजार सैनिक आणि पाच लक्ष रुपये किल्लयाच्या रक्षणाला मजबूती आणण्यासाठी ताबडतोब रवाना केले. परंतु त्याने केलेली तजवीज निष्फळ ठरली. अशातऱ्हेने शहाजहानच्या सल्लागारांचा भ्याडपणा आणि खुद्द त्याच्याकडून सावधपणा बाळगण्यात झालेली कुचराई यामुळे वायव्य सरहद्दीवरील दोन मोक्याच्या किल्ल्यापैकीं एकाला तो मुकला.

### दुसऱ्या शहा अब्बासच्या हालचाली

या ठिकाणी कंदहारमधील पर्शियनांच्या हालचालीबाबत सविस्तर वृत्तांत देण्याची आवश्यकता नाही. [77] दुसरा शहा अब्बास याने तिन्ही मुख्य किल्ल्याना एकाच वेळी वेढा दिला आणि कंदहारचा वेढा त्याने अधिक जोरदारपणे चालविला. बिस्तचा सुभेदार परदल खान याने थोड्याशा प्रतिकारानंतर शरणागति दिली. जमिदावर येथील शिबंदीबरोबर कंदहारचा पाडाव होशपर्यंत तात्पुरता तह करण्यात आला. येथील किल्लेदार दौलत खान याच्यावर अतिशय नाजुक अशा परिस्थितीला तोंड देण्याची पाळी आली. वयोवृद्ध असल्यामुळे आणिबाणीच्या परिस्थितीवर मात करण्यासाठी जो कणखर निग्रह लागतो त्याचा त्याच्याठिकाणी अभाव होता. त्याशिवाय त्याचे सर्वच अनुयायी त्याच्याजवळ एकजीतपणे नीष्ठा बाळगून नव्हते. शादीखानाच्या नेतृत्वाखाली असलेल्या पक्षाने किल्लयाची ताबडतोब शरणागति देण्यात यावी असा आग्रह त्याने धरला. दौलत खानाने जो पवित्रा घेतला होता त्याबद्दल समाधान न वाटल्यामुळे त्याने किल्लयाबाबतच्या सर्व गुप्त गोष्टी आक्रमकाना उघड करून सांगण्यास सुरवात केली. एका प्रसंगी तर त्याने किल्लयावरील शिबंदीमध्ये असलेल्या मतभेदाचा वृत्तांत लिहून तो एका बाणाला अडकविला आणि तो बाण त्याने पर्शियनांच्या दिशेने धनुष्यामधून उडविला.

यावर दुसऱ्या शहा अब्बास याने दौलत खानाला धमकावणीने, भरलेले आणि त्याची मनधरणी करणारे असे पत्र लिहिले त्याने आपल्या फौजेच्या सामर्थ्याने ठासून प्रतिपादन केले. त्याने असेही लिहिले की तुर्कांच्यापासून इरवान ज्या सैन्याने जिंकुन घेतले तेच हे सैन्य आहे. दौलत खानाने शरणागति दिल्यास त्याला आपल्याकडे सन्मानाची नोकरदारी देण्याचे अमिषही त्याने दौलत खानाला दाखविले. हे पत्र घेऊन येणाऱ्या अनुचाराला शादी खान याने किल्लयात प्रवेश दिला, आणि तो आल्याचे त्याने दौलत खानाला कळविले. शादी खानाबरोबर कडकपणे वागण्याचे ऐवजी आणि त्याला ताबडतोब दुसऱ्याला धडा बसेल अशी शिक्षा करण्याचे ऐवजी दौलत खानाने त्याला बोलावृ पाठविले आणि त्याला त्याच्या वर्तनाचा जाब विचारला. नंतर निरोप घेऊन येणाऱ्या अनुचाराची भेट घेण्याला त्याने संमत्ती दिली. शहाचे पत्र वाचल्यानंतर त्याने पाच दिवसाकरिता संधीची विनंती केली. शहाने ही विनंती मान्य केली.

### कंदहारचा पाडाव

पाचव्या दिवशी अली कुली नावाचा एक पर्शियन अधिकारी दौलत खानाचा निर्णय जाणून घेण्यासाठी शादी खानाच्या मोर्चाजवळ आला. दरम्यानच्या

काळात दौलत खानाने प्रतिकार चालू ठेवण्याबद्दल शिबंदीचे मन वळविण्यासाठी आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा केली परंतु जेथे सक्तीची जरूरी होती तेथे मनधरणी ही निरर्थक ठरली. अखेर शादी खानाने वइसकर्ण दरवाजा पर्शियनांच्या स्वाधीन केला. तेव्हा दौलत खानाची परिस्थिती मोठी अनुकंपनिय झाली. त्याच्यावरील संकटात आणखी भर म्हणून की काय शिबंदीने आपल्या जागा सोडल्या आणि कोणतेही काम करावयास नकार दिला. अशा परिस्थितीत दुसरा कोणताच पर्याय न उरल्यामुळे दौलत खानाने काही अटींवर शरणागति दिली. ११ फेब्रुवारी १६४९ रोजी पर्शियनानी किल्ल्याचा ताबा घेतला. शहाने मिहराब खान याची किल्लेदार म्हणून नेमणूक केली आणि शहा कुली खान याच्याबरोबर क्षमायाचनेचे एक पत्र देऊन त्याला शहाजहानकडे रवाना केले.

**सामालोचन**

कंदहारचा ताबा कोणाकडे असावा याबाबत पर्शियन आणि मोगल सम्राट यांच्यामध्ये जे परस्परविरोधी दावे होते त्याबाबत निर्णायक अशा अनुमानाप्रत येणे अतिशय कठीण आहे. जर का नैसर्गिक सरहद्दी आणि अग्रहक्काने असलेले अधिकार या गोष्टी विचारात घेतल्या तर कंदहारवर न्यायाप्रमाणे मोगलांचाच अधिकार होता. कारण हलमंद नदी ही पर्शियाची सीमारेषा होती आणि बाबर बादशहाने कंदहार शहर हे त्या शहराच्या मूळ अधिपतिपासून जिंकून घेतलेली होते. पर्शियनानी आपल्या हक्कांच्या समर्थनार्थ दोन गोष्टी पुढे केल्या होत्या. पहिली गोष्ट म्हणजे कंदहारचा ताबा घेण्यसाठी शहा हुसेन अरघुनयाने शहा इस्माईल याला केलेले पाचारण आणि दुसरी म्हणजे आपला देश परत जिंकून घेण्य चे कामी शहा तहमास्प याने केलेल्या मदतीबद्दल परत फेड म्हणून कंदहार त्याच्या स्वाधिन करण्याचे हुमायुनने त्याला दिलेले वचन. प्रथम दर्शनी पर्शियाची बाजु आपल्याला अधिक बळकट वाटते परंतु जर का आपण शहा तहमास्प याने हुमायुन याला दिलेल्या मदतीचे परिक्षण केले आणि पर्शियन सैन्याचा हुमायुन बाबतचा दृष्टीकोन ध्यानात घेतला तर आपल्या मनात शंकेला जागा निर्माण होते. आणखी एक गोष्ट म्हणजे खुद्द शहा तहमास्प यानेच प्रथम दुटप्पीपणाचे तंत्र अंगिकारले. परिणामी कंदहार कोणाच्या ताब्यात असावे या प्रश्नाला आपले वर्चस्व टिकविण्यासाठी दोन्ही पक्षांनी आपल्या सामर्थ्याची परिक्षा घेण्याचे स्वरूप प्राप्त झाले.

जेव्हा कंदहारला शहाने वेढा दिल्याबाबत वृत्तांत देणारा दौलत खानाने पाठविलेला खलिता शहाजहान याला मिळाला, तेव्हा किल्ल्यावरील दबाव कमी करण्यासाठी त्याने राजपुत्र औरंगजेब आणि सादुल्लाखान यांना पन्नास[३८] हजार स्वार घेऊन कूच करून जाण्याचा हुकूम दिला. दोन्ही सेनानी भीरा येथे एकत्रीत झाले आणि त्यानी पेशावरच्या रोखाने चाल केली. तेथून कोहात, जमरूद आणि जलालाबादमार्गे २५ मार्च १६४९ रोजी ते काबूल येथे पोहोचले. दरम्यान कंदहारचा पाडाव झालेला होता. म्हणून बादशहाने झपाट्याने कूच करून जाण्याची राजपुत्राला आज्ञा केली आणि पर्शियन सैन्याने कंदहार येथे मजबूत पाय रोवण्याचे अगोदर तेथे पोहोचण्याचा त्याला हुकुम केला.

त्यांच्याजवळ जरी तुटपुंजी साधनसामुग्री होती आणि वाटेत ती मिळविण्यात जरी अनेक अडचणी होत्या तरीदेखील राजपूत्र आणि सादुल्लाखान यानी बादशहाच्या आज्ञेचे तंतोतंत पालन केले. काबूल येथे निष्कारण वेळ न घालवता त्यानी गझनीकडे कूच केले. तेथे मिळेल ती साधनसामुग्री घेऊन बंदोबस्त करण्यासाठी त्यानी पंधरा दिवस मुक्काम केला. नंतर त्यानी पुन्हा कूच करण्यास सुरवात केली आणि ९मे रोजी ते किलात गिलजइ येथे येऊन पोहोचले. दरम्यान बादशहा काबुल येथे येऊन पोहोचला होता. वरील ठिकाणांहून बादशहाच्या आदेशाप्रमाणे सादुल्लाखानाने सैन्याच्या पाच तुकड्या घेऊन कूच केले. त्यामधे त्याचा उद्देश कंदहार येथील शिबंदीला वसंत ऋतुतील पिकाची कापणी करूँ देण्यास प्रतिबंध करण्याचा होता. सादुल्लाखान १४ मे रोजी तेथे येऊन पोहोचला. त्यानंतर दोन दिवसानी राजपुत्र त्याला येऊन मिळाला. त्याच दिवशी कंदहारचा वेढा चालू करण्यात आला.

दुर्दैवाने बादशाही फौजांवर सुरवातीपासूनच माघार घेण्याचे प्रसंग ओढवले. राजा मान ग्वाल्हेरी आणि जगत सिंग याचा मुलगा भाऊ सिंग यानी चिलजीना नावाच्या टेकडीची संरक्षणाची व्यवस्था फार तुटपुंजी आहे हे बघितले आणि आपल्या तारूण्यसुलभ उत्साहाच्या भरात ती टेकडी अचानक हल्ला करून घेण्याचा प्रयत्न केला. परंतु मिहराब खान याने गुप्तपणे बंदुकधारी सैनिकांची एक तुकडी तेथे पाठविली. या तुकडीने बादशाही सैन्य गोळीवाराच्या आटोक्यात येताच त्यांच्यावर जबरदस्त मारा केला. रजपुतांचे अतोनात नुकसान होऊन त्यानी माघार घेतली. तरी देखील टेकडीच्या अर्ध्या वाटेवर त्यानी एक मेढेकोट बांधला आणि काहीकाळ पर्यंत तेथून त्यानी झुंज दिली•

राजपुत्र हा कंदहारच्या वेढयात गुंतलेला असताना त्याने आजुबाजुच्या जिल्ह्यात लुटालुट करण्यासाठी कुलीज खान याची रवानगी केली. त्याने बिस्तसभोवार असलेली उभी पिके ताब्यात घेण्यात यश मिळविले आणि सीस्तान मधील खुनशीवर हल्ला केला. नंतर त्याने किबाद खान आणि अल्ला कुली खान यांची जमिनदावर लुटण्यासाठी रवानगी केली. तेथून जमविलेली लुट परत घेऊन हे सेनानी येत असताना त्यांच्यावर नजफ कुली मीर आखुर आणि हाजी मनुचहर याच्या नेतृत्वाखालील पर्शियन सैन्याने हल्ला केला आणि त्याना हलमंद नदीच्या पलिकडे हाकलून लावले. आपल्या अधिकाऱ्याचा पराभव झाल्यामुळे कुलीज खान याने कुशक नाखुद कडे माघार घेतली. तेथून तो कंदहारच्या नैऋत्येस चोवीस मैलावर असलेल्या संग बाला हिसारुच्या दिशेने मागे सरला.

पर्शियन सैन्य चाल करून येत आहे याबद्दलचा पहिला इशारा जेव्हा त्यांच्या दोन हजार सैनिकांच्या एका तुकडीने राजपुत्र औरंगजेबाच्या छावणी पासून चार मैलापर्यंत कूच करून बऱ्याचशा जनावरांना उचलून नेले, तेव्हा मिळाला. परंतु त्यांचा पाठलाग केला गेला आणि आपली लुट टाकून पळून जाण्यास त्याना भाग पाडण्यात आले. राजपुत्राने सादुल्लाखानाबरोबर विचार विनिमय करून कुलीजखानाच्या मदतीसाठी रूस्तमखानाची रवानगी केली. २५ ऑगस्ट रोजी बाला हीसार येथे तो कुलीज खानाला जाऊन मिळाला या ठिकाणाहून पर्शियनांच्या हालचालीबद्दल बातमी काढण्यासाठी गुप्त हेरांची रवानगी करण्यात आली. मोगल सैन्याने आता बाला हीसार आणि शहा मीर या शहरांच्या अर्ध्या वाटेवर आपली छावणी दिली. काही काळानंतर पर्शियन सेनापती मुर्तजाकुली हा मोगल सैन्याच्या माऱ्याच्या टप्प्यात आला.

### शहा मीरची लढाई

युद्धाला सुरवात दोन्ही फौजांमधील आघाडीच्या तुकड्यामधील अनिर्णीत अशा चकमकीने झाली. मोगलांनी माघार घेतली आणि अर्धन्दाबवर असलेल्या शहा मीर येथे आपले मोर्चे पक्के केले. जेव्हा त्यानी पर्शियन सैन्य चाल करून येत आहे हे बघितले तेव्हा रूस्तम खानाने आपल्या सैन्याची लढाई देण्याच्या दृष्टीने व्यूह रचना केली. त्याच्या लांबचलांब पसरलेल्या तोफखान्याच्या रांगेच्या पाठीमागे नजर बहादुर आणि राव छत्रसाल यांच्या नेतृत्वाखाली आघाडीचे सैनिक होते. सैन्याच्या मध्य भागाच्या उजव्या बाजुचे

नेतृत्व रूस्तम खानाकडे होते आणि डाव्या बाजुचे कुलीज याच्याकडे. त्या दोघांच्या सेनादलाची मिळून सैन्याची दुसरी फळी तयार झालेली होती. या दुसऱ्या फळीच्या दोन्ही टोकांना संरक्षण उजव्या बाजूकडे सरदार खानाच्या हाताखालील सैन्याने आणि डाव्या बाजूला शाद खान याच्या हाताखालील सैन्याने दिलेले होते. शत्रूने देखील आपल्या सैन्याची व्युहरचना वरील प्रमाणेच केली. पर्शियन सैन्याचा सरसेनापती मुर्तजाकुली याचे आगमन त्यादिवशी सकाळीच झाले होते. हिंदुस्थानी सैन्याचा पराभव केल्याखेरीज आपण आपला उपवास सोडणार नाही अशी त्याने प्रतिज्ञा केली.

शहा मीरच्या युद्धाला प्रारंभ झाला तो दोन्ही बाजुनी परस्परांवर केलेल्या तोफांच्या प्रचंड भडिमाराने. सैन्याच्या आघाडीच्या बाजूला युद्धाची धुमश्चक्री चालू असताना पर्शियनानी गोलाकार पलटखाली आणि मोगलांच्या दोन्ही फळ्या आणि पिछाडी यावर दबाव आणला. कुलीज खान आणि शाद खान हे पर्शियनांच्या माऱ्याला तोंड देत दुर्निवार उभे राहिले, परंतु सरदार खान याची घसरगुंडी झाली. त्याच्या मदतीसाठी रूस्तम खान हा अगदी वेळेवर चाल करून गेला आणि दोन्ही पक्षात घनघोर युद्ध झाल्यावर त्याने हल्ला करणाऱ्या शत्रुला परतवून लावले. पर्शियनानी केलेला हल्ला अशातऱ्हेने मोडून काढण्यात आला आणि रात्रीच्या आवरणाखाली त्यानी माघार घेतली. विजयी मोगल सैन्याने पर्शियन सैन्याने टाकून दिलेल्या अनेक तोफा आणि बंदुका हस्तगत केल्या.

कंदहारच्या नवीन मोहीमेत मोगलांच्या दृष्टीने मनाला समाधान देणारी गोष्ट म्हणजे हा विजय होता असे म्हणावे लागेल. परंतु अंतिम विजय मिळविण्याच्या दृष्टीने त्यामुळे काही सुधारणा झाली असे मात्र म्हणता येणार नाही. कंदहारचा वेढा रेंगाळतच चालला आणि राजपुत्र औरंगजेबाला काय करावे ते समजेनासे झाले. अखेर सादुल्ला खानाच्या सुचनेवरून खंदकामधील पाण्याचा निचरा करण्यासाठी जमिनीखालून एक पाट काढण्यात आला. परंतु वेढा घालून बसलेल्या मोगल सैन्याचे सर्व प्रयत्न शिबंदीने किल्ल्यावरून तोफांचा प्रचंड भडीमार करून उधळून लावले. हिवाळ्याचे आगमन आणि वेढ्यासाठी लागणाऱ्या तोफांचा अभाव यामुळे आपल्या अधिकाऱ्याना वेढा उठविण्याचा हुकूम देणे बादशहाला भाग पडले. त्यानुसार ३ सप्टेंबर १६४९ रोजी राजपुत्र औरंगजेबाने कंदहारपासून आपल्या माघारीला सुरवात केली.

**पर्शियन वकीलाची भेट घेण्यास शहाजहानचा नकार**

कंदहारच्या वेढ्याला सुरवात झाल्यानंतर एक महिन्याने पर्शियन वकील शहा कुली हा काबुल येथे येऊन पोहोचला. बादशहाची मन:स्थिती इतकी संतप्त झाली होती की त्याने वकीलाला आपल्या भेटीस बोलाविले नाही. त्याने जफर खान याला वकीलाची वास्तपुस्त करण्यास सांगितले. एक महिन्यानंतर शहाच्या पत्राला लेखी उत्तर दिल्याशिवायच वकीलाला निरोप देण्यात आला. पर्शियामधे त्याला जाऊ देण्याविषयी राजपुत्र औरंगजेब याला आज्ञा देण्यात आली. बादशहाच्या वतीने जफर बेग याने पर्शियाच्या शहाला सांगण्यासाठी म्हणून पुढील तोंडी निरोप वकीलाजवळ दिला: "आपल्या बादशहाला तुम्ही असे सांगा की दोन्ही घराण्यामधे असलेले सलोख्याचे आणि मैत्रीचे संबंध पुढे चालू ठेवणे हेच त्याना अधिक शोभून दिसले असते. परंतु बलाढ्य मित्रांची किमत ही ज्याना बुद्धीमत्ता आहे त्यानाच कळू शकते.....ते काही असो. जेव्हा तुमच्या बादशहाच्या कंदहार विरूद्धच्या मोहीमेची बातमी आम्हाला कळली तेव्हा कंदहारचा ताबा आमच्या-कडे ठेवण्यासाठी आम्ही राजपुत्र औरंगजेब याला प्रचंड सैन्य देऊन रवाना केले आणि आम्ही काबूल येथे छावणी करून आहोत. आमचे सैन्य चाल करून येत आहे याची बातमी तुमच्या बादशहाला कळल्यावर त्यानी हेरातकडे माघार घेतली. त्यांच्याबरोबर युद्ध खेळण्यास राजपुत्र अतिशय उत्सुक होता. त्याने कंदहारला वेढा दिला. जेवढे शक्य होते तितके परमेश्वराच्या कृपेने मी केलेले आहे आणि याच्यापुढे जे काही मी करीन त्याला तो परमेश्वर आणि सारे जग साक्ष राहील.[१९]"

**मोगलांच्या अपयशाची कारणे**

या निरोपामधे असलेल्या मग्रूरीची बरोबरी कंदहार येथे मोगल सैन्यावर जी नामुष्कीची परिस्थिती ओढवली तीनेच केली. सत्तेचा बेभान असा जो गर्व शहाजहानला झाला होता त्याच्या धुंदीत पर्शियनाची साधनसामुग्री किंवा प्रतिकार करण्याची त्याची शक्ति या दोन्ही गोष्टींची नोंद त्याला घेता आली नाहीं. कंदहारचा किल्ला यापूर्वी अचानक केव्हा हल्ला करून घेणे कोणालाही शक्य झाले नाही ही गोष्ट शहाजहान विस-रला. परंतु आपली गेलेली अब्रु परत मिळविण्यासाठी त्याला मोहीम संपविण्याची घाई झाली, परिणामी त्याने जे सैन्य पाठविले त्या सैन्याजवळ धड युद्ध सामुग्रीही नव्हती किंवा अन्नधान्याचा पुरवठाही नव्हता. एवढ्या प्रचंड सैन्याला अन्नधान्य पुरविण्याइतका कंदहारचा प्रदेश हा सुपीक नव्हता.

परंतु मोगल सम्राटाची सर्वात मोठी घोडचूक म्हणजे पर्शियनानी आपला परिपूर्ण तोफखाना लढाईच्या मैदानात उतरविला होता त्याकडे त्याने केलेले दुर्लक्ष ही होय. तुर्कीच्या बरोबर सातत्याने त्याचे युद्ध चाललेले असल्यामुळे तोफखान्याचा उपयोग अधिक चांगल्या तऱ्हेने करणे हे मोगलांपेक्षा त्याना अधिक चांगल्या तऱ्हेने अवगत होते. याउलट मोगलांच्या तोफखान्यावरील अधिकारी वर्ग हा मिश्र जातीय युरोपियनांचा होता. कंदहारमधे असलेल्या इतर तोफांच्या जोडीला आणखी दोन भारी पल्ल्याच्या तोफा होत्या. त्यांच्याशी बरोबरी करील अशी एकही तोफ मोगलांकडे नव्हती. मोगल सैन्यातील अधिकारी आणि सैनिक वर्ग यांच्यामधे वैयक्तिक शौर्य आणि धाडस या गुणांची कमतरता नव्हती. परंतु धाडसी आणि भित्रे त्यांच्यामधे कसलाही भेदभाव न दाखविणाऱ्या प्रचंड भडीमारासमोर हे गुण कसे उपयोगांत येणार होते ? त्याशिवाय पर्शियन सेनानी मिहराब याच्या अंगी असामान्य हिम्मत आणि धीरोदत्त निर्धार हे गुण होते आणि मोगलांच्या वाताहातीला मिहराबच्या हाताखाली असलेला भारी दर्जाचा तोफखाना जितका कारणीभूत झाला तितकेच त्याच्या अंगातील कर्तृत्व कारण ठरले यात काहीच शंका नाही.

**कंदहार घेण्याचा दुसरा प्रयत्न**

कंदहार जिंकून घेण्याचा प्रयत्न १६४९ मधे सोडून देण्यात आला. १६५२ मधे कंदहार जिंकून घेण्यासाठी फिरून प्रयत्न केला गेला. १६५१ च्या ऑगस्ट महिन्यातच काश्मिरमधून परतताना शहाजहान याने योजिलेल्या मोहिमेसाठी आपल्या अधिकाऱ्याना एकत्रित होण्यासाठी हुकूम सोडले. शहा शुजा याला बंगालमधून बोलावण्यात आले. राजा जयसिंग, राजा जयवंतसिंग, रूस्तम खान, अलावर्दीखान, राजा विठलदास वगैरेना १६५२ च्या वीस जानेवारी पर्यंत दरबारात हजर राहण्याचा हुकूम देण्यात आला. रूस्तम खान लाहोर येथे बादशहापाशी येऊन दाखल झाला. त्याने बरोबर दोन लाख रुपये आणले होते. आपली तुला करण्याचा समारंभ साजरा केल्यानंतर शहाजहानने लाहोर सोडले आणि तो ४ एप्रिल १६५२ रोजी काबूल येथे येऊन दाखल झाला.

पूर्वीप्रमाणेच आता देखील मोहिमेचे नेतृत्व राजपुत्र औरंगजेब आणि सादुल्लाखान यांजकडे होते. त्या दोघांना २ मे १६५२ रोजी कंदहारचा वेढा सुरू करण्याचा हुकुम देण्यात आला. सैन्यामधील शिपायांची संख्या पन्नास हजार आणि साठ हजार यांच्या दरम्यान होती आणि त्यांच्या-

पैकी एक पंचमांश बंदुकची आणि गोलंदाज होते. "अधिकाऱ्यांची संख्या एकंदर सैन्याच्या एक विसांश एवढी होती. तोफखान्यामधे सत्तर पौंडी दोन मोठ्या तोफा होत्या, चार ते पांच पौंडी वीस लहान तोफा होत्या, हत्तीवर लादलेले वीस आणि उंटावर लादलेले शंभर असे जंबूरख होते. मालाची नेआण करण्याची व्यवस्था खास बादशहाच्या तबेल्यातले निवडक हत्ती आणि त्याशिवाय इतर अधिकाऱ्यांच्या ताब्यातील हत्ती आणि तीन हजार उंट एवढ्या दलाकडे सोपवली होती." मागील वेढ्याचे वेळी घडलेल्या प्रसंगाचीच पुनरावृत्ती झाली. चिलझीना टेकडी आणि कैतुल कडा अचानक हल्ला करून जिंकून घेण्याचा राजरुप आणि महाबत खान यांचा प्रयत्न पूर्णपणे फसला. राजपुत्र औरंगजेब आणि सादुल्लाखान यांचे मोर्चे सरकणे अशक्य झाले आणि विजयाची आशा ही पूर्वी इतकीच दूर राहिली. बादशाही फौजेची आपल्या तोफखान्यावर फार भिस्त होती. परंतु अगदी आणिबाणीचे वेळी त्यांच्या तोफखान्याने त्याना दगा दिला. राजपुत्राच्या गोलंदाजानी भारी वजनाचे गोळे तोफातून उडवण्याचा प्रयत्न केल्यामुळें ऐंशी तोफांचे खंदकामधेच फुटुन तुकडे झाले. कासीम खानाच्या खंदकात दोन तोफा निरुपयोगी झाल्या आणि अनुभवी माणसाच्या अभावी सादुल्ला खानाच्या खंदकातील तोफांचा उपयोग करता येणे शक्य झाले नाही. याच्याउलट कसलेल्या पर्शियन गोलंदाजानी मोगलांवर आपल्या गोलंदाजीतून मृत्युचा जणू काही पाऊसच पाडला. गोळीबार करण्याचे अगोदर शत्रू आपल्या तोफखान्याच्या माऱ्यात येण्याची ते शांतपणे वाट पहात असत.

वेढा चालू असताना राजपुत्र औरंगजेबाने पर्शियन सेनापती औतारखान याला लाच देण्याचा प्रयत्न केला. कंदहार येथे मिहराब खान याचे जागी त्याची नेमणूक झालेली होती. औरंगजेबाने त्याचेकडे मोगलाच्या चाकरीत तुम्हांला मानाची मोठी जागा देतो असा निरोप देऊन हाजी बहादुर याला पाठविले. परंतु औतारखानाने राजपुत्राला पूर्वी आलेल्या अपयशाचा उल्लेख करून हाजी बहादुर याला टोमणे दिले, आणि त्याने कुत्सितपणे उद्‌गार काढले की राजपुत्राला हिंदुस्थानात जाण्याची जर शरम वाटत असेल तर त्याने पर्शियाला जावे, आणि त्याचा पूर्वज हुमायून याच्याप्रमाणेच त्याने पर्शियाच्या शहाकडे चाकरी शोधावी. या उत्तराने हाजीबहादुर याला मोगल छावणीकडे पाठविण्यात आले.

### मोगलांचे अपयश

मोगलांची तयारी इतकी डामडौलाची आणि भपक्याची असूनदेखील त्याना कोणतीच कामगिरी पार पाडणे शक्य झाले नाही आणि म्हणून शहाजहान याने वेढा उठविण्याचा हुकूम दिला. राजपुत्र औरंगजेबाने त्याने आपल्याला थोडा अधिक अवधी द्यावा यासाठी त्याचे मन वळविण्याचा प्रयत्न केला. परंतु तसे न करण्याइतका शहाणपणा शहाजहानने दाखविला. सारी सेना थकून गेली होती. बराच काळ रखडलेल्या परंतु अपयशी झालेल्या त्यांच्या मोहिमेनंतर सैन्यातील शिपाई मायदेशी परतण्यास उत्सुक झालेले होते. त्यानुसार ९ जुलै रोजी राजपुत्राने कंदहार सोडले आणि ७ ऑगस्टला तो काबूल येथे आपल्या बापाला येऊन मिळाला.

### तिसऱ्या मोहिमेची तयारी

लागोपाठ झालेल्या दोन मोहिमांत औरंगजेबाला आलेले अपयश आणि माणसे आणि द्रव्य यामध्ये झालेले प्रचंड नुकसान या गोष्टी शहाजहानच्या गर्वाचा उपशम करण्यास पुरेशा ठरल्या नाहीत. त्याच्या मनात अजूनदेखील विजयाची थोडीफार आशा होती. आतापर्यंत जे साध्य झाले नव्हते ते आपण साध्य करून दाखवू या दाराने दिलेल्या वचनामुळे या आशेला उजाळा मिळाला. काबूल आणि मुलतान हे दोन सुभे त्याच्याकडे नेमून देण्यांत आले, त्याचा दर्जा तीस हजार जात आणि वीस हजार सवार इतका वाढविण्यात आला, आणि कंदहार घेण्याचे कामी प्रयत्न करण्याची संधी शहाजहानने त्याला दिली. राजपुत्र आपल्या बापाबरोबर लाहोर येथे आला आणि त्याने मोठ्या प्रमाणावर तयारी करण्याचे हुकूम दिले. तोफखान्यामध्ये सुधारणा आणि मजबुती करण्याकडे यावेळी विशेष लक्ष देण्यात आले. मीर आतिश कासिमखान आणि बादशाही तोफखान्याचा मुशरिफ महमद सालिह याच्या देखरेखीखाली एक मण आणि सोळा शेर वजनाचा गोळा फेकण्याऱ्या दोन मोठ्या तोफा ओतण्यात आल्या. तिसरी तोफ राजपुत्राचा मीरआतिश जफर खान याच्या देखरेखीखाली ओतण्यात आली. वेढ्याची तयारी तीस हजार गोळे, पाच हजार मण दारु, पाचशे मण शिसे आणि चौदा हजार अग्निबाण जमा करून पुरी करण्यात आली.

राजपुत्राजवळ सेनादल पुढीलप्रमाणे होते : एकशे सात मनसबदार, पाच हजार अहदी; त्यांच्यापैकी अर्धे घोड्यावर स्वार झालेले बंदुकधारी आणि उरलेले अर्धे घोड्यावर स्वार झालेले तिरंदाज होते; दोन हजार पायदळी सैनिक; त्यांच्यामध्ये बंदुक चालवणारे गोलंदाज आणि अग्निबाण फेकणारे यांचा

समावेश होता; सहा हजार चर खोदणारे, पाचशे सुरुंग पेरणारे आणि पाचशे पाणी वाहून नेणारे. प्रमुख अधिकाऱ्यामध्ये जयसिंग, कुलिज खान, रुस्तुम खान छत्रसाल आणि अली मर्दान खान हे होते. वहातुकीचे साधन म्हणून आठशे हत्ती आणि तीन हजार उंट यांची सोय करण्यात आली. राजपुत्राकडे मोहिमेच्या खर्चासाठी दोन कोट रुपये सोपविण्यात आले. सर्व दृष्टीने विचार करता शहाजहानच्या कारकिर्दीमधील ही मोहिम सर्व दृष्टींनी भपकेबाज अशी होती परंतु त्या मोहिमेला विलक्षण असे अपयश प्राप्त झाले."[४०]

### दाराचे लाहोर येथून प्रयाण

दाराने ११ फेब्रुवारी १६५३ रोजी लाहोर सोडले आणि वीस दिवसात तो मुलतान येथे पोहोचला. आपल्या अधिकाऱ्यांना आपल्याला येऊन मिळता यावे यासाठी त्याने तेथे काही काळ मुक्काम केला. त्याने २२ मार्च रोजी सिंधु नदी ओलांडली. वाटेमधील रहिवाशाना कोठल्याही तऱ्हेचा उपद्रव न देण्यासंबंधीचे कडक हुकूम त्याने आपल्या सैनिकांना दिले. जरी त्याच्या सैन्यापैकी बरेचसे सैन्य अजून आले नव्हते तरीदेखील वेढा सुरू करण्याचा मुहुर्ताचा दिवस जवळ येत चालल्याने राजपुत्राने छावणीसाठी मैदान मुक्रर करण्याकरिता रूस्तम खानाला कंदहारकडे पाठविले.

### कंदहार येथे आगमन

२३ एप्रिल १६५३ रोजी दारा कंदहार येथे पोहोचला आणि किल्ल्यासभोवार खंदक खणून त्याने वेढ्याला औपचारिकरीत्या सुरवात केली. त्याने बिस्तच्या रस्त्यावर देखभाल करण्याचा आणि किल्ल्यावरील शिबंदीला कुमक पोहोचु देण्यास प्रतिबंध करण्याचा रूस्तम खानाला हुकूम दिला. पूर्वीच्या दोन वेढ्यांचे प्रसंगी बादशाही फौजेची जी व्यूह रचना होती त्याप्रमाणेच याहीवेळी सैन्याची रचना करण्यात आली. किल्ल्यापासून एक मैलावर महंमद कामरानच्या बागेतील लक्का टेकडीच्या पाठीमागील तलावानजीक राजपुत्राने आपली छावणी दिली. पाठीमागील दरवाजापाशी राजा जयसिंग याची जागा मुक्रर करण्यात आली आणि कुलिज खान याला वइस कर्ण दरवाज्याच्या विरूद्ध बाजूला, बाबावली दरवाज्याच्या विरूद्ध बाजूला महाबत खान याला आणि चिलजीना टेकडीच्या विरूद्ध बाजूला इखलास खान याला अशा जागा नेमून देण्यात आल्या. खंदकांच्यामधे मोक्याच्या ठिकाणी तोफखाना ठेवण्यात आला.

### वेढ्याला सुरवात

किल्यावरील शिबंदीला जेव्हा हिंदुस्थानी सैन्याच्या आगेकुचीची बातमी समजली तेव्हा औतारखानाने एक अतिशय जलद जासूद कुरबान अली याला मदत मागविण्यासाठी दरबाराकडे रवाना केले. कंदहारच्या मदतीसाठी जाण्याचा हाजी मनुचहर आणि बकलान बेग याना शहाने हुकूम दिला. त्याशिवाय सरसेनानी अलीकुली खान याला बुस्ताम येथे आपल्या सैन्याची जमवा-जमव करण्याची आज्ञा देण्यात आली. परंतु वरील कुमकेची फौज कंदहार येथे येण्याचे अगोदरच मोगल तेथे येऊन पोहोचले होते. तरीदेखील मोगलांचे संख्याबल अधिक असताना मोठ्या साहसाने औतारखानाने आक्रम-कांना किल्ल्यावरून तोफांचा भडीमार करून उत्तर दिले. त्याने त्यासाठी राजपुत्र मुक्काम करून असलेल्या खंदकालाच विशेषकरून लक्ष्य केले आणि परिणामकारकरित्या आपल्या तोफांचा भडीमार त्या दिशेने केला.

बादशहाने दिलेल्या आदेशानुसार पर्शियनांविरूद्ध हलमंदची फळी धरून ठेवण्यासाठी दाराने रूस्तम खानाची रवानगी केली. २१मे १६५३ रोजी तो बिस्त येथे पोहोंचला आणि दहा दिवसांच्या वेढ्यानंतर त्याने बिस्तचा अधिकारी मेहदी कुली याला काही अटीवर शरण येण्यास भाग पाडले. काही काळानंतर गरष्कचा किल्लाही मोगलानी आपल्या ताब्यात घेतला.

बिस्तच्या पाडावानंतर दाराने किल्ल्यावरील शिबंदीला उद्देशून एक काव्यरचना करून पाठविली. त्यात त्याने अशी धमकावणी दिली की त्यांनी सामोप-चाराने किल्ल्याची शरणागति न दिल्यास त्यांची सर्रास कत्तल केली जाईल. यावर किल्ल्यावरील शिबंदीने मोठ्या धिमेपणाने पुढील प्रमाणे उत्तर पाठविले. साऱ्या विश्वाची समशेर आमच्या विरूद्ध चेताउन उठु दे, जर का परमेश्वराची तशी इच्छा नसेल तर ती आम्हाला छेदू शकणार नाही. धमकावणीनंतर दाराने मन वळविण्याचा मार्ग स्विकारला, आणि किल्ल्यावरील शिबंदीने चाकरी सोडून पळून जाण्याचे कबूल केल्यास सन्मानाच्या जागा आणि मनाला मोह पाडतील अशी बक्षिसे या गोष्टींची लालूच दाखविली. काहीजण या मोहाला बळी पडले आणि त्यानी किल्ला सोडला परंतु किल्ल्यावरील बहुसंख्य शिबंदीने अखेरपर्यंत लढण्याचा आपला निर्धार प्रकट केला.

वरीलप्रमाणे खळबळजनक अशा वाटाघाटी चाललेल्या असताना राजा राजरूप याने चीलजिना टेकडीवर हल्ला करून घेण्याचा १४ जुलै रोजी

प्रयत्न केला. त्याने लाकडाचे ओंडके आणि फळया यांच्या सहाय्याने आच्छादलेला असा एक मार्ग तयार केला आणि या मार्गाच्या आडोशाने त्याने टेकडी चढण्यास सुरवात केली. टेकडीला संरक्षण देणारा बुरूज जमिनदोस्त करण्यासाठी त्याने तोफांचा भडीमार सुरू केला, परंतु त्याच्या तोफांच्या माऱ्याच्या बाहेरच्या बाजूला तो बुरूज पडला. परिस्थिती आणखी बिकट करण्यासाठी म्हणून की काय बुरूजाच्या पाठीमागून किल्ल्यवरील शिबंदीने वेढा घालणाऱ्या मोगल सैनिकांवर गोळयांचा नुसता पाऊस पाडला आणि त्यांची भयंकर जिवित हानी केली.

रूस्तम खानाच्या पदरातही अशाच तऱ्हेचे अपयश पडले. बिस्तच्या पाडावानंतर त्याला जमीनदावर जिंकून घेण्याचा हुकूम करण्यात आला होता. तो तेथे जाऊन पोहोचला आणि त्याने आजुबाजूच्या जिल्ह्यायात लुटालुट केली. एका प्रसंगी त्याने हलमंद नदी देखील ओलांडली आणि तेथे जमा झालेल्या काही पर्शियन सैनिकांची पांगापांग केली. परंतु तेथील शिबंदीने प्रतिकार केल्यामुळे आणि कूच करून येणाऱ्या पर्शियन सैनिकांच्या धाडीमुळे लवकरच त्याची परिस्थिती अनुकंपनीय झाली. त्याने जमीनदावर सोडले आणि बिस्तकडे माघार घेतली. येथे देखील त्याला तग धरता आली नाही. त्याने बिस्त सोडले आणि कंदहारकडे माघार घेतली. बादशहाने या गोष्टीबद्दल अतिशय नापसंती दर्शविली.

जेव्हा दारा मुलतानहून येत होता तेव्हा लमाणांच्या एका प्रमुखाने त्याला कंदहारच्या शिबंदीजवळ अन्नधान्याची फार मोठी टंचाई असल्याची बातमी दिली. त्यानुसार त्याला असे वाटले की आपण किल्ल्याच्या वेढयाचे काम रेंगाळत ठेवल्यास आपल्याला किल्ल्याचा पाडाव करता येईल. ही अफवा मोगल सैन्यामधे देखिल पसरलेली होती. मोगल सैन्याच्या निष्क्रियतेचे थोडेफार स्पष्टीकरण आपल्याला यामधे मिळते. या अफवेला प्रतिरोध करण्यासाठी औतारखानाने घैरत खानाच्या मोर्चामधे एक पत्र टाकले. त्या पत्रात किल्ल्यावरील शिबंदीला दोन वर्षे पुरेल इतका अन्नधान्याचा साठा आहे अशा तऱ्हेचा मजकूर होता. वरील मजकुराशिवाय त्याने अजुनपर्यंत काहीही लाभ उठविण्यात अपयश आल्याबद्दल बादशाही पक्षाला टोमणे दिले होते आणि हल्ला करण्याबद्दल त्याना आव्हान दिले होते. या पत्राला दाराने उत्तर दिले की कोणत्याही क्षणी आपल्या दोन तोफा येण्याची आपण वाट पहात आहोत आणि त्या जेव्हा येतील तेव्हा

आपण संरक्षकांची फळी जमिनदोस्त करू. औतारखानाने या धमकीची टर उडविली आणि लिहिले "जो पर्यंत माझे मस्तक माझ्या खांद्यावर शाबूत आहे तोपर्यंत कंदहारचा पाडाव अशक्य आहे; म्हणूनच कंदहार घेण्याची कल्पना डोक्यातून काढून टाका आणि हिंदुस्थानकडे परत फिरा."

औतार खानाने मोगलांना छद्मीपणाने जे आव्हान दिले होते त्याचा योग्य तो परिणाम झाला. किल्ला जिंकून घेण्याचा अखेरचा प्रयत्न करण्याचा दाराने निश्चय केला. सैन्यातील सर्व मोठ्या तोफा एका ठिकाणी गोळा करण्यात आल्या. असे केल्यामुळे तोफांच्या माऱ्याच्या आडोशाने बादशाही फौजांना खंदकापर्यंत पोहोचता आले असते आणि खंदकामध्ये मातीने भरलेली पोती टाकता आली असती. परंतु ही योजना फसली. यानंतर धरणाचा बंधारा फोडून खंदकामधून पाणी काढून टाकण्याचा प्रयत्न करण्यात आला. परंतु किल्ल्यावरील शिबंदीने दुसऱ्या ठिकाणाहून आपला पाण्याचा पुरवठा चालू ठेवला. सरतेशेवटी ऑगस्ट महिन्याच्या सुरवातीला मोठ्या तोफा वेढ्याचे ठिकाणी येऊन पोहोचल्या आणि बादशाही फौजानी आपला तोफांचा भडीमार सुरू केला. या तोफांच्या भडीमाराने तिनशे यार्ड लांबीची संरक्षक फळी आणि बाहेरचे मातीचे काम जमिनदोस्त झाले. परंतु किल्ल्याच्या पायाशी चिखल असल्यामुळे किल्ल्याच्या रोखाने चाल करून जाणे हे अशक्य झाले.

**दाराचे पुनरागमन**

किल्ल्याचा वेढा सुरू होऊन आता चार महिने झालेले होते, आणि विजय मिळण्याची आशा ही पूर्वी इतकीच दुरापास्त होती. बादशाही फौजांजवळील दारू गोळ्याचा साठा आता खलास झालेला होता आणि त्यांचा तोफांचा भडीमार आता थांबला होता. यावर शिबंदीने किल्ल्याच्या संरक्षण फळीची दुरूस्ती करण्यास सुरवात केली. दाराने किल्ला जिंकून घेण्याचा आणखीन एक प्रयत्न करण्याचा निश्चय केला. असा बेत आखण्यात आला की एका बाजूकडून मुख्य सैन्य किल्ल्यावर हल्ला चढवून शिबंदीचा मारा आपल्या दिशेने ओढवून घेत असताना राजा जयसिंग याने दुसऱ्या ठिकाणाहून किल्ल्याच्या भिंती चढून जाऊन आत प्रवेश करावा. परंतु यासाठी नेमून दिलेल्या सैन्याच्या विविध विभागांनी परस्परांबरोबर सहकार्य न केल्यामुळे ही योजना फसली आणि बादशाही सैन्याचे प्रचंड नुकसान झाले.

सरतेशेवटी मोहीम निष्कारण लांबविण्यामधील निरर्थकपणा शहाजहान याला दिसून आला. कंदहार हे अजिंक्य होते. कंदहारला वेढा देऊन किंवा त्यावर अचानक हल्ला करून ते जिंकून घेण्याचा प्रयत्न करणे म्हणजे निव्वळ वेडेपणा होता. म्हणून त्याने दाराला माघारी बोलावले. २७ सप्टेंबर रोजी त्याने कंदहार सोडले आणि ऑक्टोबरमधे तो मुलतान येथे पोहोचला. एक महिन्यानंतर त्याचे लाहोर येथे आगमन झाले.

**कंदहारच्या मोहिमेचे परिक्षण**

सारांश कंदहार विरुध्द मोगलांना आलेल्या अपयशाची कारणे पाहता त्यात आपल्याला असे दिसून येईल की त्यांच्या अपयशाचे मुख्य कारण म्हणजे दुय्यम दर्जाचा तोफखाना आणि बंदुका, तोफा आदि शस्त्राबद्दल त्याना असलेली अपुरी माहिती हे होते. त्याशिवाय पर्शियनांनी नेहमी बचावाचा पवित्रा घेतला त्यामुळे त्याना जो फायदा उठविता आला त्यामधे किल्ल्याची विशिष्ठ मांडणी आणि मजबुती यांची भर पडली. अली मर्दान खान याने किल्ल्याच्या मजबुतीत फार मोठी भर घातलेली होती. त्याशिवाय किल्ल्याचे दोन किल्लेदार मिहराब खान आणि त्यानंतर औतार खान या दोघांच्या अंगी असामान्य असे कर्तृत्व होते. त्यानी संकटाला नेहमीच तुच्छ लेखले, आपल्या धाडशीपणात त्यानी कधीही उणेपणा आणू दिला नाही आणि आपल्या अनुयायांचा विश्वास त्यानी कायम राखून ठेवला. शेवटी कंदहारच्या अनातिथ्यशिल प्रदेशाने अन्नधान्याचा साठा पुरा पाडण्याबाबत मोगलाना अतिशय मोठ्या अशा संकटात नेहमीच गुंतविले. मोगल बादशहाने केलेली सर्वात मोठी चूक म्हणजे प्रचंड सैन्याची त्यानी केलेली रवानगी ही होय. या सैन्याला फार मोठ्या छावणीची जरूर भासे. याचा परिणाम असा झाला की बादशाही सैन्याची आगेकूच होण्यात मदत होण्याचे ऐवजी त्याची प्रगती मात्र त्यामुळे रोखून धरली गेली.

पर्शियन आणि मोगल दरबारामधील अधिकृत संबंध औरंगजेब गादीवर येईपर्यंत संपुष्टांत आले. वारसा हक्काच्या युध्दाला सुरवात होण्याअगोदर राजपुत्र मुराद याचा दुसऱ्या शहा अब्बास याच्याबरोबर जोरदार पत्रव्यवहार चाललेला आपल्याला दिसून येतो. सिंहासन मिळविण्यासाठी त्याने योजलेल्या बेतांना पूर्तता यावी म्हणून मुरादने शहा अब्बासकडे मदतीची विनंती केली. प्रत्यक्षात कंदहारमधे शहाने काही सैन्याची जमवाजमव

केली आणि मुरादकडून मागणे आल्यास त्याच्या मदतीला जाण्यासाठी सैन्य तयार ठेवले. परंतु तशी वेळ आलीच नाही. औरंगजेबाकडून वाताहात झाल्यानंतर दाराने देखील शहाला पत्र लिहून त्याच्याकडे संरक्षण देण्याविषयी विनंती केली. परंतु कंदहार येथे त्याच्या सैन्याला ज्या लाजिरवाण्या प्रसंगातून जावे लागले त्याचा विसर शहाजहानला आपल्या हयातीत कधीही पडला नाही

# तळटीपा

## प्रकरण नववे

(१) Bernier, p. 128

(२) Rush Brook Williams, 'An Empire Builder of the Sixteenth Century,' pp. 117-119.

(३) Vincent Smith, 'Akbar, the Great Mogul,' p. 258.

(४) R. B., Vol.II. pp. 240-42.

(५) आलम आराय 'अब्बासी, पान ४१६ (Add. 16,684).

(६) जामी-अल-मरासिलात, पान २२९; कजवीनी, पाने १७६ब-७७; लाहोरी, खंड १, पाने २६१–६२.

(७) जामी- अल-मरासिलात, पाने २५२ ब -२५३.

(८) कजवीनी, पाने १८३ब-८७; लाहोरी, खंड १, पाने २८१–८७; जामी-अल -मरासिलात, पान २५२.

(९) खुल्द -इ-बरीन, पान ३९.

(१०) कजवीनी, पान २१९ब; लाहोरी, खंड१, पाने २६१–६२.

(११) कजवीनी, पाने २४९–५०,२५५; लाहोरी, खंड १, पान ४४१.

(१२) कजवीनी, पाने २४५ब–४६ब; लाहोरी, खंड १, पाने ४१९–२१; खुल्द-इ-बरीन, पाने ४०–४१ब.

(१३) कजवीनी, पाने २६९ब–२७३; लाहोरी, खंड१, पाने ४७७–८६.

(१४) खुल्द - इ -बरीन, पाने ९० ब आणि १०७.

(१५) Sykes, 'History of Persia,' Vol. II. pp. 210-11.

(१६) या तणातणींच्या हकीकतीसाठी पहा वली कुली शामलूकृत किसस-उल्-खाकानी.

(१७) लाहोरी, खंड १, भाग ३, पाने, २५७–६६; खुल्द-इ-बरीन पान ११४.

(१८) बहारि-इ-सुरवन, पान ४५.

(१९) खुल्द-इ-बरीन मधे अली मर्दान खानाविरुध्दच्या आरोपांची जंत्रि दिलेली आहे. ( पाने ११४–११६ब); अली मर्दान खानावरीव संशयाला यत्किंचितही जागा नव्हती असे ताहिर वहिदचा कर्ता सांगतो (पान २३६). याबाबत वली कुली शामलू हा ताहिर वहीद बरोबर सहमत आहे (पाने ४३ आणि ७४); अली मर्दान खानाला पर्शियन दरबारांत अनेक शत्रू होते आणि आपल्या राज्य कारभाराचा वृत्तान्त तेथे जाऊन सादर करण्यास तो घाबरत होता आणि म्हणून त्याने कंदहारची विश्वासघाताने शरणागती दिली असे बर्नियर याने विधान केलेले आहे (पान १४८).

(२०) लाहोरी, खंड २, पान ३२.

(२१) लाहोरी, खंड २, पान ३२; वली कुली शामलू याच्या मतें त्याचे नाव मशहद अली असे होतें (पान ४४).

(२२) किसस, पान ४४.

(२३) लाहोरी, खंड २, पान ३५; हिंदुस्तानच्या बादशहाने कंदहारचा ताबा घेण्यासाठी सफदरखानाची रवानगी केली असे ताहिर वहीदने सुचविले आहे तें चूक आहे (पान २४).

(२४) लाहोरी, खंड२, पाने २४–५४; खुल्द-इ-बरीनमधे या लढाईची बोळवण केवळ एका वाक्यांत करण्यात आलेली आहे (पान११६).

(२५) जामी-अल-मरासिलात, पाने२५३ब-५४; किसस, पान ४३; लाहोरी, खंड २, पान९३.

(२६) लाहोरी, खंड २, पान४९. शहाने रूस्तम खान याला खुरासांनात सैन्याची जमवाजमव करण्याची आज्ञा दिली. परंतु तो मरण पावला असे ताहिर वहीदचा कर्ता म्हणतो (पान २४).

(२७) जामी-अल-मरासिलात, पान २५४ब.

(२८) लाहोरी, खंड २, पान १२५.

(२९) दारा परतल्यामुळे ही मोहीम सोडून देण्यात आली असे विधान. ताहिर वहीदमध्ये आहे (पान २४); लाहोरी, खंड२ पान १३९

(३०). लाहोरी, खंड २, पाने ४९२–४००; ताहिर वहीद, पाने ६१–६४; किसस, पान ५४.

(३१) जामेउल्इन्शा, पाने १२२ब–१२६ब.

(३२) ताहिर वहीद, पाने ४८–४९.

(३३) लाहोरी, खंड २, पाने ५९५–६०२.

(३४) कंदहारवर नियोजीत करण्यांत आलेल्या मोहिमेबाबत सुलतान इब्राहीमकडून शुभसंदेश घेऊन हा वकील आला होता असे विधान किसस मध्ये आहे (पान ५५).

(३५) मुन्शात-इ-ताहिर वहीद, पाने २५–२६.

(३६) वारीस, पाने ४११–१३.

(३७) अधिक विस्तृत माहितीसाठी पहा वलीकुली शामलूकृत किसस-अल-खाकानी.

३८) पहा Sarkars 'History of Aurangzib, ' Vol I. Chapters VII–VIII.

(३९) वारीस, पाने ४६३–४६५ ( Add. 6556 ).

(४०) वारीस, पाने ४६८–७३ब (Add. 6556) दाराच्या मोहिमेच्या विस्तृत माहितीसाठी पहा किसस-अल-खाकानी आणि लताईफ-उल–अखबार.

(४१) मुन्शात-इ-ताहिर वहीद, पाने ७ आणि ११ब –१२ब.

(४२) मुन्शात-इ-ताहिर वहीद, पाने ३ब–४ब.

प्रकरण १० वे

## ( शहाजहानकालीन ) संस्कृति निदर्शक संस्था

शहाजहानचा दरबार हा शाही वैभवाच्या पराकोटीचा एक गमक म्हणून मानला जाई. त्याच्या कारकिर्दीत मोगल साम्राज्याने भरभराट आणि सुबत्ता यांचा परमोच्च बिंदू गाठला. हिंदुस्थानच्या संपत्तिच्या[1] पसरलेल्या किर्तीने हिंदुस्थानकडे आकर्षित झालेल्या सातासमुद्रापलीकडून येणाऱ्या परदेशी प्रवाशांची रीघ लागली. बादशहा आणि त्याच्या आजूबाजूचा परिवार यांच्या भव्य भपकेबाजपणामुळे त्यांचे नेत्र दिपून गेले. त्याच्या दरबारातील थाटमाटाची नेत्रदिपकता ही त्यांच्या कल्पनाशक्तीला अनाकलनीय ठरली आणि त्यामुळे तिच्याबद्दल त्यानी हातचे राखून न ठेवता मनमोकळेपणाने प्रशंसेचे उद्‌गार काढले. बर्नियर, टॅव्हरनियर आणि मनुची यानी त्याना आलेल्या अनुभवांची अतिशय विलोभनीय अशी वर्णने लिहून ठेवली आहेत. त्यांचा वृत्तान्त पूर्णपणे विश्वसनीय आहे असे जरी म्हणता आले नाही तरी त्यानी माहितीचा जो प्रचंड साठा आपल्याला उपलब्ध करून दिला आहे त्यावरून मोगल दरबाराच्या विचित्र वैचित्र्याची आणि त्यांच्या अद्‌भुततेची आपल्याला थोडीफार कल्पना येते.

**बादशहा (शहाजहान)**

वैभव आणि थाटमाट यांच्या या भव्य झगमगाटाचे केंद्रस्थान मोगल सम्राटाने विभूषित केलेले असे. तो (शहाजहान) मध्यम बांध्याचा आणि

गव्हाळी वर्णाचा होता. त्याचा भालप्रदेश रूंद होता, भुवया उभारलेल्या होत्या, नाक थोडेसे बाकदार पण सरळ होते. त्याचे डोळे राखी रंगाचे पण एक तऱ्हेची तजेलदार चमक असलेले होते. परंतु बुबुळे मात्र काळीभोर होती. त्याच्या नाकाच्या डाव्या बाजूला एक चामखीळ होता. त्याचे तोंड निमुळते होते आणि त्याचे दात सुंदर आणि स्वच्छ होते. त्याचा आवाज अतिशय मधुर होता आणि तो फारशी भाषेत अस्खलीतपणे बोलू शकत असे. त्याचा बाप जहांगीर आणि आजा अकबर यांनी दाढी ठेवली नव्हती पण शहाजहान याने मात्र जुन्या वळणाच्या मुसलमान पध्दतिप्रमाणे भरघोस दाढी ठेवली होती. त्याचे बाहुद्वय फार लांबही नव्हते किंवा त्यांना आखूडही म्हणता आले नसते. त्याच्या उजव्या हाताच्या चारी बोटांवर तीळ होते. असे तीळ असणे म्हणजे सुचिन्हदर्शक समजले जात असे. सारांश त्याचे सर्वसाधारण व्यक्तिमत्व हे सम्राटाला शोभून दिसणाऱ्या सर्व गुणांबरोबर मिळते जुळते होते•

## त्याचा स्वभाव

स्वभावतःच तो अतिशय उद्योगी आणि मेहेनती होता. स्वच्छतेचीय तो अगदी काटेकोरपणे दक्षता बाळगीत असे. दररोजचे नमाज पढणे किंवा राजधानीला असल्यास येणारा रमजान उपवास तो फारच क्वचित चुकवीत असे. मुसलमान धर्मात सांगितल्याप्रमाणे येणाऱ्या शुभ रात्रींचे वेळी तो त्यातील अर्धावेळ प्रार्थना म्हणण्यात आणि दानधर्म करण्यात घालवीत असे. तो अत्तरांचा दर्दी होता आणि त्याच्या कपड्यावर ही अत्तरे मुक्तहस्ताने शिंपडली जात. संभाषणात तो सभ्यता आणि आदराभिनय यांचे कधीही उल्लंघन करित नसे आणि अगदी खालच्या वर्गाच्या अनुचरांशी बोलताना देखिल त्याना तो 'तू' या अक्षराने संबोधित नसे.

## लौकिक दृष्टिकोनाचे निराकरण

'त्या काळातले राजसिंहासन हे एकाद्या गुलाबाच्या फुलांच्या ताटव्या-सारखे खचितच नव्हते. बादशहाला त्याची म्हणून करावी लागणारी कर्तव्ये होती आणि त्याला उपलब्ध असलेल्या वेळाची विभागणी हे दाखविते की या वस्तुस्थितीची त्याला जाणीव होती.'[२] सरकारानी केलेले हे भाष्य अगदी यथार्थ आहे. मोगल बादशहाचे जीवन म्हणजे सुखासिनता, लोलुपता, खेळ आणि कामुकता यांची एक कधीही न संपणारी जुगुलबंदी आहे असा एक सर्वसामान्य समज आहे. परंतु हा समज कसा चुकीचा आहे याचा

प्रत्यय आपल्याला त्यांच्या दैनंदिन जीवनचर्येची जी बारीक सारीक तपशीलवार माहिती मिळते त्यावरून येतो. समकालीन फारशी इतिहास ग्रंथांत याबाबत आपल्याला भरपूर माहिती उपलब्ध होते. ह्या आखलेल्या दैनंदिन कार्यक्रमाची अंमलबजावणी बादशहा हा छावणीमधे असला तरी किंवा राजधानीमधे त्याचे वास्तव्य असले तरी अगदी काटेकोरपणे केली जाई. शहाजहानचे जीवन अतिशय कष्टप्रद होते आणि त्याने आपला वेळ सरकारी कामकाज आणि ख्याली खुशाली यामधे त्या त्या प्रमाणांत विभागला होता ही गोष्ट सिध्द करण्यासाठी अतिशय बिनतोड असा पुरावा उपलब्ध आहे.

### दिनचर्या

सूर्योदयाच्या अगोदर[३] दोन प्रहर तो उठत असे. दररोजचे प्रातर्विधी उरकल्यानंतर तो आपल्या खाजगी मशीदीत जाई आणि तेथे प्रार्थनेच्या समयाची वाट बघत चटईवर बसून राही. सकाळची प्रार्थना म्हणून झाल्यावर तो सूर्योदय होईपर्यंत स्मरणी ओढत राही. जेव्हा तो प्रवासात असे तेव्हा प्रार्थना तो आपल्या खास महालांत म्हणत असे.

### झरोका

मशिदीमधून तो झरोका दर्शन[४] मधे जाई. तेथून दररोज सकाळी आपल्या प्रजाजनांना दो दर्शन देई. या सूज्ञ प्रथेचा अवलंब पहिल्याप्रथम अकबराने केला आणि त्याच्या वारसांनी ती प्रथा पुढे चालविली. या प्रथेच्या मुळाशी जी तात्विक भूमिका होती तिचा विशेष म्हणजे ती भूमिका सार्वभौमत्वाच्या औद्धत्त्यातून निर्माण झालेली नसून तिच्या पाठीशी सार्वभौमाच्या मनांत आपल्या प्रजेच्या आपण अधिकाधिक जवळ जावे ही जी इच्छा होती तिच्यामधून तिचा उगम झाला होता. त्याशिवाय साम्राज्याच्या डोलाऱ्याचे अस्तित्व हे केवळ बादशहाच्या व्यक्तिमत्वावर अवलंबून आहे अशी समजूत असलेल्या त्या युगांत आपण हुशार आहोत आणि आपली शरीर प्रकृति ही धडधाकट आणि निरोगी आहे याबद्दल आपल्या प्रजेला दिलासा देणे ही गोष्ट बादशहाच्या दृष्टिने अतिशय जरूरीची होती. याठिकाणी सर्वसामान्य प्रजाजनांना त्याच्याकडे जाण्यासाठी मुक्तद्वार होते आणि हे ठिकाण असे होते की त्याठिकाणी सर्वसामान्य प्रजाजन उच्चपदस्थ सरकारी अधिकाऱ्यांविरूध्द देखिल कोणत्याही मध्यस्थाच्या मदतीशिवाय न्यायाची दाद मागू शकत असत.

सर्वसामान्य प्रजाजनांना बादशहाकडे आपल्या गाऱ्हाण्यांची दाद लावून घेण्यासाठी जाण्याइतके धारिष्ठ होते किंवा नाही याबद्दल शंकेला जागा आहे. त्याच्या शाही प्रतिष्ठेची त्याना जरब बसली असती; परंतु त्याहीपेक्षा अधिक महत्वाची गोष्ट म्हणजे शासन संस्थेवर ज्यांचा ताबा होता अशा खुनशी आणि लाचलुचपतखोर अधिकाऱ्यांबरोबर शत्रूत्व ओढवून घेण्यास त्यांना भिती वाटली असती. अर्थात् शहाजहानपुरते बोलावयाचे झाल्यास तो आपल्या राज्यातील अगदी क्षुल्लक व्यक्तिच्या तक्रारीकडे देखिल लक्ष देत असे आणि गुन्हेगाराला, मग तो राज्यातील केवढयाही उच्च दर्जाचा अधिकारी असला तरी देखिल त्याला कडक शिक्षा देण्यांत हयगय करीत नसे या गोष्टींची नोंद घेणे जरूर आहे. मोगल सम्राटांनी आपल्या प्रजेला न्याय मिळावा यासाठी त्याना विशिष्ट न्यायसंस्था उपलब्ध करून दिली ही गोष्ट निश्चितच त्यांच्या जमेच्या बाजूला धरली पाहिजे यात काहीच शंका नाही; आणि या संस्थेचा उपयोग मोगल प्रजेला करणे शक्य झाले नसेल किंवा त्यांनी तसा उपयोग केला नसेल तर तो अपराध पूर्णतः मोगल सम्राटांचा आहे असे म्हणता येणार नाही.

प्रजेच्या तक्रारींची नोंद घेणे आणि प्रजेकडून सलामी घेणे याशिवाय झरोका दर्शनाचे वेळी इतर अनेक गोष्टींकडे सम्राटाला लक्ष देणे भाग पडत असे. याठिकाणी नव्याने पकडलेले हत्ती की ज्याना दिवाणेआमच्या समोरील पटांगणात आणता येणे शक्य होत नसे त्याना बादशहाला दाखविण्यासाठी आणले जाई. हत्तींच्या झुंजींचा आपला आवडता खेळदेखिल शहाजहान या झरोका दर्शनमधून पहात असे. कधिकधि एकापाठोपाठ पाच हत्तींच्या जोडयांचा झुंजी पहात शहाजहान गुंग होऊन जात असे. याच ठिकाणी शाही मनसबदार आपापल्या सैनिकांच्या तुकडया बादशाही निरिक्षणासाठी आणीत असत.

**दिवाण-इ-आम**

झरोका दर्शन मधे साधारणपणे एक तास घालविल्यानंतर बादशहा दिवाण-इ आममधे जात असे. चाळीस खांबाचा आधार असलेली तांबड्या दगडांत बांधलेली अतिशय भव्य अशी ती एक इमारत आहे. या इमारतीच्या तिन्ही बाजूंना सभोवार असलेले पटांगण आहे तर चौथी बाजू एका भिंतीने झाकली गेली आहे. या भिंतीच्या मध्यभागी एक मोठी कमान असून ती दिवाण-खान्याच्या उंचीच्या अधिक उंचीवर बांधण्यांत आलेली आहे. या कमानीची

बांधणी अतिशय शुभ्र अशा संगमरवरी दगडांत करण्यांत आलेली असून कमानीचे काम आणि खालवर कारण्यांत आलेली फुले यांनी ते अधिक भव्यपणे सुशोभित करण्यांत आलेले आहे. शिल्पाच्या दृष्टिने आग्रा येथिल हा दिवाणखाना अतिशय साधा आहे. दिल्लीच्या लाल किल्ल्यातील दिवाण-खान्यांत जे कौशल्यपूर्ण प्रसाधन आपल्या ठायीठायी दृष्टीला पडते त्यांचा अभाव या ठिकाणी आपल्याला जाणवतो. अशाच तऱ्हेचा, परंतु माफक प्रमाणावर, एक दिवाणखाना याच कारणासाठी लाहोरच्या किल्ल्यांत बांधण्यात आला होता. बादशहा ज्यावेळी छावणीत मुक्कामाला असे त्यावेळी दिवाण-इ-आमची सोय मोठमोठे तंबू उभारून करण्यांत येत असे.

**अग्रमानाचा अनुक्रम**

दिवाणखान्याच्या आत आणि बाहेर बादशहा केव्हा प्रवेश करतो याची वाट पहात आणि आपली नजर कमानीवर दृढ ठेवीत अधिकारी वर्ग, दरबारी मंडळी आणि शिपाई शिस्तीत उभे राहात. दिवाणखान्याच्या अगदी बाहेरची बाजू चांदीच्या कठड्याने बंद करण्यात आलेली होती आणि २०० अथवा अधिक स्वार एवढी मनसब असलेल्या अधिकाऱ्यांनाच दिवाणखान्यांत प्रवेश करण्याची मुभा असे. विशेष अधिकार युक्त असलेल्या मनसबदारांना फक्त खांबाजवळ जागा नेमून दिलेली असे. कोनाड्याच्या डाव्या बाजूला हातामधे बादशाही निशाणे आणि पताका घेऊन कोरची नावाने अधिकारी आपल्या पाठी भिंतीकडे करून उभे राहात. कमानीच्या पायथ्याशी दोन्ही बाजूना राजाचे मुख्य मुख्य अधिकारी बादशहासमोर आपापल्या विभागाची दफ्तरे ठेवण्याच्या तयारीने उभे असत.

चांदीच्या कठड्यांच्या बाहेरच्या बाजूला आणखी जागा लाकडी कठडे घालून बंदिस्त करून घेण्यांत आलेली होती. हे लाकडी कठडे तांबड्या लाखेने रंगविण्यांत आलेले होते. या जागेत उभे राहण्यासाठी दोनशे स्वारांपेक्षा ज्यांची मनसब कमी आहे अशा मनसबदारांची, अहदी, तिरंदाज, गोलंदाज आणि जेष्ठ प्रतिच्या मनसबदारांचे आश्रित यांची सोय करण्यांत आलेली होती. लाकडी कठड्याच्या बाहेरच्या बाजूला अमिरउमरावांचे घरगडी आणि पायदळ सैनिक उभे राहात. या कठड्याच्या आतमधे प्रवेश तीन दरवाजां-मधून दिला जाई आणि या दरवाजांवर दक्ष अधिकारी आणि राजदंडधारक यांचा सख्त पहारा असे.

### कामकाज

दिवाण-इ-आम मधिल कारभाराला तेथे सकाळी ७ वाजून ४० मिनिटांनी बादशहाचे आगमन झाल्यावर सुरवात होई. पहिल्याप्रथम मुख्य बख्शी हा मनसबदारांचे अर्ज सादर करित असे आणि बढतीला जे लायक असत त्यांची बादशहाबरोबर भेट घडवून आणण्यासाठी त्यांना बादशहासमोर आणीत असे. ज्यांची नेमणूक परप्रांतात केली जाई त्यांना मानाचा पोषाख देण्यात येत असे. त्यानंतर सद्र हा अधिकारी बादशहासमोर गरीब आणि निराधार लोकांचे मोकादमे ठेवी आणि विद्वान आणि धार्मिक मंडळीची ओळख तेथे जमलेल्या मंडळींना करून देई. ह्यानंतर मीर सामान आणि दिवाण वियूतात हे अधिकारी आपापल्या विभागांचे कागदपत्र बादशहा-पुढे सादर करीत असत. त्यानंतर अह्दींचा बक्षी, मीर आतीष आणि तोफ-खान्याचा मुश्रीफ हे अधिकारी नवीन भरती केलेले रंगरूट आपापल्या विभागाना सादर करीत असत. हे झाल्यावर नंतर दरबारातील वजनदार मनसबदार, प्रांतिक सुभेदार, दिवाण अथवा बक्षी यांजकडून आलेले विनंती अर्ज अथवा भेटी बादशहासमोर ठेवीत. पुष्कळ वेळा बादशहा हे कागदपत्र स्वत: नजरेखालून घालीत असे आणि त्यावर आपल्या आज्ञा लिहित असे. सर्वांत शेवटी अर्ज-इ-मुकर्रर हा अधिकारी मनसब, जहागिरी आणि नकदी याबाबतच्या टिपणी बादशहाला सादर करीत असे. अशात-हेने गंभीर बाबींबाबतचे काम संपल्यावर ठराविक रतीब असलेले हत्ती आणि घोडे यांची पहाणी होई आणि मग दरबार बरखास्त होत असे.

### दिवाण-इ-खास

दिवाण-इ-आममधून बादशहा दिवाण-इ-खास अथवा खाजगी बैठक-खान्यामधे जात असे. आग्रा आणि दिल्ली या दोन्ही शहरामधिल दिवाण-खाने हे शहाजहान बादशहाच्या कारकिर्दीत बांधण्यात आलेले होते. आग्रा येथिल दिवाण-इ-खासचे वर्णन टॅव्हर्नियर याने केले आहे तर महमद वारिस हा दिल्ली येथिल दिवाण-इ-खासचे अतिशय बहारदार वर्णन देतो. यानंतरचे दोन तास बादशहा दिवाण-इ-खासमधे घालवित असे. राज्य कारभा-राच्या अथवा राजकीय कारणास्तव ज्या गोष्टींबाबत जाहिर निर्णय घेता येत नसे अशा कारभाराच्या गोष्टींची देखभाल या वेळात दिवाण-इ-खास मधे केली जाई. राज्याचे उच्चपदस्थ वजीर आपापली निवेदने बाद-शहापुढे सादर करीत. त्यावर बादशहा आपला हुकुम लिहून घेण्यास सांगत

असे अथवा आपले हुकुम त्यावर स्वतः लिहित असे. अतिशय निकडीचे असे खास मुकदमे सद्र हा अधिकारी बादशहासमोर ठेवीत असे आणि त्यावर मदद-इ-मुआश अथवा मदतीसाठी रकमांची मंजुरी तो बादशहाकडून मिळवीत असे. या ठिकाणी बादशहा कलाकुसरीच्या कामांची म्हणजे उदाहरणार्थ चित्रकला आणि भरतकाम यांची पाहणी करीत असे. शाही इमारतींचे जे नकाशे तयार केलेले असत त्याबाबत बादशहाची संमत्ति मिळविण्यासाठी दारोगा-इ-इमारत हा दिवाण -इ-खास मधे नेहमी उपस्थित असे. या नकाशांबाबत या ठिकाणी इत्थंभूत चर्वितचर्वण होत असे. शहाजहान बादशहाच्या कारकिर्दीच्या पूर्वाधीत शिल्पशास्त्र विषयक सर्व बाबींसंबंधी बादशहाचा प्रमुख सल्लागार आसफखान हा होता. वरील गोष्टीं शिवाय दिवाण-इ-खास मधे बादशहाला बहिरी ससाणे, ससाणे आणि पाळीव चित्ते नजर केले जात असत.

**शहाबुर्ज**

दिवाण-इ-खास मधून बादशहा शहाबुरूज अथवा शाही मनोऱ्याकडे जात असे. येथे अतिशय गुप्त अशा मसलतीसाठी बैठक भरत असे. राजपुत्र आणि तीन किंवा चार अधिकारी यांचा अपवाद वगळता येथे कोणालाही प्रवेश नसे. कोणत्याही अधिकाऱ्याला त्यांच्या कामाला लागणाऱ्या वेळापेक्षा अधिक वेळ तेथे थांबता येत नसे. शहा बुरूजामधे खाजगी निर्णय घेतले जात, गुप्त हुकुमनाम्यांचे आलेखन केले जाई, आणि त्यांची रवानगी प्रांतिक सुभेदारांकडे करण्यांत येत असे. त्याशिवाय दिवाण इ-खास मधे ज्या बाबींबद्दल उलाढाल करता येणे शक्य नसे अशा बाबींबाबत म्हणजे शाही मालकीच्या जमिनी (खालसा), पगार (तलब) किंवा वेतन (तनखा) याबाबत उलाढाल येथे होत असे. आपल्या कामामधे दुरूस्त्या करण्यासाठी कधिकधि बादशहा आपल्याला शहाबुरूजमधे बोलावित असे विधान अमीनाई कजवीनी या ग्रंथकर्त्याने केले आहे. साधारणपणे शहाबुरूज मधिल व्यवहारांत दोन प्रहर व्यतीत होत असत.

यासुमारास मध्यान्ह होऊन गेलेली असे आणि येथून बादशहा जनानखान्याकडे गमन करीत असे. याठिकाणी देखिल त्याच्यासाठी थोडेफार काम खोळंबलेले असे. भोजन केल्यानंतर तो वामकुक्षी करी. बादशहा जागा झाल्यावर मुमताज महाल त्याच्यासमोर धर्मादायासाठी योग्य अशा मुकदम्यांची यादी ठेवीत असे. हे मुकदमे तिच्या नजरेस तिची मुख्य दासी, जहांगीरच्या दरबारातील

राजकवी तालिब याची बहीण सती खानुम हिने आणलेले असत. या यादी-मधिल प्रत्येक मुकदम्याची बादशहा कसून छाननी करीत असे आणि त्यावर आपल्या आज्ञेचे दस्तखत करीत असे. गरीब आणि निराधार अशा मुलींना विवाहासाठीं योग्य अशा हुंड्याची रक्कम मंजूर करण्यात येई आणि अनेकदा त्यांचे विवाहही ठरवून दिले जात. ज्यांचे आईबाप हयात नाहीत अशी मुले आणि विधवा स्त्रिया यांना उदर निर्वाहासाठी द्रव्यार्जन केले जाई. राजवाड्यापाशी आलेला याचक विन्मुख होऊन परत पाठविला गेला आहे असे क्वचितच घडत असे. अशा तऱ्हेने पिडितांच्या दुःख निवारण्यासाठी दररोज मोठमोठ्या रकमांचे वाटप होत असे.

**संध्याकाळी बादशहा करीत असलेली सार्वजनिक कामे**

दुपारी तीन वाजण्याचे सुमारास बादशहा राजवाड्यातून बाहेर पडे. बऱ्याच वेळा तो राजवाड्याच्या रक्षक दलाची पाहाणी करण्यासाठी दिवाण-इ-आम मधे येई परंतु बहुतांशी दुपारचे नमाज पढण्यासाठी जो समुदाय जमला असे त्यामधे तो सर्वसाधारणपणे सामील होत असे. यानंतर आपला संध्या-काळचा वेळ तो दिवाण-इ-खास मधे राज्यकारभाराबाबतची कामे उरकण्यांत घालवीत असे. नंतर तो संगीत ऐकत असे अथवा हरणांची द्वंद्वयुध्दे बघण्यांत वेळ घालवत असे. यासुमारास मोठमोठी झुंबरे पेटविली जात. त्यांचा प्रकाश किनखावाने विणलेले पडदे आणि लोड यांच्यावर परावर्तित झाल्यामुळे एकंदर वातावरणात जो उठाव येत असे तो मोठा मनोहारी असेल यात काहीच शंका नाहीं. संध्याकाळच्या वेळी दिल्ली येथिल दिवाण-इ-खास मधिल दिवे लावल्यानंतर त्यांचे झगमगते सौंदर्य कसे असेल याची आता आपण केवळ अंधुकशीच कल्पना करू शकतो. एकेकाळी ज्या भपकेबाज लाकडी सामानसुमा-नाने या दिवाण-इ-आमला शोभा आणली ते पूर्णपणे नष्ट झालेले असले तरी देखिल मिआज तीला दिवाण-इ-आमच्या भिंतीच्या एका बाजूला अमीर सुश्रावच्या काव्याच्या ओळी कोरलेल्या आपल्याला दिसतात त्या आपल्या मनाला सहज सुचवून जातात की एकेकाळी दिवाण -इ-आम म्हणजे पृथ्वीवरील स्वर्गसमान असला पाहिजे.

**निद्रा**

संध्याकाळी आठ वाजता शहाबूरूजामधे अर्धा तास आपल्या सल्लागारांशी आणखी सल्लामसलत केल्यावर बादशहा हा जनानखान्यांत परतत असे. तेथे

तो आपले संध्याकाळचे जेवण घेई. त्यानंतर तरूण स्त्रियांनी गायिलेली गाणी तो ऐकत असे. साधारण १० वाजण्याचे सुमारास तो शय्यागृहात जाई. यावेळी बादशहाला वाचून दाखविणारे विद्वान प्रवासवर्णन, साधुसंतांची चरित्रे अथवा इतिहास अशा वेगवेगळ्या विषयांवर वाचन करीत. बादशहाचे शय्यागृह आणि वरील प्रमाणे वाचन करणारे विद्वान यांच्यामधे एक पडदा असे. बाबर बादशहाचे आत्मचरित्र हा बादशहाचा वाचनाचा आवडता विषय होता.

**न्यायसभा**

या दैनंदिन कार्यक्रमांत फक्त शुक्रवारी आणि बुधवारी बदल होत असे; कारण शुक्रवार हा दिवस म्हणजे मुसलमानांचा विश्रांन्तीचा दिवस असे. त्यादिवशी दरबार भरत नसे. बुधवारच्या दिवशी बादशहा परस्पर झरोका दर्शनमधून दिवाण-इ-खास मधे जात असे. तेथे तो वरीष्ठ न्यायाधिश म्हणून दुय्यम न्यायाधिशांनी दिलेल्या निकालांवर निर्णय देई आणि न्यायदानाचे काम करी. येथे तो फिरोज तख्त या सिंहासनावर अधिष्ठित होई आणि न्यायदानाचे अधिकारी, मुफ्ती आणि कायदेपंडित यांच्या हजेरीत न्यायदानाच्या कामकाजाला सुरवात करी. दारोगा-इ-अदालत हा अधिकारी प्रत्येक मुकदमा बादशहासमोर अलग अलग रित्या ठेवीत असे. बादशहा त्यावर फिर्यादीबरोबर बोलून त्याची बाजू ऐकून घेत असे आणि प्रत्येक मुकदम्याबाबत अगदी काटकोरपणे मुसलमान कायद्यानुसार (शरा) आपला हुकुमनामा दस्तखत करीत असे.

**दरबारातील शिस्त**

मोगल दरबाराने उभे केलेले चित्र म्हणजे शिस्त आणि सुव्यवस्था यांची मिलावट असलेल्या एकाद्या भव्य देखाव्यासमान असे. प्रत्यक्ष वस्तुस्थिती अशी असण्याचे कारण म्हणजे मोगल दरबारात रितीभातींचे अतिशय काटेकोरपणे पालन करण्यावर भर दिला जाई हे होते. दरबारांत जागा घेताना अग्रक्रमत्व हे त्या त्या मनसबदाराचा दर्जा अथवा श्रेणी यावर अवलंबून असे. दरबारांत सर्वांना उभे रहावे लागे. राजपुत्र बसू शकत असत पण ते सुध्दा परवानगी घेतल्यावाचून नाहीं. जहांगीरने दरबारांत शहाजहानला बसण्यासाठी एका सोन्याच्या खुर्चीची तरतूद केलेली होती. तोच विशेष हक्क शहाजहान याने आपला थोरला मुलगा दारा शुको याला दिला होता. फक्त वजीर आणि मीर बख्शी ह्या दोघा अधिकाऱ्यांना पायऱ्या चढून

जाण्याची आणि सिंहासनाजवळ येण्याची परवानगी असे; बाकीच्याना सिंहासनाच्या पायाशी उभे रहावे लागे.

**मानवंदनेची पध्दति**

आपल्या वाडवडिलांशी तुलना करता शहाजहान हा त्याच्या धार्मिक दृष्टिकोनाबाबत निश्चितपणे अधिक सनातन मतप्रणालीचा होता. धर्माने वागणुकीबाबत जे काही नियम घालून दिले होते त्यांच्याशी पूर्णपणे विसंगत अशा चालिरितींचे आचरण तो कधीही सहन करीत नसे. अकबराने आचरणात आणून दिलेली आणि शहाजहानच्या काळांत प्रचलित असलेली सिजदा अथवा सपशेल लोटांगण घालून मानवंदना करण्याची पध्दति ही या प्रकारच्या चालिरितीत मोडत होती. इस्लामच्या धार्मिक कल्पनेनुसार सिजदा हा मानवंदनेचा प्रकार फक्त परमेश्वराच्या बाबतीतच लागू होता आणि पृथ्वीवरील कोणत्याही जिवंत व्यक्तिला तशा प्रकारे मानवंदना करून घेण्याचा अधिकार नव्हता. या कारणास्तव शहाजहानने राज्यावर आल्यानंतर पहिली जी आज्ञा काढली ती ही अपवित्र प्रथा नष्ट करून टाकण्याबाबत. वरील प्रथेच्या ऐवजी मानवंदनेची सर्वसामान्य पध्दति रूढ करण्याचा त्याचा मनसुबा होता. परंतु महाबत खानाने बादशहाच्या स्तुतीपर उद्गार काढत असे प्रतिपादन केले की सम्राट आणि राजघराण्यातील व्यक्ति यांच्याबाबत विशेषकरून थोडाफार फरक दाखविणे जरूर आहे कारण परमेश्वरानेच त्यांचे स्थान इतरेजनांपेक्षा उच्चतम ठेवले आहे. यानुसार सिजदा या प्रथेऐवजी जमीनबोस अथवा जमिनीचे चुंबन घेण्याची पध्दती रूढ करण्यांत आली. सिजदा या मानवंदनेच्या प्रथेत कोणत्याही व्यक्तिला गुढगे टेकून आपले कपाळ जमिनीवर घासावे लागे. परंतु जमीनबोसच्या पध्दतिनुसार मानवंदना करणाऱ्या व्यक्तिला आपले दोन्ही हात जमिनीवर टेकवावे लागत आणि नंतर ते आपल्या कपाळापाशी न्यावे लागत. परंतु कालांतराने जेव्हा शहाजहानला असे दिसून आले की मानवंदनेच्या या नवीन पध्दतीत- आणि पूर्वीच्या पध्दतीत फारकत करण्यासारखे जवळजवळ काही नाहीच तेव्हा त्याने जमीनबोसची मानवंदना करण्याची पध्दति रद्दबादल केली आणि तिच्या ऐवजी चार तसलीम ही प्रथा अनुकरणांत आणण्याचा हुकुम दिला. परंतु विद्वान आणि धर्मोपदेशक यांना जमीनबोस आणि चार तसलीम या पध्दतिनुसार मानवंदना करण्याच्या बंधनातून मुक्त करण्यात आले, कारण बादशहा त्यांचा विशेषकरून चाहता होता. मुसलमानामधे सर्वसामान्यपणे रूढ असलेल्या

मानवंदनेच्या पध्दतिचेच ही मंडळी पालन करीत आणि ही पध्दति म्हणजे दुसऱ्याला त्याच्या जीवनांत शांतीचा लाभ होवो असे म्हणून त्याचे अभिष्टचिंतन करण्याची पध्दति होय.

जेव्हा जेव्हा बादशहा झरोका येथे जाई किंवा दरबारांत येत असे तेव्हा तेव्हा बादशहा चिरायु होवोत या तेथे जमलेल्या मंडळीकडून होणाऱ्या प्रचंड गर्जनेने त्याचे स्वागत होई. त्यानंतर तेथे संपूर्ण शांततेचे वातावरण पसरत असे आणि नंतर सर्वसामान्य व्यवहाराची कामे खालच्या स्वरांत उरकली जात. जर का बादशहाला कोणाबरोबर बोलावयाचे असल्यास तो त्या व्यक्तीच्या दिशेने फक्त खूण करीत असे. त्यानुसार बादशहाचे दंडधारी रक्षक त्या व्यक्तीला सिंहासनाच्या पायापाशी घेऊन जात. तेथे पोहोचल्यावर ती व्यक्ती बादशहाला सर्वसामान्य रितीनुसार मुजरा करीत असे आणि अतिशय विनम्र भावाने बादशहाच्या तोंडून पडणारे शब्द ऐकण्यासाठी तेथे उभी रहात. असे. जर का बादशहाने या व्यक्तिला मानाचा पोषाख अर्पण केला तर ही व्यक्ति पुन्हा एकदा बादशहाला मानवंदना करीत असे आणि बादशहाला पाठ न दाखवता तशीच मागे सरकत आपल्या जागेवर जाऊन उभी राही.[१३] यावेळी त्या व्यक्तिचे तोंड सदैव सिंहासनाच्या दिशेने असे कारण सिंहासनाला कोणीही पाठ दाखविणे म्हणजे अनादराची त्या व्यक्तिकडून परिसीमा गाठली गेली असे समजले जाई.

**परराष्ट्रांचे वकील**

परराष्ट्रांच्या वकिलांना बादशहाच्या भेटीसाठी दिवाण-इ-आममधे सरदार मंडळी घेऊन येत असत. इतर आशियाई देशांच्या दूतांपेक्षा पर्शियाच्या वकिलाना अधिक बहुमानाची आणि योग्यतापूर्वक अशी वागणूक दिली जाई. त्यांना त्यांच्या देशाच्या पध्दतिनुसार बादशहाला मुजरा करण्याची मुभा असे. त्याचप्रमाणे त्यांच्यावर विशेष अशा मानमरातबांची आणि बक्षिशीची भरपूर खैरखैरात करण्यांत येई. परंतु जेव्हा पर्शियाबरोबरच्या संबंधात तेढ निर्माण झाली तेव्हा पर्शियन वकिलांना मिळणारा बहुमान आणि सन्मान हा तुर्कस्थानच्या वकिलांना देण्यांत येऊ लागला. बोखारा, समर्कन्द आणि काशघर या देशाच्या वकिलांना फार मोठ्या सौजन्याने वागविले जाई परंतु पर्शियाच्या वकिलांना जे काही विशेष हक्क होते ते वरील देशांच्या वकिलांना कधिच उपभोगता आले नाहीत. युरोपिय देशांच्या दूतांबद्दल बोलावयाचे झाल्यास त्यांना दिली

जाणारी वागणूक ही तुच्छतेची असे असेच तिचे वर्णन करावे लागेल. एक सर थॉमस रो याचा अपवाद वगळल्यास सतराव्या शतकाच्या पूर्वार्धात असे एकही उदाहरण आपल्याला आढळणार नाही की योग्य त्या सन्मानपूर्वक एकाद्या युरोपीय राष्ट्राच्या वकिलाची बादशहाने भेट घेतली आहे. किंबहुना सर थॉमस रो याला देखिल आपल्या मानमरातबाचा आब राखण्यासाठी बराच मोठा झगडा करावा लागला. शहाजहानच्या कारकिर्दीत डच आणि इंग्रज यांचा उल्लेख कोणत्याहि प्रकारचा राजकीय दर्जा नसलेले क्षुल्लक व्यापारी असा केला जाई. साहजिकच एतद्देशिय बखरकारांनी त्यांना जमेत धरले नाही यांत काहीच नवल नाहीं.

**सणासुदीचे दिवस**

दिवाण-इ-आम आणि दिवाण-इ-खास यांच्या इमारती त्यांच्यापरीने जरी शोभिवंत असल्या तरी सणासुदीच्या दिवशीं या इमारतींच्या सौंदर्यांत भपकेदार आणि सदभिरूची पूर्ण अशा सजावटीने आणि विस्तारपूर्वक अशा केलेल्या रोषणाईने भर टाकली जात असे. नवरोज म्हणजे बादशहा सिंहासनावर आल्या दिवसाचा वार्षिकोत्सव, दोन्ही ईदचे उत्सव, शाब-इ बरातचा उत्सव आणि बादशहाचे सौरवर्षाप्रमाणे आणि चांद्रमासाप्रमाणे होणारे तुलासमारंभ या सर्व प्रसंगी दरबारांत मौजमजेचा मोठा जल्लोष होत असे. दरबारातील अमिर उमराव मंडळी सोन्याच्या जाड धाग्यानी कडा गुंफलेल्या किनखाबाच्या कापडाच्या भव्य छताखाली भपकेदार पोषाख करून जमत आणि हिरे, मोती व इतर बहुमोल धातूंचे अलंकार यांच्या भारंभाराने जणू काही मढलेला बादशहा आपल्या शोभिवंत सिंहासनावर बसत असे आणि सरदारदरकदार मंडळींकडून नजराणे स्विकारत असे व त्यांच्यावर बक्षिसांची खैरखैरात करीत असे.[१४]

**शहाजहानच्या दरबारातील आश्चर्ये**

शहाजहानच्या दरबाराचे सर्वांत मोठे आश्चर्य म्हणजे तेथिल सुप्रसिध्द असे मयूर सिंहासन. सिंहासनाभिषिक्त झाल्यावर त्याने मयूरसिंहासन बनविण्याबद्दल हुकूम जारी केले. सात वर्षांत मयूरसिंहासनाची रचना पुरी झाली. टॅव्हरनियर याने मयूरसिंहासनाच्या अत्युत्कृष्ट कारागिरीचे सविस्तर वर्णन केलेले आहे. शहाजहानच्या दरबारातील मयूरसिंहासनाच्या खालोखालचे दुसरे आश्चर्य म्हणजे कोह-इ-नूर हा हिरा हे होय. हा हिरा मीर जुम्ला याने बादशहाला भेट म्हणून अर्पण केला होता.

### शहाजहानच्या दरबाराचे महत्व

परंतु शहाजहानच्या दरबाराचे अस्तित्व हे त्यामधील भव्यतेचे प्रदर्शन करणे यासाठी प्रामुख्याने नव्हते. दरबारातील वैभवाचे प्रदर्शन हे त्या दरबारातील दैनंदिन जीवनाच्या एका अंगासारखे होते. या जीवनाची दुसरी आणि उपयुक्त अशी एक बाजू होती आणि ती म्हणजे लोकांमधे सांस्कृतिक विचारांचा विकास आणि फैलाव करणे यासाठी त्या दरबाराकडून केली जाणारी कार्यवाही ही होय. देशामधे त्याकाळात स्थित असलेले शांततेचे वातावरण आणि याला जोड म्हणून सम्राटाची जातीने लक्ष घालण्याची वृत्ती यामुळे कला आणि वाङमय यांच्या वाढीला जोरदार चालना मिळाली. कवी, तत्वज्ञ, विद्वान वगैरे मंडळी दरबाराचा आश्रय मिळविण्यासाठी मोठ्या संख्येने गोळा झाली आणि बुध्दिमत्तेला शहाजहानच्या दरबारातून विन्मुख होऊन परत जाण्याची कधिच पाळी आली नाही. गुणवत्ता ओळखण्यांत बादशहा कधिही कोता पडला नाही आणि गुणवत्तेला मुक्त हस्ताने त्याने बक्षिसी बहाल केली. त्याच्या दरबारी मंडळींनी त्याचे अनुकरण केले इतकेच नव्हे तर खरोखर कर्तृत्ववान असलेल्या मंडळींना आश्रय देण्याचे कामी त्यांच्यामधे अहमअहमिका लागली.

### दरबारी विद्वान मंडळी

याशिवाय शहाजहानच्या दरबारीयांपैकी काही मंडळी स्वतःच वाङमयाच्या क्षेत्रात मानमान्यता पावलेल्यांपैकी होती. त्यांच्या पैकी काही जण म्हणजे अली मर्दानखान, सादुल्लाखान, सैदखान, जफरखान, खानाजादखान, मीर जुम्ला, अफजलखान, राजाजयसिंग वगैरे होते. रणांगणामधे कुशल योद्धे म्हणून जशी यांची ख्याती होती तद्वतच वाङ्मयाच्या प्रांगणात त्यांचा हात धरणारा कोणी नव्हता. दरबारातील रितीरिवाज आणि परंपरा यांचा वारसा ते आपल्याबरोबर घेऊन जात आणि साम्राज्याच्या वेगवेगळ्या प्रांतात त्यांचा ते फैलाव करीत. त्यांच्या हातून सांस्कृतिक दृष्ट्या जी काही कामगिरी घडली त्याबाबतची पध्दतशिर अशी नोंद आज आपल्याकडे उपलब्ध नाही ही मोठ्या दुर्दैवाची गोष्ट आहे. परंतु त्यासंबंधि जे फुटकळ उल्लेख समकालीन राजकीय वाङ्मयात आलेले आहेत त्यावरून त्यांच्या हातून जी भरघोस कामे घडली त्याबाबत थोडीफार कल्पना आपल्याला येऊ शकते.

### शिक्षणासाठी संस्था

दरबाराव्यतिरिक्त राज्यामधे ज्ञान आणि संस्कृति यांचा लोकांमधे प्रसार करण्यासाठी आणखीही काही संस्था होत्या. ज्याना आपण सरकारी

म्हणू शकू अशा दोन शाळा तेव्हा होत्या. त्यापैकी एक आग्रा येथे होती आणि दुसरी दिल्ली येथे. या शाळांमधे शिक्षकांच्या नेमणूका थेट बादशहाकडून केल्या जात. अर्थात् या ठिकाणी ही गोष्ट नमूद करणे अवश्य आहे की आम जनतेच्या शिक्षणासाठी प्रत्यक्ष राज्यसंस्थेचा कोणत्याहि प्रकारे संबंध होता असे यात अभिप्रेत नाही. सरकार शिक्षणासाठी मशिदींना अनुदान देत असे, आणि अशा मशिदी बहुतेककरून विद्वत्तेची केन्द्रस्थाने बनत असत.

सरकारची कर्तव्ये काय आहेत याबाबत आपला जो आधुनिक दृष्टिकोन आहे त्यामधून विचार केल्यास मोगल कालीन शासनसंस्थेची शिक्षणाबाबतची उदासिनता ही खचितच निषेधार्ह आहे यात काहीच संशय नाही. असे जरी असले तरीदेखिल ही वस्तुस्थिती एक प्रकारची इष्टापत्तिच होते असे म्हटल्यास त्यांत काहीच वावगे होणार नाही.

**शिक्षण विषयक खाजगी प्रयत्न**

याचा एक परिणाम असा झाला की व्यतिगत आणि खाजगी शिक्षण विषयक जोखमाची कामे अंगावर घेण्याच्या वृत्तीला वाव दिला गेला. एका लेखकाने जसे विधान केले आहे की जहांगीरच्या कारकिर्दीत प्रत्येक खेडे[१७] आणि शहर यामधे शाळा होत्या. ह्या शाळा म्हणजे सरकारकडून ज्याना मदत मिळते अशा संस्था निश्चितच नव्हत्या. या संस्थांची स्थापना स्थानिक आणि खाजगी प्रयत्नामुळे झाली असली पाहिजे यात काहीच संशय नाही. त्याशिवाय शिक्षण ही बाब त्याकाळी ज्याना प्रापंचिक बाबी म्हणता येईल त्यांच्या कक्षेबाहेरची होती. संसाराच्या ऐहिक कर्तव्यापासून बाहेर पडलेल्या योगी लोकांसाठी राखून ठेवलेला एक खास व्यवसाय म्हणून शिक्षणाकडे बघितले जाई. हे शिक्षण मोफत किंवा अगदी मामुली शुल्क घेऊन दिले जात असे. अशाप्रकारे शिक्षण देण्यासाठी सच्छिल व्यक्तिनी चालविलेल्या संस्था लाहोर[१८], अहमदाबाद, बुरहाणपूर अ णि जौनपूर येथे होत्या. शहाजहानच्या कारकिर्दीत सिरहिंद, थानेश्वर आणि अंबाला येथे सुप्रसिध्द विद्वान मंडळींचे वास्तव्य होते. दूरदूरचे विद्यार्थी त्यांच्या विद्वत्तेचा लाभ उठविण्यासाठी याठिकाणी येत असत.

या काळातील शिक्षणाचे आणखी एक महत्वाचे केन्द्रस्थान म्हणजे काश्मिर हे होते.[१९] तेथिल निरोगी हवा, स्थित असलेले शांततामय वातावरण आणि तेथिल सौंदर्याने नटलेली वनश्री याचे विद्वान मंडळीना

मोठे आकर्षण वाटे आणि आपापले ग्रंथलेखन करण्यासाठी आणि सुखासीनतेमधे आपले जीवन व्यतीत करण्यासाठी ही मंडळी मोठ्या संख्येने तेथे येऊन स्थायिक होत. मुल्ला हसन फरोधी आणि मुल्ला मुशिन फनी यांचा तर जन्मच काश्मिरचा. ख्वाजा खुदावन्द महमूद हा त्या प्रांतांत येऊन स्थायिक झाला; मुल्ला शहा हा काश्मिरमधे वारंवार येत जात असे; आणि कलीम आणि कुदसी यांनी पादशहानाम्याची काव्यरूप रचना करण्यासाठी काश्मिरमधे आपले वास्तव्य केले.

## शिकविले जाणारे विषय

या शैक्षणिक संस्थांच्या अभ्यासक्रमामधे विविध तऱ्हेच्या विषयांचा समावेश केलेला असे. हे विषय अष्टपैलू आणि बहुश्रुत अशा शिक्षकांकडून शिकविले जात असत. आजच्याप्रमाणे एकादा विषय विशेष व्यासंगाने शिकविला जाण्याची प्रथा त्या वेळी नव्हती. प्रत्येक उपयुक्त विषयाचे अल्पज्ञान विद्यार्थ्याला मिळाले पाहिजे हा त्या काळच्या शिक्षणाचा प्रधान हेतू असे.[३०] वेदान्त आणि अध्यात्मविद्या या विषयांच्या अभ्यासाकडे अधिक लक्ष पुरविले जात असे हे जरी खरे असले तरी इतिहास, गणित, छन्दशास्त्र आणि सुंदर अक्षरलेखन वगैरे विद्यार्थ्यांचे अभ्यासाचे आवडीचे विषय होते. परिक्षांची पध्दति तेव्हा नव्हती परंतु मानमान्यता पावलेल्या प्राध्यापकांच्या हाताखाली शिक्षण होणे ही वस्तुस्थिती त्या व्यक्तिची पात्रता ठरविली जाण्यास पुरेशी ठरत असे.

## अधिक वाङ्मयीन वाटचाल

या सार्वत्रिक स्वरूपाच्या शिक्षण पध्दतिचा एक अतिशय सहजतया जो परिणाम झाला तो म्हणजे वाङ्मयीन घडामोडींना गतिमानता प्राप्त झाली हा होय.[३१] पर्शियन ही राजभाषा असल्यामुळे तिच्या विकासाला प्रोत्साहन मिळाले,[३२] आणि त्या भाषेत प्रचंड प्रमाणावर साहित्याची निर्मिती झाली. यासुमारास दोन प्रमुख असे वाङ्मयीन सांप्रदाय अस्तित्वात आलेले होते. त्यापैकी एक म्हणजे हिंदुस्थानी फारसी सांप्रदाय आणि दुसरा म्हणजे निव्वळ फारसी सांप्रदाय. पहिल्या सांप्रदायाचा मान्यवर प्रतिनिधी म्हणून अबुलफजल् याचा उल्लेख करावा लागेल. त्याने भाषा आणि शैली यांना प्रमाणबध्दता आणण्याचे मोठे कार्य केले. त्याने अतिशय कंटाळवाण्या आणि गुंतागुंतीच्या अशा एका वेगळ्याच शैलीचा पायंडा घालून दिला. या शैलीच्या लिखाणांत पुष्कळदा तालबध्दता आणि वाक्यरचना यांचा संगम

साधण्यासाठी अभिप्रेत अर्थरचनेचा बळी दिला जाई. शहाजहानच्या कारकिर्दीत वरील शैलीच्या प्रणेत्याचे अनुकरण करण्याचा प्रयत्न करणारे लेखक मोठ्या संख्येने झाले. परंतु काही अपवाद वगळता बाकीच्याना केवळ अंशत:च यश मिळाले असे म्हणावे लागेल. यालेखकांमधे अबदुलहमीद लाहोरी, महमदवारिस, चंन्द्रभान आणि महमद सालिह यांचीच नावे ठळकपणे नजरेत भरण्यासारखी आहेत.

### नव्या पर्शियन भाषेची शैली

या काळामधे हिंदुस्थानी-फारसी वाङमयाची जी निर्मिती झाली ते वाङमय निश्चितपणे निव्वळ पर्शियन नव्हते यात काहीच वाद नाही. आणि अशा तऱ्हेची अपेक्षा करणे हे देखिल निरर्थक आहे. पर्शियन भाषेचा आता हिंदुस्थानांत जम बसू लागलेला होता आणि अशा परिस्थितीत आजू-बाजूचे जे नवीन आणि उस्फूर्त असे जे वातावरण होते त्यापासून फार काळ-पर्यंत ती दुरावून राहू शकत नव्हती. तिने हिंदुस्थानी कल्पना आणि हिंदुस्थानी विचारप्रणाली आपल्यामधे सामावून घेतली आणि तिचा उपयोग हिंदुस्थानी विषय निरूक्ती साठी केला जाऊ लागला. अगदी साहजिकच पर्शियन भाषेने स्वत:चे एक विशिष्टपूर्ण असे स्थान प्राप्त करून घेतले. या बाबींचा यत्किचितही विचार न करता पर्शियन भाषेला अफारशी म्हणून त्याज्य ठरविणे याचा अर्थ हिंदुस्थानी लोकांच्या बुध्दिमत्तेचा साजेलसा गौरव न करण्यासारखे आहे. कोणतीही भाषा परकीय लोकांच्यामधे वावरताना आपले मूळचे शुध्द स्वरुप कधीही टिकवून धरू शकत नाही. अर्थात हे परकीय लोक बौध्दिक दृष्ट्या अगदीच नगण्य असले तर गोष्ट वेगळी आणि पर्शियन भाषा या नियमाला अपवाद आहे असे सिध्द करण्यास कोणतीही सबळ कारणे नाहींत.

हिंदुस्थानी, फारशी शैलीचा विकास झाला याचे कारण तिला जो अवास्तव दरबारी आश्रय मिळाला हे होय. अबुलफजल याच्या लेखन-विष्कारानें सहजतया शहाजहानला मोहिनी घातली, याचे कारण त्याच्या कलाकृतींची अलंकारिक भाषा हे होते. म्हणून तशाच धर्तीवर आपल्या कारकिर्दीच्या वृत्ताची गुंफण जो करू शकेल अशा व्यक्तिच्या शोधार्थ शहाजहानचा हव्यास होता. आणि तसे बघितले तर खरोखरीच या हिंदुस्थानी-फारशी शैलीमधे एक प्रकारची अवर्णनीय गेयता आहे, की जी प्रत्येक हिंदुस्थानी

व्यक्तिच्या हृदयात प्रशंसेची भावना उद्दिपित करणे. असे जरी असले तरी या सर्वांचा अर्थ काय याचे रसग्रहण न झाल्यामुळे कोणाही परदेशी माणसाच्या मनांत निश्चित संभ्रम होत असे. अकबर आणि शहाजहान यांच्या वैभवशाली कारकिर्दी यापेक्षा कमी हृद्य अशा भाषेने चित्रित करता येणे अशक्य होते.

## फारशी संप्रदाय

दुसरा संप्रदाय, ज्याचे वर्णन शुध्द फारशी संप्रदाय असे करता येईल त्याला आश्रय दरबारातील अधिकाऱ्यांचा होता. हे अधिकारी फारशी वंशाचे तरी होते किंवा आपल्या जात कुळीचा उगम फारशी वंशात आहे असा तरी त्यांचा दावा होता. शहाजहानच्या कारकिर्दीच्या पूर्वार्धात मुल्ला शुकुल्ला उर्फ अफजलखान याने अनेक फारशी विद्वानांना आपल्या आश्रयाखाली घेतले. यामधे दोन अतिशय प्रथितयश विद्वान म्हणजे अमीनाई कजवीनी आणि जलाल उद्दीन तबातबाई. त्यांचे समकालीन जे भारतीय लेखक होते त्यांच्या बरोबर तुलना करताना या लेखकांचे ग्रंथ फार मोठ्या पातळीवर पोहोचतात आणि दोन्ही शैलीमधे असलेला फरक मोठ्या ठळकपणे पुढे आणतात.

## इराणमधून आलेले कवि

या कारकिर्दीचा आणि तसे बघितले तर १७व्या शतकाच्या संपूर्ण पूर्वार्धाचा एक दृष्टीस येणारा विशेष म्हणजे या कालखंडामधे मोठ्या प्रमाणावर इराण मधून कवींची झालेली आवक हा होय. मोगल दरबारामधे फैजीनंतर एकाही हिंदुस्थानी कविकडे राजकविचे पद गेले नाही, ही गोष्ट अतिशय उल्लेखनीय अशी आहे. ती असे दर्शविते की जरी हिंदुस्थानी फारशीची गद्य शैली प्रमाणबध्द करण्यात आलेली होती तरी शुध्द पर्शियन शैलीने आपला वरचष्मा राखला होता. जेव्हा शहाजहान याने कलीम याची राजकवि म्हणून नेमणूक केली तेव्हा त्याने या वस्तुस्थितीशी आपल्याला ओळख असल्याची जाणीव दिली.

## कविता

शैलीच्या प्रश्नावरून आपण आता या कालखंडात ज्या प्रकारचे वाङमय निर्माण झाले त्या बद्दलच्या चर्चेकडे वळू. इतिहासानंतर भरपूर निर्मितीच्या

दृष्टिकोनातून कवितेचा नंबर लागतो. वर उल्लेख केल्याप्रमाणे उत्कृष्ट कवी जे होते ते इराणमधून आलेले होते. परंतु एक अथवा दोन अपवाद वगळल्यास इतर सर्व सामान्य बुध्दीमत्तेचे होते आणि त्यांच्यापैकी कोणा-चीही नवीन किंवा अस्सल कलाकृती निर्माण करण्याची कुवत नव्हती. त्यांच्या बहुतेक कलाकृति स्वाद रहित आहेत आणि ज्याला आपण कल्पनेचा विस्तार आणि भावनेची उदात्तता असे म्हणू त्याचा त्यांच्या कलाकृतिमधे ठळकपणे अभाव आहे. आपल्या कविताना नव्या कल्पनांचा साज शृंगार चढविण्याचे ऐवजी ते आपले लक्ष्य शब्दांची रचना बदलण्याकडे अधिक देतात आणि बहुतेक कविंच्या बाबत आपल्याला असे दिसून येईल की त्यांच्या काव्याची निर्मिती ही प्रेरणेतून झालेली नसून त्यांचा उगम केवळ जरूरी मधून झालेला आहे..

### शैली

त्यांनी लिहिलेला गझल हा काव्य प्रकार तथाकथित सुफी प्रकारातला आहे आणि त्यांच्या काव्याचे विषय हे ठराविक साच्याचे आणि सर्वसामान्य असे आहेत. त्यांनी आपल्या काव्यात ज्या उपमा आणि रूपके यांचा उपयोग केलेला आहे त्या करिता त्यांनी 'गुल-ओ-बुलबुल', 'शीरीन-ओ-फरहाद' अथवा 'लैला-ओ-मजनू' या रूढ दंत कथांचा उपयोग केलेला आहे. सर्वसामान्य पात-ळीच्या वर आपल्या कल्पना शक्तिला ते क्वचितच खेचून नेऊ शकतात. त्याच-प्रमाणे त्यांच्या कल्पनेच्या भराऱ्यांमधे त्यांच्या बुध्दीचे अतिशय कोते प्रदर्शन आपल्याला दिसून येते. गझल शिवाय या कालखंडातील महत्वाच्या दिशेने जो विकास झाला तो म्हणजे कसीदा ह्या काव्यप्रकाराचा होय. कारण या काव्यरचनेमध्ये जे विचारनाविन्य होते त्यामुळे त्याबद्दल कसीदाकाराना भरपूर मोबदला मिळे. बादशहाला आपल्या स्तुतिपर कवन ऐकण्याची अतिशय हौस असे आणि जर त्याच्या झालेल्या स्तुतीने बादशहा खूष झाला तर तो कविची सुवर्णाची अगर चांदीची तुला करीत असे आणि ते सर्व त्याला बक्षीस म्हणून देत असे.

### समारंभाचे प्रसंग

त्या काळामधे काही निश्चित असे समारंभाचे प्रसंग होते की जेव्हा कविंनी आपली योग्यता आणि प्रतिभा याचे दर्शन घडवून आणावे अशी अपेक्षा होती. बादशहाच्या चंद्रमासाप्रमाणे किंवा सौरवर्षाप्रमाणे येणाऱ्या वाढदिव-

साच्या प्रसंगी त्याचप्रमाणे राज्यारोहणाचे प्रसंगी अथवा बादशाही घराण्यात पुत्र जन्म होई त्यावेळी कवि तो प्रसंग चित्रीत करणारे छोटे काव्य अथवा कसीदा रचित आणि त्याबद्दल शोभेल अशी बक्षिशी मिळवित. त्याचप्रमाणे दरबारात नियमितपणे मुशहिरे (स्पर्धा) होत असत. त्यावेळी बादशहाचे लक्ष आपल्याकडे वेधून घेण्यासाठी कविची परस्परामधे अहंमअहमिका चाले.

### कवि

शहाजहानच्या दरबारात शुध्द फारशी संप्रदायापैकी जुना आणि जाणकार कवि म्हणजे बहुधा सईदाई गीलानी हा होता. त्याच्याकडे जहांगीरच्या कारकिर्दीपासून दारोधा-इ -जरगर खाना अथवा हिरेखात्याचा प्रमुख या पदाचे अधिकार होते. त्याच्या व्यतिमत्वामधे आपल्याला जुन्या आणि नव्या वृत्तींचा सुरेख मिलाप दिसतो.[२३] त्याने रचलेली काही छोटी काव्ये ही अतिशय सर्वोत्कृष्ट आहेत.

### कलीम

शहाजहानच्या दरबारचा राजकवि अबुल तालीब कलीम हा होता. तो मुळचा काशान मधला परंतु तो वाढला. हमदानमधे तो जहांगीरच्या कारकिर्दीमधे हिंदुस्थानामधे आला. त्याला मीर जुम्ला अर्फ रूह-अल-अमीन याने आश्रय दिला. शहाजहानच्या राज्यारोहणानंतर तो बादशाही चाकरीत शिरला. त्याने त्याच्या अंगी असलेल्या असामान्य गुणाबद्दल बक्षिशी म्हणून त्याच्यावर अतिशय उच्च अशा सन्मानाची खैरखैरात केली. त्याच्या दिवाण मधे कसीदांचा भरणा असून त्या सर्व शहाजहानला उद्देशून केलेल्या आहेत. त्याच्या मस्नवी मधे शहाजहानने बांधलेल्या इमारतींची वर्णने आहेत. त्याने लिहिलेला साकीनामा हा काश्मीरचा सुभेदार जफरखान याच्या प्रीत्यर्थ आहे. त्याने पादशाहनामा या ग्रंथाचे काव्यात रूपांतर केले.[२४]

### कुदसी

दुसरा कवि म्हणजे हाजी महमद जान अर्फ कुदसी. याची लिहिण्याची शैली अतिशय सुरेख असून तिची सर्वत्र वाहवा होत असे. लौकरच त्याने शहाजहानचे लक्ष वेधून घेतले. त्याने त्याच्याकडे पादशहा नामा या ग्रंथाचे काव्यात रूपांतर करण्याचे काम सोपविले. त्याने काश्मीर मधील बगीचांचे वर्णन लिहिले आणि शहाजहान याने बांधलेल्या अनेक इमारतींवर एक

कविता रचली. त्याशिवाय १६३० ते ३८ या कालखंडावर अनेक सांकेतिक लघुकाव्ये लिहिली. कलीम याच्यापेक्षा त्याची काव्यरचना अधिक समर्थ आहे असे मानले जात असे.[२५]

**काशी**

मीर महमद याहीया उर्फ काशी हा आपल्याला शीराजचा मानीत असे. तो हिंदुस्थानामधे आला आणि त्याने बादशहा आणि दाराशुको यांचा आश्रय मिळविला. त्याच्यावर देखील पादशाह नामा या ग्रंथाचे काव्यात रूपान्तर करण्याचे काम सोपविण्यात आले. परंतु लौकरच बादशहाची त्याच्यावर गैरमर्जी झाली आणि त्याचे काम अर्धवटच राहिले.[२६]

**साईब**

परंतु या काळातला सर्वश्रेष्ठ कवि म्हणून ज्याचा उल्लेख करावा लागेल आणि ज्याला एका नवीन शैलीचा शोध लावल्याचे श्रेय दिले जाते तो म्हणजे मिरजा महमद अली. याचे काव्यातले नाव साईब असे होते. बराच काळ पर्यंत तो काबूल येथे होता. तेथे त्याला जफरखान याचा आश्रय मिळाला होता. हिंदुस्थानात शहाजहानने त्याचे अगत्यपूर्वक स्वागत केले आणि त्याला मुस्तईदखान ही पदवी दिली. तथापि तो दरबारात राहिला नाही. त्याचा मूळचा आश्रयदाता जफरखान याची काश्मीरचा सुभेदार म्हणून नेमणूक झाल्यावर तो त्याच्याबरोबर तिकडे गेला. कालान्तराने दुसरा शहा अब्बास याने त्याची दरबारी राजकवि म्हणून नेमणूक केल्यानंतर तो इराणला गेला.[२७]

**सलीम**

सलीम हा मूळचा तेहरानचा. इतर अनेक कविंप्रमाणे त्याने हिंदुस्थानमधे राजाश्रय मिळविण्यासाठी आपला मायदेश सोडला.[२८] त्याची लेखणी कविता करण्यात सदैव सज्ज असे आणि तो शिघ्रकाव्य देखील करू शकत असे. परंतु त्याची कविता लोकप्रिय नव्हती, इतकेच नव्हेतर त्याच्या गुणांची सर्वदूर तारीफही झालेली नव्हती. तो इस्लाम खानाच्या चाकरीत होता आणि त्याने त्याच्या कुचबिहार आणि आसाम मधील पराक्रमावर छोटया मस्नवी रचल्या.

**मसीह**

हकीम रूक्नुद्दीन उर्फ मसीह हा मूळचा काशानचा. तो पहिला शाह अब्बास याच्या चाकरीत होता. परंतु त्याच्याकडून अपमान झाल्यामुळे तो

हिंदुस्थानमधे आला. तेथे त्याने जहांगीर आणि शहाजहान या दोघांचीही मर्जी संपादन केली. तो इराणला परतला, आणि १६५६ मधे मरण पावला.[२९]

**रफी**

हसन बेग हा रफी या टोपण नावाखाली लिहित असे. तो मशहद येथून बोखारा येथे गेला. तेथे त्याची नेमणूक नजर महमदखान याने फरमाने आणि आज्ञापत्रे लिहिण्याच्या कामावर केली. तो १६४५च्या सुमारास हिंदुस्थानात आला आणि शहाजहानचे लक्ष त्याने आपल्याकडे वेधून घेतले. तो काही धंदेवाईक कवि नव्हता परंतु त्याची शैली मोठी सुंदर आणि ओघवती होती. जेव्हा तो आपली कविता बादशहाला नजर करीत असे, तेव्हा तेव्हा त्याची शहाजहान भरपूर स्तुती करीत असे.[३०]

**फारूक**

महमद फारूक हा ख्वाजा महमद सिद्दीक याचा अत्यंत बुध्दीमान मुलगा होता. अधिकारी आणि दरबारी मंडळी यांच्यामधे तो अतिशय लोकप्रिय होता. तो अतिशय सुंदर कविता करीत असे. सुरवातीला त्याला अफजल खान याने आश्रय दिला आणि नंतर सईद खान याने. त्याच्या बरोबर तो काबूल येथे राहिला.[३१]

**मुनीर**

हिंदुस्थानी-फारशी संप्रदायातील कवि मधे ज्याचा उल्लेख प्रथम करावयाला पाहिजे तो म्हणजे मौलाना-अबुल बरकात अुर्फ मुनीर हा होय.[३२] तो अतिशय उत्कृष्ट असा गद्य लेखकही होता आणि महमद या इतिहासकाराचा तो अतिशय जानी असा दोस्त होता. अष्टपैलू पणाच्या बाबतीत त्याची तुलना फक्त फैजी बरोबरच होऊ शकली असती. त्याच्या काही कविता या अतिशय आनंददायी अशा आहेत.

**शायदा**

मुल्ला शायदा याचे बालपण फतेपूर येथे गेले, परंतु त्याने दिल्ली येथे स्थलान्तर केले. त्याच्या अंगी खोचक विनोद बुध्दी, कल्पक बुध्दीमत्ता आणि थोडेफार विचार नाविन्य होते. एका तासाच्या अवधीत तो कसीदा रचू शकत असे. तो कुदसीवर जहाल टीका करीत असे. त्याचा समकालीन मीर इलाही

याच्या बरोबर त्याचे अगदी उघड शत्रुत्व होते. त्याला लागोपाठ अबदूर रहीम खान-इ-खानान, शाहरीयार आणि शहाजहान यांचा आश्रय मिळत गेला. त्याने मखजन-इ-गंजूरच्या धर्तीवर एक नितीपर मनवी लिहिली आणि तिला दौलत-इ-बीदार असे नाव दिले. आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धात तो काश्मीरमधे उरलेले जीवन घालविण्याकरिता गेला. तेथेच तो मरण पावला.[३३]

**ब्राम्हण**

चंद्रभान उपनाव ब्राम्हण हा मोगल कालखंडातील पहिला गुणवान हिंदु कवि आहे. तो मूळचा लाहोरचा. तो वृत्तीने सहिष्णु असून त्याचा दृष्टीकोन विशाल होता. तो सारख्याच सुरेखपणे गद्य आणि कविता यांचे लिखाण करू शकत असे. जर एखाद्या लेखकाला अबुल फझल याची शैली पूर्णपणे आत्मसात केली आणि त्याच्या सारखीच हुबेहुब रचना केली असे श्रेय द्यावयाचे असेल तर ते निश्चितच चंद्रभान याच्याकडेच जाईल. त्याचा ग्रंथ चारचमन म्हणजे एखादे गद्य किती अलंकृत आणि गुढ गुंजनात्मक असू शकते त्याचे अतुलनीय उदाहरण आहे.[३४]

**हाजिक**

हकीम हाजीक हा हकीम अबूल फतेगीलानी याचा पुतण्या. त्याचा जन्म हिंदुस्थानात झाला आणि तेथेच त्याचे बालपण गेले. फार्शी आणि हिंदुस्थानी संस्कृतीच्या सुखद् मिलाफाचे त्याचे व्यक्तिमत्व म्हणजे एक उत्कृष्ट उदाहरण होते. त्याची शैली म्हणजे नव्या कल्पनांच्या जुन्या विचारांशी झालेल्या मिलाफाचा एक सुंदर नमुना होता. तो आपल्या रचना अतिशय भावनोत्कटतेने आणि आर्ततेने म्हणत असे. त्याचा लेखन संभार हा प्रचंड होता परंतु तो लोकप्रियही होता. तबकात शहाजहानी याच्या लेखकाने हाफीज महमद खियाली हा गुणवत्तेत अन्वारी याच्या इतकाच श्रेष्ठ होता असे विधान केलेले आहे.[३५]

**खियाली**

खियाली याने कधी श्रीमंताच्या पुढे पुढे केले नाही किंवा त्यान खुश करण्यासाठी काव्यरचना केली नाही. काव्याशिवाय खगोलशास्त्र, फलज्योतिष आणि गणित या विषयांचेही त्याला सम्यक ज्ञान होते.[३६]

**दिलीरी**

दिलीरी हा एक तरूण कवि होता. त्याचे आयुष्य फार मोठ्या गरीबीत गेलेले होते. अन्नाशिवाय त्याला दिवसा पाठीमागून दिवस काढावे लागत

असत. तो उरफी याचा मोठा चाहता होता आणि त्याच्या शैलीचे अनुकरण करण्याचा त्याने प्रयत्न केला. त्याला उमद्या मुलांचा षोक होता आणि स्त्रियांचा तो द्वेष करी.[३७]

### माहीर

महमद अली माहीर हा जातीने पर्शियन होता. त्याचा जन्म हिंदुस्थानात झाला आणि त्याचे बालपणही तेथेच गेले. एका जागेहून दुसऱ्या जागी सारखे फिरत त्याने एखाद्या भटक्या सारखे जीवन घालविले. सुंदर संगीत आणि विलोभनीय सौंदर्य या दोन गोष्टींचे त्याला अतिशय विलक्षण आकर्षण होते. त्याची शैली साधी आणि सुंदर अशी होती.[३८]

### गद्य

कल्पनेच्या विलासाला गद्याच्या प्रांगणात फार मोठा वाव होता. आपली भाषाशैली आणि तालबध्दता ही अधिकाधिक परिपूर्ण व सुस्वर व्हावी म्हणून लेखक वर्ग आपल्याकडून काहीही बाकी ठेवीत नसे. लेखकाच्या लिखाणामधे उपमा अलंकाराची खैरखैरात असे आणि चांगल्यापैकी लेखक आपल्या लिखाणाला काव्याचा साज चढविण्याचा प्रयत्न करीत. अशा तऱ्हेने विकास पावलेल्या पुष्पमय शैलीतील दोन ग्रंथ शष फते कांगडा[३९] आणि चार चमन उपलब्ध असून प्रत्येक ग्रंथामधे एक विशिष्ट संप्रदाय अभिप्रेत आहे. यापैकी एक ग्रंथ शुध्द फारशी आणि दुसरा हिंदुस्थानी फारशी शैलीचा नमुना आहे. कलात्मक कल्पना विलास आणि भाषेची श्रीमंती यामधे दुसरा ग्रंथ पहिल्यापेक्षा वरचढ आहे.

### गद्याचे प्रकार

ज्यानी आपला वेळ फक्त ऐतिहासिक ग्रंथांच्या लिखाणासाठी खर्च केला अशा गद्य लेखकांची संख्या फार मोठी आहे. त्यांची शैली आणि लेखन विशेष याबद्दल चर्चा इतरत्र आलेली आहे. गद्याच्या ज्या दुसऱ्या एका प्रकारची मोठ्या परिश्रमाने जोपासना करण्यात आली तो प्रकार म्हणजे belles lettres हा होय. समकालीन खाजगी आणि अधिकृत पत्रव्यवहाराचे काही संग्रह ग्रंथ आपल्याला आज उपलब्ध आहेत. त्यांची सुंदर आणि अलंकारीक शैली व त्याचप्रमाणे चमत्कारीक कल्पना विलास यांचे मर्म आपण सहजतया जाणू शकतो. मुनीर, ब्राह्मण, जयसिंग,[४०] अफजलखान,[४१]

सादुल्लाखान,[४२] फाजीलखान,[४३] शेख इबायत अुल्ला,[४४] मुल्ला महमूद जैन पुरी[४५] हकीम हाजीक[४६] शैदा, आणि मुल्ला तुघराय[४७] यांची पत्रे आज देखील आदर्श म्हणून पुढे ठेविली जातात.

## तुघराई

मुल्ला तुघराई हा जहांगीरच्या कारकिर्दीच्या अखेरीला हिंदुस्थानामधे आला आणि दक्षिणेमधून शहाजहानच्या दरबारात तो दाखल झाला. त्याची नेमणूक राजपुत्र मुराद याचा मुन्शी म्हणून झाली. त्याच्या समवेत तो बाल्ख येथे गेला. त्याने या मोहिमेचा वृत्तान्त मिरात अल-फुतूह या ग्रंथात लिहिला. त्याच्या इतर गद्य ग्रंथामधे काश्मीरच्या स्तुतीपर असलेल्या फिर दौसीया, शहा शुजा याच्या स्तुतीपर असलेल्या कन्न-अल-मानी, आणि राजपुत्र मुराद याच्या स्तुतीपर असलेल्या ताज-अल-मदाई यांचा समावेश होतो.

## इतर गद्य ग्रंथ

१६४७ मधे शहाजहान याच्या विनंतीवरून महमद अफजल या बोखारा येथील विद्वानाने मलफुजात-इ-तीमूरी या ग्रंथाची सुधारलेली आवृत्ती तयार केली.[४८] त्याच वर्षी हरमुजच्या राजपुत्र बाला अख्तर याचे पराक्रम आणि साहस कथा यांचे वर्णन करणारा ग्रंथ जौनपूरच्या मुनिर याने रचला. त्या काळच्या अतिशय अलंकारीक अशा शैलीमधे या ग्रंथाची रचना आहे.[४९]

याच कालखंडात चार व्यापक असे शब्दकोश रचण्यात आले आणि ते ग्रंथ शहाजहान याला अर्पण करण्यात आले. ते पुढील प्रमाणे : फरहंग-इ-रशीदी आणि मुन्तखाब अुल-लुघाट-इ-शहाजहानी हे अबदूर रशीद अल तङ्वी याने रचलेले; अमान अुल्ला उर्फ खाना जाद खान याने रचलेला चहार-अन्सार-दानिशा आणि महमद सादीक याने रचलेला शहीद -इ-सादीक. यापैकी शेवटचा शब्दकोश हा शास्त्रीय ज्ञान कोशासारखा असून त्यामधे विशेषतः धार्मिक, तत्त्वज्ञान विषयक, राजकीय, नैतिक आणि विश्वोत्पत्ति शास्त्र या विषयांचा समावेश आहे.[५०]

## भाषान्तरे

अकबराच्या कारकिर्दीत नंतर दारा शुको याने आणखी एक गद्य वाङ्मयाचा प्रकार उर्जितावस्थेला आणला आणि तो म्हणजे संस्कृत ग्रंथांचे फारशी भाषेमधे भाषान्तर. त्याने स्वतः हिंदू उपनिषद, भगवत्गीता आणि

योगवसिष्ठ यामधील पारिभाषिक संज्ञांचे भाषांतर केले.[५१] त्याचा मुन्शी बनवाली दास याने प्रबोधचंद्र उदय याचे फारशी मध्ये भाषान्तर केले आणि त्याचे नाव गुलजार-इ-हाल असे ठेविले.[५२] दुसऱ्या एका व्यक्तिने म्हणजे इब्न हर करण याने रामायणाचे भाषान्तर केले.[५३]

**धार्मिक ग्रंथ**

या कालखंडामधे ज्या धार्मिक ग्रंथांची रचना झाली त्यांचे थोडे फार वर्णन देखील जागेच्या अभावी शक्य नाही. परंतु दोन उल्लेख करणे अत्यंत जरूरीचे आहे. दारा शुको याने एका मुसलमान अवलियाचे चरित्र लिहिले आणि या ग्रंथाचे नाव त्याने सफीनत-अल्-औलीया असे ठेवले.[५४] परंतु अधिकता दर्शक धर्मावरील अत्यंत महत्त्वाचा आणि अस्सल ग्रंथ म्हणता येईल तो म्हणजे दबिस्तान-अल-मजाहीब हा होय. या ग्रंथाचे लिखाण सुप्रसिध्द लेखक मुहासिन फानी याने केले. हा एक उत्कृष्ट कवि होता, तितकाच उत्तमपैकी गद्य लेखकही होता.[५५]

**औषधशास्त्र**

अभ्यासाचा दुसरा आवडता विषय म्हणजे औषधशास्त्र हा होता. या कालखंडातील काही हकीम यांची गणना अतिशय बुध्दीमान व्यक्तिमधे करावी लागेल. आपल्या शास्त्रामधे ते निष्णात होते. इतकेच नव्हे तर इतर विषयांचे देखील त्यांना व्यापक ज्ञान होते.[५६]

**वजीर खान**

हकीम अलीम उद्दीन वजीर खान हा दरबारी राज वैद्य होता. त्याचा जन्म लाहोर मधे झाला होता आणि तेथेच त्याचे बालपण गेले होते. त्याने वैद्यक शास्त्राचा अभ्यास हकीम दवाई याच्या हाताखाली केला. नाडीवरून रोग निदान करण्यात तो कुशल होता आणि शहाजहान बादशहा आणि त्याचे मुलगे यांच्या स्वभाव विशेषाचे त्याला यथातथ्य ज्ञान होते. त्याच्याकडे एका पाठोपाठ दिवाण-इ-बियुतात, खान सामान आणि मीर अर्ज या अधिकारपदाची सूत्रे आली. अखेर त्याला ५००० स्वारांचा अधिकारी करण्यात आले आणि पंजाबच्या सुभेदारीवर त्याची नेमणूक करण्यात आली.[५७]

दुसरा नावाजलेला हकीम म्हणजे हकीम दाऊद हा होय. हा पहिल्या शहा अब्बासच्या मर्जीतला होता. आपल्या आश्रयदात्याच्या मृत्यूनंतर

तो मक्का येथे गेला आणि तेथून प्रवास करत तो हिंदुस्थानात आला. शहाजहानने पाच हजार स्वारांची मनसब आणि तकर्रबखान ही पदवी देऊन त्याचा गौरव केला.[५८]

### मोमिना

हकीम मोमिना शीराजी हा जहांगीरच्या कारकिर्दीत हिंदुस्थानामधे आला आणि महाबत खान याच्या चाकरीत शिरला. पुढे त्याची नेमणूक दरबारामधे करण्यात आली आणि शहाजहान याने त्याला दोन हजारांचा अधिकारी केले. तो अतिशय हुषार आणि लोकप्रिय असा धंदेवाईक हकीम होता.[५९]

### हकीम

आणखी ज्या काही नावांची नोंद होणे अत्यावश्यक आहे ती नावे म्हणजे हकीम फतुल्ला शीराजी. हा रोगशास्त्र आणि पॅथॉलॉजी यामधील तज्ञ होता. दुसरा म्हणजे हकीम सद्रा. हा पिढीजात हकीम होता.[६०] आणखी दोघेजण म्हणजे हकीम अबुल कासीम आणि हकीम रूकनाई काशी. त्या काळातील अतिशय निष्णात असे शस्त्रवैद्य जगजीवन[६१] आणि शेख कासीम हे होते.

### खगोलशास्त्र आणि गणित

खगोलशास्त्र आणि गणित या दोन विषयांचा देखिल मोठ्या प्रमाणावर व्यासंग त्या काळखंडात होता. मुल्ला फरीद मुनज्जीम हा त्या काळातला फार मोठा खगोलशास्त्रज्ञ होता. त्याने एक खगोलशास्त्रविषयक नकाशा तयार केला आणि त्याला आपल्या आश्रय दात्याच्या नावानुसार जीच-इ-शहाजहानी असे नांव दिले.[६२] अताउल्ला याने गणित, मापन शास्त्र आणि बीजगणित यावर एक प्रबंध लिहिला आणि तो शहाजहान आणि दारा यांना अर्पण केला.[६३] अबदूर रशीद याने संस्कृत मधून बीजगणितचे भाषांतर केले.[६४] दुसरे सुप्रसिध्द गणिती म्हणजे मौलाना महमुद जौनपुरी[६५], मौलाना महमद याकुब लाहोरी[६६] आणि मीर शम्सउद्दीन खिलजानी[६७] हे होते.

### वेदान्त विद्वान

न्यायतत्त्व शास्त्र, वेदान्त, नितीशास्त्र, तत्त्वज्ञान, आणि समाजशास्त्र हे सिध्द पुरूष आवलीये यांच्या अभ्यासाचे विषय होते. अशा तऱ्हेच्या विद्वानांची संख्या ही गणती न करता येण्याएवढी होती. प्रत्येक खेडे अथवा शहर यामधे मुल्लांचे वास्तव्य असे आणि हा मुल्ला आपला वेळ एखाद्या मशिदीत

वरील पैकी एखाद्या विषयाचे चिंतन करण्यात घालवीत असे. या काळातले सुप्रसिध्द विद्वान म्हणजे अबुल मकारीम[८८] हा अबुल फजल याचा भाऊ होता. मुल्ला हैदर कश्मीरी;[८९] मौलाना अब्दअुस सलाम लाहोरी[९०] आणि मौलाना हसन दिहलवी.[९१]

### साधुसंत

आपल्या सदाचरणाबद्दल आणि धर्मनिष्ठेबद्दल विशेषेकरून ज्या व्यक्ति प्रसिध्द होत्या त्यामधे लाहोरचा मुल्ला शहा,[९२] सय्यद अहमद कादीरी[९३], सय्यद जलाल गुजराती[९४], शहा मीर लाहोरी[९५] आणि शेख अबदूल हक दिहलवी[९६] हे होते.

### हिंदी

शहाजहानच्या कारकिर्दीचा कालखंड आणि ज्याचे वर्णन वाङमय आणि भाषा यांच्या विकासाचा अतिशय तेजस्वी असा युगारंभ असे करता येईल तो कालखंड हे जवळ जवळ एकमेकांशी मिळते जुळते होते. या विकासाच्या परिणामापासून शहाजहान अलिप्त राहणे हे जवळ जवळ अशक्य होते. तो हिंदी बोलत असे. हिंदी संगीताची त्याला आवड होती आणि हिंदी कवींना तो आश्रय देत असे. त्यावेळी दरबाराबरोबर संबंध असलेल्या हिंदी कवींमधे सुंदरदास, चिंतामणी आणि कविंद्र आचार्य याचा उल्लेख करावा लागेल.

### सुंदर दास

सुंदर दास ब्राह्मण हा ग्वाल्हेरचा [९७] राहणारा. शहाजहान याने त्याला राजाश्रय दिला आणि त्याला कविराय ही पदवी प्रथम दिली. यानंतर त्याच्या अंगातील गुणांची आपल्याला कदर आहे हे दर्शविण्यासाठी त्याने या पदवी पाठीमागे महा ही उपाधी जोडली. अधून मधून मुत्सद्देगिरीच्या कामगिरीवर शहाजहानकडून त्याची नेमणूक केली जाई. जुजहार सिंग याने बंड करण्याचे अगोदर जासूद म्हणून त्याला त्याच्याकडे पाठविण्यात आले होते. त्याने हिंदी काव्यकलेवर सुंदर शृगांर हा ग्रंथ लिहिला. त्याने लिहिलेल्या आणखी दोन ग्रंथांची नावे 'सिंघासन बत्तीसी' आणि 'बारह मासा' अशी दिली जातात.

चिंतामणि [९८] हा कानपूर जिल्ह्याचा रहिवासी होता: चार भावामधे हा सर्वात वडील होता. चौघाही भावांना कविच्या अंगी असलेल्या उत्कृष्ट बुध्दी

मत्तेचे वरदान होते. परंतु त्या सर्वांमधे चिंतामणि हा उजवा होता यात काहीच शंका नाही. वस्तुस्थिती अशी होती की कवितेच्या कलेमधे एका नवीन प्रभावाचा तो जनक होता. त्या काळामधे तो सर्वश्रेष्ठ कवि होता असे सर्वांचे मत होते. शहाजहानचा त्याला राजाश्रय होता. त्याने "छंदविचार", "काव्यविवेक", "कविकुल कल्पतरू" आणि "काव्य प्रकाश" हे ग्रंथ लिहिले तो विशेषकरून ब्रोज भाषा बोलीचा कवि होता आणि त्याची शैली अतिशय सुरेख आणि उत्कृष्ट अशी होती. अत्युत्तम कविता आणि छंद यासाठी याने रचलेले रामायण मुख्यत्वेकरून प्रसिध्द आहे.

कवीन्द्र आचार्य[७९] हा बनारसचा रहिवाशी होता. त्याने शहाजहान आणि त्याचे मुलगे यांच्या स्तुतिपर "कविंद्र कल्पलता" नावाचा ग्रंथ लिहिला त्याच्या ग्रंथरचनेत आपल्याला अवधी आणि ब्रीजभाषा या बोलींचा अतिशय सुरेख असा संगम झालेला दिसतो. तो एका चांगल्या पैकी संस्कृत कविही होता. त्याने योग वसिष्ठ या ग्रंथावर एक भाष्य लिहिले.

**अर्दूचे भवितव्य**

परंतु इकडे उत्तरेमधे हिंदीची भरभराट होत असताना आणि त्या भाषेला पूर्णत्व, सौंदर्य आणि शैलीबध्दता प्राप्त होत असताना हिंदीची भविष्य कालीन प्रतिस्पर्धी होणारी भाषा म्हणजे अुर्दू, हिची मात्र अतिशय जोमदारपणे दक्षिणेमधे वाढ होत होती, ही गोष्ट अतिशय चमत्कारीक म्हणून नमूद करण्याजोगी आहे. उर्दू भाषेचे मूळ हे पूर्व पंजाब आणि पश्चिम उत्तर प्रदेशात होते. उर्दू भाषेने उत्तरेतून स्थलांतर केले आणि १८ व्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत ती आपल्या मूळ देशी परतली नाही. तिच्या विकासाचे श्रेय शहाजहान याला देणे म्हणजे अतिशय चुकीचे आहे आणि त्या गोष्टीला ऐतिहासिक पुरावा नाही. शहाजहान याने तिला राजाश्रय दिला नाही इतकेच नव्हे तर उत्तर हिंदुस्थानात[८०] त्या भाषेमधे ज्याला असामान्य प्रभुत्व प्राप्त झालेले आहे असा एकही लेखक आपल्या आढळण्यात येत नाही.

**दक्षिणेमधे उर्दूची भरभराट का झाली ?**

मोगल दरबारामधे अुर्दूभाषेला अनुकूलता लाभली नाही याचे कारण अगदी उघड आहे. फारशी भाषेचा प्रभाव अजून जाणवण्या इतपत प्रबळ होता आणि इराण बरोबर मोगलांचे घनिष्ट संबंध असल्यामुळे शहाजहानच्या संपूर्ण कारकिर्दीत तिला सातत्याने दिलासा मिळत गेला. इराण बरोबर असलेले

हे संबंध औरंगजेबाच्या कारकिर्दीत तुटले आणि उत्तरेमधे अुर्दूची झपाटयाने वाढ झाली तर इकडे दक्षिणेमधे फारशी भाषेचा प्रभाव खूपच कमी झाला. विजापूर आणि गोवळकोंडा येथे जवळ-जवळ साऱ्या राज्य कारभाराचे स्वरूप हिंदूमय झाले. अशा परिस्थितीत अुत्तरेच्या अुर्दूपासून वेगळी असलेली दख्वनी अुर्दू हिची वाढ फारशी आणि ब्रीजभाषा यांच्यामधे जो संकर झाला त्याच्या प्रभावाने न होता फारशी भाषेचा मराठीवर जो प्रभाव पडला त्या मधून झाली, असे गृहीत धरल्यास त्यात फारशी चूक आहे असे म्हणता येणार नाही.

### शिल्पशास्त्र

सर्व साधारण व्यक्तिच्या मनात शहाजहानच्या कारकिर्दीच्या वैभवाचे प्रतिबिंब अुत्कृष्टपणे चित्रित करण्यात आलेले आहे, ते त्या काळच्या वाङ्मयात नसून मुख्यत्वेकरून त्या काळच्या कलेमधे आहे. बादशहाचे सारे लक्ष शिल्पशास्त्राच्या विकासाकडे केंद्रित झालेले होते. त्याच्या कारकिर्दीत बांधण्यात आलेल्या इमारती म्हणजे शिलाशास्त्रातील अतुलनीय असे जे कसब असते त्याचे चालते बोलते स्मारक आहे असे म्हणावे लागेल. आज देखील त्यांची मोहकता आणि ताजेपणा पूर्वीइतक्याच जोमाने टिकून आहे आणि साऱ्या जगाच्या कानाकोपऱ्यातून आलेल्या प्रवाशांच्या डोळयांना अजून देखिल त्यांच्याकडे बघितल्यावर भरपूर नेत्रसुखाचा आनंद मिळतो. त्यांच्याकडे बघितल्यावर आपल्याला जी प्रचिती येते ती उदासतेची, शांततेची, सौंदर्याची आणि भव्यतेची. एखाद्या तज्ञाला या वास्तूंमधील अतिविस्तार हा थोडा फार विचित्र वाटला तरी देखील त्या वास्तूंचे सर्वांगीण सौंदर्य हे एखाद्या अनभिज्ञ व्यक्तिच्या डोळयांना अपरिमीत सुख देणारे आहे. जरी त्या काळातील अतिशय प्रचंड असे एतिहासिक वाङ्मय नष्ट झाले असले आणि शहाजहानच्या कारकिर्दीची कथा सांगण्यासाठी केवळ या इमारती जरी उभ्या असल्या तरी देखील इतिहासामधील अतिशय भव्य अशी ती कारकिर्द होती असे आज देखील कोणीही निश्चितपणे सांगेल याबद्दल थोडा देखील संशय असावयाचे कारण नाही.

### शिल्पाची घाटणी

या कालखंडातील शिल्पाची घाटणी काय असावी याबद्दल तज्ञांमधे भिन्न भिन्न दृष्टिकोन आहेत. हिंदुस्थानी प्रतिमेच्या अंगी काहीतरी स्वतंत्र

किंवा अस्सल निर्माण करण्याची कुवत आहे हे मान्य करण्यास कां-कूं करणाऱ्या ज्या काही व्यक्ति आहेत ते याबाबतीत भारतीय शिल्पावर बाहेरचे अतिशय जबरदस्त असे दडपण पडल्याचा दावा करतात.[१] परंतु याच्या अगदी विरूध्द असे मत असणारा दुसरा एक वर्ग आहे. ते असा दावा करतात की या घाटणीची उत्पत्ती भारतीय परंपरेचा जो नैसर्गिक विकास आणि पूर्तता झाली त्यातूनच केवळ झालेली आहे.[२] अशा तऱ्हेच्या अतिशय नाजूक अशा प्रश्नावर अन्तिम निर्णयाचे भाष्य करणे हे अशक्य आहे. परंतु सत्य हे या दोन अन्तिम मतामधेच सामावलेले आहे, ही गोष्ट अतिशय उघड आहे यात काही शंका नाही. या दोहोपैकी कोणत्यातरी एका संस्कृतीच्या प्रभावाने या घाटणीची निर्मिती झाली असावी असे निःशंकपणे मानण्यास जागा आहे. या घाटणीचा विकास अतिशय स्थिरपणे होत गेला आणि या कालखंडात तिला राजाश्रय आणि उत्तेजन मिळाल्यामुळे पूर्णत्व प्राप्त झाले.

**घाटणीची वाढ कशी झाली**

अकबराची कारकिर्द आणि त्याचा नातू शहाजहान याची कारकीर्द यामधे बांधल्या गेलेल्या इमारतींच्या घाटणीमधे अगदी डोळ्यामधे दिसण्याजोगा फरक प्रथम दर्शनी आपल्याला दिसून येतो. याचा परिणाम असा झाला आहे की या दोन्ही घाटणींमधे काहीतरी दुवा अथवा बंधन आहे ही गोष्ट जे विचारात घेत नाहीत. त्यांच्या दृष्टीकोनात शहाजहानच्या कारकिर्दीतील घाटणीचा विकास हा अकबराच्या कारकिर्दीतील घाटणीतून झाला असावा अशी जी विचारसरणी आहे तिची शक्यता अतिशय कमी संभवते. परंतु थोडा विचार केल्यास अशा तऱ्हेच्या कल्पना सहज नाहिशा होतात. जर का आपण दोन्ही कारकिर्दीमधील बांधण्यात आलेल्या इमारतींचा एकत्रपणे विचार केला तर त्यामधे एक तऱ्हेचा दुवा आहे असे आपल्याला सिध्द करता येईल आणि या घाटणीचा जो विकास झाला त्यामधील टप्प्यांचा आपल्याला मागोवा घेता येईल. हा जो एकाएकी बदल झाला त्याचे आणखी एक स्पष्टीकरण आहे. ते आपल्याला शहाजहानच्या कारकिर्दीमधे अतिशय मोठ्या संख्येने इमारतींची जी बांधणी झाली त्यामधे सापडू शकेल. त्याशिवाय खुद्द बादशहाला शिल्पाचे जे शास्त्र होते ते पूर्णपणे अवगत होते. त्याचप्रमाणे रूपहीन आणि विचित्र यापासून अतिशय भव्य आणि मनात भरणारे यामधला फरक कसा ओळखावयाचा याचे त्याला सम्यक ज्ञान होते. वस्तुस्थिती अशी होती की प्रत्येक इमारतीचा नकाशा तो काळजी

पूर्वक पहात असे आणि आपली अंतिम सम्मति देण्याचे अगोदर तज्ञांबरोबर तो त्याचे तपशीलवार विवेचन करीत असे.[८] अशा परिस्थितीमधे एका उत्कृष्ट आणि अतिशय नवीन अशा घाटणीचा प्रादुर्भाव झाला असल्यास त्यामधे आश्चर्य वाटण्याचे काहीच कारण नाही.

### शहाजहानच्या आवडी निवडी

शहाजहानला शिल्पामधे जी आवड होती तिचा उगम आपल्याला त्याच्या आयुष्याच्या अगदी पूर्वार्धात झालेला दिसून येईल. राजपुत्र असताना देखील त्याला राहण्यासाठी दिलेल्या राजवाड्यामधे तो बदल करीत असल्याचे आणि नव्या दुरूस्त्या करीत असल्याचे दिसून येते. जेव्हा तो बादशहा झाला तेव्हा त्याने आपल्या उराशी बाळगलेल्या कल्पनांना वाट करून देण्याचा चंग बांधला. त्याशिवाय त्याच्या स्वभावामधे जे काही विशेष होते त्यामधे त्याने शिल्पाला जे इतके वाहून घेतले त्याचे स्पष्टीकरण मिळते. शहाजहान हा बढाईखोर आणि महत्वाकांक्षी होता. ज्या माणसाच्या अंगी बढाईखोरपणा असतो तो मनुष्य लोकांनी आपल्याला चांगले म्हणावे याकरता अगदी जीव टाकीत असतो. म्हणून त्याला एकाएकी अशी जाणीव झाली असावी की आपण जर अतिशय भव्य अशा इमारतींची उभारणी केली तर आपणाला जे काही पाहिजे आहे ते चिरंतन मिळू शकेल. दुसरी गोष्ट म्हणजे त्याच्या अंगी जी इर्षा होती ती त्याला सर्वसाधारणपणे अशक्य असलेल्या गोष्टी साध्य करण्यास प्रवृत्त करी. चित्रकलेमधे आणखी प्रगति करणे हे अशक्य होते, आणि सहाजिकच ज्या शिल्पकलेच्या प्रांतामधे सुधारणेला भरपूर वाव होता त्या शिल्पकलेकडे तो वळला. त्याच्या कारकिर्दीत ज्या इमारती बांधण्यात आल्या त्यामुळे त्याचा दिमाख आणि महत्वाकांक्षा थोड्या फार अंशी तरी तृप्त झाली असली पाहिजेत.

### त्याने ठिकठिकाणी बांधलेल्या इमारती

शहाजहान याने आपल्या कारकीर्दीमधे ज्या ज्या स्थळांना भेटी दिल्या त्या त्या ठिकाणी शिल्पशास्त्रामधे त्याला जी अनिवार अशी आसक्ती होती. त्याचा ठळक ठसा आपल्याला दिसून येतो. त्याच्या कारकिर्दीमधे ज्या अशा इमारती बांधण्यात आल्या त्यांची यादी देणे देखील कठीण आहे, मग त्यांचे तपशीलवार वर्णन करणे हे तर सोडूनच द्या. अजमीर येथील शेख

मुईन उद्दीन चिस्ती याच्या मोठ्या कबरीतील दर्गा आणि अन्नसागर वरील बारादरी या दोन गोष्टी म्हणजे शहाजहानच्या सदभिरूचिचा अतिशय उत्कृष्ट अशा पुराव्या सारख्या आहेत. समकालीन इतिहासकारानी काश्मीर, लाहोर, आंबाला, बारी, फैजाबाद, ग्वाल्हेर, काबूल आणि इतर अनेक शहरे यांचा उल्लेख करून त्याठिकाणी शहाजहान याने इमारती बांधल्या असे सांगितले आहे. परंतु शहाजहान याने ज्या इमारती बांधल्या त्यापैकी अतिशय प्रातिनिधिक आणि ज्या इमारती उत्कृष्टपणे जतन करून ठेवण्यात आल्या आहेत अशा इमारती आग्रा आणि दिल्ली येथीलच असे म्हणावे लागेल.

**आग्रा**

आग्राच्या[४] किल्ल्यात असलेल्या इमारती म्हणजे अकबराच्या काळापासून तो शहाजहानच्या काळापर्यंत बांधण्यात आलेल्या अनेक तऱ्हेच्या इमारती यांचा समुच्चय आहे असेच समजले पाहिजे. शहाजहान याने तेथे दिवाण-इ-आम आणि दिवाण-इ-खास आणि जनान्यातील स्त्रीयांसाठी इमारती यांची अुभारणी केली. "या इमारतींतील सभास्थाने, दोन इमारतींच्या मधून जाणारे रस्ते आणि शामियाने यांची बांधणी शुध्द पांढऱ्या संगमरवरी दगडातील आहे, त्यावर अतिशय विस्तृत असे कोरीव काम आहे आणि त्यावर फुलांची बहारदार अशी नक्षी रेखाटलेली आहे.[५]" आणखी एक सुंदर बांधकाम म्हणजे सामान बुरूज. यावर एकेकाळी मौल्यवान खडे बसवून तो सुशोभित करण्यात आला होता. या ठिकाणीच शहाजहानचा अंत झाला. आपल्या आयुष्याच्या शेवटच्या क्षणी आपली प्रिय पत्नी जेथे चिरंतन निद्रा घेत पहुडली होती तेथे म्हणजे ताजमहालकडे शहाजहानने आपली दृष्टी लावली होती, ती या सामान बुरूजावरूनच.

**मोती मशीद**

किल्ल्यामधील फारशी भव्य नसलेली परंतु जिचे वर्णन सर्वोत्कृष्ट असे करता येईल ती म्हणजे मोती मशीद ही होय. ही मशीद सात वर्षात (१६४५–१६५३) बांधण्यात आली. तिच्या बांधकामावर तीन लक्ष रुपये खर्च करण्यात आले. ही इमारत म्हणजे शिल्पकलेची परिपूर्णता जिच्यामधे आहे परंतु त्याचबरोबर जिच्यामधे साधेपणा आहे, याचे एक उत्कृष्ट उदाहरण आहे. या मशिदीच्या बांधकामासाठी पांढऱ्या संगमरवराचा अुपयोग केलेला आहे.

### जामी मशीद

किल्ल्याच्या बाहेर वायव्येच्या बाजूला जामी मशीद आहे. शहाजहानची सर्वात मोठी मुलगी जहान आराबेगम हिने ती बांधली आहे. या मशिदीचे बांधकाम पाच वर्षे चालल्यानंतर १६४८ मधे ती पुरी झाली. तिच्या बांधकामासाठी खर्च एकंदर ५ लक्ष रु. आला. धाडसी कल्पकता, अतिशय अुत्तम सफाई आणि भव्य प्रमाणशिलता यांचा उत्कृष्ट मिलाफ असलेली अतिशय सुंदर इमारत असे या मशिदीचे वर्णन करावे लागेल".

### ताज

परंतु आग्रा शहरातील सौंदर्याचा मेरूमणी असे ज्याचे वर्णन करता येईल तो म्हणजे ताज. जगामधील अतिशय विलोभनीय असे बांधकाम असाच ताजमहालाचा उल्लेख करावा लागेल. हॅवेल ताजमहालला हिंदुस्थानचा व्हिनस द मिलो असे संबोधितो. त्याने असे उद्‌गार काढले आहेत की ताजमहाल म्हणजे एक मोठी आदर्श कल्पना सृष्टी असून ही कल्पना सृष्टी शिल्पशास्त्राच्या विश्वांत मोडणारी नसून कोरीव कामाच्या विश्वांत मोडणारी आहे.[९] ताज महालाची पराकाष्ठेची रमणीयता, त्याच्या शिल्पकलेची भव्यता, आणि ज्या कारागीरांनी त्याचे बांधकाम केले त्यांची पूर्णाभिरूची आणि कौशल्य यांची कल्पना करून देणे हे देखील अशक्य आहे. ताज महालच्या बांधकामासाठी वापरलेला शुध्द संगमरवरी दगड, त्याचे कलात्मक गोलाकार घुमट, त्याचे उत्तमप्रकारे कोरीव काम केलेले पडदे आणि त्याचे निष्कलंक जडाव काम ही सर्व वर्णनाच्या पलीकडे आहेत. ताजमहाल म्हणजे खरोखर एक सौंदर्याची प्रतिकृती आहे आणि या प्रतीकृतीपासून मनाला कायम आनंदच मिळत राहील. हिंदुस्थानच्या शिल्पकलेच्या सबंध इतिहासात ताजमहालसारखे काही बांधले गेले नाही किंवा कल्पिलेही गेले नाही. ताजमहालपेक्षा अतिशय प्रचंड अशा इमारती आहेत इतकेच नव्हे तर ताजमहालपेक्षा अधिक विस्तार असलेल्या इमारती अस्तित्वात आहेत परंतु भव्यता आणि साधेपणा यांची इतक्या पूर्णांशाने अुभारणी आणि प्रमाणबध्दतापूर्वक एकोपा आपल्याला कुठेही आढळून येत नाही. ताजमहालकडे बघितल्यानंतर डोळे निवतात आणि हृदयाला आमोद होतो. मुमताज महालच्या या स्मारकाच्या अुभारणीच्या कल्पनेचा उगम जरी दिमाखातून झालेला असला तरी त्यावर मृदुतेचे आवरण आहे.[१०]

**ताजमहालच्या घाटणीबाबत वेगवेगळी मते**

ताजमहालच्या सौंदर्याची प्रशंसा करण्याबाबत जरी सर्व लेखकांमधे मोठा एकोपा असला तरी ताजमहालची उत्पत्ति आणि घाटणी याबाबत त्यांच्या मतामधे फारमोठा विरोध आहे. आपल्या 'Rambles and Recollections' या ग्रंथात स्लीमन याने एक अतिशय विलक्षण सूचना केली आहे आणि ती म्हणजे ताजमहालचा नकाशा ऑस्टिन बोर्डो या फ्रेंच वास्तुशास्त्रज्ञाने तयार केल्याची.[११] त्याच प्रमाणे कल्पनेला न पटणारी हास्यास्पद कलाटणी देऊन तो हा फ्रेंच वास्तुशास्त्रज्ञ म्हणजे उस्ताद ईसा आहे असे प्रतिपादन करतो. परंतु ऐतिहासिक पुराव्याच्या अभावी या सूचनेला पुष्टी मिळत नाही. मॅनरिक याने जो पुरावा सादर केला आहे तो आधारा दाखल घेऊन व्ही. स्मिथ हा ताजमहालच्या नकाशाचे जनकत्व जरमिनो वीरोनेओ याच्याकडे देतो.[१२] परंतु ऐतिहासिक पुरावा हा सदोष आहे यावर आणि इमारतींच्या घाटणी बाबतचा अंतर्गत पुरावा जो खुद्द इमारतीवरूनच प्रत्ययास येतो त्याच्या आधारे सर जॉन मार्शल आणि इ.बी. हॅवेल यांनी स्मिथचे मत अग्राह्य ठरविले आहे.[१३]

**दिल्ली**

दिल्लीचा राजवाडा[१४] म्हणजे एकाच वेळी बांधण्यात आलेली आणि एकसारख्या योजनेवर आधारलेली अशी समतोल रचना आहे. सौंदर्य आणि भव्यता यामधे पूर्वेकडे तरी ही रचना अद्वितिय आहे आणि कदाचित साऱ्या जगात तिच्यापेक्षा सरस अशी दुसरी रचना आढळणार नाही. फत्तेपूर सीक्री येथील अकबराच्या राजवाड्याबरोबर तुलना करताना दोन्हीमधील विलक्षण विरोधाभास सहज दृष्टिस पडतो. एक म्हणजे मर्दानी रसरशीत पणाचा नमुना आहे तर दुसरीमधे जनानी सौंदर्यविस्ताराचे चालते बोलते उदाहरण आहे. परंतु दोन्ही रचनांमधे त्यांच्या परीने सौदर्य विशेष आहेत. मुद्दाम ज्याची बांधणी हाती घेण्यात आलेली आहे आणि प्रमाणबध्द योजनेनुसार जी पार पाडण्यात आलेली आहे अशा परीपूर्ण राजवाड्याची तजवीज काय असते हे समजून घेण्यासाठी दिल्ली येथील राजवाडा हा हिंदुस्थानामधील एकमेव आहे असे आपल्याला म्हणावे लागेल.

पश्चिमेकडे असलेले राजवाड्याचे मुख्य प्रवेशद्वार अथवा लाहोरी दरवाजा याचे तोंड भरपूर लांबरूंद असलेल्या चांदणी चौकाकडे आहे. हा दरवाजा

घुमट असलेल्या एका मोठ्या दिवाणखान्याशी जोडलेला असून या दिवाण खान्यातून आतल्या बाजूला असलेल्या पटांगणांत प्रवेश करता येतो. हे पटांगण ओलांडून गेल्यानंतर दिवाण-इ-आमकडे तोंड असलेला नौबत खाना आहे. ढबदारपणाच्या बाबतीत दिवाण-इ-आमची इमारत आग्रा येथे असलेल्या तशाच इमारतीपेक्षा वरचढ आहे. राजवाड्याच्या अुत्तर विभागात सुप्रसिध्द दिवाण-इ-खास ही इमारत आहे. शहाजहानच्या कारकिर्दीमधील सर्व इमारतीत ही इमारत अधिक अलंकारिक आहे. रचना शास्त्राच्या दृष्टीकोनातून बघितल्यास या इमारतीची घाटणी कदाचित परिपूर्ण नसेल. परंतु ही इमारत अतिशय भव्य आहे यात काहीच शंका नाही. या इमारतीत ताजमहालचा साधेपणा नसेल परंतु ताजमहालचा ज्या भावनेतून जन्म झाला ती भावना या इमारतीच्या मुळाशी नव्हती ही गोष्ट आपण लक्षात घेतली पाहिजे. शहाजहान आपल्या किर्तीच्या शिखरावर असताना त्याच्या वैभवाचे वर्णन करणे हा या शिल्पाचा अुद्देश होता. आणि ही गोष्ट ध्यानात घेतली तर या शिल्पाचे यश परिपूर्ण आहे असेच म्हणावे लागेल. अमीर खुश्राव[५] याने केलेली यथोचित रचना ही इमारत बांधण्यापाठीमागे जी कल्पना होती ती अतिशय हुबेहुबपणे व्यतीत करते.

जर का या भूतलावर खरोखरच स्वर्ग असेल
तर तो इथे आहे, इथे आहे, इथे आहे,

दिल्ली किल्ल्याच्या बाहेरच्या बाजूला एका उंच चबूतऱ्यावर जामी मशीद आहे. या मशीदीचा आराखडा आणि ज्या घाटणीमधे ती बांधण्यात आलेली आहे त्याबाबत मोती मशीदीबरोबर तुलना केल्यास आपल्याला दोन्ही मधे असलेला पूर्ण विरोधाभास नजरेस येतो. या मशीदीमधून ज्या राजवाड्याचे दर्शन होते, त्या राजवाड्यातील चैतन्यच जणू या मशीदीत मूर्तिमंत खेळत आहे असे वाटते. ही मशीद शाही मशीद म्हणूनच खरी बांधण्यात आलेली होती. ती पाहण्याकरीता येणाऱ्या लोकांच्या मनात तसाच विचार येतो. तिची बांधणी तांबड्या वाळूच्या दगडात करण्यात आलेली आहे आणि यामुळे किल्ल्याच्या बाहेरच्या भिंतीबरोबर ही रंगसंगती अतिशय मिळती जुळती आहे. या मशिदीला दोन संगमरवरी मनोरे आहेत.[६६]

**चित्रकला**

जरी शहाजहानचे मुख्य लक्ष वास्तूशास्त्राच्या विकासाकडे केंद्रित झालेले होते तरी त्याने आपल्या बापाची चित्रकले बाबतची परंपरा पुढे चालू ठेवली.

चित्रकलेच्या शाळेवर आता महमद फकीर अुल्ला खान याची देखरेख होती. आणि त्याकाळच्या उत्कृष्ट प्रतिमांचे चित्रण करणारा मीर हाशिम हा त्याचा मदतनीस होता. बादशहाव्यतिरिक्त दरबारातील चित्रकलेचे आणखी प्रसिध्द आश्रय दाते म्हणजे आसफखान आणि राजपुत्र दारा शुको हे होते. त्यांच्या चाळीस अल्पाकृति चित्रांची चित्रावली अजून अुपलब्ध आहे. या चित्रावलीवरून त्याकाळच्या कलेची आपल्याला कल्पना येते.

कलेच्या रचना प्रणालीत अनेक बदल झालेले आपल्या नजरेला येतात. पहिल्या प्रथम मुळचा जोमदारपणा आणि स्वाभाविकता यांचा अभाव. वरवर पाहता जरी मानवी प्रयत्नामधून दिसून येणाऱ्या कसबाची जपणूक झालेली आपल्याला आढळून येते तरी वास्तूचा नकाशा किंवा कल्पना यामधे बदल करण्याचा थोडा देखील प्रयत्न केला गेला नाही. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास मोगल कालीन कलेत अस्सल चित्राच्या निर्मितीऐवजी नकली निर्मितीचे प्रमाणच अधिक होते. दुसरी गोष्ट म्हणजे या चित्रकलेमधे अतिशय विलक्षण आणि विचित्र चित्राच्या निर्मितीबद्दलची चमत्कारीक अशी इच्छा आपल्याला दिसून येते. कदाचित् या पाठीमागे चित्राच्या निर्मितीत अस्सलपणाचा जो अभाव होता तो लपविण्याचा हेतू असावा. तिसरी गोष्ट म्हणजे प्रत्येक चित्राला अतिशय सुशोभित अशी किनारपट्टी देण्याची प्रथा सुरू झाली. त्याकाळी काढण्यात आलेले कोणतेही चित्र अशा तऱ्हेची किनारपट्टी असल्याखेरीज पुरे झाले असे समजण्यात येत नसे. पुष्कळवेळा अशा किनारपट्टीत अतिशय शोभिवंत अशा फुलांची नक्षी असे, परंतु इतर ठिकाणी आपल्याला या किनारपट्टीत पक्षी अथवा प्राणी यांच्या आकृत्या टाकलेल्या आढळतात. चौथी गोष्ट म्हणजे अशी चित्रे काढताना रंगसंगती आणि तपशील ही अधिक भडकपणे दाखविण्याची प्रवृत्ती अधिक प्रामुख्याने आपल्याला दिसून येते. त्याचप्रमाणे सोन्याचा अमर्यादपणे वापर झाला आपल्याला दिसून येते. अशा तऱ्हेने या चित्रातून चकाकीचे जे दर्शन आपल्याला मिळते त्या मधे समकालीन शिल्पकलेचे प्रतिबिंब आपल्याला दिसते.

**लेखन कला**

चित्रकलेबरोबरची लेखनाची जी जोडीची कला होती त्या कलेचीही मोठ्या परिश्रमपूर्वक वाढ करण्यात आली. चित्रकाराइतकाच अुत्तम लेखनिकांचाही सन्मान केला जात असे.[९८] त्याकाळची काही उत्कृष्ट हस्तलिखिते लेखनकला ही किती पारिभाषिक होती हे दाखवितात. एखादे हस्तलिखित

अर्थपूर्ण करण्यासाठी चित्रकाराच्या कौशल्याइतकेच लेखनिकांचे कौशल्य जरूर होते.

त्या काळच्या प्रमुख लेखनिकामधे महमद मुराद शीरीन कलम हा प्रमुख होता. मीर इमाम याचा शिष्य आकारशीदा हा अक्षरांची वर्तुळे काढण्यात निष्णात होता. मीर अबदुल्ला मुशकीन कलम याचे मुलगे मीर सालीह आणि महमद मोमीन हे आणखी प्रथितयश लेखनिकांमधे होते. हे दोघेजण कवि देखिल होते. सालीह हा फारशी आणि हिंदी या दोन्ही भाषांत रचना करीत असे आणि मोमीन हा फक्त फारशी भाषेमधे.[९९]

त्या काळच्या प्रमुख शिकीस्ता नवीसामधे कीफायत खान आणि जलाल उद्दीन युसूफ हे होते. ते दोघे महमद हुसेन खलफ याचे शिष्य होते.

**संगीत**

शहाजहानच्या आवडीच्या विषयांपैकी आणखी एक म्हणजे संगीत कला. या संगीत कलेला त्याने उदार आश्रय दिला आणि संगीताच्या अस्सल निर्मितीकडे त्याने जातीने लक्ष घातले. तसे बघितल्यास संगीताच्या पध्दतीत फारच थोडा बदल झालेला होता, कारण अकबराच्या दरबारातील सुप्रसिध्द गायक तानसेन याने संगीताची जी पध्दती रूढ केलेली होती तिच्यामधे सुधारणा करील अथवा तिच्यापासून वेगळी पध्दती निर्माण करील असा एकही गुणी गायक शहाजहानच्या दरबारी नव्हता. घुरपद हा शहाजहानचा अतिशय आवडता राग होता आणि हा राग अतिशय कुशलतेने पेश करणारा गायक म्हणजे लालखान गुनसमुद्र हा होता. लालखान हा तानसेन याचा जावई आणि त्याचा सर्वोत्तम शिष्य होता. शहाजहानच्या दरबारातील उत्कृष्ट हिंदू गायक जगन्नाथ हा होता. त्याच्यावर शहाजहान याची अतिशय मर्जी होती.[१००] त्याला महाकविराय ही पदवी होती. बादशहाच्या स्तुतीपर तो अनेकवार काव्य रचना करीत असे. त्या निमित्त त्याला बादशहाकडून भरपूर बक्षीसी मिळे.

त्याकाळी संगीतामधे ज्या वाद्यांचा उपयोग केला जात असे त्यांची यादी या ठिकाणी देणे शक्य नाही. परंतु ही वाद्ये वाजविणाऱ्या दोघांची नावे या ठिकाणी देणे उचित आहे. हे दोघेजण म्हणजे सुखसेन आणि सुरसेन. सुखसेन हा रूबाब(गितार) वाजविण्यात निष्णात होता आणि सुरसेन बीन वाजविण्यात.[१०१]

# तळटीपा

## प्रकरण दहावे

(१) हिंदुस्थानच्या संपत्तिच्या वृत्तान्तासाठीं पहा मॅन्डेलस्लो, पान ११८; मनुची खंड १, पान २०६; बर्नियर, पान २०२; मानरिक असे म्हणतो की हिंदुस्थानच्या प्रत्येक शहरामधून खजिने होते आणि तसा एक खजिना त्याने राज महाल येथे प्रत्यक्ष बघितला. खंड २, पान २७४; टॅव्हरनियर, खंड १, प्रकरणे ८ आणि १०; लाहोरी, खंड २, पाने ७१३–१४; महमद सादिक, पान १०८; Sarkar, Studies in Moghul India (pp. 16–20.) या ग्रंथात विश्वसनीय असा वृत्तान्त दिला आहे.

(२) Sarkar : Studies in Moghul India, p. 15.

(३) कजवीनी, लाहोरी यानी आणि चन्द्रभान याने आपल्या दुसऱ्या चमनमधे दैनंदिन कार्यक्रमाचे वर्णन दिलेले आहे. मनुचीने घुसलखान्यामधिल विचार विनिमयांचा उल्लेख केलेला आहे. खंड २, पाने ४६२–६३. बादशहाच्या दैनंदिन कार्यक्रमाचे वर्णन अनेक परदेशी प्रवाशांनी सर्वसामान्यपणे दिले आहे.

(४) ती एक प्रकारची बाहेरून पुढे येणारी खिडकी होती.

(५) अकबर आणि जहांगीर यांच्या कारकिर्दीत याला घुसलखाना असे संबोधले जाई परंतु शहाजहानने हे नाव बदलून दौलतखाना-इ-खास असे ठेविले. लाहोरी, खंड२, पान २२०.

(६) टॅव्हरनियर, खंड १, पाने १०५–९.

(७) वारिस, पाने १७–२३.

(८) शहा बुरूज येथे झालेल्या घडामोडीच्या आपल्या वृत्तान्तात कजविनी आपला स्वतःचा उल्लेख करतो, पान १४१.

(९) तिचा भाऊ तालिब याची तिच्यावर मनस्वी माया होती. आणि ती पर्शियाहून आग्रा येथे आली. Brown, History of Persian Literature (1500-1924), p. 255.

(१०) मनुचीने असे विधान केले आहे की दरबारात जे मौन पाळण्यात येई ते आश्चर्यकारक होते, आणि शिस्तीमधे कोणत्याही प्रकारचा गोंधळ नसे. खंड १, पान ९०.

(११) लाहोरी, खंड१, पाने११०–११२, अशा प्रकारच्या इतर हुकूमांमधे इलाही कॅलेन्डर ऐवजी हिजरीचा उपयोग करण्याच्या आज्ञेचा अंतर्भाव होता (लाहोरी, खंड १, पाने १२६–२९). अशाच प्रकारची आणखी एक आज्ञा म्हणजे बादशहाचे छायाचित्र शिरस्त्राणामधे वापरण्यास घालण्यांत आलेली बंदी ही होय (महमद सादिक, पान ७).

(१२) चार तसलीम ही एक मुजरा करण्याची पध्दति होती आणि त्यामधे मुजरा करणारा वाकत असे आणि आपल्या कपाळाला, डोळयांना आणि बाहूंना स्पर्श करीत असे.

(१३) मॅन्डेलस्लो पान ११८.

(१४) बर्नियर, पाने २६८–६९; मनुची, खंड२, पाने ३४८–४९; मॅनरिक, खंड २, पाने २००–४; टॅव्हर्नियअर, खंड १, पाने ३७९–८१.

(१५) लाहोरी, खंड १, भाग २, पाने ७८–८१; बर्नियर असे सांगतो की हे मोर एका कसबी फरेंच कारागिराने बनविले होते, पान २६९; Description of seven thrones by Tavernier, Vol. I pp. 381–87; मॅनरिक, खंड, २ पाने१९८–९९.

(१६) महमद सादिक याने आपल्या तबकात इ-शहाजहानी या ग्रंथात मीर शम्सुद्दीन अली खिलजानी याची नेमणूक आग्रा येथिल एका शाळेत शहाजहानने केल्याचा उल्लेख केला आहे (पान ३२०); पुन्हा हाफिज महमद खियाली याच्याबद्दल लिहिताना तो म्हणतो की दिल्ली येथिल शाळेचा तो एक थोर उलेमा होता, (पान ३२४); शिवाय पहा पान २९५, पान २९४.

(१७) महमद सादिक याने तबकात, पान २९६ वर जो वृत्तान्त दिला आहे त्याला पुष्टी डेल्ला व्हॅल्ले याने एका खेडयातील शाळेचा जो वृत्तान्त दिला आहे त्यावरून मिळते, पाने २२७-२८; Proceedings of the Indian Historical Records Commission, 1923 मधील Education and Literature among the Moghuls, या आपल्या लेखांत डा. बेनी प्रसाद यांनी काढलेले उद्‌गार याबाबत नमूद करण्यासारखे आहेत, पान ४८.

(१८) लाहोर येथे खूप मोठ्या संख्येने विद्वान मंडळी होती असे मनूची म्हणतो. खंड २, पान ४२४.

(१९) लाहोरी, खंड१, भाग२, पान ५५.

(२०) पहा ऐन, पाने २०१–०२,.

(२१) आपल्या तिसऱ्या चमनमधे लाहोर येथिल साहित्यिक घडामोडींची माहिती चन्द्रभान याने दिली आहे.

(२२) हिंदुस्थानांत मोगलांच्या अमलाखालील प्रदेशांत हिंदुस्थानीबोली पेक्षा देखिल कदाचित् पर्शियन बोलीचा अधिक उपयोग केला जातो यात आश्चर्य करण्यासारखे काही आहे असे वाटण्याचे काही कारण नाहीं, असे विधान डेल्ला व्हॅल्ले याने केले आहे, पान ९६.

(२३) सालिह, पान ७०२ ब; मासिर-उल्-उमरा, खंड १, पाने ४०५–०८;

(२४) तबकात, पान३२२; सालिह, पाने ६९८; Rieu, p. 687; Brown (1500-1924) pp. 258-51; शिबली, भाग ३, पाने १८५–२०८,.

(२५) तबकात, पान३२४ब; सालिह, पाने ६९६–९७; Rieu, p.684.

(२६) Rieu, Or 1852,p. 1001.

(२७) Rieu, Or 292; Brown (1500-1924), pp. 265-76.

(२८) सालिह, पान ७०३; Rieu, p. 738.

(२९) सालिह, पान ६९५; I. O. L. No. 1572.

(३०) सालिह, पान ७०४.

(३१) तबकात, पाने ३२४–३२५.

(३२) सालिह, पान ७१०.

(३३) तबकात, पान ३२२; सालिह ६९८–९९.

(३४) चौथ्या चमनमधे चन्द्रभान याने आपल्या जीवनाचा वृत्तान्त दिला आहे. B. M. Add. 16863; सालिह, पान ७०७.

(३५) तबकात, पान ३२१; सालिह, पान ७१०.

(३६) तबकात, पान३२७ ब.

(३७) तबकात, पान ३२७ ब.

(३८) सालिह, पान ७०५ ब.

(३९) या ग्रंथाचा कर्ता जलालुद्दीन तबातबाई हा होता. See Beni Prasad n. 18, p. 317.

(४०) जयसिंग याची अनेक पत्रे जामिउल् इन्शामधे उधृत केली आहेत. B. M. Or 1702.

(४१) तबकात, पान ३१७, सालिह, पान ६९१ ब–६९२ आणि पान ७०८.

(४२) सालिह, पान ६९२ आणि पान ७०८.

(४३) सालिह, पान ६९३ ब आणि पान ७०८.

(४४) सालिह, पाने ६८९ ब–६९० आणि पान ७०९.

(४५) सालिह, पान ७१०.

(४६) M. U. Vol. I, pp, 587:90

(४७) Rieu, Add. 16852.

(४८) Rieu, pp. 178-79

(४९) ,, ,,

(५०) ,, Add. 5555, Add. 5556; Add. 5554 I. O. L. No 2226.

(५१) Farquhar : Outline of Religious Literature of India, p. 287; Rieu, Add. 18404, I. O. L. No. 1949 and 1972.

(५२) I. O. L. No. 1945

(५३) I. O. L. No. 1995

(५४) Rieu, or. 224.

(५५) ,, Add. 16670

(५६) मनुची खंड २, पाने ३५५–५६. मनुचीने वैद्यकशास्त्रज्ञांच्या नावाची यादी दिली आहे.

(५७) सालिह, पान ६९५ ब; M. U., Vol. III, pp. 933-36.

(५८) सालिह, पान ६९५ ब–६९६.

(५९) सालिह, पान ६९५.

(६०) M. W., pp. 577-79.

(६१) लाहोरी, खंड १, पान ३१६.

(६२) तबकात, पान ३२०ब; Rieu. Or 372, I. O. L. No. 2254

(६३) Rieu, Add. 16769.

(६४) ,, Add. 16869.

(६५) सालिह, पान ६९४.

(६६) सालिह, पान ६९४ ब.

(६७) तबकात, पान ३२०.

(६८) तबकात, पान ३१९.

(६९) तबकात, पान ३२०.

(७०) सालिह, पान ६९३ ब.

(७१) तबकात, पान ३१८ ब.

(७२) सालिह, पान ६८६.

(७३) तबकात, पान ३१४.

(७४) सालिह, पान ६८१ ब–८२.

(७५) तबकात, पान १३३ ब; सालिह, पाने ६८३–८४.

(७६) तबकात, पाने ३०८-११, सालिह, पान ६९१ ब.

(७७) Mishra Bandhu Vinod, Vol. II, pp. 454-55; Hindi Shabd Sagar, Vol, II, Epilogue, p. 129.

(७८) Mishra Bandhu Vinod, Vol II, pp. 457-59; Hindi Shabd Sagar, Vol. II, Epilogue, p. 133.

(७९) Mishra Bandhu Vinod, Vol. II pp. 453-54.

(८०) History of Urdu Literature या आपल्या ग्रंथात रामबाबू सक्सेना यांनी उर्दूच्या विकासाबद्दल केलेली चर्चा, पान १२ पहा.

(८१) Fergusson : History of Indian & Eastern Architecture, p. 286; V. Smith : History of Fine Arts, p. 172 and p. 180.

(८२) Havell : Indian Architecture, Chapter VI.

(८३) इमारत खात्याचा प्रमुख एक अधिकारी होता आणि त्याचा हुद्दा दारोगा-इ-इमारत असा होता. मक्रमत खान काही-काळपर्यंत या जागेवर होता.

(८४) आग्रा किल्ल्याचे सय्यद महमद लतीफ याने आपल्या Agra Historical and Descriptive या पुस्तकात केलेले वर्णन पहा, पाने ७४-७९

(८५) Agra, Historical and Descriptive, p. 82.

(८६) ,, p. 86.

(८७) ,, pp. 90-94; Fergusson, pp. 317-18.

(८८) लाहोरी, खंड १, भाग २, पान २५२; Fergusson, pp. 318-20; लतीफ, पाने १८४–८८; कजवीनी, पान ४०६.

(८९) Havell : Indian Architecture, p. 29.

(९०) See Havell : Indian Architecture, Chapter II, Lalif pp. 100-123; Fergusson, pp. 315-17; V. Smith, pp. 181-82.

(९१) Sleeman : Rambles and Recollections, Vol. I. p. 385.

(९२) V. Smith : History of Fine Arts, pp. 183-85.

(९३) E. D. Havell : Indian Architecture, pp. 33-39; Sir John Marshall : Archaeological Survey of India Report (1904-05), pp. 1-3.

(९४) वारिसने वर्णन केलेली दिल्लीमधिल स्थळे पान १६ आणि पाने १७–२३; Fergusson, pp. 309-12; Archaeological Survey of India Report (1911-12), pp 1-27.

(९५) वारिस, पान २३.

(९६) Fergusson, pp. 318.20; वारिस, पाने ५१३ ब–१५. (Add. 6556).

(९७) Percy Brown : Indian Painting under the Moghuls p. 7.

(९८) पहा V. Smith's remarks on Calligraphy. History of Fine Arts, pp. 208-07. Chandra Bhan says that Shah Jahan was a Connoisseur of Calligraphy : Char-Chaman pp. 336.

(९९) सालिह पाने (Add. 6557) Chandra Bhan gives the following other names of calligraphis ts : Yaqut, sarfi, Mulla Mir Ali, Slutan Ali Mir Imad Mulla Darvish, Md. Khan, Md. Hussain.

(१००) लाहोरी, खंड १, भाग २, पान ५६; कजवीनी पाने ३२९ ब-३३१.

(१०१) वारिस, पान ७०; डेल्ला व्हॅल्ले याने दिलेले बीन या वाद्याचे वर्णन पहा पान ११७–१८.

प्रकरण ११ वे

# राज्यकारभाराची काही अंगे

**मोगल सम्राटाचे स्थान**

शहाजहानच्या साम्राज्याची उभारणी ही अति विस्तृत पध्दतिच्या शासनयंत्रणेवर झालेली होती. ह्या शासन यंत्रणेच्या अंगोपांगांत आणि अकबराने पूर्णत्वाला नेलेल्या शासनयंत्रणेत म्हणण्यासारखी तफावत अशी फारच थोडी होती. संपूर्ण शासन यंत्रणेच्या गतीमानतेचा उगम हा बादशहापासून होता. बादशहाचे ऐहिक बाबींबाबत सर्वाधिकाराचे स्थान होते इतकेच नव्हे तर त्याच्या हाती असलेल्या सत्तेच्या पाठीशी मुसलमान धर्माची तत्वप्रणाली खडी उभी होती. बादशहा हा पृथ्वीवरील परमेश्वराची छाया आहे असे मानले जात असे[१] आणि म्हणून त्याच्या आज्ञांचे पालन कोणताही प्रतिरोध न करता करणे हे प्रत्येकजण आपले कर्तव्य मानीत असे. शासन यंत्रणे बाबतच्या संपूर्ण कायदेकानूंचा उगम हा बादशहापासून आहे अशी सर्वसामान्य भावना होती आणि जर का धर्म विषयक मतभेदांच्या बाबतीत त्याने दिलेला निर्णय हा शरीत[२] बरोबर विसंगत नसेल तर तो अंतीम निर्णय म्हणून मानला जाई. अशा तऱ्हेने सिध्दान्तापुरते बोलावयाचे झाल्यास त्याची सत्ता अनियंत्रित होती.

**बादशहाच्या अनियंत्रितत्वावर रूढीतून निर्माण होणाऱ्या कायद्याचा असलेला पगडा**

परंतु प्रत्यक्षात मात्र वरवर दिसणारे हे अनियंत्रितत्व अनेक तऱ्हेच्या बंधनांनी जखडून टाकलेले होते. सैन्याच्या बळावर बादशहा आपली इच्छा प्रजेवर लादू शकत असे हे खरे होते, परंतु सर्वकाळ आणि सर्व प्रसंगी हे शक्य होत नसे. आमचा सम्राट हा तत्कालिन लोकमताची[3] नाडी काय आहे हे जाणून घेण्याविषयी अतिशय उत्सुक असे हे विधान करून अबूल फजल याने बादशहाच्या सत्तेवर किती बंधने होती हे गर्भितपणे सूचित केले आहे. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे झाल्यास असे म्हणता येईल की बादशहाची इच्छाशक्ती ही जरी बंधनमुक्त असली तरी त्याला रूढीमधून निर्माण झालेल्या कायद्याला योग्य तो आदरभाव दाखवावा लागे कारण अर्वाचीन युगात लिखित कायद्याचे अंगी जे सामर्थ्य आहे ते मध्ययुगीन कालखंडात परंपरागत कायद्याला होते.

**लिखित कायद्याचा अभाव**

मोगल कालखंडात लिखित कायद्याचा असलेला अभाव ही गोष्ट आपल्याला चमत्कारीक वाटते इतकेच नव्हे तर त्यावरून आपल्याला अशीही कल्पना करावीशी वाटते की त्या काळांत मोगल सम्राटाने आपल्या इच्छाशक्तिचा मनमानेल त्या पध्दतिने उपयोग केला असला पाहिजे. या अनुमानाला समकालीन युरोपियन प्रवाशांनी आपले जे अनुभव निवेदन केलेले आहेत त्यांच्या बळावर भरघोस पुष्टी मिळते. परंतु त्यांनी जी बाजू मांडली आहे ती गृहीत धरण्याचे अगोदर आपण दोन महत्वाच्या गोष्टी आपल्या ध्यानांत ठेवणे जरूर आहे. पहिली गोष्ट म्हणजे जर का मोगल सम्राटाच्या इच्छाशक्तिचा नेहमी मनमानेल तसा उपयोग केला गेला असला तर मोगल शासनव्यवस्था इतका काळ टिकून राहूच शकली नसती. आतापेक्षा त्याकाळी लोकमानसाची प्रतिकारशक्ति ही अधिक सामर्थ्यशाली होती; आणि राज्याचा सेनासंभार आणि सर्वसामान्य जनता यांच्यामधे जवळजवळ फरक असा काही नव्हताच. दुसरी गोष्ट म्हणजे बहुतेक युरोपियन प्रवाशाना अगदी तुटपुंजा पुराव्याच्या आधारे अनुमानाप्रत येण्याची सवय होती आणि पुष्कळ वेळा प्रत्यक्ष वस्तुस्थितीत ज्याचा अभाव असे त्याची उणीव आपल्या कल्पनाशक्तितून त्या गोष्टी निर्माण करून ते भरून काढीत. आणि त्यामुळे थोड्याथोडक्या वेळा नाही तर पुष्कळदा असा प्रसंग येई की आपल्या निवेदनाच्या भरांत आपणच सांगितलेल्या गोष्टी ते खोडून काढीत.[4] सारांश त्यांनी केलेली विधाने मोठ्या काळजीपूर्वकच ग्राह्य समजली पाहिजेत.

### मोगल शासन हे निव्वळ कागदी शासन आहे

मोगल शासनयंत्रणा ही मूलतः कागदोपत्रीची शासनयंत्रणा होती.[१] शासन यंत्रणेच्या प्रत्येक बारीक सारीक गोष्टींची नोंद अतिशय काटेकोरपणे आणि सूक्ष्मपणे एकाच ठिकाणी नव्हे तर अनेक ठिकाणी केली जात असे. या नोंदी अनेक जणांच्या हातामधून गेल्या आणि त्या सर्वसाधारणपणे बिनचूक आहेत. अशा परिस्थितीत या नोंदींनी लिखित कायद्याची उणीव भरून काढली असे विधान जर आपण केले तर ते फारसे वावगे ठरणार नाही. या नोंदींत पूर्वीचे दाखले अंतर्भूत होते आणि जरी या नोंदीचा सुत्रबध्द अस कायद्याच्या स्वरूपात क्रमवार संग्रह करण्यात आलेला नव्हता तरी देखील या नोंदींची अनेक गुंतागुंतीची प्रकरणे सोडविण्याचे कामी मदत झाली असली पाहिजे यात काहीच शंका नाही. तसे पाहिले तर लिखित कायद्याचा अभाव हे एक प्रकारे वरदानच होते कारण त्यामुळे लाचखाऊ वकिलांच्या पिळवणुकीपासून खटलेकऱ्यांचा बचाव झाला आणि अतिशय जलद न्याय प्राप्त करून घेणे त्याला शक्य झाले.[१] त्या शिवाय काटेकोर आणि कडक अशा नियमांचे बंधन नसल्यामुळे न्यायाधिशांना आपली मुखत्यारी आणि बुध्दीमत्ता यांचा भरपूर प्रमाणात उपयोग करून घेण्याची संधी मिळत असे.

### मोगल हुकुमशाहीच्या स्वरूपाचे विवरण

मोगल हुकूमशाहीच्या स्वरूपाचे विवरण करताना आपल्या असे नजरेस येते की आपल्या प्रजेच्या स्वाथ्याविषयी मोगल सम्राटाच्या मनात एक प्रकारची जी सखोल अनुभूती वसत होती हे त्या हुकूमशाहीचे वैशिष्ठ्य होते. सारांश खिलजी आणि तुघलक हुकुमशाह्यांपेक्षा मोगल हुकूमशाही ही प्रागतिक स्वरूपाची होती. खिलजी आणि तुघलक हुकूमशाह्यांमधे लोकांच्या हितसंबंधांकडे फारच थोडे लक्ष दिले जात असे आणि त्याबाबत त्यांनी दाखविलेली उदासिनता ही त्यांच्या साम्राज्यांचा जो झपाट्याने ऱ्हास झाला त्याच्या अनेक कारणांपैकी एक प्रमुख कारण होती. त्याशिवाय मोगल सम्राटांनी त्यांच्या अधिसत्तेला मान्यता मिळावी म्हणून हिंदुस्थानच्या बाहेरील सत्तांकडून कधीच अपेक्षा केली नाही आणि त्यांच्याबाबत अतिरिक्त प्रादेशिक लागेबांधेही फारसे नव्हते. हिंदुस्थानच्या भूमिमधे त्यांच्या साम्राज्याची पाळेमुळे जी इतकी खोलवर रूजली गेली त्याच्या प्रमुख कारणांपैकी हे एक कारण होते.

### मोगल शासनाचे उद्दीष्ट

मोगल शासनाचे उद्दीष्ट आणि स्वरूप काय होते याबद्दल विभिन्न मते आहेत. सरकारांच्या मते हे उद्दीष्ट आधिभौतिकवादी, किंबहुना जवळ-जवळ क्षुद्रतेचे निदर्शक असे होते;[७] मूरलँड याने असे विधान केलेले आहे की मोगल शासनाचे उद्दीष्ट महसूल जमा करणे आणि पुरेसे सैन्य विभाग जवळ बाळगणे एवढेच होते;[८] आणि डॉ. बेनीप्रसाद यानी असे सुचीत केले आहे की मोगल शासनाचे स्वरुप हे तत्वत: सांस्कृतिक होते आणि सामान्य अथवा सर्वसाधारण प्रजेची इच्छा शासनाकडून विचारात घेतली जाई.[९] शांततामय जीवन जगणे शक्य होईल अशा तऱ्हेची परिस्थिती मोगल शासनाने निर्माण केली होती ही वस्तुस्थिती आपल्याला नाकरता येणार नाही आणि म्हणून मोगल शासनाचे वर्णन 'अभिजात हुकुमशाही' असे केले तरी चालण्यासारखे आहे. मोगल शासनाचे हे जे प्रमुख अंग होते त्यावरूनच टॅव्हर्निअर[१०] याने असे उद्‌गार काढले की शहाजहान याने आपल्या लोकांवर जे राज्य केले ते एखादा बादशहा आपल्या प्रजाजनांवर करतो तसे नसून एखादा पिता कुटुंबिय मंडळीवर करतो त्याप्रमाणे होते.

### इतिहासकारांकडून केली जाणारी सर्वसामान्य चूक

काही अर्वाचीन इतिहासकारांनी जी एक चूक केली आहे ती म्हणजे तत्वत: मध्ययुगीन कालखंडात मोडणाऱ्या मोगल शासनाची आणि आधुनिक राज्यकारभाराची पध्दती यामधे केलेली तुलना. साहजिकच ते ज्या अनुमानां- प्रत येऊन पोहोचतात ती निश्चितच मोगल शासनाला अनुकुल नसतात.[११] परंतु अशा तऱ्हेची अनुमाने ही चुकीची आहेत कारण ती काढताना ज्या अनेक संस्थांचे अस्तित्व आपण आपल्या संस्कृतीचा विचार करताना गृहीत धरतो परंतु ज्या संस्थांचा मध्ययुगीन कालखंडात अभाव होता, आणि ज्या बद्दल तत्कालीन राज्यकर्त्यांना कोणत्याही तऱ्हेचा दोष देता येणार नाही, या गोष्टी आपण विचारात घेत नाही. त्याचप्रमाणे आणखी एक गोष्ट आपण नेहमी लक्षात ठेवली पाहिजे आणि ती ही की १७ व्या शतकापासून आता- पर्यंत आपल्या प्रजेबाबत राज्याची कर्तव्ये आणि कामे काय असावीत या बाबतच्या राजकीय विचार प्रणालीत बराचसा बदल घडून आलेला आहे.

### बादशहा आणि त्याचे मंत्री

अशा तऱ्हेने साम्राज्याचा विस्तार, ज्याला आपण दळणवळणाची जलद साधने म्हणतो त्याचा अभाव, आणि शासनाच्या इतर नाना प्रकारच्या

समस्या या सर्व गोष्टींचा मोगल हुकुमशाहीच्या तात्विक भूमिकेवर प्रभाव पडला. बादशहाच्या हाती शासनाच्या धोरणाची मुख्य सुत्रे होती परंतु या धोरणाचे बारीक-सारीक तपशील त्याला जबाबदार असलेले त्याचे अधिकारी अमलात आणीत. तत्वत: हे अधिकारी त्याचे नोकर होते परंतु प्रत्यक्षात मात्र ते त्याचे सल्लागार होते. वस्तुस्थिती अशी होती की आपल्या अधिकाऱ्यांकडून सल्ला मागणे आणि हा सल्ला स्वीकारणे अथवा नापसंत करणे हे बादशहाच्या मर्जीवर अवलंबून होते. परंतु सर्वसाधारणपणे शासनाने स्वीकृत केलेल्या धोरणावर जर परिणाम होणार नसेल तर बादशहा हा सल्ला मानीत असे. आपापल्या खात्यांबाबत सरकारी अधिकाऱ्यांना पुष्कळ अंशी स्वातंत्र्य होते याबाबत काहीच शंका नाही. मोगल शासनाच्या प्रशासकीय यंत्रणेची चर्चा तीन स्वतंत्र शीर्षकांखाली करता येईल अ) केंद्रीय, ब) प्रांतिक आणि क) स्थानिक. या ठिकाणी सुरवातीलाच एक गोष्ट नमूद केली पाहिजे आणि ती म्हणजे मोगल शासनाची पहिली दोन अंगे ही तिसऱ्या अंगापेक्षा अधिक व्यवस्थित रितीने संघटित करण्यात आलेली होती.

**वकील**

केंद्रीय शासनामधे किंबहुना सबंध राज्यामधे सर्वोच्च अधिकारी वकील हा होता[१२]. राज्यकारभाराच्या तो प्रत्यक्षात मुख्य पदावर होता, कोणत्याही अधिकाऱ्याला तो नेमू शकत असे आणि बडतर्फ करू शकत असे आणि बादशहा त्याच्याशी वारंवार सल्ला मसलत करीत असे. शहाजहान याने आसफखान याला आपला वकील म्हणून नेमले आणि आपल्या सम्राज्ञीच्या शिफारसीनुसार त्याच्याकडे मुहरउजक[१३] अथवा बादशाही शिक्का सोपविला.

**वकिलांच्या अधिकारांची व्याप्ती**

घरगुती खाते आणि त्याचप्रमाणे सामान्य प्रशासन विभागावर वकिलाची हुकमत चाले. पुढील अधिकारी त्याला प्रत्यक्ष रितीने जबाबदार होते:–

**मीर माल**

जमीन सोडून बादशहाच्या सर्व खाजगी मालमत्तेची देखभाल करण्याचे काम मीर माल[१४] याच्याकडे असे.

**मीर अर्ज**

अर्जदार अथवा अनेक खात्याचे अधिकारी यांचा बादशहाबरोबर परिचय करून देण्याचे काम मीर अर्ज[१५] करीत असे.

### कोरबेगी

बादशाही निशाणांचा ताबा कोरबेगी[१६] याच्याकडे होता.

### मीर तुजुक

दरबारी शिष्टाचार समारंभाची योजना मीर तुजुक[१७] हा करीत असे. शहाजहान याने मीर तुजुक या अधिकाऱ्यांची संख्या वाढवून चार केली.[१८] कारण ह्या अधिकाराशी संलग्न इतकी कामे होती की ती एका अधिकाऱ्याकडून पार पडणे अशक्य होते.

### मीर बार

शाही जंगलाचा ताबा मीर बार[१९] ह्याच्याकडे होता.

### मीर बहर

बंदरे आणि जलमार्ग यांचा ताबा मीर बहर[२०] याच्याकडे होता आणि तो बादशाही उपयोगासाठी असलेल्या नावांची देखभाल करीत असे.

### मीर मंजिल

शाही छावणीची व्यवस्था मीर मंजिल[२१] हा करीत असे.

### खान सालार

शाही मुदपाकखान्याचा खान सालार[२२] हा मुख्याधिकारी होता.

### मीर मुन्शी

मीर मुन्शी[२३] हा बादशहाचा मुख्य सचीव होता. सर्वसाधारणपणे मीर मुन्शी ही व्यक्ती साहित्य क्षेत्रात गुणवत्ता संपादन केलेली असे. शाही पत्रव्यवहाराचा कच्चा मजकूर तो तयार करी आणि कधी-कधी बादशहाने सांगितलेले तो लिहून घेत असे. शहाजहान याच्या कारकीर्दीच्या अखेरीला चंद्रभान हा त्याचा फर्मान नवीस होता.[२४]

### अख्त बेगी

अख्त बेगी[२५] हा घोड्यांची पैदास करणाऱ्या खात्याचा प्रमुख होता.

## खुश बेगी

खुश बेग़ी[26] हा क्रीडा खात्याचा प्रमुख होता.

## दिवाण-इ-तन् आणि दिवाण-इ-खालसा

वकीलाच्या खालोखालचा अतिशय सत्तावान अधिकारी म्हणजे दिवाण हा होता. याला वजीर[27] अथवा दिवाण-इ-कुल असेही म्हणत. अर्थविभागाचे प्रमुख पद त्याच्याकडे कायमचे असे. प्रशासनाच्या सर्व विभागांचे काम सुरळीत-पणे चालले आहे हे बघण्याची त्याची जबाबदारी होती आणि प्रत्येक महत्वाच्या सरकारी कागदपत्रांवर तो सही करीत असे. त्याला मदत करण्यासाठी म्हणून दोन दुय्यम दिवाण होते. त्यापैकी एकाला दिवाण-इ-तन्[28] असे म्हणत. जहागीरींची देखभाल तो करीत असे. दुसऱ्याला दिवाण-इ-खालसा[29] असे म्हणत. तो शाही जमिनजुमल्याचा कारभार बघत असे. पुढील अधिकारी हे वजीराला जबाबदार होते.

## मुस्तौफी

मुस्तौफी[30] हा साम्राज्याच्या आय आणि व्यय यांची देखभाल करीत असे. खर्चाच्या बाबी कमी करण्याचे अधिकार त्याला दिलेले होते. महसूल खात्या-संबंधीच्या सर्व कागदपत्रांवर तो सही करी.

## साहिब-इ-तौजी

साहिब-इ-तौजी[31] अथवा बक्षी हा फक्त राजधानीतील नोकर वर्गाच्या पगार वाटपाबद्दल जबाबदार होता. गवंडी आणि कारागिर यांच्या वेतन देयकांवर प्रथम याची सही होत असे आणि नंतर ती मुस्तौफी याच्याकडे पाठ-विली जात.

## अवारज नवीस

अवारज नवीस[32] हा दैनंदिन आय आणि व्यय यांचा हिशेब ठेवीत असे.

## मीर सामान

मीर सामान[33] याच्याकडे राज्याच्या सामान-सुमानाचा ताबा होता. ही जागा अतिशय जबाबदारीची होती आणि त्या जागेवर फक्त विश्वासू आणि लायक माणसांची नेमणूक होत असे. अफजलखान, सादुल्लाखान, फाझिलखान,

ज्यांना पुढे वजिरी मिळाली, त्यांना बढती मिळण्याचे अगोदर त्यांनी मीर सामान हे पद विभूषीत केले होते.[३४]

### मुश्रीफ

मुश्रीफ[३५] हा महसुल खात्याचा वरिष्ठ कारकून होता आणि खजांची हा खजिनदार होता.

### वाकिआ नवीस

वाकिआ नवीस[३६] याच्याकडे सर्व महत्वाचे हुकूम आणि घटना यांची नोंद करण्याचे काम असे आणि तो राज्याच्या दप्तराची देखभाल करी.

### सद्र

केंद्रीय शासनामधे आणखी अनेक अधिकाऱ्यांचा समावेश होता. यामधे सद्र-इ-सुदूर[३७] अथवा धर्मोपदेशकांचा मुख्य अधिकारी याचे स्थान अतिशय महत्वाचे होते. तो दानधर्माबाबत देखरेख करणाऱ्या खात्याचा प्रमुख होता आणि विद्वान व धर्मोपदेशक यांची तो बादशहाबरोबर रूजवात करून देई. शहाजहान याच्या कारकीर्दीच्या पहिल्या पंधरा वर्षापर्यंत सद्र हे अधिकार पद मूसवीखान याच्याकडे होते. इ. स. १६४२ मधे त्याची वागणूक असमाधानकारक वाटल्या-मुळे त्याला बडतर्फ करण्यात आले, आणि त्याच्या जागी सय्यद जलाल गुज-राती याची नेमणूक करण्यात आली.[३९]

### मीर बक्षी

परंतु सद्रपेक्षा अधिक महत्वाचा अधिकारी मीरबक्षी[४०] हा होता. वजन आणि सत्ता याबाबत योग्यतेने तो दिवाण अथवा वकील यांच्या केवळ खालो-खाल होता. तो लष्करी खात्याचा प्रमुख होता आणि शिपायांची भरती, सैन्याची पहाणी आणि लष्कराशी संबधित असलेल्या अशाच प्रकारच्या इतर बाबींवर तो देखरेख करीत असे. त्याला मदत करण्यासाठी दुय्यम बक्षी हा असे आणि याला दुसरा बक्षी असे म्हणत. जेव्हा लष्करी तुकड्यांची रवानगी रणां-गणावर होत असे तेव्हा प्रत्येक तुकडी साठी वेगळया बक्षींची नेमणूक केली[४१] जाई. हे बक्षी बहुधा मुख्य अथवा मीर बक्षी याला व्यक्तिशः जबाबदार असत.

### दारोगा-इ-घुसलखाना

दारोगा–इ–घुसलखाना[४२] ही अधिकाराची जागा फक्त जबाबदार आणि विश्वासू व्यक्तिनाच दिली जाई. या जागेवर ज्या व्यक्तिची नेमणूक होई

त्या व्यक्तिच्या अंगी धाडस, योग्य अयोग्य काय आहे ते समजण्याची कुवत आणि जागरुकता यांची आवश्यकता असे. कारण ज्या दिवाण-इ-खास मधे अतिशय महत्त्वाच्या आणि गुप्त अशा गोष्टींची चर्चा होत असे त्या ठिकाणी अनिष्ट अथवा नको असलेल्या व्यक्तीना प्रवेश मिळणार नाही हे बघण्याचे ह्या अधिकाऱ्याचे काम असे.

**काजी-उल्-कुजात**

काजी-उल्-कुजात[४४] अथवा मुख्य काजी हा न्याय खात्याचा प्रमुख होता. प्रांतिक न्यायालयांकडून आलेल्या खटल्यांच्या सुनावण्या ऐकणे आणि न्यायदानाच्या कामात बादशहाला मदत करणे ही त्याची कामे होती. ह्या जागेवर महमद अस्लाम[४५] हा बऱ्याच काळपर्यंत होता. त्याच्यानंतर काजी खुशहाल[४६] हा त्या जागी आला तेव्हा शहाजहान याच्या कारकीर्दीचे २३ वे वर्ष होते.

**दारोगा-इ-किताबखाना**

दारोगा-इ-किताबखाना[४७] हा मुख्य ग्रंथपाल होता. बादशाही ग्रंथालयात अतिशय उत्कृष्ट बांधणी असलेली २४,००० हस्तलिखिते असल्याचा उल्लेख मॅन्डेलस्लो करतो.[४८]

**दारोगा-इ-जरगरखाना**

दारोगा–इ–जरगरखाना[४९] हा शाही जवाहीरखात्याचा प्रमुख होता. या जागेवर जहांगीरच्या कारकीर्दीपासून सईदाई गीलानी हा होता.[५०] त्याच्यानंतर या जागेवर मीर सालीह आणि महमद शरीफ यांच्या नेमणुका झाल्या.[५१]

**मीर अदल आणि दारोगा-इ-दाग-इ-ताशीह**

छावणीचा मीर अदल[५२] आणि दारोगा-इ-दाग-इ-ताशीह हे देखील महत्त्वाचे अधिकारी होते.[५३]

**कोतवाल**

कोतवालाचा[५४] उल्लेख अनेक युरोपीयन प्रवाश्यांनी केलेला आहे. कोतवाल हा राजधानीचे ठिकाणी आणि प्रमुख शहरी असे. मॅन्डेलस्लो असे सांगतो की त्याचा समावेश बादशहाच्या खाजगी सल्लागार मंडळामधे होत असे.[५५] त्याच्या कामाचे स्वरूप विविध प्रकारचे होते. हल्लीच्या काळातील पोलीस-महानिरीक्षक आणि न्यायाधिश या दोघांचा समन्वय कोतवालामधे साधलेला

होता. राज्यामधे गुन्हेगार व्यक्तिवर तो नजर ठेवून असे आणि त्याच्या अधिकारातील प्रदेशात तो शांतता आणि सुव्यवस्था राखी. गुप्त बातम्या मिळविण्यासाठी तो हलालखोर अथवा झाडूवाले यांची योजना करीत असल्याचे मनुची सांगतो.[५६]

## साम्राज्याचे सुभे

साऱ्या मोगल साम्राज्याची विभागणी २२ सुभे[५७] अथवा प्रांत यांच्यामधे करण्यात आलेली होती. प्रत्येक सुभ्यावर सुभेदार अथवा सिपाहसालार हा अधिकारी असे. यापैकी बादशहाच्या गैरहजेरीत फक्त दिल्ली आणि आग्रा या सुभ्यांवर सुभेदारांची नेमणूक होत असे.[५८] कंदहारचा सुभा पर्शियनांनी परत जिंकून घेतला. बाल्ख आणि बदक्शान हे सुभे फारच थोडाकाळ साम्राज्यात राहिले. दक्षिणेतील चार सुभे काही-काही वेळा एकाच अधिकाऱ्याच्या हाताखाली दिले जात.[५९] इतर सुभ्यांचा राज्यकारभार सुभेदारांकडून केला जाई. अवधचा सुभा वगळता[६०] आपल्याला साम्राज्यामधील सुभेदारांच्या नेमणुका आणि एका सुभ्यातून दुसऱ्या सुभ्यात झालेल्या बदल्या यांचा एकत्रित असलेला वृत्तांत आपल्याला मिळतो. अवधचा सुभेदार म्हणून मिर्जा खानाच्या जागी इतीकादखान याची नेमणूक झाल्याचा उल्लेख बादशहाच्या कारकीर्दीच्या २२ व्या वर्षी आपल्याला मिळतो.

## प्रांतिक सुभेदार

ज्यांच्या अंगात कायद्याची अंमलबजावणी करण्याची कुवत आहे अशा कार्यक्षम लष्करी अधिकाऱ्यांमधून प्रांतिक सुभेदारांची[६१] निवड होत असे. अशा व्यक्ति चारित्र्य आणि प्रामाणिकपणा यांनी संपन्न असाव्या अशी सर्वसाधारण अपेक्षा असे. प्रांतिक सुभेदार हे नालायक अथवा दुर्गुणी असल्यास शहाजहानला ते कधीही सहन होत नसे. जर का अशा सुभेदारांचे वर्तन असमाधानकारक असल्यास किंवा त्यांच्याबद्दल दरबाराकडे तक्रारी आल्यास जरी हे सुभेदार त्याच्या आवडत्या अधिकाऱ्यांपैकी असले तरी त्यांना कामावरून दूर करण्यास तो अनमान करीत नसे. आजम खान आणि शायस्ताखान[६२] यांना त्याने त्यांच्या नालायकीमुळे गुजराथच्या सुभेदारीवरून बडतर्फ केले. त्याच प्रमाणे लोकांनी तक्रारी केल्यामुळे त्याने तरबीयत खानाला काश्मीरच्या[६३] सुभेदारीवरून दूर केले. या उलट काश्मीरच्या रहिवाश्यांना जफरखान याच्याबद्दल आवड निर्माण झाल्यामुळे त्याने त्याची नेमणूक काश्मीरचा सुभेदार म्हणून केली.[६४]

सुभेदाराची बडतर्फी केल्याचे आणखी एक उदाहरण वजीर खानाचे होते. जुलूम जबरदस्ती केल्याच्या आरोपावरून त्याला पंजाबच्या सुभ्यावरून काढण्यात आले.[६५]

## सुभेदाराच्या सेवेची मुदत

प्रांतिक सुभेदारांच्या नियुक्तीची मुदत ही बादशहाच्या मर्जीवर अवलंबून असे.[६६] सुभेदारांच्या बदल्या ज्या तत्वावर होत असे एखादे समान तत्व त्यामधून काढता येणे शक्य नाही. परंतु एक गोष्ट स्वच्छ आहे आणि ती ही की प्रत्येक महत्त्वाकांक्षी आणि कार्यक्षम व्यक्तिला या अतिशय महत्वाच्या जागेवरून अधिकार गाजविण्याची संधी दिली जाई.

## प्रांतिक सुभेदारांचे अधिकार

प्रांतिक सुभेदारांना जी कामे पार पाडावी लागत त्यांचे स्वरूप तीन प्रकारचे होते : १) मुल्की, २) न्यायालयीन आणि ३) लष्करी.[६७] त्याच्या मुल्की अधिकारात तो संपूर्ण शासनाचा कार्यकारी प्रमुख होता; न्यायालयीन अधिकारात त्याच्याकडे काजी आणि मीर अदल यांच्या निर्णयावर अपीले ऐकण्याचे काम असे; आणि लष्करी अधिकारी म्हणून त्याच्याकडे प्रांतामधील लष्करी तुकड्यांवर अधिकार चालविणे आणि या तुकड्यांच्या देखरेखीचे व त्या उत्तम स्थितीत ठेवण्याबद्दल योग्य तो खर्च करण्याचे अशी कामे होती. बादशहाकडून ज्यांच्या नेमणुका झाल्या आहेत असे अधिकारी वगळता इतर दुय्यम अधिकाऱ्यांना तो बडतर्फ करू शकत असे. बादशहाकडून परवानगी मिळविल्याशिवाय देहांत शासनाची शिक्षा तो अंमलात आणू शकत नसे. सर्व सामान्य जनतेच्या नागरी हक्कांचे पालकत्व त्याच्याकडे होते. त्याच प्रमाणे शासनामधील अडचणींबाबत चर्चा करण्यासाठी जबाबदार अधिकाऱ्यांच्या बैठकी त्याने घ्याव्यात अशी सर्वसामान्यपणे त्याच्याबद्दल अपेक्षा होती.

दिवाण[६८] हा सुभ्यामधील मुख्य अर्थविषयक अधिकारी होता. तात्त्विक दृष्टचा त्याचे स्थान सुभेदाराशी तुलना करताना दुय्यम होते परंतु प्रत्यक्षात दर्जाच्या दृष्टीने तो त्याच्या बरोबरीचा होता.

## दिवाण

त्याची नेमणूक बादशहाकडून परस्पर केली जात असे. सुभेदाराच्या कारभारावर नजर ठेवण्याचे कामही त्याच्याकडे सोपविलेले होते. शहाजहानच्या

कारकिर्दीत प्रांतिक दिवाणाकडे एकाच वेळी अनेक अधिकाराच्या जागा सोपविल्या होत्या. महंमद वारिस[६९] याने शेख मूसा गिलानी याचे उदाहरण नमूद करून अशी नोंद केली आहे की शहाजहानच्या कारकीर्दीच्या २१ व्या वर्षी गिलानीची नेमणूक मुल्तानचा दिवाण, अमीन आणि फौजदार अशी एकाच वेळी झाली होती. अशाच तऱ्हेची अनेक उदाहरणे आपल्याला देता येतील.

**आमिल**

आमिल अथवा महसूल गोळा करणारा अधिकारी.[७०] याच्याकडे शेतीच्या सुधारणेबाबतची अनेक कामे पार पाडण्याचे काम होते. त्याच्या हाती महसूल आणि कार्यकारी खात्याबाबत अतिशय अमर्याद असे अधिकार होते कारण ज्या ठिकाणी कोतवालाची नेमणूक झालेली नसे तेथे त्याची कामे पार पाडण्याची जबाबदारी देखील आमिल याची होती.[७१]

**बिटिकची**

आमिल याला मदत करण्यासाठी दोन अधिकारी होते. (१) बिटिकची[७२] अथवा नोंदणी अधिकारी आणि (२) पोतदार[७३] अथवा खजिनदार.

**पोतदार**

वरील अधिकाऱ्यांशिवाय आणखी एक अधिकारी म्हणजे प्रांतिक वाकिहनवीस हा होता.[७४] हा आपले अहवाल दरबाराकडे दिवाणाच्या-करवी पाठवीत असे. शहाजहानच्या कारकिर्दीत आपल्याला आणखी एका अधिकाऱ्याच्या जागेचा उल्लेख मिळतो आणि तो म्हणजे प्रांतिक बक्षी. अशावेळी दोन्ही अधिकाऱ्याच्या जागा एकाच व्यक्तिकडे सोपविल्या जात.[७५]

**सरकार**

प्रांताच्या खालोखालचा शासनाचा घटक म्हणजे सरकार.[७६] अनेक परगणे एकत्र करून हा घटक बनविलेला असे आणि त्याचा कारभार फौजदार ह्या अधिकाऱ्याकडून केला जाई.[७७] शहाजहान याने आपल्या राज्यारोहणाच्या दिवशी सरकारांवर अनेक नेमणुका केल्या. समकालीन ऐतिहासिक बखरीत आपल्याला 'फौजदारी-इ-सरकार' ही संज्ञा वारंवार आढळते.[७८]

शहाजहानच्या कारकीर्दीत परगणे आणि खेडी यांचा कारभार कसा चालविला जाई याबद्दल स्पष्ट असा काही उल्लेख मिळत नाही. कानूंगो

हा परगण्याचा अधिकारी असावा आणि पटवारी हा खेड्याचा अधिकारी असावा अशी शक्यता संभवते.

### न्यायालयीन राज्यकारभार

वर जो वृत्तांत आलेला आहे त्यावरून त्याकाळी न्यायालयीन राज्यकारभार कसा केला जात असावा याची कल्पना करणे कठिण नाही. बादशहा हा न्यायखात्याचा प्रमुख होता. त्याच्यासमोर मूळ कज्जे चालत आणि त्याच प्रमाणे प्रांतिक न्यायालयांकडून आलेली अपीलेही चालत. राजधानीमध्ये त्याचा प्रमुख कायदेशीर सल्लागार काजी-उल्-कजात् हा होता आणि प्रातांमध्ये हेच काम काजी आणि मीर अद्‌ल हे करीत.[७९] शहाजहानच्या कारकीर्दीत या दोन्ही जागांचे अधिकार एकाच व्यक्तिकडे सोपविले जात.

### गुप्त हेर संघटना

मोगलांच्या अतिशय उत्कृष्ट अशा गुप्तहेर संघटनेची अनेक युरोपीय प्रवाशांनी स्तुती केलेली आहे.[८०] राजधानीमध्ये गुप्त हेर खात्याचा प्रमुख वाकिहनवीस हा होता. प्रांतामधे हे काम करण्यासाठी दुय्यम वाकिहनवीस यांची नेमणूक केली जाई आणि शहरामधे हे काम कोतवाल करीत असत.

### रस्ते

साम्राज्याचे राजधानीचे ठिकाण हे अनेक रस्त्यांच्या मदतीने प्रांतांबरोबर जोडलेले होते.[८१] यापैकी एक रस्ता पूर्वेकडे बंगालकडे गेलेला होता तर दुसरा पश्चिमेकडे पेशावरच्या दिशेने गेलेला होता. आणखी एक रस्ता रजपुतान्यातून अहमदाबादकडे आणि तेथून दक्षिणेकडे गेलेला होता. आणि तिसरा रस्ता माळव्यातून बुरहाणपूरकडे गेलेला होता. या रस्त्यांच्या दोन्ही बाजूला सावली देणारी झाडे लावलेली होती आणि ठराविक अंतरावर ठिकठिकाणी सुखसोयींनी युक्त अशी विश्रांतिस्थाने होती. ही ठिकाणे म्हणजे प्रवाशांना आजारीपणात अथवा दमल्यानंतर अथवा पावसापासून निवारा आणि आधार देत असे मॅनरिकने त्यांचे वर्णन केलेले आहे. ही विश्रांति स्थाने बांधण्याचा खर्च आजूबाजूच्या खेड्यांमधून वसूल केल जाई अथवा आपली स्मृती चिरकाल ताजी-तवानी राहावी अशी इच्छा मनात बाळगून असणारे राजघराण्यातील पुरूष अथवा श्रीमंत आणि बलशाली व्यक्ति ही ठिकाणे बांधण्याचा खर्च देत असत.[८२]

**रस्त्यांची सुरक्षितता**

प्रवासी आणि व्यापारी यांच्यासाठी हे रस्ते सुरक्षित ठेवण्याची सरकार योग्य प्रकारे काळजी घेत असे.[८३] दिवसा उजेडी होणाऱ्या चोऱ्यांविरूध्द संरक्षण देण्याची जबाबदारी फौजदाराकडे असे. रस्त्यांची सुरक्षितता राखण्यासाठी इतर स्थानिक अधिकाऱ्यांनी त्याला मदत करावी अशी अपेक्षा असे. तरी देखील धमकी देवून पैसे लुबाडणे अथवा चोऱ्या माऱ्या यांचे प्रकार वारंवार होत असलेले आपल्याला आढळून येतात. परंतु जेव्हा स्थानिक अधिकाऱ्यांना गुन्हेगारांना शोधून काढण्यात अपयश येई तेव्हा त्यांच्या अधिकार कक्षेत आलेले नुकसान भरून काढण्याची सक्ती त्यांच्यावर केली जाई अथवा त्यांना बडतर्फ केले जाई.[८४]

ज्या शिक्षेला हल्लीच्या काळात आपण पशुतुल्य शिक्षा असे म्हणू अशा शिक्षेचे अनेक प्रकार त्याकाळी अस्तित्वात होते. त्या काळच्या फौजदारी कायद्याचा आद्य हेतु सुधारणावादी अथवा मानवहितवादी नव्हता तर या हेतूचे स्वरूप सूडात्मक असे होते. त्याच प्रमाणे गुन्ह्याच्या प्रमाणात शिक्षा दिली जात आहे किंवा नाही याकडे फारच थोडे लक्ष दिले जाई. अवयव च्छेदन, मानखोडा, चाबकाने मारणे आणि (मनुचीने जे सांगितले आहे त्यावर विश्वास ठेवावयाचा असल्यास) विंचू, आणि सर्पदंश हे सर्वसाधारणपणे शिक्षेचे प्रकार होते.[८५]

**तुरूंग**

ग्वाल्हेर, रणथंभोर, आणि बहुधा रोहटास या किल्ल्यांचा उपयोग राजकीय गुन्हेगारांना ठेवण्यासाठी राज्य तुरूंगासारखा करण्यात येई, परंतु सर्वसामान्य अपराध्यांसाठी स्थानिक तुरूंग होते. त्यांना बंदीखाना असे म्हणत. मॅनरिकने यापैकी एका तुरूंगाची हकीगत दिली आहे. तो म्हणतो की कैद्यांना खाटा वापरण्याची परवानगी नसे परंतु त्यांना खाजगी रित्या औषधोपचार करून घेण्यासाठी परवानगी दिली जाई.[८६]

**डाक चौकी**

प्रांतांमधून दरबारामध्ये बातम्या पोहोचविण्यासाठी सोयीस्कर अशा टप्प्यांवर अतिशय जलद अशा जासुदांची नियुक्ती केली जाई. ही जी संघटना होती तिला डाक चौकी या नावाने ओळखत असत.[८७] मोगल प्रशासनाचे विशेष अंग म्हणजे त्या प्रशासनाचे लष्करी स्वरूप हे होय.

**मोगल शासनाचे स्वरूप हे लष्करी का होते ?**

ह्याचे कारण म्हणजे पहिल्या प्रथम मोगलकालीन लोकसंख्येचे स्वरूप[८८] आणि दुसरे म्हणजे प्रशासनामधे काही बाबीबाबत काहीतरी खास असू शकते या कल्पनेचा अभाव. मध्ययुगीन कालखंडातील बहुसंख्य लोक हे वृत्तीने युयुत्सु होते आणि आज्ञापालन आणि शरणागति या गोष्टींबद्दल आजच्यापेक्षा त्यांच्या मनात अधिक तिटकारा होता. अशा तऱ्हेची उध्दट वृत्ती त्या काळी अस्तित्वात होती आणि त्याला पुरावा म्हणजे अगदी राजधानीच्याजवळ असलेल्या दोआब सारख्या प्रदेशातील स्थानिक बंडाळी मोडून काढण्याठी राज्यकर्त्यांकडून वारंवार मोहिमा हाती घेण्यात आल्या हा होय. त्या शिवाय आमिल या अधिकाऱ्याला महसूल गोळा करण्याचे कामी मदत करण्यासाठी प्रांतामधील प्रमुख ठिकाणी सैन्य ठेवण्यात आलेले असे.

**खास नैपुण्याचा अभाव**

शासनाचे शास्त्र हे अजून बाल्यावस्थेत होते आणि प्रशासनाच्या विशिष्ट भागातच अधिकाऱ्यांच्या एखाद्या गटाने नैपुण्य संपादन करण्याची कल्पना तेव्हा नव्हती. या उलट प्रत्येक अधिकारी हा लष्करी व त्याचबरोबर मुल्की कर्तव्ये पार पाडण्यात तितकाच कार्यक्षम आहे असे समजले जाई[८९] आणि सरकारी सेवेचे स्वरूप हे विशेषेकरून लष्करी असल्याने संपूर्ण राज्य कारभाराला लष्करी उठाव प्राप्त झाला. शहाजहानच्या कारकिर्दीत सद्र हा देखील लष्करी अधिकारी होता आणि आपल्या लष्करी हुद्यानुसार तो आपला पगार काढीत असे.[९०]

**मनसबदारी पध्दत**

राज्याची संपूर्ण लष्करी संघटना ही जिला मनसबदारी पध्दत म्हणता येईल तिच्यावर अवलंबून होती. मनसब ह्या संज्ञेचे स्पष्टीकरण देताना आयर्विन असे म्हणतो की तिचा उद्देश श्रेष्ठत्व ठरविणे आणि वेतनाचा क्रम निश्चित करणे हा होता. एखाद्या विशिष्ट अधिकाराच्या जागेचा वापर करणे असा अर्थ त्यात अभिप्रेत होता असे नव्हते. मनसब ह्या शब्दाचा अर्थ फक्त त्या अधिकाराच्या जागेवरील अधिकारी राज्याच्या चाकरीमधे होता आणि गरज पडेल तेव्हा शासनाला पाहिजे ती सेवा देण्याचे त्याच्यावर बंधन होते, या पलीकडे अधिक लावता येणार नाही.[९१] मनसबदारीच्या पध्दतीच्या मुळाशी कल्पना ही अशी होती. तात्विक दृष्टया बघितल्यास या

पध्दतीचे स्वरूप अतिशय साधे होते. परंतु प्रत्यक्षात ही पध्दत इतक्या गुंतागुंतीने भरलेली होती की अजून देखील या गुंतागुंतीची पूर्णपणे उकल आलेली नाही.

### पध्दतीचा उद्देश

अकबराने मनसबदारी पध्दत त्याच्या लष्करी अधिकाऱ्यांच्याकडून होणारी लबाडी आणि पैशाचा अपहार ही टाळण्याकरिता आणि त्याच्या लष्करी संघटनेला स्थैर्य प्राप्त करून देण्यासाठी सुरू केली. त्याच्या कारकिर्दी-मध्ये दाग-ओ-ताशीह (घोड्याला डाग देणे) या बाबतचे जे कायदे कानून होते[९२] त्यांचे अतिशय कडकपणे पालन केले जात असल्याने मनसबदाराचा दर्जा आणि प्रत्यक्षात त्याने हाताखाली बाळगलेले सैनिक यांच्यामधे निश्चितपणे अनुरूपता संपादली जाई. परंतु त्याच्यानंतर गादीवर आलेल्या बादशहांच्या कारकिर्दीत काही नव्याने निर्माण करण्यात आलेल्या लष्करी हुद्यांमुळे सिध्दांत आणि वस्तुस्थिती यामधे फार मोठी तफावत निर्माण झाली.

### सवार हुद्दा

यापैकी पहिला हुद्दा म्हणजे सवार हा होता. हा हुद्दा तसे पाहिले तर अकबराच्या कारकीर्दीच्या अखेरच्या वर्षात अस्तित्वात आला. हा हुद्दा अतिशय कृपण अशा वृत्तींच्या अधिकाऱ्यांना दिला जात असे.[९३] परंतु अकबरानंतर गादीवर आलेल्या त्याच्या वारसांच्या कारकीर्दीत या हुद्याचे स्वरूप सर्वसामान्य झाले. हा हुद्दा देण्याचा उद्देश एखाद्या अधिकाऱ्याच्या हाताखालील सैनिकांच्या संख्येत त्याला कोणतेही अतिरिक्त नैपुण्य न देता वाढ करण्याचा असे. जेव्हा एखाद्या अधिकाऱ्याला असे नैपुण्य मिळत असे तेव्हा त्याच्या मूळ हुद्याला जात असे म्हणत आणि अतिरिक्त हुद्याला सवार असे म्हणत.

### जात आणि सवार या शब्दांचे महत्वः ब्लॉचमन

जात आणि सवार या दोन शब्दांचा विशेष अर्थ काय आहे यावर फार मोठे मतभेद आहेत. ब्लॉचमन याचे असे मत आहे की जात ह्या शब्दा-मधे एखाद्या मनसबदाराने आपल्या हाताखालील सैनिकांची संख्या किती ठेवायची असा अर्थ अभिप्रेत आहे आणि सवार या शब्दात त्याच्या हाता-खाली किती सैनिक प्रत्यक्षात बाळगलेले आहेत हा अर्थ अभिप्रेत आहे. ब्लॉचमन आणखी असे म्हणतो की मनसबदार हा आपले वेतन आपल्या जात या हुद्याप्रमाणे काढीत असे.[९४] परंतु दोन कारणांमुळे हे मत अग्राह्य आहे. पहिले कारण म्हणजे ज्या कारणासाठी सवार हा हुद्दा निर्माण करण्यात आला

ऱ्या पाठीमागचा उद्देश यामुळे ढासळून पडतो आणि दुसरे कारण म्हणजे काही विशिष्ट अधिकारी असे होते की त्यांचा फक्त जात हाच हुद्दा होता. अशा परिस्थितीत जर का आपण ब्लॉचमनचे मत स्वीकारले तर त्यातून असा अर्थ निघेल की ज्यांचा हुद्दा फक्त जात हा होता त्यांना जात आणि सवार हे दोन्ही हुद्दे असलेल्या अधिकाऱ्यांपेक्षा अधिक सैन्य बाळगणे भाग होते आणि तसे केल्याने त्यांचा दर्जा कमी होत होता.

### आर्यविन

आर्यविन याने या बाबतीत असा विचार प्रकट केला आहे की एखाद्याला सवार हा हुद्दा देणे म्हणजे त्याचा अधिक सन्मान केल्यासारखे होते आणि जात हा हुद्दा असलेल्या अधिकाऱ्यापेक्षा प्रत्यक्षात त्याच्याकडे किती घोडेस्वार अधिक होते हे त्यातून कळत असे.[९५] हा दृष्टिकोन तीन कारणासाठी असमर्थनीय ठरतो. पहिल्या प्रथम जर का हा दृष्टिकोन आपण स्वीकारला तर मोगल फौजेची एकंदर संख्या कल्पनातीत अशा आकड्यापलीकडे जाऊन पोहोचेल. दुसरे कारण म्हणजे जर का ज्या अधिकाऱ्याचा सन्मान करण्यात आलेला आहे त्याने जादा घोडेस्वार आपल्याजवळ बाळगावे असा याचा अर्थ असला तर हा सन्मान म्हणजे त्याच्या दर्जात विशेष वाढ होण्याचे ऐवजी त्याच्यावर एक प्रकारचा जादा भार टाकण्यासारखे होणार होते. तिसरे कारण म्हणजे काही अधिकाऱ्यांच्या बाबतीत मनसबदाराने बाळगलेल्या घोडेस्वारांची संख्या राजपुत्राने बाळगलेल्या घोडेस्वारांच्या संख्येपेक्षा मोठी होते आणि ही गोष्ट अशक्यप्राय होती.

### डॉ. त्रिपाठी

डॉक्टर आर. पी. त्रिपाठी यानी या प्रश्नाची अतिशय सांगोपांग अशी चर्चा केलेली आहे आणि त्यानी असे अनुमान काढले आहे की सवार हा दर्जा एखाद्या अधिकाऱ्याचा सन्मान करण्यासाठी दिला जात असून त्याकरिता त्या अधिकाऱ्याला जादा भत्ता दिला जात असे. परंतु त्यानुसार घोडस्वारांची संख्या बाळगण्याचे बंधन त्याच्यावर नसे.[९६] दुसऱ्या शब्दात सांगायचे झाल्यास सवार हा दर्जा आणि प्रत्यक्षात घोडेस्वारांची बाळगण्यात येणारी संख्या यांचा काही संबंध नव्हता. या संख्येचे नियमन फक्त जात या दर्जाप्रमाणे होत असे. कोणत्याही अधिकाऱ्याला त्याच्या सवार या दर्जाबद्दल दर घोडेस्वारापाठीमागे किती भत्ता दिला जात होता तो मुद्दा अजून वादग्रस्त आहे.

## दो अस्प सिह अस्प

सवार ह्या दर्जापेक्षा आणखी अधिक अशा पुढील दर्जाची निर्मिती जहांगीरच्या कारकीर्दीत झाली. या पाठीमागचा उद्देश त्या मनसबदाराने स्वत:च्या हाताखाली जी एकंदर संख्या बाळगावयाची होती तिचा काही भाग अथवा ती संख्या पूर्णांशाने दाखविणे असा होता म्हणजे दो अस्प सिह अस्प. पादशाहनामा[७] या ग्रंथात असा स्पष्ट अुल्लेख आहे की दो अस्प सिह अस्प हा हुद्दा असलेल्या अधिकाऱ्याने बाळगावयाची घोडेस्वारांची संख्या ही सवार हुद्दा असलेल्या तशाच अधिकाऱ्याने बाळगावयाच्या संख्येच्या दुप्पट होती. उदाहरणार्थ ५००० जात आणि ५००० सवार ही मनसब असलेल्या अधिकाऱ्याने ३०० सिह अस्प स्वार, ६०० दो अस्प स्वार आणि १०० एक अस्प स्वार बाळगावे अशी अपेक्षा होती. परंतु त्याच्या मनसबीत ५००० जात आणि ५००० सवार दो अस्प सिह अस्प अशा तऱ्हेने जर वाढ करण्यात आली तर त्याने ६०० सिह अस्प, १२०० दो अस्प आणि २०० एक अस्प अशा तऱ्हेने स्वार बाळगावेत अशी अपेक्षा होती. परंतु या ठिकाणी एक गोष्ट ध्यानात ठेवण्याजोगी आहे की ज्या मनसबदाराने पूर्णपणे दो अस्प सिह अस्प या नियमानुसार स्वार बाळगावयाचे होते अशा मनसबदारांची उदाहरणे फारच थोडी होती.

## मनसबदारीतील भेदामुळे निर्माण झालेली फार मोठी तफावत

वर उल्लेखिलेल्या मनसबदारीचे जे प्रकार होते त्यामुळे प्रत्यक्षात कोणाही मनसबदाराने त्याच्या दर्जानुसार बाळगावयाची स्वारांची संख्या आणि प्रत्यक्षात तो बाळगत असलेल्या स्वारांची संख्या यामधे फार मोठी तफावत घडवून आणली. अशा तऱ्हेची परिस्थिती योग्यप्रकारे सुधारून यावी याकरता शहाजहानने आपल्या कारकिर्दीच्या विसाव्या वर्षी बऱ्याच प्रकारचे वटहुकूम काढले.[८]

## शहाजहानने काढलेले वटहुकूम

वरील नव्या हुकूमानुसार ज्या मनसबदाराची जहागीर हिंदुस्तानामधे आहे त्याने त्याच्या मनसबीनुसार बाळगावयाच्या स्वारांच्या संख्येपैकी एक तृतीयांश स्वार बाळगावयाचे होते. उदाहरणार्थ ३००० जात आणि ३००० सवार याप्रमाणे मनसब असलेल्या अधिकाऱ्याने डाग देण्यासाठी फक्त एकहजार स्वार आणावयाचे होते. परंतु जर का त्याची नेमणूक

हिंदुस्तानाबाहेर असलेल्या प्रांतात झाली तर त्याला आपल्या मनसबीच्या फक्त एक चतुर्थांश इतकीच स्वारांची संख्या बाळगावयाची होती. यामधे पुढे आणखी घट करण्यात आली आणि ती म्हणजे बाल्खच्या मोहिमेच्या वेळी. तेव्हा हे प्रमाण एक पंचमांश असावे असे ठरविण्यात आले.

**लष्करातील वेगवेगळे दर्जे**

शहाजहानच्या कारकिर्दीच्या शेवटच्या दशकात सर्वात मोठी मनसब राजपुत्र दारा याच्याकडे होती. तो ४० हजार जात आणि २० हजार सवार इतक्या मनसबीचा अधिकारी होता. हे सर्व स्वार दो अस्प सिह् अस्प या वर्गात मोडणारे होते. राजघराण्याच्या बाहेर कोणत्याहि अधिकाऱ्याने प्राप्त करून घेतलेला सर्वात मोठा दर्जा म्हणजे ७ हजार जात आणि ७ हजार सवार हा होता. आसफखान याची मनसब ९ हजार जात आणि ९ हजार सवार होती. परंतु त्याचे उदाहरण हे अपवादात्मक होते. तो बादशहाचा सासरा होता आणि त्याला सिंहासन मिळवून देण्याच्या कामात त्याचा फार मोठा पुढाकार होता. बादशहाच्या कारकिर्दीच्या तिसाव्या वर्षाच्या अखेरीला ७ हजार जात आणि ७ हजार सवार अशी मनसब असलेले फक्त तीनच अधिकारी होते, आणि ते म्हणजे अली मर्दानखान, सैदखान आणि इस्लामखान.[९९]

**लष्करातील दर्जांचे वर्गीकरण**

मनसबदारांची जात आणि सवार या दर्जाच्या आधारावर आणखी जी विभागणी झाली होती, ती तीन दर्जांमधे झाली होती. याला अपवाद म्हणजे ५ हजारापेक्षा ज्यांची मनसब अधिक आहे असे अधिकारी होते त्यांना या वर्गीकरणातून वगळण्यात आले होते.[१००] जर का ५ हजाराखालील जात आणि सवार यांचे दर्जे सारखे असल्यास तो अधिकारी पहिल्या वर्गाचा आहे असे मानले जाई. जर का सवार दर्जा हा अर्धा किंवा अर्ध्याहून अधिक असला तर तो अधिकारी दुसऱ्या वर्गाचा आहे असे मानले जाई. परंतु जर का सवार दर्जा हा अर्ध्यापेक्षा कमी असेल तर तो अधिकारी तिसऱ्या वर्गाचा समजला जाई.[१०१]

**लष्करातील दर्जांची क्रमवारी**

३ हजार जात पासून ७ हजार जात पर्यंत लष्करातील दर्जांच्या क्रमवारीमधे १ हजाराने फरक पडत असे. ज्याची मनसबदारी ३५०० आहे

असा फक्त एकच अधिकारी होता. १ हजारापासून ते २५०० पर्यंत या फरकाचे प्रमाण ५०० एवढे असे आणि १००० पासून खाली ५०० पर्यंत हा फरक १००चा असे. या सर्व घटनांवरून आपल्याला असे दिसून येईल की मनसबदारीचा सर्वात खालचा दर्जा हा ५००चा होता. ५०० मनसब ही साम्राज्यात दूरवर पसरलेली होती आणि शहाजहानच्या कारकिर्दीत हा दर्जा असलेल्या मनसबदारांची संख्या सर्वात अधिक होती.[१०२]

**तनखे**

ज्यांना वर्षातील बाराच्या बारा महिने तनखा दिला जाई असे मनसबदार फारच थोडे होते. शहाजहानच्या कारकिर्दीच्या उत्तरार्धात वर्षातून १० महिने पगार हीच मर्यादा होती.[१०३] तरीदेखील या ठिकाणी एक विशेष नमूद करण्यासारखी गोष्ट म्हणजे जेव्हा अली मर्दान खान याची ७ हजार जात आणि ५ हजार स्वार या दर्जाचा मनसबदार म्हणून नेमणूक झाली आणि यापैकी ५ हजार स्वार हे दो अस्प सिह अस्प या दर्जाचे होते तेव्हा देखील त्याचा तनखा वर्षाला ३० लक्ष रुपये इतका ठरवून देण्यात आला आणि हे वर्ष १२ महिन्याच्या हिशोबाप्रमाणे गणती करण्यात आले.[१०४] कधी कधी बादशहाची खास मर्जी म्हणून एखाद्या अधिकाऱ्याला त्याच्या दर्जाने ठरवून दिलेल्या प्रमाणापेक्षा देखील अतिरिक्त भत्ता दिला जाई. असा अतिरिक्त भत्ता आसफखान अली मर्दानखान या दोघांनाही दिलेला होता.[१०५]

**विशेष हुद्दे**

जात आणि सवार या दर्जा व्यतिरिक्त आणखीही काही असे दर्जे होते की ज्यावर लायकी असलेल्या अधिकाऱ्यांची नियुक्ती केली जाई. सर्वसाधारणपणे तुमन ओ-तूघ या हुद्यावर केवळ राजपुत्राचीच नियुक्ती केली जाई. परंतु ७ हजार जात–सवार यापेक्षा ज्याची मनसब कमी नाही अशा मनसबदाराला देखील वरील हुद्दा देण्यात येत असे.[१०६] त्याचप्रमाणे निशाण आणि नौबत ही चिन्हे देखील उच्च पदस्थ अधिकाऱ्यांसाठी राखून ठेवली जात.[१०७] माही मराटीब हा हुद्दा फक्त दक्षिणी अधिकाऱ्यासाठीच राखून ठेवलेला होता.[१०८]

**सेना विभागाची पाहणी**

मनसबदारांना आपापल्या हाताखाली सेना प्रमुखाने ठरवून दिलेल्या कालावधिनंतर पहाणीसाठी आणावे लागत असत.[१०९] ज्याना जहागीर दिलेली असे त्यांच्या सेनाविभागांची वर्षातून एकदा पहाणी होई आणि त्याना याबाब-

तीत सवलत म्हणून ६ महिन्यांचा कालावधि देण्यात येत असे. परंतु नकदी अथवा ज्यांचा तनखा रोख रकमेत दिला जाई ते आपले सेनाविभाग दर सहा महिन्याने पहाणीसाठी आणीत. त्यांना सवलत म्हणून जो कालावधि दिला जाई तो फक्त दोन महिन्यांचा असे.

**मनसबदार-बादशहाच्या प्रत्यक्ष चाकरीत आणि दरबारातील सेवेत**

राज्यातील मनसबदारांच्या हाताखालील सेनाविभाग हे एका ठिकाणी स्थिर असे कधीही नसत. त्याचप्रमाणे त्यानी दरबारात बादशहाचे सेवेसाठी नेहमी रूजू असावे, अशीही त्यांच्याकडून अपेक्षा नसे. वर उल्लेखिलेल्या प्रमाणे लष्करी कामकाजाप्रमाणे मुलकी कामकाजे पार पाडण्यासाठी सुध्दा त्यांची नियुक्ती केली जात असे. उच्च दर्जाचे जे मनसबदार असत त्यांची नेमणूक प्रांताचे सुभेदार म्हणून केली जात असे अथवा वायव्य सरहद्द प्रांतावरील मोहिमांचे मुख्य अधिकारी म्हणून त्यांची नियुक्ती होई.जेव्हा मनसबदार आपली कामगिरी पार पाडण्यासाठी दरबारापासून दूर जात असत तेव्हा त्यांचा उल्लेख तैनात असा केला जाई.[११०] परंतु जे मनसबदार राजधानीच्या ठिकाणीच कामासाठी रहात असत त्यांचा उल्लेख हाजिररकाब असा केला जाई.[१११] त्यांच्याकडे चौकीवर पहारा बसविण्याचे आणि बादशहाच्या हुकुमाप्रमाणे इतर कामे पार पाडण्याची जबाबदारी असे.

**अहदी**

मनसबदारीची पध्दती ही मुलतः अप्रत्यक्षरीत्या लष्करात शिपायांची भरती करण्याची जी योजना असे त्यावर आधारलेली होती. बादशहा हा प्रत्येक अधिकाऱ्याचा दर्जा ठरवित असे आणि त्यानंतर आपल्या दर्जाला अनुरूप अशी शिपायांची भरती करणे हे त्या अधिकाऱ्याचे काम असे. परंतु राज्याच्या सैन्यात शिपायांची प्रत्यक्षरीत्या देखील भरती होई. अशा तऱ्हेने भरती झालेल्या शिपायांना 'अहदी' अथवा उच्च कुलस्थस्वार या नावाने ओळखले जाई आणि त्या सर्वांचा एकठ्ठा उल्लेख घरगुती घोडेस्वार या सर्वसाधारण किताबाखाली केला जाई. सर्वसामान्य शिपायांपेक्षा त्यांना दिला जाणारा तनखा हा अधिक चांगला असे.

**अनियमीत सेना विभाग**

सैन्याचा जो आणखी एक विभाग होता त्याचा उल्लेख आपल्याला अनियमीत सेनाविभाग असा करता येईल.[११२] यामधे रजपुतान्यामधिल मांड-

लिक अधिपती आणि इतर जमीनदार यांनी भरती केलेल्या स्वारांचा समावेश होत असे. परंतु ज्या अधिकाऱ्यांना अधिकृत मनसबदारीमध्ये समाविष्ट करून घेतले असेल त्यांना आपल्या जातीनुसार त्यांनी केलेल्या भरती शिवाय त्यांच्या दर्जानुरूप ठरवून दिलेल्या स्वारांची संख्या बाळगण्याचे बंधन असे.

### लष्कराची वेगवेगळी खाती

या प्रचंड लष्करी संघटनेच्या चार शाखा होत्या. या शाखा म्हणजे पायदळ, घोडदळ, तोफखाना आणि आरमार.

### पायदळ

सेना विभागाचे एक लढाऊ अंग म्हणून पायदळाला जे महत्त्व होते ते कमी झाले होते.[११४] आताचे पायदळ म्हणजे एखाद्या संमिश्र संघटनेसारखे असून त्यामध्ये काही लढाऊ आणि मोठ्या संख्येने असलेल्या बिनलढाऊ अथवा बाजारबुणगे यांचा समावेश होता. हे बाजार बुणगे म्हणजे खिदमतिया, दरबान अथवा पहारेकरी, कहार अथवा पालखी वाहून नेणारे, पहलवान अथवा मल्ल आणि मेवरा अथवा गुप्त हेर. पायदळाच्या लढाऊ विभागात समशिरबाज अथवा कसलेले भाडोत्री योध्दे आणि बर्कंदाज अथवा निशाणबाजी करणारे यांचा समावेश होता.[११५]

### घोडदळ

परंतु लष्करी संघटनेची अतिशय महत्वाची शाखा म्हणजे घोडदळ ही असून मनसबदारी पध्दतीची ती एक प्रमुख आधारस्तंभ होती. प्रत्येक घोडेस्वाराने योग्य जातीचा घोडा बाळगावा आणि त्याला नेमून दिलेल्या संख्येनुसार त्याने घोडे बाळगावे या विषयी फार मोठी दक्षता घेतली जाई.[११६] सर्वसामान्यपणे प्रत्येक शिपायाला दोन घोडे बाळगावयाला लागत, एक प्रत्यक्ष चाकरीसाठी आणि दुसरा शिलकी ठेवण्यादाखल. सारांश तसे पाहिले तर मोगलांचे घोडदळ हे कार्यक्षम आणि अतिशय संघटीत असे होते. बर्नियर याने मोगलांच्या घोडदळाची यथायोग्य अशी प्रशंसा केली आहे.[११७]

### तोफखाना

शहाजहान याच्या कारकिर्दीत तोफखान्याची सुत्रे मुख्यत्वेकरून युरोपियन,[११८] डच, इंग्लिश, पोर्तुगीज आणि फ्रेंच यांच्या हातात होती. तोफखान्याचे दोन

प्रकार होते, एक भारी आणि एक हलका. शहाजहान कालीन हलक्या तोफखान्याचा बंदोबस्त अतिशय उत्तम प्रकारचा होता, असे मत बर्नियर याने प्रकट केले आहे.[११९] परंतु भारी तोफखाना हा अकार्यक्षम होता आणि समकालीन पर्शियन तोफखान्याशी तुलना करताना कनिष्ठ प्रतिचा होता.

### आरमार

शहाजहानच्या काळात मोगलाचे आरमार फारसे नाव घेण्यासारखे नव्हते. [१२०] वहातुक करण्यासाठी जहाजांचा जो लहानसा काफिला होता त्याला नवारह् असे म्हणत. तथापी दोन प्रसंगी, एकदा हुगळीच्या पोर्तुगीजांविरूध्द[१२१] आणि त्यानंतर पुन्हा एकदा आसाम मधील युध्दात[१२२] या आरमाराचा उपयोग लष्कराचे लढाऊ अंग म्हणून करण्यात आला.

### महसुलाबाबत व्यवस्था

लष्करी संघटनेच्या खालोखाल परंतु तितकेच महत्वाचे राज्यकारभाराचे अंग म्हणजे महसुलाबाबतची व्यवस्था. समकालीन इतिहास ग्रंथामधे जे काही तुरळक उल्लेख आलेले आहेत त्यावरून आपल्याला असे दिसून येते की शहाजहान हा शेतकऱ्यांच्या सुस्थितीबद्दल अतिशय दक्ष होता[१२३] महसुल वसुल करणारे जे अधिकारी असत त्यांच्या जुलूम जबरदस्ती मधून शेतकऱ्यांना दिलासा मिळावा म्हणून त्याने काश्मिर मधील काही बेकायदेशीर कर रद्द केले.[१२४] शहाजहान याच्या कारकिर्दीतील विशेष उल्लेखनीय गोष्ट म्हणजे तेव्हा शेतीला पाणी पुरवण्याकरता बांधण्यात आलेले अनेक कालवे ही होय.[१२५]

### झबती पध्दती

परंतु शहाजहानच्या कारकिर्दीत महसुलाच्या व्यवस्थेबाबत जी सर्वसाधारण पध्दत अस्तित्वात होती तिच्यामध्ये आणि अकबराने सुरू केलेली आणि परिपूर्ण केलेली जी पध्दत होती तिच्यामधे मुलतः फारमोठा फरक आहे. अकबराने सुरूकेलेली झबती अथवा नियामक पध्दती हिचा उद्देश जहागिरी पध्दती नाहीशी करणे आणि जमिन कसणारांबरोबर प्रत्यक्ष संबंध प्रस्थापित करणे हा होता. या पध्दतीचे मख्य विशेष म्हणजे मोजणी आणि गणती हे होते. या पध्दतीनसार शेतकऱ्याने देण्याचा वसुल हा रोखीत घ्यावयाचा होता आणि सरकारकडून शेतकऱ्याकडील मागणी ही एकूण उत्पन्नाच्या $^{1}/_{3}$ इतकी ठरविण्यात आलेली होती. तथापि या ठिकाणी एक

गोष्ट नमूद करणे जरूर आहे आणि ती म्हणजे मोगल साम्राज्याच्या ज्या प्रांतांमधे शासन व्यवस्थितपणे प्रस्थापित झालेले होते तेथेच झबती पध्दती प्रचलीत होती.[१२७] बंगाल, सिंध, काबूल, खानदेश आणि काश्मिर हे प्रांत या पध्दतीच्या प्रत्यक्ष व्याप्तीच्या मर्यादेपलीकडे होते. या प्रांतामधे महसुल गोळा केला जात असे तो घल्लाबक्ष अथवा[१२८] पीक विभागणीच्या पध्दतीनुसार, अथवा नस्क[१२९] किंवा गट आकारणी पध्दती नुसार. पहिल्या पध्दतीत शेतकऱ्यांबरोबर प्रत्यक्ष संबंधाची शक्यता होती तर दुसऱ्या पध्दतीत तशी शक्यता नव्हती.

## शहाजहानच्या कारकिर्दीत झालेले बदल

शहाजहानच्या कारकिर्दीत जहागिरी पध्दतीचे जे पुनरूज्जीवन झाले त्यामुळे झबती पध्दतीच्या जणूकाही मुळावरच प्रहार केला गेला. साम्राज्याचा जवळजवळ सात दशांश भाग मक्त्याने देण्यात आला आणि[१३०] त्यानुसार खालसा जमिनींचे (प्रत्यक्ष शासनाच्या अधिकाराखाली असलेल्या जमिनी) क्षेत्र मोठ्या प्रमाणावर कमी झाले. गट मोजणीची पध्दती ही अपवादात्मक होण्याऐवजी तिला सर्वमान्य असे रूप प्राप्त झाले,[१३१] आणि सरकारकडून होणारी मागणी ही एक तृतियांशावरून निम्यावर गेली. शेतकऱ्यावरील बोजात अधिक वाढ झाली कारण प्रत्यक्ष शेतीखाली असलेल्या जमीनीपोटी त्याला सारा भरावा लागे इतकेच नव्हे तर त्याच्या ताव्यात असलेल्या जमिनीबद्दल देखील.[१३२] अशातऱ्हेने जमिनीपासून येणाऱ्या महसुलाचे उत्पन्न चाळीस कोटी रूपया पर्यंत वाढले.[१३३]

## दक्षिणेमधील दुष्काळ

शहाजहानच्या कारकिर्दीत दक्षिणेमधे अतिशय कडक असा दुष्काळ पडला होता आणि त्याचप्रमाणे पंजाब आणि काश्मिरमधे धान्याची थोडी फार टंचाई निर्माण झाली. १६३०–३१ साली पडलेल्या दुष्काळाचे अतिशय दुरगामी असे परिणाम झाले. या दुष्काळाचे अतिशय झळ गोवळकोंडा, अहमदनगर, गुजरात आणि माळव्याच्या काही भागांना लागली. समकालीन जे इतिहास ग्रंथ उपलब्ध आहेत त्यामधे या दुष्काळात जी भयानक हत्या झाली व दक्षिणेतील लोकांना जे भयंकर दुःख सहन करावे लागले त्याबद्दल हृदयाला हेलावून सोडणारे असे वृत्तान्त आहेत. "भाकरीच्या एका तुकड्याकरता लोक आपला जीव देण्यास तयार होते परंतु विकत घेण्यालाच कुणी पुढे येत नव्हता; आपला

दर्जा एका साखरेच्या खड्या बदली देण्याची तयारी असे पण कोणाला त्याची पर्वा नसे...... बराच काळपर्यंत कुत्र्याच्या मासापोटी बकरीचे मास विकले जाई आणि मृत माणसांचा हाडाचे केलेले चूर्ण पिठात मिसळून त्याची विक्री होई. माणसे माणसांना खाऊ लागली आणि स्वतःचा मुलाचे मास त्याच्यावरील प्रेमाचा बळी घेऊ लागले. गरीब आणि निर्वासीत यांच्यासाठी भोजनगृहे आणि धर्मशाळा उघडण्याचे आदेश बादशहाने दिले. प्रत्येक सोमवारी बुरहाणपुरच्या गोरगरिबात ५००० रुपयांची खैरात केली जाई आणि अहमदाबादेत मोठ्या प्रमाणावर सारामाफी करण्यात आली."[१३४]

## काश्मिर

१६४१ मधे झालेल्या अतिवृष्टीमुळे काश्मिर मधिल खरीप पिकांची फार मोठो हानी झाली, आणि परिणामी फार मोठी धान्यटंचाई निर्माण झाली. जवळ-जवळ ५०००० लोक परागंदा झाले आणि तेव्हा दरबार स्थित असलेल्या लाहोर-मधे त्यानी स्थलांतर केले. बादशहासमोर आपली दैन्यावस्था सांगण्यासाठी ते एकत्रा होऊन झरोखा खिडकीसमोर येऊन ठाकले. शहाजहानने त्यांच्यात वाटण्यासाठी एक लक्ष रुपये देण्याचा आणि दररोज दोनशे रुपयांचे अन्न त्याना शिजवून देण्याचा वटहुकूम काढला. काश्मिरमधे दुष्काळी कामावर खर्च करण्यासाठी म्हणून ३०००० रुपये तरबियत खानाकडे पाठवून दिले आणि भाजी भाकरी वाटपासाठी पाच स्वयंपाकगृहे उघडण्याचा त्याला हुकूम दिला. परंतु तरबियत खानाला परिस्थिती आटोक्यात आणण्यात अपयश आले आणि म्हणून त्याच्या जागेवर जफरखानाची नेमणूक करण्यात आली. बादशहाने दुष्काळी कामासाठी आणखी २०००० रुपये जफरखानाला मंजूर केले.[१३५]

## पंजाब

१६४६ मधे पाऊस कमी पडल्याने पंजाबात दुष्काळ पडला. बादशहाच्या आज्ञेने शिजविलेले अन्न लोकांना वाटण्यासाठी प्रान्तामधे दहा भोजनगृहे प्रास्थापित करण्यांत आली आणि सय्यद जलाल याला गरीब आणि निर्वासीत यांच्यामधे १०००० रुपये वाटण्या साठी नियुक्त करण्यात आले. विक्री करण्यात आलेल्या मुलांसाठी मोठ्या रकमा सरकारने भरल्या आणि त्याना त्यांच्या पालकांच्या स्वाधिन केले. १६४७ च्या फेब्रुवारीमधे पंजाबमधिल दुष्काळी कामासाठी बादशहाने आणखी ३०००० रुपये मंजूर केले.[१३६]

### प्रशासनाची अस्मिता

शहाजहानच्या शासकीय कारभारासाठी जी प्रशासकीय यंत्रणा होती तिचा आतापर्यंत आढावा घेण्यात आला. आता या यंत्रणे पाठीमागची जी आस्मिता होती तिचे परिशीवन करणे जरुरीचे आहे. पहिला जो बदल दृष्टिस येतो तो म्हणजे शासकीय यंत्रणेच्या धार्मिक दृष्टिकोनातील. घड्याळचाऱ्या काट्याप्रमाणे आता या दृष्टिकोनाचे माप निश्चितच दुसऱ्या टोकाला झुकले होते. मुसलमानी रुढी आणि रिती रिवाजांचे पुनरुत्थापन केल्याबद्दल इतिहासकार शहाजहानची वारेमाप स्तुती करतात. सिजदा पद्धतिचे निर्मूलन आणि बादशहाची प्रतिमा फेट्यावर वापरण्यास घालण्यात आलेली बंदी ही या बदललेल्य दृष्टिकोनाची प्रतिके म्हणून दाखविता येतील. परंतु यापेक्षाहि महत्वाचे प्रतिक म्हणजे हिंदु आणि ख्रिश्चन या बिगर मुसलमान धर्मियांबाबतचा बादशहाचा दृष्टिकोन.

### हिंदूंच्या देवळांचा विध्वंस आणि भ्रष्टाचार

हिंदूंच्या देवस्थानांचा विध्वंस आणि भ्रष्टाचार याला जहांगीरच्या कारकिर्दीत जरी पुन्हा सुरवात करण्यात आली होती[१३७] तरी या प्रकाराला योजनाबद्ध स्वरुप शहाजहानने दिले. प्रथम जानेवारी १६३३ मधे त्याने साम्राज्यातील आणि विशेषत: बनारस मधील नव्याने बांधण्यात आलेल्या सर्व देवळांचा विध्वंस करण्याची आज्ञा दिली.[१३८] या पाठोपाठ सप्टेंबर-ऑक्टोबर मधे दुसऱ्या वटहुकूमानुसार नवी देवळे बांधण्यास किंवा जुन्यांची दुरुस्ती करण्यावर पूर्णपणे बंदी घालण्यात आली.[१३९] मुसलमानांप्रमाणे पोषाख करण्याची, जाहिररित्या किंवा खाजगी रित्या दारु पिण्याची वा विकण्याची, मुसलमानांच्या कबरस्थानाशेजारी मृतांना दहन करण्याची किंवा सती जाण्याची, आणि त्याचप्रमाणे युद्धामधील मुस्लीम गुलामांना खरेदी करण्याची हिंदुना मनाई करण्यात आली.[१४०]

### पाखंडी प्रथांचे उच्चाटन

साम्राज्याच्या काही भागात, विशेषत: पंजाब, काश्मिर आणि गुजरात (पंजाब), हिंदू आणि मुसलमान मुक्तपणे आपापसात मिसळत आणि रोटीबेटी व्यवहार करीत. उदा. भिभारमधे अशी प्रथा होती की एकाद्या हिंदूने आपली मुलगी लग्ना दाखल मुसलमानास दिली तर जेव्हा तिचा मृत्यु होई तेव्हा तिचे दफन केले जाई; परंतु एकाद्या मुसलमानाने आपली मुलगी हिंदूला दिल्यास मरणोत्तर तिचे दहन केले जाई. १६३४ मधे शहाजहानने ही प्रथा बंद केली

आणि हिंदूकडे दिलेल्या मुली पुन्हा परत मिळविण्याचा हुकूम दिला. परंतु एकाद्या हिंदूने धर्मान्तर केल्यास त्याला अशी मुलगी पत्नी म्हणून ठेवण्याची एका अटीवर परवानगी देण्यात येई आणि ही अट म्हणजे त्याने पुन्हा एकदा मुसलमानी रिवाजानुसार त्याचे झालेले लग्न विधियुक्त करावे.[१४१]

**सक्तिची धर्मान्तरे**

त्याशिवाय बादशहाच्या हुकूमानुसार हिंदूंचे स्वखुषीने आणि सक्तीने धर्मान्तर करण्याचे पद्धतशीर प्रयत्न करण्यात आले.[१४२] हिंदूंनी स्वखुषीने धर्म स्विकारावा म्हणून त्यांना बक्षिशी आणि नोकरी चाकरीची प्रलोभने दाखविली जात. धर्मान्तराच्या या योजनेवर शहा मीर लाहोरी आणि मुहिब अली सिन्धी यांची खास नियुक्ती करण्यात आली होती.[१४३] अशा प्रकारे बाटलेल्या व्यक्तिना बादशहासमोर हजर केले जाई आणि बादशहा त्यांच्यावर पदव्या आणि मानसन्मान यांची खैरात करी किंवा त्यांना खास भत्ता नियुक्त करुन देई. मुसलमान धर्म स्विकारु नये यासाठी आपल्या नातेवाईकावर दबाव आणण्यास अथवा त्याना परावृत्त करण्यास हिंदूना सख्त मनाई करण्यात आली होती.[१४४] आमिरउमरावामधे झालेली दोन धर्मान्तराची उदाहरणे विशेष उल्लेखनीय आहेत. राजसिंग कचवाह याचा मुलगा राजा भक्तवार सिंग याने मुसलमान धर्म स्विकारल्यावर त्याला मानाचा पोषाख आणि दोन हजार रुपये देण्यात आले; आणि त्याचा मुलगा पुरुषोत्तमसिंग याने धर्मान्तर केल्यावर त्याला सादतमंद ही पदवी बहाल करण्यात आली.[१४५]

सरकारी अधिकाऱ्यांची बदली वा बडतर्फी त्यांच्या वैयक्तिक धार्मिक दृष्टिकोनामुळे करण्यात आल्याची दोन उदाहरणे कागदोपत्री सापडतात. लष्करखानाची काबूलहून बदली करण्यात आली कारण धार्मिक तत्वाबद्दल त्याची ढिलाईची वागणूक ही तेथील लोकांना असह्य झाली;[१४६] आणि जलालुद्दीन तबातबाई याने दिलेल्या हकीकतीनुसार तनच्या दफ्तरदारीवरुन राय मायदास याची तो हिंदू असल्यामुळे हकालपट्टी करण्यात आली. त्याच्या जागी मुल्ला अबदुल लतीफ गुजराती याला नेमण्यात आले.[१४७]

**धार्मिक धोरणाला पडलेल्या मर्यादा**

परंतु धर्मासंबंधी हे जे असहिष्णु वृत्तीचे धोरण होते ते कृतीत उतरविणे फक्त राजधानी नजिकच्या प्रांतामधेच शक्य होते. साम्राज्याच्या सर्व भागात तितक्याच

जोरदारपणे या धोरणाचा पाठपुरावा करणे केवळ अशक्यप्राय होते आणि म्हणून काही ठिकाणी हिंदूंबरोबर समझोता करण्यात आला. कॅम्बे मधे गाईंची हत्या करण्यास मनाई करण्यात आल्याचा उल्लेख डेल्ला व्हॅले करतो पण त्यासाठी हिंदूंना जबरदस्त दंड पडल्याचेही तो पुढे सांगतो.[१४८] हिंदूंना पवित्र असलेल्या जनावरांना मारण्यावर प्रामुख्याने हिंदू वस्ती असलेल्या जिल्ह्यात कडक निर्बंध असल्याचा मॅनरिक उल्लेख करतो.[१४९] ओरिसामधून प्रवास करीत असताना त्याच्या एका अनुयायाकडून एक मोर मारला गेला. याबद्दल हात तोडण्याची त्याला देण्यात आलेली शिक्षा चाबकांचे फटके मारण्यावर निभावून नेण्याचे काम त्याला मोठ्या मुष्किलिने करता आले.[१५०] यात्रेकरुवर कर बसवण्यात आल्याचाही उल्लेख तो करतो.[१५१]

**शहाजहानकाळीन प्रशासनाचा सर्वसामान्य आढावा**

शहाजहानच्या प्रशासकीय कारभाराच्या बाह्यस्वरुपात तरी जोश आणि चेतना ही दृष्टीत्पत्तोस येत होती. बाल्ख, कन्दहार आणि दक्षिण या प्रान्तांमधील मोहिमा आणि साम्राज्यान्तर्गत प्रस्थापित असलेली शांतता ही तत्कालीन शासनाचे स्थैर्य सिद्ध करण्यासाठी सबळ पुराव्यासारखी आहेत. नोकरीमधील बढती ही हळू आणि सावकाशीने मिळत असे याबद्दल बर्निअर आणि मनुची यांनी केलेले प्रतिपादन कार्यक्षमतेकडे निश्चितपणे लक्ष दिले जात असल्याचा दाखला आहे.[१५२] शहाजहानच्या कडक न्यायप्रियतेची मनुचीने अनेक उदाहरणे दिली आहेत आणि टॅव्हर्निअरच्या वृत्तान्ताने याला पुष्टि मिळते. तो असे सांगतो की शहाजहानच्या कारकिर्दीतील धोरण इतके कडक होते आणि विशेषत: रस्त्यावरील सुरक्षिततेबाबत की, चोरी केल्याच्या आरोपावरुन एकाद्या माणसाला फाशी देण्याची जरुरच कधी पडत नसे.[१५३] उपलब्ध असलेल्या या पुराव्याच्या आधारे आपण असे अनुमान काढले की, या काळापर्यंत तरी मोगल शासनाला न्याय दक्षतेबद्दल आत्मियता होती आणि जोपर्यंत लोकांच्या हितसंबंधाचे सरकारी धोरणाशी वावडे नव्हते तोपर्यंत शासन या हितसंबंधाना जपत असे तर त्यामध्ये फारशी अतिशयोक्ति होणार नाही.

परंतु शहाजहानची कारकीर्द एक विरोधाभासात्मक चित्र उभे करते. एका बाजूला भपका आणि मोठेपणा यांचे विलक्षण असे प्रदर्शन तर दुसरीकडे उघडउघड दिसून येणारी ऱ्हास आणि अवनती यांची निशाणी. आतापर्यंत आपण आढावा घेतला तो पहिल्या बाजूचा; आता आपण याच कारकिर्दीची दुसरी बाजू पडताळून पाहू. अगदी थोडेसे समीक्षण जरी केले तरी शासनाची अशी अधोगती का होत

गेली तिचे मूळ आपल्याला सहज दिसून येईल; आणि ते मूळ प्रशासकीय यंत्रणेत ज्या दुष्प्रवृत्तीचा बुजबुजाट झाला होता त्यात आढळेल. यापैकी काही दोष हे परंपरेने प्रशासकीय यंत्रणेत दृढमूल होऊन गेले होते परंतु त्यातील बहुसंख्य दोषांचा उगम हा सावधगिरी आणि दूरदृष्टि यांच्या असलेल्या अभावात आपल्याला आढळेल. या ज्या उणीवा होत्या त्यांची वाढ थोडी का होईना पण निश्चितपणे होत होती, आणि या उणीवानींच अखेर मोगल साम्राज्याचा विनाश घडवून आणला.

**लष्करी पद्धतितील उणीवा**

साऱ्या साम्राज्याची मदार ज्या लष्करी पद्धतीवर आधारलेली होती तिच्यात आता ढिलाई शिरली होती. शिस्तीचा संपूर्ण अभाव[१५४], एकट्ठा आणि आखलेल्या डावपेचांची क्वचितच होणारी तालीम[१५५] आणि हत्तीदलावर नको तेवढे परावलंबीत्व[१५६] यामुळे लष्करी पद्धतित ज्या मूलभूत उणीवा निर्माण झाल्या होत्या त्याव्यतिरिक्त फार मोठ्या आणि गंभीर अशा समस्यानी लष्करी पद्धतिला कीड लागलेली होती. जहागिरी पद्धतिची वाढविण्यात आलेली व्याप्ती आणि त्यामुळे दाघ-ओ-ताशिह या खात्यात निर्माण झालेला निष्काळजीपणा यामुळे मनसबदारी पद्धतिच्या कार्यक्षमतेवर अतिशय विपरीत परिणाम झाले होते. अतिरिक्त मानसन्मान गोळा करण्याची जी प्रवृत्ति बळावली होती त्यामुळे गोंधळात आणखी गोंधळाची परिस्थिती निर्माण झाली. त्याशिवाय याच कालखंडात अल्पवयीन वारसाला मनसब आदा करण्याची अपायकारक आणि दुष्ट पद्धति अस्तित्वात आली.[१५७] या ठिकाणी एक गोष्ट मान्य करावयास पाहिजे आणि ती ही की, मृत अधिकाऱ्याच्या सेवेची काहीतरी परतफेड करणे आणि दखल घेणे आवश्यक होते परंतु या अधिकाऱ्याची मनसब त्याच्या अल्पवयी वारसाकडे लावून देणे ह्या गोष्टीमुळे कोणत्याही परिस्थितीत प्रशासनाचा दर्जा उंचावला जाण्यास मदत होणार नव्हती.

त्याशिवाय सैन्याच्या आकारात फार मोठ्या प्रमाणात वाढ झालेली होती. आणि जरी या सैन्याने साम्राज्यांतर्गत आपले काम चोख बजावले होते, तरी परकी सत्तां विरुद्ध, विशेषतः पर्शियन सत्ते विरुद्ध या सैन्याची कामगिरी उपेक्षणीय होती. खरोखर पाहिले असता शूर आणि कणखर योद्धयांची निश्चितच वाण नव्हती, परंतु त्यांची साधनसामुग्री अवजड आणि आवाक्याबाहेर झाली होती. परिणामी सैन्याची वाटचाल अगदी कूर्मगतीने होई,[१५८] आणि अकबराने गुजरातमधे चाल करुन जातेवेळी जी विलक्षण करामत करुन दाखविली होती त्याची पुनरावृत्ती आता अशक्यप्राय होती. शिवाय या सैन्याच्या मोकळ्या प्रदेशात

युद्ध खेळण्याच्या कुवतीबाबत शंकेला जागा नव्हती, परंतु तुटी फुटी जमिन आणि डोंगराळ प्रदेशात हे सैन्य परिणामकारक कामगिरी करण्यास असमर्थ होते. अहमदनगरला नमविणे सहज शक्य होते याचे कारण मोगलांचे सैन्यबळाच्या बाबतीत निर्विवादपणे वरचस्व होते; आणि तरी देखिल ही गोष्ट साध्य झाली ती बऱ्याच कालहरणानंतर. तथापि बाल्खमधील मोहिमेत संख्या बलातील श्रेष्ठत्व हे मोगलांच्या फारच थोडे कामास आले.

### महसूल प्रशासनातील भोंगळपणा

सैन्याप्रमाणेच महसूलाच्या प्रशासनाच्या बाबतीतदेखिल ही ढिलाई मागील बाजूने शिरली होती. राज्याच्या महसुलाने ४० कोटी रुपयांची सीमा गाठली होती हे जरी खरे असले तरी अकबर ज्या कारणासाठी बराच काळ आणि श्रम करित झगडला ते म्हणजे शासन आणि प्रजा यामध्ये प्रत्यक्ष निर्माण होणारी अनुभूति, तीमात्र पूर्णपणे नाहीशी झाली. त्याशिवाय वर सांगितल्याप्रमाणे शेतकऱ्यावरील करांचे ओझे अढीतिढीने वाढले. आणि जमिन ही मशागतीखालून हळूहळू कमी होऊ लागली हे बर्निअर याने केलेले विधान सत्य परिस्थितीला फारसे सोडून नाही.[१५९]

### लाचलुचपत

परंतु प्रशासन पद्धति धडाकून खिळखिळी करणारी आणखी एक दुष्ट प्रथा म्हणजे बादशहा आणि जेष्ठ सरकारी अधिकारी यांना नजर अथवा नजराणा देण्याची बोकाळलेली वहिवाट. या वहिवाटीची प्रथा प्रथम पाडली ती नूरजहानने आणि जहांगीरच्या काळात तिच्या लोकप्रियतेने तर उधाण गाठले; परंतु शहाजहानचे कारकिर्दीत या वहिवाटीने अगदी खालची पातळी गाठली. स्वखुषीने दिलेली भेट असे असलेले तिचे मूळ स्वरुप जाऊन तिला आता सख्तीच्या देणगीचे स्वरुप आले; परिणामतः बादशहा हर एक औपचारिक प्रसगांचे वेळी आपल्या दरबारी मंडळीकडून नजराण्यांची अपेक्षा करु लागला आणि हीच दरबारी मंडळी या नजराण्यांची वसुली त्यांच्या दुय्यम पदाधिकाऱ्यांकडून जुलुम जबरदस्ती करुन करु लागली. लपूनछपून देण्यांत येणारी लाच असाच या नजराण्यांचा अर्थ झाला आणि जवळ जवळ प्रत्येक युरोपियन प्रवासी[१६०] या घटनेची नोंद घेतो आणि अतिशय कडक भाषेत तिची निर्भत्सना करतो.

### इतर आशियाई सत्तांबरोबरील संबंध

या प्रकरणाचा समारोप मोगल शासनाचे इतर आशियाई राष्ट्रे आणि साम्रा-

ज्यान्तर्गत व्यापार उदीम करणारे युरोपियन व्यापारी यांच्या बरोबरील संबंधाचे थोडक्यात समालोचन करून केल्यास ते सयुक्तिकच ठरेल. आपण यापूर्वीच्या प्रकरणात मोगलांच्या पर्शिया आणि ट्रान्स ऑक्सियाना या बरोबरील संबंधाची चर्चा केलेली आहे आणि आता या प्रकरणाच्या समारोपात हिंदुस्थानी मोगल सम्राटांचे तुर्कस्तानचा सुलतान आणि मक्केचा शरीफ यांच्या बरोबर काय संबंध होते त्याचा आढावा घेण्यात आला आहे.

**तुर्कस्तान बरोबरील संबंधाची सुरुवात**

तुर्कस्तान आणि मोगल शासन यांच्या मधील परस्पर देवाण घेवाणीची सुरुवात मोठ्या चमत्कारिक परिस्थितीने झाली. जरीफ नावाच्या घोड्याच्या व्यापारात वाकबगार असलेल्या एका इसमाने १६३७ मध्ये शहाजहानकडून शाही पागेसाठी उत्तम पैकी घोडे पैदा करण्यासाठी अरेबिया आणि तुर्कस्तान या देशांना भेट देण्याची परवानगी मिळविली[१६१] शहाजहानने अफजलखान याला बायझंटाईनच्या सुलतानाच्या प्रधान मंत्र्याला एक पत्र लिहीण्यास सांगून त्यात जरीफची सुलतानापाशी शिफारस करण्याचा हुकूम दिला. त्याशिवाय, बादशहाने सुलतान मुराद चौथा याला देण्यासाठी एक पत्र आणि एका तलवारीचा समावेश असलेल्या भेटी दिल्या.

**तुर्कस्तानमधे जरीफ**

जरीफ याने लाहिरी बंदर येथून प्रवासास सुरुवात केली आणि मक्का आणि इजिप्त मधून प्रवास करीत तो मुसल येथे आला. यावेळी बायझंटाईनच्या सुलतानाचा मुक्काम मुसल येथे होता. या ठिकाणी जरीफ याने सुलतानाकडे हजेरी लावली. शहाजहान याने जे पत्र दिले होते त्यामुळे सुलतान खुष झाला परंतु सुलतानाला अधिक आनंद झाला तो शहाजहान याने त्याला जी हिरेजडीत तलवार पाठविली होती त्यामुळे. यावेळी मुरादची बगदादवरील मोहिमेची पूर्ण तयारी झाली होती आणि मोहिम हाती घेण्याचे क्षणी शहाजहानकडून भेटीदाखल आलेली तलवार त्याने अतिशय शुभदायी म्हणून मानली. आपण मोहिमेवरुन परत येईपर्यंत मुरादने जरीफ याला मुसल येथेच मुक्काम करुन राहण्यास सांगितले.[१६२]

**अर्सलान आकाची हिंदुस्थानात रवानगी**

मोहिमेवरुन परतल्यानंतर मुरादने अर्सलान आका याची खानगी मोगल दरबारातील आपला वकील म्हणून केली. त्याच्याबरोबर जरीफ हा देखिल हिंदु-

स्थानात परतला. बसरा ते थत्तापर्यंत त्यानी समुद्रमार्गे प्रवास केला. एप्रिल १६४० मधे तुर्कस्थानच्या तसुलतानाच्या वकीलाने काश्मिरमधे शहाजहानची भेट घेतली. असलान आका जवळ जवळ आठ महिने हिंदुस्थानात राहून आपल्या देशाला परतला.[१६३]

## सय्यद मुहीउद्दीन याचे आगमन

यानंतरच्या दहा वर्षात तुर्कस्तान आणि हिंदुस्तान या देशांमधे वकिलातीचे संबंध आले नाहीत. १६५० मध्ये सुरतेच्या अधिकाऱ्यांनी तुर्कस्तानचा वकील सय्यद मुहीउद्दीन याचे आगमन झाल्याचे बादशहाला कळविले.[१६४] उत्तरेकडे होणाऱ्या या वकिलाच्या प्रवासात वेगवेगळ्या टप्प्यांवर सय्यद मुहीउद्दीन याचे आगत – स्वागत करण्यासंबंधीचे सविस्तर वटहुकूम शहाजहानने जारी केले. सय्यद मुहीउद्दीन याला १०००० रुपयांची थैली नजर करण्याचा हुकूम सुरतेच्या अधिकाऱ्यांना देण्यात आला. सय्यदच्या प्रवासात उज्जैन आणि दिल्ली येथेही त्याला अशाच थैल्या नजर करण्यात आल्या. बुरहाणपूर आणि मांडू येथे त्याला प्रत्येकी २००० रुपये नजर करण्यात आले. १६५१ मधे बादशहाने त्याला निरोप दिला.

## अहमद सैदची तुर्कस्तानकडे रवानगी

हिंदुस्थानतर्फे तुर्कस्तानकडे वकील म्हणून हाजी अहमद सैद यास पाठविण्यांत आले.[१६५] सुलतान अहमद याल लिहिलेल्या पत्रात शहाजहान याने बाल्ख आणि बदक्षान या प्रांतात घडलेल्या घटनांची इत्यंभूत हकीकत लिहून कळविली आणि आपल्या स्वतःच्या भूमिकेचे समर्थन धार्मिक बाबीच्या नावाखाली केले.[१६६] ११ जून, १६५३ मधे हाजी अहमद सैद याची तुर्कस्तानच्या सुलतानाने भेट घेतली.[१६७]

## जुल्फिकार आका याची हिंदुस्थानात पाठवणी

यानंतर सुलतान महमद याने जुल्फिकार आका याला आपला वकील म्हणून हिंदुस्थानात रवाना केले[१६८] त्याच्याबरोबर सोबत म्हणून हाजी अहमद सैद हा बसऱ्यापर्यंत गेला आणि तेथून दोघाजणानी आपापले मार्ग चोखाळले. तुर्कस्तानच्या वकीलाने बसरायेथून आपला प्रवास सुरु केला आणि तो डिसेंबर, १६५३ मधे सुरत येथे येऊन पोहोचला. सय्यद मुहीउद्दीन प्रमाणेच जुल्फिकार आका याचे स्वागत करण्यात आले आणि मार्च, १६५४ मधे

तो बादशहासमोर हजर झाला. सुलतान महमद याने आपल्या पत्रात[१६९] नजर महमद खान याने मदतीकरता केलेल्या विनंतीचा आणि शहाजहान विरुद्ध त्याने केलेल्या अटीतटीच्या तक्रारींचा उल्लेख केलेला होता. परंतु हाजी महमद सैद याच्या बरोबर पाठविलेल्या पत्रात शहाजहानने आपल्या वर्तनाचे जे समर्थन केले होते त्याबद्दल समाधान व्यक्त केले होते.

## कैम बेगची तुर्कस्तानकडे वकिलात.

सुलतान महमद याच्या पत्रातील सूर एकाद्या आश्रयदात्याला पत्र लिहावे असा होता. त्यामुळे शहाजहान याला आपला अपमान झाला आहे असे वाटले आणि ऑगस्ट, १६५४ मधे कैम बेग याजबरोबर पाठविलेल्या आपल्या उत्तरात[१७०] त्याने सुलतान महमद याने ज्या पद्धतिने पत्र लिहिले होते त्यावर कडाडून टीका केली, याच्या तरुण पणाबद्दल आणि त्याच्या सल्लागार मंडळाच्या अननुभवीपणाबद्दल त्याला सपाटून टोमणे मारले. यानंतर शहाजहानची कारकीर्द संपुष्टात येईपर्यंतच्या कालखंडात तुर्कस्तान आणि हिंदुस्थान यांच्यामधे वकीलांची देवाणघेवाण झाल्याचा कुठेही उल्लेख नाही.

## मक्का

शहाजहानच्या कारकिर्दीत मक्का आणि मेदिनाचा शरीफ आणि तेथील प्रजाजन यांचा लाभ व्हावा म्हणून मोठमोठ्या रकमा आदा केल्या जात असत.[१७१] शहाजहान गादीवर आल्यापासून १६५१ पर्यंत मक्केला त्याने जवळ जवळ १० लाख रुपये पाठविल्याचे महमद वारीस आपल्या वृत्तान्तात सांगतो.[१७२] हे पैसे पाठविण्याची पद्धत देखिल चमत्कारिक होती कारण एकादा अधिकारी जेव्हा मक्केची तीर्थयात्रा करण्यासाठी प्रयाण करीत असे तेव्हा त्याच्याबरोबर बऱ्याचशा वस्तु दिल्या जात. या वस्तूंची विक्री जेव्हा मक्का येथे होई तेव्हा या विक्रीपासून १०० टक्के नफा होत असे. हा नफा आणि मूळ मुद्दल यांची विभागणी मक्का आणि मेदिनाचा शरीफ आणि तेथील गरीब आणि निर्वासित यांच्यामधे केली जाई.

## युरोपिय व्यापारी: पोर्तुगीज

या कालखंडात हिंदुस्थानातील पोर्तुगीज सत्तेचा अतिशय झपाट्याने ऱ्हास होत गेला तर डच आणि इंग्रज यांच्या सामर्थ्यात वाढ होत गेली. अकबराच्या कारकिर्दीतील छोटासा कालखंड वगळता पोर्तुगीजांना मोगलांबरोबर सलोख्याचे संबंध टिकवता आले नाहीत. खरे सांगावयाचे झाल्यास मोगलांच्या

व्यापारी जहाजांना आपल्य ताब्यात घेऊन किंवा मक्केला यात्रेकरु घेऊन जाणारी जहाजे अडवून पोर्तुगीज मोगलांपासून सवलती उक्ळीत असत. हिंदुस्थानातील कोणतेही जहाज पोर्तुगीजांचा परवाना असल्याखेरीज प्रवेश करु शकत नसे आणि या परवान्यांसाठी दमण आणि दीव येथील पोर्तुगीज अधिकारी भरमसाट पैसे आकारीत असत.[१७३] परिणामी पोर्तुगीज म्हणजे न टाळता येणारे संकट आहे आणि त्याचा निःपात करता येत नाही म्हणून त्यांचे अस्तीत्व सहन करणे भाग आहे अशी मोगलांनी आपली धारणा करुन घेतली होती.

१६३० मधे गोव्याचा गव्हर्नर कॉण्डे द लिन्हारेस याने आपला एक प्रतिनिधी सुरत येथे पाठवून असा प्रस्ताव मांडला की, मोगलानी सुरतेमधून इंग्रज आणि पोर्तुगीज यांची हकालपट्टी केल्यास पोर्तुगीज सुरत येथे आपल्या वखारीची स्थापना करतील इतकेच नव्हे इंग्रज आणि डच यांच्या इतकाच व्यापारउदीम सुरतेमधे आणतील. परंतु त्यासुमारास पोर्तुगीजानी नुकतेच एक हिंदुस्थानी गलबत पकडल्यामुळे त्यांच्या विरुद्ध सुरतेमधे भावना फार प्रक्षुब्ध झाल्या होत्या. यात आणखी भर म्हणून की काय त्यांनी मुसाई नावाचे आणखी एक हिंदुस्थानी जहाज पकडले होते आणि शाही नावाचे दुसरे जहाज ताब्यात घेण्याचा त्यांचा इरादा असल्याची बातमी होती. परंतु इंग्रजांबरोबर दोस्ती करण्यात सुरतेच्या व्यापाऱ्याना यश आले आणि इग्लंडमधून रस्टेल नावाचा इंग्लिश कप्तान आरमारी ताफा घेऊन येत होता त्याने पोर्तुगीजांच्या कचाट्यातून हिंदुस्थानी गलबताची सुटका केली.[१७४]

दरम्यान दक्षिणेमधे मुक्काम करुन असलेल्या शहाजहानला पोर्तुगीजांच्या या वर्तनाची विलक्षण चीड आली आणि त्याने विजापूरच्या आदिलशहाला गोव्याची नाकेबंदी करण्यासाठी चिथावणी दिली. ही नाकेबंदी आणि सिलोनमधे पोर्तुगीजांना बसलेला नुकसानीचा तडाखा यामुळे पोर्तुगीजांची धुंदी उतरली आणि त्यांनी सुरतेच्या अधिकाऱ्यांबरोबर तडजोड केली. त्यांनी मुसाई गलबताचा ताबा मोगलांकडे दिला, डच आणि इंग्रज यांची हकालपट्टी करण्याची मागणी मागे घेतली. याबदली सागरी वाहतुकीसाठी दस्तक देण्याच्या त्यांच्या हक्काला मंजुरी देण्यात आली आणि जमिनीवरील त्यांची जी मालमत्ता जप्त करण्यात आली होती ती त्याना परत करण्यात आली.

आता यानंतर पोर्तुगीजांच्या मनात एकच भिती घर करुन राहिली आणि ती म्हणजे शहाजहानने जर विजापूरचा पाडाव केला तर त्यांच्या गोव्यामधील सुरक्षिततेला धोका निर्माण होणार होता ही.[१७५] पोर्तुगीजांचा हा अंदाज

खरा ठरला आणि जेव्हा शहाजहानने १६३५ मधे दक्षिणेवर आक्रमण केले तेव्हा स्पेनच्या राजाने गोव्यामधील आपल्या अधिकाऱ्यांना विजापूर आणि अहमदनगर या दोन्ही राज्यांच्या सुलतानांना मदत देण्याची आज्ञा दिली. १६३८ मधे पोर्तुगीज आणि मोगल यांच्यात वैमनस्याची ठिणगी उडाली आणि मोगलांनी दमण आणि दीवला वेढा दिला.[१७६] परंतु सुरत येथील इंग्लीश फॅक्टरीचा प्रमुख प्रेसिडेंट फ्रेमलीन याच्या मध्यस्तीने दोन्ही पक्षात समझोता घडून आला.[१७७]

डच

या घटना घडत असताना पोर्तुगीजांची सागरी सत्ता आणि व्यापारामधील वर्चस्व यांना ओहोटी लागली आणि पोर्तुगीजांच्या ऐवजी या गोष्टींवर डचांनी कबजा केला. डचांची पहिली फॅक्टरी सुरत येथे पीटर व्हॅन डेन ब्रोएके याने स्थापन केली आणि दोन वर्षानंतर पीटर गिलेत्झव्हॅन रॅव्हेस्टीन याने गुजरातचा तात्कालीन सुभेदार राजपुत्र शहाजहान याजकडून व्यापार करण्याबाबत अतिशय समाधानकारक हक्क आपल्या पदरात पाडून घेतले.[१७८] जहांगीरच्या कारकिर्दीच्या अखेरीपर्यंत डचानी शांततापूर्ण मार्गाने आपली व्यापार विषयक जबाबदारी पार पाडली आणि नंतर राज्यारोहणासाठी जेव्हा शहाजहान याने जुन्नरहून आग्याकडे प्रयाण केले तेव्हा डचांनी त्याला नजराणे आदा केले आणि शहाजहानने पण त्यांची योग्य ती संभावना केली.[१७९] परंतु मार्च १६२८ मध्ये आग्रा येथील त्यांच्या फॅक्टरला बादशहाच्या परवानगीवाचून सोरामीठ खरिदल्यामुळे कारावासात टाकण्यात आले. परंतु थोडीशी चतुराई वापरुन लाच देऊन त्यानी आपल्या फॅक्टरची सुटका करुन घेतली.

१६३५ मधे आतापर्यंत सलोख्याचे असलेले डच आणि इंग्लिश यामधील स्नेह संबंधात इंग्रजांनी पोर्तगीजांबरोबर तह केल्याने तणाव निर्माण झाला.[१८०] डच फॅक्टरीचा प्रमुख पिटर्सझन याने सुरतेच्या सुभेदाराला दरबाराकडे इंग्रजांबद्दल प्रतिकूल अहवाल पाठविण्यास उद्युक्त केले. उत्तरादाखल डचांना सवलती देण्याची मोगलानी तयारी दाखविली. पण त्याकरता अशी अट त्यांच्यावर घालण्यात आली की त्यानी दमण आणि दीवमधून पोर्तुगीजांचे उच्चाटन करावे आणि तेव्हा जलमार्गावर असलेला इंग्रज आणि पोर्तुगीज यांचा ताबा स्वतःकडे घेऊन सुरतेमधून समुद्रमार्गाने होणाऱ्या सर्व व्यापार उदीमाचे नियमन त्यांनी करावे. पिटर्सझनचा कल या अटी मान्य करण्याकडे होता, परतु त्याच्या बटाव्हिया येथील वरीष्ठ अधिकाऱ्यांनी अशा प्रकारचा कोणताहि समझोता मोगलांबरोबर करण्याची त्याला मनाई केली. अखेर त्याची मोगल अधिकाऱ्यांबरोबर ज्या मुद्यांवर तडजोड झाली

यतानुसार डचांना निळीचा खुला व्यापार करण्याची परवानगी देण्यात आली आणि त्यानी एक कोटी २० लक्ष रुपयांची रक्कम अनामत म्हणून ठेवावी असे ठरले. त्याशिवाय त्यांना गलबते बांधण्यास आणि स्वाली व्यक्तिरिक्त इतर कुठेही गलबते नांगरण्यास मज्जाव करण्यात आला.

अशा प्रकारच्या अनुकूल परिस्थितीत डचांच्या व्यापारात फार मोठ्या प्रमाणावर वाढ झाली आणि त्यानी इंग्रज आणि पोर्तुगीज यांना केव्हाच मागे टाकले. १६४२ मधे त्यानी एक शिष्टमंडळ दरबाराकडे रवाना केले. या मंडळाला बादशहाकडून आणखी किफायतशीर अधिकार आणि हक्क आपल्या पदरात पाडून घेण्यात यश प्राप्त झाले परंतु नंतरच्या सहा वर्षात इतक्या कटकटी निर्माण झाल्या की त्यामुळे डच आणि मोगल याना एकंदर परिस्थिती असमाधानकारक असल्याची जाणीव झाली. डचांनी टीनच्या व्यापारात मक्तेदारी मिळविण्याचा प्रयत्न केला. ते गुजराती व्यापाऱ्यांना न मानवल्यामुळे त्यांनी डचांविरुद्ध बादशहाकडे तक्रार केली.[१८२] तर दुसरीकडे शायस्ताखानाने डचांची पिळवणूक करुन त्यांना प्रचंड नुकसानीत आणले आणि प्रांतिक अधिकाऱ्यांनी त्याना सर्व बाजूने त्रास देण्यास सुरुवात केली. १६४८ मधे डचानी जॅन टॅक याला आपल्या गाऱ्हाण्यांची दाद लावून घेण्यासाठी दरबारात रवाना केले. यावर बादशहाने शायस्ताखानाला खडसावले आणि डच व्यापाऱ्यांची मालमत्ता परत करण्याचा सुरतेच्या अधिकाऱ्यांना हुकूम दिला; परंतु जॅन टॅक याने बंगालमधे व्यापाराबाबत खास सवलती देण्याची केलेली विनंती मात्र फेटाळून लावण्यात आली.

दरम्यान सुरतेमधे मोगलांनी डचांवर जुलुम केल्याचे वृत्त जेव्हा बटाव्हियाच्या अधिकाऱ्यांना कळले तेव्हा त्यानी मोगल आणि त्याचबरोबर इंग्रज या दोघांवरही सूड घेण्यासाठी एका आरमारी ताफ्याची रवानगी केली. या ताफ्याच्या कप्तानाने मोगलांचे एक जहाज अडवले आणि डचांच्या सर्व गाऱ्हाण्यांची दाद लावण्यात यावी अशी मागणी केली. परिणामी सुरतेच्या अधिकाऱ्यांनी डचांचे झालेले नुकसान पूर्णपणे भरुन देण्याचे कबूल केले, आचीनमधे खुला व्यापार करण्याची त्यांची मागणी सोडून देण्यास मान्यता दिली, खास गुदामामधे डचांना आपला माल भरुन ठेवण्याची परवानगी मंजूर केली आणि बंगाल आणि ओरिसामधे डचांच्या ज्या काही तक्रारी होत्या त्या दूर करण्याबद्दल दरबाराकडे कार्यवाही करण्याचे आश्वासन दिले.

यानंतर जॅन टॅक याने दुसऱ्यांदा दिल्लीला प्रयाण केले आणि यावेळी शहाजहानने पूर्वीपेक्षाही अधीक मानसन्मानाने त्याची भेट घेतली. पुढील वर्षी शत्ताह

येथे व्यापार करण्याची डचाना परवानगी देण्यात आली.[१८३] परंतु डचांच्या सगळ्याच गाऱ्हाण्यांची, विशेषत: त्यांच्या बंगालमधील प्रतिनिधींना जी वागणूक दिली जात होती त्याची अजून दखल घेतली गेली नव्हती; म्हणून मोगलांकडे तिसरे एक शिष्ट मंडळ पाठविण्याचा निर्णय घेण्यात आला. या मंडळाचे प्रतिनिधित्व जॅन टॅक आणि जॅन वेर्कहाऊट यांजकडे होते. ते राजधानीत पोहोचले तेव्हा बादशहा तिथे नव्हता, त्यामुळे बादशहाची वाट पहात त्याना तेथे रखडून रहावे लागले.

शहाजहान दिल्ली येथे परतल्यावर डच प्रतिनिधींनी दरबारातील काही प्रमुख उमरावमंडळींना फितविले. यात जहान आरा होती कारण सुरतेवर तिचा मालकीहक्क होता. ३१ डिसेंबर, १६५२ रोजी डच प्रतिनिधी मंडळाला बादशहासमोर हजर करण्यात आले. जकातीपासून सूट मिळावी अशी त्यांची मागणी फेटाळून लावण्यात आली परंतु त्यानी एकठाक रुपये ५५००० भरावे असे त्याना सांगण्यात आले. भरताड मालावरील लादलेली बंधने दूर करण्याची आणि मोगलांकडे पळून आलेल्या आणि धर्मान्तरीत अशा डच आश्रिताना आपल्या ताब्यात देण्याची अशा त्यांच्या दोन्ही मागण्यांची मोगल दरबारने दखल घेण्याचेही नाकारले. परंतु बंगालमधे रस्त्यांवर वसूल केल्या जाणाऱ्या जकातीपासून सूट देणारे फर्मान काढण्याचे आश्वासन त्याना देण्यात आले आणि त्याचप्रमाणे स्वालीमधे एक इमारत बांधण्याची आणि सुरत येथे गलबते दुरुस्त करण्याची आणि बांधण्याची परवानगी त्याना देण्यात आली. याच्या बदली आचीन आणि डचांच्या नियंत्रणाखालील इतर प्रदेश याकडे जाणाऱ्या हिंदुस्थानी जहाजांना मुक्त परवाने देण्याचे डचांनी कबूल केले.

दिल्लीमधील राहाणीमान महागाईचे असल्यामुळे टॅक आणि वेर्कहाऊट हे आग्ऱ्याला परतले परंतु जेव्हा त्याना ठरल्याप्रमाणे फर्मान मिळाली तेव्हा ती अतिशय असमाधानकारक असल्याचे त्याना आढळून आले. वेर्कहाऊट हा परत दिल्लीला येण्यासाठी निघाला परंतु त्याने बरोबर भेटी आणलेल्या नसल्यामुळे बादशहाने त्याची भेट घेण्याचे नाकारले; यानंतरच्या शहाजहानच्या कारकिर्दीच्या कालखंडात डच आणि मोगल यांचे परस्परामधीलसंबंध असेच हळूहळू बिघडत गेले. बंगालमधे राजपुत्र शुजापासून जॅन हर्पूरटेन याने व्यापाराबाबत काही खास सवलती मिळविण्याचा प्रयत्न केला, परंतु ही बाब अद्यापिही मोगल दरबाराच्या विचाराधीन असल्याने, शुजाने हस्तक्षेप करण्याचे नाकारले. १६५६ मधे जॅन टॅक चौथ्यांदा आग्ऱ्याहून डचांची जी गाऱ्हाणी होती त्यांची दाद लावून घेण्याचा प्रयत्न करण्यासाठी दिल्लीला गेला.[१८४]

व्यापार आणि सागरी वर्चस्व या दोन बाबतीत डचांचे अतिशय कट्टर प्रतिस्पर्धी इंग्रज होते. त्यांचे हिंदुस्थानात आगमन यापूर्वीच झाले होते आणि ते सावकाश का होईना पण आपला व्यापार वृद्धिंगत करीत होते. जहांगीरच्या कारकिर्दीच्या अखेरीस त्यांचे मोगल दरबारातील प्रतिनिधीत्व बंगहॅम आणि क्लेमेन्टस् हे दोघेजण करीत होते. क्लेमेन्टस् हा आग्रा येथील इंग्रज फॅक्टरीचा उपप्रमुख होता. डिसेंबर, १६२७ मधे आग्र्याकडे प्रयाण करण्यासाठी शहाजहान जेव्हा गुजराथमध्ये आला, तेव्हा सुरतेच्या फॅक्टरीचा प्रेसिडेंट केरीज हा भडोच येथे नजराणा घेऊन त्याच्या भेटीस गेला.[२८५] आग्रा येथे बंगहॅम आणि क्लेमेन्टस् हे दोघे जण नवोदित सम्राटाचे अभिनंदन करण्यासाठी गेले. मार्च, १६२८ मध्ये डचांना ज्या आरोपावरुन कैद करण्यात आले होते त्याच आरोपावरुन दोघांना बंदिस्त करण्यात आले, परंतु लवकरच दोन्ही पक्षात सलोख्याचे संबंध प्रस्थापित झाले. एक वर्षानंतर सिंधमधे फॅक्टरीची स्थापना करण्यासाठी इंग्रजांना पाचारण करण्यात आले; १६३० मधे रस्टेल याने एक मोगलांचे जहाज पोर्तुगीजांच्या हातात पडण्यापासून वाचवले.[१८६]

१६३०–३१ मधे पडलेल्या दुष्काळाचा इंग्रजांच्या व्यापाराला जबरदस्त तडाखा बसला. एक सूरत वगळता दक्षिणेमधील आपल्या सर्व फॅक्टऱ्या बंद करणे त्यांना भाग पडले. बाजारातील मंदीमुळे त्यांचे जे आर्थिक नुकसान झाले होते त्यात आणखी भर पडली कारण हिंदुस्थानी व्यापाऱ्यांनी निळीच्या व्यापाराची मक्तेदारी आपल्याकडे घेण्याचा प्रयत्न केला; याचवेळी इंग्रजांबरोबर शत्रुत्वाने वागणाऱ्या सुभेदाराची सुरतेला नेमणूक झाल्यामुळे परिस्थिती अधिकच चिघळली.[१८७] १६३५ मधे इंग्रजांच्या फॅक्टरीचा प्रेसिडेंट मेथवोल्ड याने पोर्तुगीजांबरोबर तडजोड केली आणि आपले व्यापाराचे केंद्र कॅम्बे येथे हलविण्याचा मनसुबा रचला.[१८८] या बातमीमुळे हिंदुस्थानी व्यापाऱ्यांमधे घबराटीचे वातावरण पसरले आणि त्यांनी बादशहाकडे या गोष्टीची तक्रार केली. यावर शहाजहानने निळीच्या व्यापारावर घातलेली तहकुबी मागे घेतली परंतु त्याजबरोबर सुरतेला भेट देणाऱ्या जहाजांनी स्वाली व्यतिरिक्त इतर कुठेही नांगर टाकण्यास आणि हिंदुस्थानमधे गलबते बांधण्यास बंदी करणारा हुकूम जारी केला. डचांप्रमाणे इंग्रजांनादेखिल १ कोटी २० लक्ष रुपये अनामत ठेवण्यास सांगण्यात आले. परंतु मेथवोल्ड हा या अटी स्विकारण्यास बिलकूल राजी नव्हता.

दरम्यान, इंग्रज चांच्यानी तौफिकी नावाचे सुरतेचे गलबत आणि महमूदी नावाचे दीवचे गलबत पकडल्याची बातमी येऊन पोहोचली.[१८९] यावर मेथवोल्ड याला सुरतेमधे आणि रॉबीन्सन याला अहमदाबादेत बंदीस्त करण्यात आले, आणि आग्रा आणि थत्ताह येथील इंग्रजांच्या मालावर जप्ती आणण्यात आली. परंतु मेथवोल्ड याची आठ आठवडयानंतर सुटका करण्यात आली. त्याने मे, १६३६ मधे जॉन ड्रेक याला आपल्यावर झालेल्या अन्यायाचे परिमार्जन व्हावे अशी विनंती करण्यासाठी बादशहाकडे पाठविले. थत्ताह आणि इतरत्र इंग्रजांचा जप्त केलेला माल त्यांना परत देण्यात आला परंतु सुरतेच्या सुभेदाराविरुद्ध कोणत्याही प्रकारची कारवाई करण्यात आली नाही; या अपमानाच्या जखमेत मीठ चोळण्यासाठी म्हणूनच की काय इंग्रजांना शस्त्र धारण करण्यास मना करण्यात आले. परंतु मोगल आणि इंग्रज यात झालेली ही तडजोड इंग्रजांच्या दृष्टिने फारच असमाधानकारक होती, आणि म्हणून १६३७ च्या अखेरीस बोनफोर्ड याची रवानगी सुरतेहून आग्राकडे करण्यात आली.[१९०] आपल्या आग्रा येथील जवळ जवळ दीड वर्षांच्या मुक्कामात तौफिकी आणि महमूदी ही दोन जहाजे पकडली गेल्याच्या भानगडीत आपले देश बांधव निरपराध आहेत याबद्दल बादशहाची खातरजमा करण्यात त्याला यश आले. या घटनेबाबत पुढे कधी नुकसान भरपाई देण्याचा प्रश्न उद्‌भवला तर त्यापासून आपल्याला संरक्षण मिळावे असे अभिवचन त्याने बादशहाकडून मिळविले. त्याचप्रमाणे बंगालमधील इंग्रजांच्या व्यापार उदीमाची प्रगती व्हावी यासाठीही बादशहाने एक फर्मान जारी करावे असे आश्वासनही त्याने बादशहाकडून घेतले.

१६४३ मधे डचांनी त्याना अनुकूल अशा ज्या खास सवलती मोगल दरबाराकडून मिळविल्या होत्या तसाच फायदा आपल्यालाही मिळावा या मोहास बळी पडून,[१९१] इंग्रजांनी बहुमोल भेटी बादशहाकडे पाठवून दिल्या. त्यांनी ज्या अपेक्षा मनाशी बाळगल्या होत्या त्याबाबत त्यांच्या पदरी निराशा पडली नाही; कारण बादशहाने एक फर्मान काढून त्यांच्या सर्व मागण्यांची पूर्तता केली. परंतु नंतरच्या सात वर्षात अनेक तऱ्हेच्या कटकटी निर्माण झाल्या. जुलै, १६५० मधे रिचर्ड डेव्हीज् याला दिल्ली येथे जाण्यासाठी नियुक्त करण्यात आले आणि त्याच्या कडे इंग्रजांची गाऱ्हाणी बादशहाच्या कानावर घालण्याची कामगिरी सोपविण्यात आली.[१९२] यावेळी बरोबर बहुमोल भेटींची शिदोरी जवळ असल्यामुळे बादशहाला आपलेसे करुन घेण्यात त्याला यश मिळाले. बादशहाकडून त्याला मिळा-

लेल्या फर्मानानुसार रस्त्यावरील जकाती देण्यापासून इंग्रजांना पूर्ण माफी देण्यात आली होती आणि त्याचप्रमाणे इंग्रज व्यापाऱ्यांना कोठल्याही प्रकारचा उपद्रव न देण्यासंबंधी सूरत आणि सिंध येथील अधिकाऱ्यांना आज्ञा देण्यात आल्या होत्या. यानंतर इंग्रजांच्या व्यापाराची झपाट्याने वाढ झाली आणि शहाजहानच्या कारकिर्दीच्या अखेरीस त्यांच्या ताब्यातील फॅक्टऱ्यांच्या परिस्थितीबाबत त्यांना समाधान मानण्यास जागा होती.

# तळटीपा

## प्रकरण ११ वे

(१) ऐन, पान २; लाहोरी, खंड १, पान ७. खान खानान (हा बहुधा खान आलम असावा) पर्शियाला जे प्रतिनिधि मंडळ घेऊन गेला होता त्याचा मनुची उल्लेख करतो. आपला बादशहा म्हणजे या भूतलावरचा ईश्वर आहे असे त्याने शहाला सांगितल्याचे पण मनुची म्हणतो. खंड २, पान ४६१.

(२) चार चमन, पान २७–ब; लाहोरी बादशहाचे वर्णन शारा स्तंभ असे गौरवाने करतो, खंड १, पान ७; कजविनी पान १८८.

(३) ऐन. पान ३.

(४) युरोपिय प्रवासी अनेक वेळा मोगलांच्या न्याय पद्धतिची प्रशंसा करतात आणि त्याच ओघात मोगल शासनाचा धिक्कार करतात. अशा प्रकारची परस्पर विरोधी वर्णने आपल्याला बर्निअर, मॅनरिक आणि मनुची यांच्या वृत्तान्तांत आढळतील. पहा मनुची. खंड १, पाने १९७–२०४ आणि खंड २, पान ३८२; बर्निअर, पान २२७ आणि पान २३६. मॅनरिक, खंड १, पान २४ आणि पान ३५४.

(५) Sarkar: (Moghul Administration 1924) p. 11.

(६) बर्निअर, पान २३६; मॅनरिक, खंड १, पान ३५४ आणि खंड २, पान २६८; मनुची, खंड १, पाने १९७–२०४.

(७) Sarkar (M.A. 1924), p. 5.

(८) Moreland, India at the deah of Akbar, p. 31.

(९) Beni Prasad, Jahangir, p. 94.

(१०) टॅव्हर्निअर, खंड १, पान ३२५.

(११) उदा. सतराव्या शतकातील हिंदुस्थान म्हणजे सर्वसामान्य माणसाच्या दृष्टिकोनातून एकाद्या पेटलेल्या खाईसारखा होता, असे अनुमान मूरलॅण्ड याने काढले आहे. Akbar to Aurangzib, p. 232.

(१२) ऐन, पान ४.

(१३) लाहोरी, खंड १, पान १८०; कजविनी, पान १४७–ब.

(१४) ऐन, पान ४.

(१५) Beni Prasad, p. 96.

(१६) B. P.

(१७) B. P.

(१८) हा वटहुकूम डिसेंबर १६४३ मधे काढण्यात आला, लाहोरी, खंड २, पान ३५०.

(१९) (२०) and (२१) B. P., p. 96; ऐन, पान ४ आणि पाने २०२–३.

(२२) ऐन, पान ४.

(२३) ऐन, पान ४.

(२४) सालिह, पान ७१०–ब; वारीस, पान १६४.

(२५) आणि (२६) ऐन, पान ४.

(२७) ऐन, पान ४; Sarkar: (M.A. 1924) p. 32-4; मनुची, खंड २, पान ४१९; मॅण्डेल्स्लो, पान ११७.

(२८) मनुची, खंड २, पान ४१९; Sarkar: (M.A. 1924) pp. 46-8; दिवाण इ तन म्हणजे पगार वाटणारा अधिकारी असे स्पष्टिकरण मूरलॅण्ड याने दिले आहे. Agrarian System, p. 94.

(२९) Sarkar: (M.A.), pp. 41-46; लाहोरी असे सांगतो की दिवाण कुळ याला दिवाण–इ–तन आणि दिवाण–इ–खालसा असे दोन मदतनीस असत, खंड १, पान ४४६.

(३०) मुस्तौफी म्हणून लाहोरी मुल्ला अब्दुल रौफ आणि मुल्ला अबदुल लतीफ यांचा उल्लेख करतो, खंड २, पान ६१०.

(३१) ऐन (Blochmann): The Account of the Army, p. vi, n. 14.

(३२) ऐन (B.), p. vi, n. 15.

(३३) ऐन (B.), p. vi, n. 16, and Sarkar: (M.A.) pp. 49-52; तिसरी मोठी अधिकाराची जागा असे मनुची सांगतो, खंड २, पान ४१९.

(३४) अफजल खान हा एक वर्ष मीर सामान होता. सादुल्ला खान दोन वर्षे आणि फाजिल खान बरीच वर्षे.

(३५) ऐन, पान १४.

(३६) ऐन, पाने १९२–३.

(३७) ऐन, पान १९८; Sarkar: (M.A.), pp. 28-9. लाहोरी, पान ३१६.

(३८) लाहोरी, खंड २, पान ३१६.

(३९) लाहोरी, पाने ३१५–१६.

(४०) Sarkar; M. A. p. 24; बनिअर या पदाचा उल्लेख राज्यातील दुसऱ्या अगर तिसऱ्या स्थानाचे असा करतो, पान १७१; मनुची, खंड २, पान ४१९.

(४१) Sarkar: (M.A.) असे म्हणतात की औरंगजेबाच्या कारकिर्दीच्या अखेरीस बक्षी या श्रेणीची तीन दुय्यम पदे होती, p. 29.

(४२) उदा. जेव्हा महाबत खान याला जुजहार सिंग याच्या विरुद्ध पाठविण्यात आले तेव्हा इस्लाम खानाची त्याच्या फौजेचा बक्षी म्हणून नियुक्ति करण्यात आली. लाहोरी, खंड १, पान २४१. तद्वत दक्षिणेतील सैन्याच्या एका तुकडीवर इशाक बेग येजदी याची बक्षी आणि वाकियानवीस म्हणून नेमणूक करण्यात आली. लाहोरी, खंड १, भाग २, पान १३६.

(४३) ह्या जागेवर फक्त खात्रीलायक व्यक्तिनाच नेमण्यात येत असे, असे विधान सालिह करतो, पान ६२०; दारोगा इ खास चौकी असा या जागेचा हुद्दा होता असे मनुची सांगतो, खंड २, पान ४२२.

(४४) Sarkar: M.A. p. 27; मनुची सांगतो की याला दोन मुफ्ती मदतनीस म्हणून दिलेले असत आणि फाशीची शिक्षा जारी करावयाची झाल्यास त्याला तीन वेळा तरी बादशहाकडे ते प्रकरण पाठवावे लागे.

(४५) या नावाचा उल्लेख दाराच्या विवाहाच्या संबंधात लाहोरी करतो, खंड १, पान ४५८.

(४६) सालिह, पान ५७६.

(४७) या अधिकाराच्या संदर्भात अबदुर रहमान रशीदाई, मीर सालिह, मीर सय्यद अली, इतिमाद खान, इनायत खान (जफर खानाचा मुलगा) यांचा उल्लेख येतो.

(४८) मॅन्डेल्स्लो, पान ११८.

(४९) ऐन, पान १३.

(५०) R. B., Vol.II, p. 195; लाहोरी, खंड १, पान ९५.

(५१) सालिह, पान ५७५ अ आणि ब.

(५२) या जागेवर क्रमवारीने मौलाना महमद फाजिल बदख्शी, सय्यद अबदुल कादिर मानकपुरी, मीर बरका बोखारी, आणि हाजी महमद सैद यांच्या नेमणुका झाल्या.

(५३) या जागेबाबत दयानत खान, इनायत खान आणि मीर जाफर यांच्या नावाचा उल्लेख येतो.

(५४) ऐन, पान २८४; मॅनरिक, खंड १, पान ४१८ आणि खंड २, पान १३७ असे सांगतो की कोतवाल हा मुख्य जकात अधिकारी देखिल असे. नंतर पुढे De Laet च्या आधारे तो असे विधान करतो की राज्यातील प्रत्येक प्रमुख शहरावर कोतवालाची नेमणूक करण्यात येत असे, खंड २, पान २७०, टीप ७ आणि पान २७१; Moreland, India at the death of Akbar, pp. 37-9.

(५५) मॅण्डेल्स्लो, पान ११८.

(५६) मनुची, खंड २. पान ४२१.

(५७) लाहोरी, खंड २, पाने ७१०–११.

(५८) नोव्हेंबर १६२९ मधे शहाजहान जेव्हा दक्षिणेत गेला तेव्हा इस्लाम खानाची आग्र्याचा सुभेदार म्हणून नेमणूक करण्यात आली. पुढे १६३८ मधे शहाजहान काश्मिरमधे गेला तेव्हा सैफखानाला त्या जागेवर नेमण्यात आले. जेव्हा राजधानी बदलून दिल्ली येथे नेण्यात आली तेव्हा हीच प्रथा पाळण्यात आली.

(५९) औरंगजेबाला ज्या चार प्रान्तांचा सुभेदार नेमण्यात आले ते प्रान्त म्हणजे अहमदनगर, वऱ्हाड, खानदेश आणि तेलंगण.

(६०) शहाजहानच्या कारकिर्दीच्या कालखंडात अवधचा उल्लेख फारच थोड्या वेळा येतो.

(६१) ऐन, पान २८०–८१; Sarkar: M.A. pp. 80-86.

(६२) लाहोरी, खंड २, पान २९०; सालिह, खंड ३, पान ६४. आजम खानाच्या जुलमी कारभाराविषयी तक्रार सय्यद जलाल याने केली असा मिरात–इ–सिकंदरीमधे उल्लेख आहे, पान ८७.

(६३) लाहोरी, खंड २, पान २८२.

(६४) लाहोरी, पान २८३; शहाजहान याने जफरखानाकडून येऊ असलेली दहा लाख रुपयांची रक्कम माफ केली, कारण काश्मिरमधील प्रजा-

जनांची त्याच्या कारभाराबद्दल कोणतीच तक्रार नव्हती. लाहोरी, खंड २, पान ४२०.

(६५) लाहोरी, खंड २, पान १५८.

(६६) मूरलॅण्ड याने जमिनधारणेच्या पद्धतीची कच्चा आणि पक्का अशी दोन भागात विभागात केली आहे, India at the Death of Akbar, p. 31; तुर्कस्तानपेक्षा हिंदुस्थानामधील सुभेदारांच्या नोकरीची मुदत अधिक होती असे बर्निअर म्हणतो, पान २३१; Beni Prasad, p. 104; ही मुदत थोडी होती असा मॅनरिक उल्लेख करतो, खंड १ पान ५३.

(६७) Sarkar: M.A. pp. 56-61 ऐन, पाने २८०–८३.

(६८) Sarkar: M.A. pp. 62-3; पिटर मुण्डी' खंड २, पान १२.

(६९) वारीस, पान ७.

(७०) ऐन. पाने २८५–८८.

(७१) ऐन, पान २८८.

(७२) ऐन, पान २८८.

(७३) ऐन, पान २८९.

(७४) Sarkar: M.A., pp. 71-5; या अधिकाऱ्यांकडून येणारे अहवाल बादशहाला रात्री वाचून दाखविले जात असत असे मनुची म्हणतो, खंड २, पाने ३३१–३२.

(७५) उदा. १६४५ मधे काजी ताहिर आसफखानी याची अशा संयुक्त अधिकार पदी नियुक्ती करण्यात आली. लाहोरी, खंड २, पान ४७५.

(७६) Moreland; Agrauian System, p. 277. सरकार म्हणजे एक विभाग असे मनुची म्हणतो, खंड २, पान ४१३.

(७७) ऐन, पान २८३; मनुची, खंड २, पाने ४५०–५१; पिटर मुण्डी, खंड २, पाने ७३–४.

(७८) कजविनी, पान १३२.

(७९) ऐन, पान २८३.

(८०) आपण आपलें अस्तित्व छपविण्याचा पराकाष्ठेचा प्रयत्न करुनही कोतवालाच्या हेराने आपल्याला कसे ओळखले याचे वर्णन मॅनरिक देतो, खंड २, पान २४९; मनुची, खंड २, पाने ४२०–२१.

(८१) पहा टॅव्हर्निअर, खंड १, प्रकरणे ४ ते ८.

(८२) मॅनरिक हा हिंदुस्थानामधील विश्रामधामांविषयी चांगले उद्गार काढतो, खंड २, पाने ९७–९९; मनुची खंड २, पान ६८ आणि पान ११६; बर्निअर मात्र वाईट मत देतो, पान २३३.

(८३) टॅव्हर्निअर, खंड १, पान २९२ आणि पान ३२५; रस्त्यांच्या सुरक्षिततेकडे अहमदाबादच्या सुभेदाराला लक्ष द्यावे लागत असे मॅण्डेल्स्लो म्हणतो, पान ११४; रस्त्यांच्या सुरक्षिततेबाबत मॅनरिकने देखिल सर्वसामान्यपणे लिहिले आहे; मनुची, पाने ४५०–५१.

(८४) ऐन, पान २८४; पिटर मुण्डी, खंड २, पान ४७; मनुची, खंड २, पान २०४.

(८५) गुन्ह्याप्रमाणे शिक्षेची क्रमवारी केलेली असे, असे मॅनरिक विधान करतो, खंड २, पान २६९; मनुची, खंड १, पाने १९७–२०४; चोरांना जिवंत भाजण्यांत येत असे असे पिटर मुण्डी विधान करतो, खंड २, पान ४७, पान २३२, पान २३३, पान २३४ आणि पान २५४.

(८६) मॅनरिक, खंड १ पान ४२३.

(८७) मेवरा म्हणजे टपालवाहक. ऐन, पान १८८; खाफीखान खंड १ पान २४३. कबुतरांचा संदेश वाहक म्हणून उपयोग करीत असल्याचा मनुची उल्लेख करतो. खंड २ पान ४६७; टॅव्हर्निअर खंड १, पान २९२; Pelsaert, p. 58.

(८८) बर्निअर, पान २०९.

(८९) या कालखंडाबाबत अनेक सेवा असे म्हणण्याऐवजी सेवा असे एकवचनी म्हणणे संयुक्तिक ठरेल कारण त्या काळांत कोणी कोणती कार्यवाही करावी याबाबत भेदभाव नव्हता असे मूरलॅण्ड याने विधान केले आहे. एकाद्या अधिकाऱ्याची एकदा नेमणूक झाली की तो बादशहाचा सातत्याने ताबेदार रहात असे आणि त्याच्या सेवेचा उपयोग लष्करी कार्यवाही किंवा मुलकी कारभार या कशासाठीही केला जात असे. Agrarian System, p. 93.

(९०) उदा. सय्यद जलाल हा ६००० जात आणि २००० सवार या इतमामाचा अधिकारी होता; लाहोरी, खंड २, पान ७१८.

(९१) Irvine: The Army of the Indian Moghuls, p. 4.. या संदर्भात पिटर मुण्डी याने केलेली मनसबदार या संज्ञेची व्याख्या पहावी, खंड २, पान १२४.

(९२) ऐन, पाने १४४–५.
(९३) Irvine, p. 4.
(९४) पहा ब्लाचमान, पाने २३८–४७.
(९५) Irvine, p. 9.
(९६) Indian Historicaן Records Commisions Vol. V, 1923, pp. 60-2.
(९७) लाहोरी; खंड २. पाने ५०५–८.
(९८) लाहोरी; पहिल्या वर्गातील हजारीला २५० घोडे तैनात करावे लागत असत असे मनुची म्हणतो, खंड २, पान ३७५.
(९९) याबावत वारीसने दिलेल्या मनसबदारांची यादी पहावी.
(१००) दस्तुर उल अमल, बी. एम्. Or. 1937; Irvine, p. 6.
(१०१) दस्तुर उल अमल, बी. एम्. Or. 1937.
(१०२) वारीस मधील मनसबदारांची यादी पहावी, बी. एम्. Or 1937.
(१०३) दस्तुर उल अमल, बी. एम्. Or. 1690. पान १०२–ब. सैनिकाना दर दोन महिन्यानी तनखा दिला जात असल्याचे बर्निअर म्हणतो.
(१०४) वारीस, पान ६२–ब.
(१०५) वारीस, पान ६२–ब आणि लाहोरी, खंड १, पान ११५.
(१०६) दस्तुर उल अमल, बी. एम्. Or. 1937.
(१०७) दस्तुर उल् अमल; आणि Chapter III of Irvine; Army of the Indian Moghuls.
(१०८) दस्तुर उल् अमल; Irvine:
(१०९) दस्तुर उल् अमल, बी. एम्. Or 1937, आणि Irvine, p. 54; बक्षी वर्षातून दोन वेळा पहाणी करीत असल्याचे मनुची म्हणतो, खंड २, पान ३७७.
(११०) Irvine, p. 9; बर्निअर, पान २११.
(१११) Irvine; बर्निअर.
(११२) Irvine, p. 43; आणि ऐन, पान १८७.
(११३) V. Smith's Akbar, p. 360; बर्निअर, पाने २०९–१०.
(११४) डॉ. हॉर्न यांना उधृत करताना आयर्व्हिन असे म्हणतो की मोगल सैन्यात

घोडदळ, पायदळ आणि तोफखाना यांचा समावेश होता, परंतु पायदळ आणि तोफखाना यांचे स्थान घोडदळाच्या मानाने फारच दुय्यम होते, पान ५७; बाजार बुणग्यांबाबतचे बर्निअरचे विधान पहावे, पान ४३.

(११५) ?न, पाने १८८–९०; पायदळाकडून तोफखान्याचा बऱ्यापैकी उपयोग केला जात असल्याचे मॅण्डेल्स्लो सांगतो, पान ११८; बर्निअरने गोलंदाजांबद्दल अतिशय वाईट मत प्रकट केले आहे, पान २१७.

(११६) घोडे हे बव्हशी अरबी, पर्शियन आणि तुर्की होते असे मॅनरिक म्हणतो, खंड २, पान २७७; बादशहाच्या चाकरीतील प्रत्येक घोडेस्वाराचा घोडा हा तुर्की असण्याबद्दल खास कटाक्ष असे, खंड २, पान ३७६.

(११७) बर्निअर पाने ४८–९.

(११८) बर्निअर, पान २१७; मॅण्डेल्स्लो हा मोगलांजवळ प्रचंड तोफखाना असल्याचे सांगतो पण दर्जाने तो अतिशय निकृष्ट असल्याचे मत तो देतो, पान ११८; मनुची, खंड १, पान ९५.

(११९) बर्निअर, पान २१८.

(१२०) मोगलांजवळ उत्तम प्रतीचे आरमार नसल्याचे कारण त्यांचा भित्रेपणा असे मॅनरिक म्हणतो, खंड २, पान २७८; खंड २, पान १६८.

(१२१) हुगळीच्या पाडावाचा वृत्तान्त पहावा.

(१२२) आसामवरील मोहिमेची हकीकत पडताळावी.

(१२३) शहाजहानच्या काश्मिरमधील प्रवासाचे वेळी त्याने शेतकऱ्यांना नुकसान, भरपाई देण्यासंबंधीचे काढलेले वटहुकूम पहावे. लाहोरी, खंड १, पान २ पाने ४–५.

(१२४) कजविनी, पान २६७–ब.

(१२५) लाहोरी, खंड २, पान १६८.

(१२६) जाबती पद्धतिच्या संदर्भात मूरलॅण्ड यांचा The Journal of the Asiatic Society, 1918 मधिल लेख पहावा.

(१२७) J.R.A.S. 1918.

(१२८) J.R.A.S. 1918.

(१२९) Moreland: Agrarian System, pp. 234-37.

(१३०) Moreland: A. S., p. 125.

(१३१) आणि (१३२) Moreland; A. S., p. 124.

(१३३) A. S., p. 126.

(१३४) लाहोरी, खंड १, पाने ३६२–६४; मिरात–इ–सिकंदरी, पान ८३–ब; मॅण्डेल्स्लो, पान १२०.

(१३५) लाहोरी, खंड २· पाने २८२–८३.

(१३६) लाहोरी, पान २८९ आणि पान ६३२; महमद सादिक पान ११६.

(१३७) अजमेर येथिल बाराहच्या देवळाचे भंजन, R. B. Vol. I, p. 254 आणि त्यानंतर करण्यात आलेला कांगडाचा विध्वंस, Vol. II, p. 223. याबाबत कजविनीचे उग्दार पहा, पान ६०; शश फतह कांगडा, पान २५.

(१३८) हा वटहुकूम जानेवारी १६३३ मधे जारी करण्यात आला. लाहोरी, खंड १, पान ४५२. बनारसमधे बहात्तर देवळांचा नाश करण्यात आला.

(१३९) कजविनी, पान ३०२; बर्निअर काश्मिरमधे देवळांचा जो विध्वंस करण्यात आला त्याचा उल्लेख करतो, पान ४००.

(१४०) कजविनी, पान ३०२.

(१४१) कजविनी, पाने ३११–१२, पान ४११. भिंभरचा जमिनदार जोखू आणि त्याच्या जमातीने इस्लाम धर्माचा स्विकार केला; पंजाबमधे ४०० हिंदूंचे धर्मान्तर करण्यात आले.

(१४२) जबरीने धर्मान्तर करण्यांत आलेल्यापैकी महत्वाची उदाहरणे म्हणजे : (१) जुजहार सिंगाचे दोन मुलगे दुर्गभान आणि दुर्जनसाल यांची नावे इस्लामकुली आणि अलीकुली अशी अनुक्रमे ठेवण्यात आली. कजविनी, पान ३६२–ब. (२) पोर्तुगीज कैदी, कजविनी, पान २९९–ब. सिरहिंदच्या दलपत याला धर्मांतर केल्यास त्याच्याजवळील मुसलमान मुली ठेवण्याची परवानगी दिली जाईल असे सांगण्यात आले. परंतु त्याने नकार दिल्यामुळे त्याला हालहाल करुन ठार मारण्यात आले आणि त्याच्या शरीराचे विच्छेदन करण्यात आले. कजविनी, पान ४११; टॅव्हर्निअर, खंड १, पान ३९१.

(१४३) तबकात–इ–शहाजहानी, पान ३१७.

(१४४) कजविनी, पान ३०२.

(१४५) कजविनी, पान ३०३–ब.

(१४६) कजविनी, पान २३८.

(१४७) तबातबाई, पान १९; परंतु लाहोरी मायदास वृद्ध झाल्याचा दाखला देतो, खंड १, पान ४४६.

(१४८) पी. डेल्ला व्हॅल्ले, खंड १, पान ७१.

(१४९) याबाबत मॅनरिक याचा वृत्तान्त पहावा, खंड २, पाने १०५–११५.

(१५०) मॅनरिक, खंड २, पाने १०५–११५.

(१५१) मॅनरिक, खंड २, पान १४७.

(१५२) बर्निअर, पान २१२; यानंतर एका ठिकाणी पुढे तो लिहितो, 'आशिया-मधील सम्राट रानटी आहेत असे मानण्याकडे जरी आपला कल असला. तरी त्यांच्या प्रजाजनाना जो न्याय मिळत असे त्याकडे त्यांचे पूर्ण दुर्लक्ष होते असे मात्र म्हणता येणार नाही'. पान २६३, मनुची, खंड २, पान १४७.

(१५३) मनुची, खंड १, पाने १९८–२०४. टॅव्हर्निअर, खंड १, पान ३२५.

(१५४) मॅण्डेल्स्लो, पान ११८; बर्निअर पान ५९; आयर्व्हिन, पान १८५.

(१५५) मॅण्डेल्स्लो, पान ११८. डेल्ला व्हॅल्ले असे म्हणतो की, प्रत्येक हिंदुस्थानी सैनिक हा फक्त एकच शस्त्र चालविण्यात कुशल असतो आणि युद्धात तो दुसऱ्या कोणत्याच शस्त्राने लढणार नाही, पान २२५.

(१५६) शहाजहान जवळ ३००० हत्तींचे दल असल्याचे मनुची सांगतो, खंड २, पान १०; बर्निअर, पान २७७; पिटर मुण्डी, खंड २, पाने ५२–३; आयर्व्हीन, पाने १७५–८१.

(१५७) जाहिदखानाच्या दहा वर्षे वयाच्या फैजुल्लानावाच्या मुलाची नेमणूक १००० जात आणि ४०० स्वारांचा मनसबदार म्हणून करण्यात आली. लाहोरी, खंड २, पान ४३४. सलाबतखानाचा मुलगा महमद मुराद याला ५०० जात आणि १०० स्वारांच्या मनसबीवर नेमण्यात आले. लाहोरी, खंड २, पान ३८४; मॅण्डेल्स्लो, पान ११८.

(१५८) आयर्व्हीन, पान २१३. छावणीमधील शिस्तीबद्दल मॅण्डेल्स्को प्रशंसोग्दार काढतो परंतु दिवासाकी १५ मैलांपेक्षा अधिक मजल या सैन्याला मारता येत नसल्याचेही तो म्हणतो, पान ११८.

(१५९) बर्निअर, पान २०५; आणि पान २२७; टॅव्हर्निअर, खंड १, पान ३९१.

१६०) बर्निअर, पान २७१; मनुची, खंड २, पान ३७८; मॅण्डेल्स्लो, पान १२१; मॅनरिक, खंड २, पान २७१; पिटर मुण्डी, खंड २, पान १४३, आणि पान २३३; Pelsaert, p. 57.

१६१) लाहोरी, खंड २, पान १८४. जरिफखानाचे (याला फॉस्टर शरीफ असे संबोधितो) शिष्ट मंडळाचा उद्देश पर्शियाच्या विरुद्ध तुर्क आणि मोगल यांची युति घडवून आणण्याचा होता असे विल्यम फॉस्टर याने सुचविले आहे. The English Factory Records (163-41), Intro. X.

(१६२) लाहोरी, खंड २, पान १८६.

(१६३) लाहोरी, खंड २, पाने २१६ आणि २१८.

(१६४) वारीस, पान ७३–ब आणि पान ८०.

(१६५) वारीस, पान ८१–ब.

(१६६) जामिउल् इन्शा, पाने १३९–५७.

(१६७) वारीस (Add 6556). पान ४८४ आणि पान ४८८.

(१६८) वारीस, पान ४८१ (Add 6556).

(१६९) जामिउल् इन्शा, पाने १३९–५७.

(१७०) वारीस, पाने ४८५–८६ (Add 6556),

(१७१) लाहोरी, खंड १, पान २०४, खंड १, भाग २, पान १०२; खंड २, पान १६४, पान ३४२, पान ३९०, पान ४०६; वारीस, पान १४, पान २९, पान ६८, पाने ८१–ब–८२, पान ४६७ (Add 6556), पान ४८६–ब.

(१७२) वारीस, पान ८१–ब.

(१७३) मॅनरिक, खंड २, पान २७८.

(१७४) The English Factories in India, 1630-33, pp. 47-8; Introduction, viii and x.

(१७५) डॅनव्हर्स, खंड २, पान २५२.

(१७६) The English Factories in India (1630-33), pp. 123-5; मनुची, खंड १, पान १८५.

(१७७) The English Factories in India (1630-33), Intro; xviii.

(१७८) The E. F. in I. (1618-21); Intro; xxxvii.

(१७९) The E: F: in I. (1624-29), Intro. xxv and xxx.

(१८०) The E. F. in I. (1634-36), Intro., vii-ix, xii, xiii, xvi, आणि डॅनव्हर्स, खंड २, पान २४०.

(१८१) The E. F. in I. (1642-45), Intro., x.

(१८२) The E. F. in I, (1646-50), Intro., xvii, xviii, xx-xxi.

(१८३) Arrival of four Dutchmen at Thattah. The E. F. in I. (1651-54), p. 116 and Intro., xi, xii.

(१८४) The E. F. in India (1655-60), p. 68.

(१८५) The E. F. in I. (1624-29), Intro., xxv, xxix, xxxii.

(१८६) The E. F. in I. (1630-33), Intro., viii, xxv, xxxiv.

(१८७) The E. F. in I. (1634-36), Intro., xv.

(१८८) The E. F. in I. (1634-36), Intro., xv.

(१८९) The E. F. in I. (1634-36), Intro., xxii-vii.

(१९०) The E. F. in I. (1637-41), Intro., xx.

(१९१) The E. F. in I. (1642-45), Intro., x.

(१९२) The E. F. in I (1646-50), Intro., xxii-iii.

प्रकरण १२ वे

# बादशहाच्या जीवनाचा अखेरचा कालखंड

छगताई आमदानीमधील सर्व सुलतानांनी आपले बहुतेक आयुष्य छावणीमध्ये घालविले ही गोष्ट सर्वार्थाने खरी आहे अर्थात त्याबरोबर हेही निश्चित आहे. की एका ठिकाणाहुन दुसऱ्या ठिकाणी होणारी त्यांची हालचाल यापाठीमागचा त्यांचा हेतू केवळ मौजमजा करण्याचा नव्हता.

**मोंगलांचे छावणीमधील जीवन : त्याची कारणे**

या गोष्टीला आणखी काही महत्वाची अशी कारणे होती की ज्यामुळे मोगल सम्राटांना छावणी हे आपले घर मानावे लागले. पहिले कारण म्हणजे मोगलांची शासनाची पद्धत की जिच्यावर लष्करी हुकुमशाही या संज्ञेचे शिक्कामोर्तब करण्यात आलेले आहे. अशाप्रकारच्या प्रशासकीय यंत्रणेत राजा ही एकच व्यक्ती अशी असते की जो या संपूर्ण यंत्रणेला पुढे ढकलू शकतो, आणि म्हणूनच राजाचे अस्तित्व हे ही यंत्रणा जिवंत ठेवण्यात अतिशय जरुरीचे असते. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास या यंत्रणेकडून कारवाई होत असताना जितक्या जवळ राजाचे अस्तित्व तितक्या प्रमाणात राजाचे अधिकारी हे तत्पर आणि अतिशय जागरूक राहतात. या छावणी–छावणीमधून होणाऱ्या हालचालीचे दुसरे कारण म्हणजे मोगल सम्राटांची अधिकाधिक प्रदेश आपल्या साम्राज्यात सामावून घेण्याची दुर्दम्य महत्वाकांक्षा. एका दुर्दैवी हुमायुनचा अपवाद वगळल्यास

बाबर पासून औरंगजेबापर्यंतचा प्रत्येक सम्राट साम्राज्याची वाढ करण्याच्या कधीही न शमणाऱ्या अनिवार लालसेने जणूकाही झपाटलेला होता. वरील संदर्भातील तिसरे कारण म्हणजे प्रत्येक सम्राटाला सर्वसामान्य प्रजेबरोबर जरी नसली तरी या नाही त्यारुपाने प्रांताच्या शासनांबरोबर वैयक्तिक संपर्क साधण्याची वाटलेली गरज. सर्व देशामध्ये सम्राटांचा जो दौरा काढण्याची पद्धत होती त्याचा परिणाम प्रांतिक सुभेदार हे सम्राटांबरोबर राजनिष्ठेने बांधून घेतले जाण्यात होत असे. कधीकधी या पद्धतीचा उपयोग प्रशासनामध्ये जी लाचलूचपत वाढीस लागली होती तिच्यावर निर्बंध घालण्यामध्ये होत असे तर कधी राज्यामध्ये जे काही भैर व्यवहार चालत त्याची माहिती बादशहाला मिळण्यात होत असे. छगताई घराण्यामधील हे जे सम्राट झाले त्यांच्या बाबत एक गोष्ट मात्र जरूर मान्य केली पाहिजे आणि ती म्हणजे अशाप्रकारचे गैरव्यवहार त्यांच्या नजरेस आल्यास ते दडपून टाकण्याची त्यांची नेहमी तयारी असे. सारांश पहिल्या सहा मोगल सम्राटांचे जीवन हे अतिशय कष्टमय अशा धामधुमीच्या हालचालीनी भरलेले होते.

आपल्या कारकीर्दीच्या ३२ वर्षांपैकी जवळजवळ निम्मी वर्षे शहाजहान हा साम्राज्याच्या राजधानीच्या शहराबाहेरच होता.या कालखंडातील त्याच्या निव्वळ खाजगी आणि वैयक्तिक जीवनाचा जर थोडक्यात परामर्ष घेतला तर तो अतिशय उद्‌बोधक ठरेल.

**शहाजहानची आग्रा येथील अनुपस्थिती**

राज्यारोहण झाल्यानंतर लगेच एका वर्षाने जुजहारसिंग याच्या बंडाचा बिमोड करण्याची जी कारवाई चाललेली होती तिच्यावर देखरेख करण्यासाठी आग्रा[1] सोडून ग्वाल्हेरकडे त्याला प्रयाण करावे लागले. जुजहारसिंग याने शरणागती दिली, आणि जवळजवळ एक महिन्याच्या अनुपस्थितीनंतर बादशहा राजधानीकडे परतला.[2] यानंतरच्या डिसेंबर महिन्यात त्याला पुन्हा एकदा आग्रा सोडावे लागले. या मोहिमेचा उद्देश दक्षिणेत पळून जाऊन बंडखोरी करणाऱ्या खानजहान लोधी याला जरब बसविण्याचा होता. शहाजहान याने रनथंबोर, चांदा आणि माळवा यामार्गे प्रयाण केले आणि तो १ मार्च १६३० रोजी बुरहाणपूर येथे पोहोचला.[3] येथे तो नंतरची जवळजवळ दोन वर्षे मुक्काम करुन राहिला.

**हुस्नआरा हिचा जन्म**

बुरहाणपूर येथे १३ एप्रिल रोजी बादशहाच्या एका मुलीचा जन्म झाला;

तिचे नाव हुस्नआरा बेगम असे ठेवण्यात आले.[४] शहाजहानच्या जीवनातील हा काळखंड फार मोठ्या सुखाचा होता. निजामशाहीमधील किल्ले एकापाठोपाठ पाडाव होत होते आणि खानजहान याचा एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणाकडे अव्याहतपणे पाठलाग चाललेला होता. अखेर त्याला सिंधजवळ गाठण्यात बादशाही फौजांना यश आले आणि खानजहान याला मृत्यूची शिक्षा देण्यात आली. बादशहाला हे जे यश मिळाले त्याच्या प्रित्यर्थ दरबारामध्ये समारंभ आणि उत्सव करण्यात आले; त्याचप्रमाणे मेजवान्या देण्यात आल्या आणि अधिकाऱ्यांची बढती करण्यास आली परंतू अचानक एकाएकी मोठी आपत्ती कोसळली आणि बादशहाच्या आनंदावर विरजण पडले. या आपत्तीमुळे शहाजहानच्या पुढील संपूर्ण आयुष्याला औदासिन्य आणि विषाद यांनी जवळजवळ घेरले.

बुधवार तारीख ७ जून १६३९ या दिवशी रात्री शहाजहानची सम्राज्ञी मुमताज महल हिने एका मुलीला जन्म दिला. बाळंतपणामुळे झालेला त्रास तिला सहन झाला नाही आणि तिची प्रकृती झपाट्याने खालावत गेली.

## मुमताजचा मृत्यु

तिने जहानआरा बेगम हिला आपल्याजवळ येण्यासाठी बादशहाला बोलावू पाठविण्यास सांगितले. बादशहा त्यावेळी अगदी नजिकच्याच एका दिवाण खान्यात आपली पत्नी ज्या ठिकाणी मृत्युमुखी पडलेली होती तिथे शहाजहान याने चपळाईने प्रयाण केले. मुमताजमहल हिने आपले डोळे किंचित उघडले आणि आपल्या मुलांची काळजी आणि देखभाल करण्याची शहाजहान याला विनंती केली आणि त्याचा अखेरचा निरोप घेतला. या सर्व गोष्टी इतक्या काही जलदगतीने घडून आल्या की शहाजहान हा अनिवार अशा दुःखाच्या लाटेत बुडून गेला आणि ओक्साबोक्सी त्याने अश्रुंना वाट करुन दिली.[५]

या घटनेनंतर संपूर्ण दरबारात सूतक पाळण्यात आले आणि दुःखाचे निदर्शक म्हणून अधिकारी वर्गाने सफेद वस्त्रे परिधान केली. जवळजवळ एक आठवडा शहाजहानने झरोखा या जागेत येण्याचे टाकले त्याच्या जीवनातील सारे स्वारस्यच लुप्त झाल्याचा आभास निर्माण झाला. शहाजहानला जो विलक्षण शोक झाला होता त्याच्या तीव्रतेने त्याचे केस पांढरे झाले. त्यानंतरची दोन वर्षे तो गाणी बजावणी आणि करमणुकीचे इतर प्रकार यापासून पूर्णपणे अलिप्त राहिला इतकेच नव्हे तर त्याने भपकेबाज पोषाख करण्याचेही सोडून दिले.

### शहाजहानचे दुःख

ईद आणि अशाच प्रकारच्या इतर समारंभाचे प्रसंगी तो घळघळा रडत असे आणि आपल्या बायकांपैकी त्याचे जिच्यावर अतिशय प्रेम होते अशी मुमताज त्याला सोडून गेल्याबद्दल शोक करी. असे म्हणतात की त्यावेळी शहाजहान असे वारंवार म्हणत असे; लोकांचे भले व्हावे यांसाठी झगडण्याचा परमेश्वराने जर त्याला दैवी संदेश पालन करण्याची आज्ञा केली नसती तर त्याने आपले साम्राज्य आपल्या मुलांमध्ये विभागून निवृत्तीचे जिणे आपण जगलो असतो.[६]

मुमताज महलचे मृत शरीर तात्पुरते तापी नदीच्या पलीकडच्या तीराकडील जैनाबाद या बागेत दफन करण्यात आले. १६३१ च्या डिसेंबर महिन्याच्या सुरवातीला मुमताजचा मृतदेह राजपुत्र शुजा वजीरखान आणि मृत मुमताजची मुख्य दासी सती–उन–निसा यांच्याबरोबर लवाजम्यासहित आग्रा येथे पाठविण्यात आला.

### मुमताजच्या मृतदेहाची आग्रा येथे रवानगी

आग्रा येथे यमुना नदीच्या काठावर एका रिकाम्या जागी मुमताजच्या मृतदेहाचे दफन करण्यात आले. ही जागा राजा मानसिंग याच्या मालकीची होती ती या प्रसंगी शहाजहान याने त्याचा नातू जयसिंग याच्या कडून अगदी मामुली किमतीत आपल्या ताब्यात घेतली.[७] पुढील १७ वर्षांच्या काळात या जागेवर शहाजहान याने एका अतिशय भव्य अशा कबरीची बांधणी केली. ही कबर (ताजमहल) पत्नीवर विलक्षण प्रेम करणाऱ्या पतीने या प्रेमाची तितक्याच उत्कटतेने परतफेड करणा-या पत्नीप्रित्यर्थ केलेले एक स्मारक म्हणून यावच्चंद्र दिवाकरो या भूतलावर प्रसिद्ध झाली.

६ मार्च १६३२ रोजी बुरहाणपूर येथील दरबार बरखास्त झाला. आणि पुढील वर्षाच्या जून महिन्यात[८] शाही दरबाराचे आग्रा येथे आगमन झाले.

### शहाजहानचे आग्रा येथे पुनरागमन

यानंतर पुढील दोन वर्षे शहाजहानचे राजधानीमध्ये वास्तव्य होते. आग्रा येथे परतल्यानंतर एका पंधरवड्याने शहाजहान याने मकतब म्हणजे त्यांचा सर्वांत धाकटा मुलगा राजपुत्र मुराद याच्या शालाप्रवेशाचा समारंभ औपचारीक पणे साजरा केला.[९] मुल्ला मिरख याची राजपुत्र मुरादचा शिक्षक

म्हणून नेमणक करण्यात आली आणि एक हजार रुपयांची बक्षिसी देऊन त्याचा सन्मान करण्यात आला. याप्रसंगाच्या निमित्ताने कोठच्याही प्रकारची मेजवानी अथवा इतर थाट करण्यात आला नाही आणि याचे कारण म्हणजे बादशहाला झालेल्या दु:खाची आठवण अजून ताजी होती.

शहाजहानला ४१ वर्षे पूर्ण झाल्यावर करण्यात आलेल्या तुला समारंभाची सांगता झाल्यानंतर शहाजहान याने त्याचा मोठा मुलगा दारा शिकोह याच्या विवाहाची तयारी ताबडतोब करण्यासंबंधी हूकूम दिले.[१०]

### दाराचा विवाह

दाराचा वाङ्निश्चय मुमताज महल जिवंत असताना आणि बादशहाचा मुक्काम दक्षिणेत असताना राजपुत्र परवीज याच्या मुलीबरोबर झाला होता. त्यावेळीच अशी आज्ञा काढलेली होती की गुजराथ, बनारस, सातगाव, मलडाह, सोनारगाव आणि पाटण येथून दुर्मिळ आणि मौल्यवान चीजा आणून घ्याव्यात. त्याचप्रमाणे आग्रा आणि लाहोर येथील शाही गृहखात्याच्या अधिकाऱ्यांनी हिरे आणि माणके, चांदी आणि सोने यांची भांडी आणि विवाहाच्या वेळी लागणाऱ्या अशाच प्रकारच्या इतर वस्तूंची तरतूद करावी असेही हुकूम देण्यात आलेले होते. परंतू मुमताज महल हिचा अचानक मृत्यू झाल्याने ती तयारी पुढे ढकलण्यात आली. जानेवारी १६३३ मध्ये पुन्हा एकदा ही जमवाजमव करण्यास सुरवात झाली.

जानेवारी महिन्याच्या २५ तारखेला जहानआरा बेगम आणि सती–उन्–नीसा खानुन ह्या दोघींच्या देखरेखीखाली बादशहा लोकांची गाऱ्हाणी ज्या ठिकाणी ऐकत असे त्या दिवाणखान्यात विवाहानिमित्त आलेल्या नजराण्यांचे प्रदर्शन भरविण्यात आले. त्या दिवशी दुपारी बाहशहा आणि जनानखान्यातील स्त्रिया यांनी या प्रदर्शनाला भेट दिली आणि संध्याकाळी शाही अधिकाऱ्यांना तिथे जाण्याची परवानगी देण्यात आली. वधूच्या आईने तिला ज्या भेटी देण्यात आलेल्या होत्या त्यांचे प्रदर्शन त्याच दिवाणखान्यात आयोजित केले आणि शहाजहान हे ही प्रदर्शन पहाण्यास गेला. १ फेब्रुवारी रोजी विवाहाच्या अगोदरचा हीनाबंदी नावाचा विधी पार पाडण्यात आला आणि इतक्या काल पर्यंत मुकेपणाने असलेल्या शाही वाद्यवृंदाने वाद्यांचे मधुर असे सूर आणि आनंदाच्या लहरी यांचा एकच जल्लोष उडवून जणूकाही मुमताजच्या मृत्यूमुळे पाळण्यात येत असलेले सूतक संपल्याचे जाहिर केले. विडयाची पाने,

वेलची आणि सुकामेवा ही दरबारी मंडळींमध्ये वाटण्यात आली आणि संध्याकाळच्या वेळी लोकांच्या आनंदाच्या आरोळयांत यमुनानदीच्या तीरावर दारूकामाची भपकेदार आतषबाजी करण्यात आली.

दुस-या दिवशी राजपुत्र शुजा, औरंगजेब आणि मुराद हे तिघेजण आसफखान आणि इतर प्रतिष्ठीत उमराव यांच्यासह दाराचे अभिनंदन करण्यासाठी आणि त्याला विवाहादाखल भेटी देण्यासाठी म्हणून त्याच्याघरी गेले. त्यानंतर एक अतिशय भव्य अशी मिरवणूक सजविण्यात आली : दारा हा हत्तीवरील अंबारीत बसला होता आणि त्याच्या पाठोपाठ दरबारी मंडळी कुणी घोडयांवर तर कोणी पायी अशी मोठ्या दिमाखात चालली होती. विवाहानिमित्त आलेल्या भेटींचे प्रदर्शन ज्या ठिकाणी भरले होते त्या दिवाणखान्यात वराला नेण्यात आले. या ठिकाणी शहाजहानने त्याला भेटी दिल्या आणि हिंदुस्थानातील रुढीनुसार त्याच्या मस्तकावर मोती पाचू आणि माणके यांची तयार केलेली एक माला (सिहरा) बांधली. शहाजहान याच्या लग्नाच्या प्रसंगी हिच माला जहांगीरने त्याच्या मस्तकावर बांधली होत्ती. संध्याकाळी यमुना नदीच्या तीरावर दिव्यांचा लखलखाट आणि रोषणाई करण्यात आली होती आणि त्याचवेळी जे प्रचंड दारुकाम झाले त्यामुळे लोकांच्या डोळयाचे पारणे फिटले.

संगीत, नाच आणि करमणुकीचे इतर प्रकार रात्रीची दोन पळे आणि दोन घडी होईपर्यंत चालले होते कारण ही वेळ विवाहाचा विधीपार पाडण्यासाठी म्हणून अतिशय शुभदायी होती. विवाहाच्या ठरलेल्या वेळी शहाजहान याने काजी महमद अस्लाम याला शहाबुर्ज इकडे पाठविले. याठिकाणी बादशहाच्या समक्ष काजी अस्लाम याने विवाह विधीच्या सोहळयाचे वाचन केले. बादशहाने लग्नाप्रित्यर्थ भेट म्हणून (मीह) पाच लक्ष रुपये नियुक्त करुन दिले. सोने आणि चांदी यांच्या मोहरांचा विवाहीत जोडप्यावर वर्षाव करण्यात आला. ही नाणी घेण्याच्या गडबडीत तेथे जमलेल्या चाकरांनी परस्परांना धक्काबुक्की केली आणि काहीजण सपशेल तोंडघशी पडले. दारा आणि त्याची पत्नी यांना सुख मिळावे म्हणून ज्या प्रार्थना म्हणण्यात आल्या त्यांनी सारे वातावरण दुमदुमून गेले. याप्रसंगी उपस्थित असलेल्या कवीजनांनी याप्रसंगाची स्मृती कायम रहावी म्हणून काव्यपंक्तीची रचना केली. बादशहाने दाराच्या राजवाडयाला भेट दिल्यानंतर यासर्व उत्सवांची सांगता झाली. दाराच्या विवाहानिमित्त जो पैसा खर्च करण्यात आला ती एकंदर रक्कम ३२ लाख रुपये इतकी भरली. यापैकी

६ लक्ष रुपये बादशाही खजिन्यातून खर्च करण्यात आले, १६ लक्ष रुपये जहानआरा बेगम हिने दिले आणि उर्वरित खर्च वधूच्या आईने केला.

या लग्नानंतर थोड्याच काळाने शुजा याचा विवाह[११] तितक्याच भपक्याने आणि डामडौलाने पार पाडण्यात आला.

**शुजाचा विवाह**

हे लग्न फेब्रुवारी २३ रोजी मिर्जा रुस्तम सफवी याच्या मुलीबरोबर करण्यात आले आणि बादशहाने लग्नाप्रित्यर्थ देणगी म्हणून (कबैन) चार लक्ष रुपये नेमून दिले.

यानंतर दरबारचा व्यवहार नेहमी प्रमाणे सुरळीत सुरु झाला आणि जरी आपल्या प्रिय पत्नीच्या निधनामुळे झालेले दुःख शहाजहानच्या मनात ताजे होते तरीदेखील शहाजहानने त्याला योग्य वाटेल अशाप्रकारे आपले जीवन जगण्यास सुरुवात केली. गायन, नाच, मैदानी खेळ, आणि इतर अशाच करमणुकीच्या प्रकाराना पुन्हा सुरवात करण्यात आली आणि बादशहाने मोठ्या उत्साहाने या सर्वात भाग घेण्यास सुरुवात केली. २८ मे १६३३ रोजी सुधाकर आणि सुरत सुंदर या दोन प्रचंड हत्तींच्या टक्करीचा खेळ त्याने झरोखा खिडकीच्या पुढे आयोजित केला. काहीवेळपर्यंत हे मदोन्मत्त हत्ती आपापसात झगडले आणि नंतर बाजूला झाले. रागाने धुंद झालेल्या सुधाकराला आपला शत्रू कोण आहे याची जाण विसरली आणि तो औरंगजेबाच्या दिशेने धावून गेला आणि त्याने औरंगजेबावर हल्ला चढविला.

**औरंगजेबाची हत्तीबरोबर झटापट**

राजपुत्राचे वय त्यावेळी जेमतेम १४ वर्षाचे होते. हत्ती धावून आल्यावर औरंगजेब शांतपणे स्थिर राहिला, आपला घोडा त्याने पूर्णपणे आपल्या ताब्यात ठेवला आणि आपल्या हातातील भाला त्याने हत्तीच्या मस्तकात भोसकला. हत्तीने थोडी माघार घेतली आणि पुन्हा औरंगजेबावर हल्ला करुन त्याच्या घोड्याला खाली पाडले.' औरंगजेब अतिशय जलदपणे जमिनीवर उभा राहिला. त्याने आपली तलवार बाहेर काढली आणि चवताळलेल्या हत्तीसमोर तो ठामपणे उभा राहिला." क्षणभरात राजपुत्र शुजा आणि राजा जयसिंग हे औरंगजेबाच्या सहाय्यास आले आणि त्यानी हत्तीवर हल्ला चढविला. त्याच्यावर झालेल्या भाल्यांच्या फेकी आणि त्याच्यावर करण्यात आलेला दारु गोळ्याचा

भडिमार यानी घाबरुन जाऊन ही मैदानातून पलायन केले. अगदी याच वेळ सुरत सुंदर हा सुधाकर बरोबर झुंज देण्यासाठी पुढे सरसावला होता. शहाजहान याने मोठया प्रेमाने राजपुत्राला आलिंगन दिले, त्याच्या निर्भय पणाचे कौतूक केले आणि त्याला बहादूर किंवा वीरपुरुष असा किताब दिला. यानंतर तीनच दिवसानी त्याच्यापंधराव्या वाढदिवसानिमीत्त बादशहाने औरंगजेबाची सुवर्णतुला केली आणित्याला ५००० मोहरा आणि सुधाकर हत्ती भेटीदाखल दिला.[१२]

याचवर्षाच्या ऑगस्ट महिन्यात शहाजहान आजारी पडला पण तीन दिवसानंतर त्याला बरे वाटले.[१३] पुढील वर्षाच्या जानेवारी महिन्याच्या अखेरीला हिंदुस्थानचे नंदनवन म्हणजे काश्मिर याला भेंट देण्यासाठी आग्रा सोडले.[१४] वाटेमध्ये राजपुत्र दारा याला फार मोठा आजार झाला आणि परिणामी शाही कुटुंबाचा हकीम वजीरखान याला दारावर इलाज करण्यासाठी म्हणून राजधानीहून ताबडतोब बोलावून घ्यावे लागले.[१५] लाहोर मध्ये थोडाकाळ राहिल्यानंतर बादशहाने आपल्या काश्मीरच्या प्रवासास पुन्हा सुरवात केली आणि ५ जून १६३४ रोजी[१६] तो काश्मीरमध्ये दाखल झाला. या प्रांताच्या मनमोहक अशा सृष्टीसौदर्याने शहाजहानला संमोहित केले आणि जरी त्याच्याजवळ या निसर्गसौदर्याची प्रतिकृती निर्माण करणारे चित्रकार नव्हते तरी त्याच्या जवळ उत्तमपणे लिखाण करणारे जे लेखक होते त्यांनी काश्मीरचे वर्णन उपमा उत्प्रेक्षानी नटलेल्या भाषेमध्ये अतिशय सुंदरपणे केलेले आहे. या वर्णनाचा गाभा जरी काव्यरुप असला तरी त्याचे स्वरुप मात्र गद्यात्मक आहे.[१७]

सप्टेंबर महिन्याच्या सुरवातीला त्याने काश्मीर सोडले[१८] आणि १६ नोव्हेंबर. रोजी तो लाहोर येथे पोहोचला.[१९] येथे त्याचा दोन महिने मुक्काम झाला १६ जानेवारी १६३५ रोजी त्याने राजधानीच्या दिशेने कूच केले.[२०] राजपुत्र मुराद याला देवी आल्यामुळे त्याने त्याला लाहोर येथे वजीरखान आणि सती –उन–निसा खानून यांच्या देखरेखीखाली ठेवले.[२१] वाटेत त्याने दिल्लीला छोटीशी भेट दिली आणि १२ मार्च १६३५ रोजी तो आग्रा येथे येऊन पोहोचला[२२]

आग्रा येथील बादशहाच्या अनुपस्थितीचा फायदा घेऊन जुजहार सिंग याने मोठी महत्वाकांक्षा उराशी बाळगून बंडाचे निशाण उभारले होते. त्याचे बंड आणि त्याच बरोबर दक्षिणेमधील असमाधानककारक परिस्थिती यामुळे सप्टेंबर महिन्याच्या अखेरीला शहाजहानला राजधानी सोडणे भाग पडले.[२३]

### दक्षिणेत दुसऱ्यांदा आगमन

बारी येथे आल्यानंतर त्याने बुंदेल खंडाला भेट देण्यासाठी आडवाटेने प्रयाण केले.[२४] जानेवारी १६३६ च्या सुरवातीला त्याने नर्मदा पार केली[२५] आणि सरळ दौलताबादच्या दिशेने कूच केली.[२६] सहा महिन्यांच्या सातत्याने केलेल्या मोहिमा नंतर अहमदनगर प्रांतात शांतता आणि सुव्यवस्था प्रस्थापित करण्यात आणि विजापूर आणि गोवळकोंडा या राज्यां बरोबर समाधानकारक तह करण्याचे कामी त्याला यश आले. जुलै महिन्याच्या सुरवातीला त्याने दक्षिणेतून कूच केले.[२७] आणि उज्जैन आणि मांडू या शहरांच्या मार्गे तो २५ नोव्हेंबर रोजी अजमेरला येऊन पोहोचला.[२८] तेथे त्याने एक आठवडा मुक्काम केला आणि नंतर आग्र्याकडे कूच केले. आग्रा येथे तो ५ जानेवारी १६३७ रोजी येऊन पोहोचला.[२९]

मार्च महिन्यात शहाजहान आजारी पडला परंतु १९ दिवसात त्याची प्रकृती सुधारली.[३०]

### औरंगजेबाचा विवाह

पुढील महिन्याच्या मध्याच्या सुमारास राजपुत्र औरंगजेब शहानवाज-खान याची मुलगी दिलरसबानू बेगम हिच्याबरोबर विवाह करण्यासाठी म्हणून दौलताबादेहून आग्रा येथे येऊन पोहोचला. विवाहाचा विधी ८ मे १६३७ रोजी पार पडला आणि विवाहाचे प्रसंगी रितीरिवाजा प्रमाणे थाटमाट आणि आनंदोत्सव साजरा करण्यात आला[३१]

### काबूलेला पहिली भेट

१६३८ च्या फेब्रुवारी मध्ये अलीमर्दानखान याने कंदहारचा ताबा मोगल अधिकाऱ्यांच्याकडे दिला. यानंतरची १५ वर्षे शहाजहानचे लक्ष वायव्य सरहद्द प्रांतातील घडामोडींकडे केंद्रित झाले होते.

१६३८ च्या ऑगस्ट मध्ये काबूल शहराला पहिल्या प्रथम भेट देण्यासाठी त्याने कूच केले[३२] या भेटीमागे त्याचे दोन हेतू होते. एक म्हणजे पर्शियन सैन्याकडून कंदहारवर होणारा संभाव्य हल्ला टाळणे आणि दुसरा उद्देश ट्रान्सऑक्सियाना मधील राजकीय परिस्थिती कशाप्रकारची आहे याचा अभ्यास करणे १८ मे १६३९ रोजी तो काबूल येथे पोहोचला आणि तेथील चार महिन्यांच्या वास्तव्यानंतर तो सप्टेंबर मध्ये लाहोरला परतला.[३३] जानेवारी

जानेवारी १६४० ते ऑक्टोबर या दरम्यान त्याने काश्मिरला दुसरी भेट दिली [३४]आणि नोव्हेंबर मध्ये तो लाहोरला परतला. त्यानंतरची दोन वर्षे तो लाहोर येथेच होता. ह्या कालखंडात ११ नोव्हेंबर १६४१ रोजी आसफखान मरण पावला.[३५] जुलै १६४२ मध्ये मुरादचा विवाह साजरा करण्यात आला.[३६] १६४३ च्या जानेवारी महिन्याच्या सुरवातीला शहाजहानचा दरबार पुन्हा आग्रा येथे परतला.[३७]

**जहानआराचे कपडे पेटतात**

अजमेरला शहाजहान याने जी छोटीशी भेट दिली तिचा अपवाद वगळल्यास पुढील दोन वर्षे शहाजहानचा मुक्काम आग्रा येथेच होता.[३८] १६४४ च्या मार्च महिन्यात जहानआरा हिचे कपडे पेटले आणि बऱ्याच ठिकाणी ती भाजली.

तिला झालेल्या जखमा गंभीर होत्या. या अपघातामुळे शहाजहानच्या मनाला अतिशय यातना झाल्या आणि तिच्यावर उपचार करण्यासाठी त्याने उत्तमोत्तम हकिमांना बोलावून घेतले. त्या शिवाय गोरगरिब आणि लायक असलेल्या व्यक्तींना दररोज एक हजार रुपयांचा दानधर्म करण्याचा त्याने हुकुम दिला. राजकन्या जवळजवळ चार महिने बिछान्याला खिळून होती आणि तिला बरे वाटावे म्हणून सातत्याने प्रार्थना केल्या जात होत्या. आपल्या आजारी असलेल्या बहिणीला भेटण्यासाठी राजपुत्र औरंगजेब आणि मुराद हे आपापल्या प्रांतातून आग्रा येथे दाखल झाले. २५ नोव्हेंबर रोजी राजकन्या जहानआरा हिला पूर्णपणे बरे वाटल्याच्या आनंदाप्रित्यर्थ मोठा खर्च करुन अतिशय भव्य प्रकारचा उत्सव समारंभ साजरा करण्यात आला. हा आनंदोत्सव संपल्यानंतर राजपुत्र औरंगजेब याने आपल्या बापाला जे दुखावले होते त्याच्याबद्दल जहानआरा हिने शिफारस केली आणि परीणामी औरंगजेबाला त्याला त्याची पहिली मनसब आणि मानमरातब पुन्हा देण्यात आले.[३९]

ह्याच सुमारास आणखी एक घटना घडली ती म्हणजे राजा गजसिंग ह्याचा मुलगा रावअमरसिंग याच्या हातून मीरबक्शी सलाबतखान ह्याचा झालेला खून.[४१] आजारीपणामुळे काही काळ अमरसिंग हा दरबारातून गैरहजर होता. २६ जुलै १६३४ रोजी तो दरबारात परतला आणि सलाबतखानाने त्याची बादशहाबरोबर भेट घडवून आणण्यासाठी त्याला दाराच्या राजवाड्यात नेले. जहानआरा आजारी असल्यामुळे बादशहाचा मुक्काम त्या ठिकाणी होता

अमरसिंग त्यावेळी डावीकडे उभा होता. आपले संध्याकाळचे नमाज पढून. झाल्यानंतर बादशहा एका अधिका-याला काही आज्ञा लिहून घेण्यास सांगत होता, तेव्हा सलाबतखानाने सिंहासनाच्या उजवीकडील जागा सोडली आणि खाली येऊन एका अधिकाऱ्याजवळ त्याने बातचीत करण्यास सुरुवात केली. हे चालले असताना अचानक अमरसिंग हा आपला खंजिर उगारुन त्याच्या दिशेने धावला आणि त्याने सलाबतखानाच्या डाव्या कुशीमध्ये तो खंजिर आतवर खुपसला सलाबतखान जागच्या जागीच ठार होऊन पडला. ही भयानक आणि कोठचेही कारण नसताना झालेली दुर्घटना प्रत्यक्ष बघितल्यानंतर खलीलउल्लाखान आणि विठ्ठलदास याचा मुलगा अर्जुन यांनी अमरसिंग याच्यावर हल्ला केला. ताबडतोब सय्यद सालार आणि इतर सहासात मनसबदार आणि दंडाधारी यानी अमरसिंग याला वेढा दिला आणि त्याला ठार केले. अमरसिंगाच्या मित्राने आणि अनुयायानी अर्जुनचा सूड घेण्याचा प्रयत्न केला आणि नंतर र.जवाड्याजवळ. चिथावणी देऊन मारामारी करण्याचा डाव टाकला. या झटापटीत मीर तुजूक मीरखान आणि मुशरीफ मलूकचंद हे ठार झाले अखेर अमरसिंगाच्या सैन्याच्या म्हौरक्यांवर सय्यदखानजहान आणि रशीदखान अन्सारी यांनी हल्ला केला आणि त्यांना ठार मारले.

### शहाजहानचे पश्चिम सुभ्यात आगमन

१६४५ च्या सुरवातीला शहाजहान याने आग्रा सोडले.[४१] आणि नंतरची तीन वर्षे त्याने पश्चिम सुभ्यामध्ये वास्तव्य केले.

१६४५ च्या उन्हाळ्यामध्ये त्याने काश्मिरला भेट दिली[४२] आणि बाल्ख आणि बदकशान या प्रांतांवरील चाललेल्या मोहिमाना मार्गदर्शन करण्या–साठी आणि देखरेख ठेवण्यासाठी त्याने दोन वेळा काबूलला भेट दिली अखेर हिंदूकुश पर्वतापलिकडील प्रदेशावर ताबा ठेवणे हे अशक्यप्राय आहे याची त्याला जाणीव झाली आणि म्हणून त्याने आपल्या सैन्याला माघार घेण्यास सांगितले. १६४७ च्या जून महिन्याच्या शेवटच्या आठवड्यात त्याने काबूल सोडले.[४३] आणि तो लाहोर आणि दिल्लीच्या वाटेने आग्रा येथे येऊन पोहोचला.[४४]

### नवीन राजधानी

आग्र्याकडे कूच करून जात असताना त्याने आपल्या दिल्ली येथील अधिका-यांना तेथे इमारतींची जी बांधणी चाललेली होती ती झपाट्याने पुरी करण्याचा हुकूम दिला.[४५] पुढील दोन महिन्यात या अधिकाऱ्यांनी दिल्ली

येथील राजवाडा रहाण्यायोग्य सजविला, २७ मार्च १६४८ रोजी बादशहाने आग्र्याहून प्रयाण केले.[४६]

एप्रिल ८ रोजी नव्या राजधानी मध्ये प्रस्थापन करण्याचा विधीपूर्वक समारंभ उरकण्यात आला. ह्या दिवशी शहाजहान यांची चांद्रवर्षानुसार तुला करण्यात येत असे. हा समारंभ मोठ्या भपक्याचा आणि थाटामाटाचा व्हावा ह्याकरता सर्वतोपरीने प्रयत्न करण्यात आले. हिंदुस्थानातील सिकंदर लोधीपासून मुसलमान साम्राज्याचे राजधानीचे शहर असलेले आग्राय ाची जागा दिल्लीने घेतली दिल्लीचे नामपरिवर्तन शहाजहानाबाद असे करण्यात आले. सकृतदर्शनीतरी असे वाटले की राजधानी बदलल्यामुळे एका नघ्या युगास प्रारंभ झाला आहे, परंतू सत्यपरिस्थिती अशी होती की दिल्ली शहराने मोगल साम्राज्याला भरभराटीचे दिवस कधीच आणले नाहीत. धर्मभोळी जी मंडळी होती त्यांची अशी धारण झाली की राजधानीमध्ये झालेला हा बदल म्हणजे मोगल साम्राज्याची सर्व–नाशाकडे जी वाटचाल सुरु झाली होती तिचे हे पहिले पाऊल होय

शहाजहानचा नव्या राजधानीत जेमतेम सहा महिने मुक्काम झाला नाही तोच नव्यानें उद्‌भवलेल्या एका संकटाने त्याला पुन्हा पश्चिमेच्याकडे प्रयाण करावे लागले.

**मोगल कंदहार गमावतात**

दुसऱ्या शहाअब्बास याने कँदहारवर हल्ला करुन ते आपल्या ताब्यात घेतले. मोगलांच्या सैन्याची मिजास जर कायम ठेवावयाची असली तर कंदहार पुन्हा जिंकून घेणे आवश्यक होते. हा हेतू मनात धरून शहाजहान याने १६४८ मध्ये दिल्लीहून कूच केले. (नोव्हेंबरच्या सुरवातीला) जवळजवळ १८ महिने तो या मोहिमेवर होता. मोगलांची जी बेइज्जत गमावलेली होती ती परत मिळण्यासाठी शहाजहान याने विलक्षण कसोशीचे प्रयात्न केले इतकेच नव्हे तर स्वतःच्या देखरेखीखाली मोहिमेची सूत्रे आपल्या हाती घेतली. परंतू ह्याचे हे सर्व प्रयत्न फुकट गेले. अखेर त्याने काबूल येथील आपली छावणी मोडली आणि ४ जानेवारी १६५० रोजी तो आपल्या राजधानीला येऊन पोहचला.[४८]

पदरात पडलेली निराशा जणूकाही भरुन काढण्यासाठी शहाजहान याने शाही राजधानीची दिल्ली येथे जी स्थापना झालेली होती तिची सांगता करुन मोठ्या प्रमाणावर समारंभ करण्यासाठी तयारी करावी अशी आज्ञा दिली.[४९]

## भव्य प्रमाणात साजरे करण्यात आलेले उत्सव आणि समारंभ

१६४८ मध्ये ज्या नव्या इमारती बांधण्यात आलेल्या होत्या त्यांचे थोडेसे काम शिल्लक राहिलेले होते तरी या इमारतींचे मुख्य बांधकाम पुरे झालेले होते. याप्रसंगासाठी मयूर सिंहासन आग्रा येथून दिल्लीला आणण्यात आले आणि नव्या राजधानीच्या उद्‌घाटनाचा जो सोहळा होणार होता तो प्रत्यक्ष पहाण्यासाठी साम्राज्याच्या दूरच्या आणि नजीकच्या अधिकाऱ्यांना दिल्लीला येण्यासाठी फर्माने गेली. त्यावेळी तरी दिल्लीचे रूपांतर उत्सव आणि समारंभ मोठ्या थाटामाटाने साजरे करीत असलेल्या शहरामध्ये झाले. शहराच्या कोनाकोनावर गटागटानी प्रजाजन गायन आणि नर्तन यांची भजा लुटत असल्याचे दृश्य दिसत होते आणि बादशहा चिरंजीव होवो ह्या आरोळयांचा आवाज आकाशापर्यंत जाऊन भिडत होता. मार्च १० १६५० रोजी हा सुखसोहाळा संपुष्टात आला.

यानंतर जवळजवळ एका वर्षानि फेब्रुवारी १६५१ मध्ये शहाजहान याने काश्मिरला अखेरची भेट देण्यासाठी प्रयाण केले.[५०]

## काश्मीरला अखेरची भेट

यानंतरचा उन्हाळा त्याने काश्मिरमध्य काढला आणि सप्टेंबर महिन्याच्या मध्यात तो लाहोरला परतला. या ठिकाणी त्याने कंदहारवर योजलेली जी दुसरी मोहिम होती त्याबाबतची तयारी पूर्ण करण्याच्या कामावर देखरेख केली. १६ फेब्रुवारी १६५२ रोजी त्याने लाहोर सोडले.[५१] आणि ३ एप्रिलला तो काबूल येथे पोहोचला.[५२] परंतू अपयशा मुळे निराश झालेल्या मनःस्थितीत २ डिसेंबरला तो दिल्लीला परतला.[५३]

यानंतरची चार वर्षे शहाजहानचे वास्तव्य सातत्याने दिल्लीलाच राहिले. ह्याला अपवाद म्हणजे छोटया मुदतीसाठी दोन वेळा आग्र्याला आणि एकवेळ अजमेरला भेट दिली एवढाच होता १६५८ च्या नोव्हेंबर–डिसेंबर मध्ये त्याने मोती मशीदीलाभेट दिली.

## शहाजहानचे दिल्लीतील वास्तव्य

यानंतर जानेवारी महिन्यात जसरुप मराठीया[५५] ह्या माणसाने भरदरबारात बादशहावर हल्ला करुन त्याचा जीव घेण्याचा अयशस्वी प्रयत्न केला. तो सिंहासनाच्या पहिल्या पायरीपर्यंत पोहोचला परंतू नौबतखान कोतवाल याने आपल्या हातातील दंडयाचा फटका मारेकऱ्याचा छातीवर दिला. ह्या

फटक्याने मारेकरी जमिनीवर कोसळला. मारेकऱ्याने तरीदेखील उठून सिंहासनाच्या पायऱ्या चढण्याचा प्रयत्न केला परंतू ख्वाजा रहमतुल्ला याने त्याच्यावर तलवारीचा वार करुन त्याचे तुकडे तुकडे केले. या दोन अधिकाऱ्यांची निष्ठा आणि तत्परता ह्याबद्दल त्यांना बक्षिसी देण्यात आली.

यावर्षाच्या मार्च महिन्यात दाराचा मोठा मुलगा सुलेमान शिकोह ह्याचा विवाह राजा जयसिंग याच्या बहिणीचा मुलगा राव अमरसिंग याच्या मुलीबरोबर करण्यात आला.

## सुलेमान शिकोह याचा विवाह

लग्न होण्याच्या अगोदर एक महिना राजकन्येला दिल्ली येथे आणण्यात आले आणि मोगल रितीरिवाजांचे शिक्षण तिला मिळावे म्हणून तिला जनान्यात ठेवण्यात आले. ह्यानंतर तिला इस्लामची दिक्षा देण्यात आली आणि विवाह संबंधाचा विधी पार पाडण्यात आला.[५६]

साम्राज्यामधील इतर घडामोडींकडे शहाजहान याचे लक्ष गुंतलेले असताना मेवाडचा राजा जगतसिंग याने जहांगीर आणि राणा अमरसिंगयांच्या मध्ये झालेल्या तहांच्या अटींचा भंग करुन चितौडच्या किल्ल्याची दुरुस्ती करण्यास सुरवात केली.

## मेवाडचा जगतसिंग

१६५२ मध्ये जगतसिंग मरण पावला आणि त्याच्यानंतर गादीवर आलेल्या राजसिंगाने जगतसिंगाचेच काम पुढे चालवले. ही गोष्ट जेव्हा बादशहाच्या निदर्शनास आणण्यात आली तेव्हा राण्याच्या वर्तनाची त्याला विलक्षण चीड आली. सप्टेंबर २४, १६५४ रोजी अजमेरला भेट देण्यासाठी आणि राजसिंग याला वठणीवर आणण्यासाठी शहाजहानने दिल्लीहून प्रयाण केले. अजमेरहून त्याने ३०००० स्वार देऊन राजसिंग यांने किल्ल्याची केलेली डागडुजी उधवस्त करण्यासाठी म्हणून सादुल्ला खानाची रवानगी केली आणीबाणीचीं परिस्थिती उद्भवल्यास मेवाड येथे कूच करुन येण्यासाठी शायस्त खानाला आपल्या सैन्यानीशी तयार राहण्याचा हुकुम देण्यात आला; त्याचप्रमाणे राजपुत्र औरंगजेब याणे आपला मुलगा सुलतान महमद याला १००० फौज देऊन मंदसूर येथे ठाण मांडून राहण्यास सांगितले. परंतु राजसिंग याने शरणागति पत्करली आणि चितोडचा किल्ला उध्वस्त करण्यात आला.[५७]

## शहाजहानचे अजमेरहून पुनरागमन

बादशहाने १४ नोव्हेंबर १६५४ रोजी अजमेर सोडले[५८] आणि एक महिन्यानंतर तो फतपूर येथे येऊन पोहचला वाटेमध्ये सुलतान महमद याचीं बादशहाबरोबर मुलाखत घडवून आणण्यात आली.[५९] फतपूर येथे तीन दिवस मुक्काम केल्यानंतर शहाजहानने आग्रयाला प्रयाण केले. तेथे तो फक्त एकदिवस राहिला. याप्रसंगी राजपुत्र दारा आणि अली मर्दानखान यांनी मोतीमंशीद पहिल्या प्रथमच बाघीतली आणि बादशहा स्वत:मचव्यात प्रवास करुन आपल्या प्रिय पत्नीच्या कबरीचे दर्शन घेण्यासाठी गेला. १८ डिसेंबरला त्याने आग्रा सोडले आणि दहा दिवसानंतर तो दिल्लीला पोहचला;[६०] पुढील एका वर्षात कोणत्याही प्रकारची दूर्घटना घडून आली नाही.

## दिल्लीमधे रोगांचा प्रादुर्भाव

१६५६ च्या डिसेंबर मध्ये एका रोगाचा प्रादुर्भाव झाला आणि म्हणून शहाजहान हा आपल्या दरबारासमवेत शिकारीसाठी म्हणून गंगा नदीच्या तिरावरील गढ मुक्तेश्वर येथे गेला तेथून तो ३१ जानेवारी १६५७ रोजी राजधानीला परत फिरला [६१] परंतु दिल्ली मधील रोगराई आटोक्यात आलेली नव्हल्यामुळे ६ फेब्रुवारी रोजी दिल्ली सोडून मुरवलीसपूरकडे प्रयाण केले.[६२] दिल्लीच्या उत्तरेला १०० मैल अंतरावर यमुना नदीच्या तीरावर शहर वसलेले आहे. तेथील थंड हवेमुळे उन्हाळ्यांत तेथे राहता येईल यासाठी बादशहाने ह्या शहराची निवड केलेली होती. याठिकाणी स्वत:साठी आणि आपल्या मोठ्या मुलासाठी राजवाडे बांधून त्याने शहराची शोभा वाढविली होती आणि त्या शहराचे फैंजाबाद असे भव्य नामांतर केले होते. शहाजहान याच्या कारकिर्दीचे पहिले पर्व आता समाप्त झाले होते आणि हा प्रसंग मोठ्या थाटामाटाने साजरा करण्याच्या हेतूने त्याने मोठ्या भपकेबाज दरबाराची योजना केली,

## शहाजहानचे आजारीपण

१६५७ च्या एप्रिल महिन्याच्या अखेरीस शहाजहान दिल्लीला परतला आणि एका एकी अपचन आणि आतड्यांना रग लागल्यामुळे आजारी पडला. जवळ जवळ एक आठवडा पर्यंत शाही हकीमांनी आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा केली परंतु शहाजहान याला झालेला आजार दिवसेंदिवस वाढतच गेला. त्याच्या

खालच्या शरीराला सूज आली, त्याची जीभ आणि ताळू कोरडी पडली आणि अधून-मधून त्याला ज्वर चढल्याची चिन्हे ही दिसू लागली. या आजाराच्या कालावधीत शहाजहान याने अन्नपाणी किंवा इतर काहीही खाद्य पदार्थ यांचे सेवन केले नाही आणि औषधांचा त्यांच्यावर कोणताच परिणाम झाला नाही. त्याला कमालीची ग्लानी आलेली होती आणि त्याला होणाऱ्या यातना असह्य होत्या आणि बादशहा या यातना एखाद्या स्थितप्रज्ञा प्रमाणे आणि धिरोदात्तपणे सोशीत होता.[६३]

### वारसदारीच्या प्रश्नाचे महत्व

बादशहाच्या आजारपणाची ही बातमी जेव्हा साम्राज्यात सर्वदूर पसरली तेव्हा सगळीकडे एकच घबराटीचे वातावरण पसरले आणि क्षितीजावर जणू काही काळचाकूट्ट राक्षसी ढगांची भीषण छाया पसरली. त्यावेळी तरी सर्व-सामान्य जनतेच्या मनाने ज्या प्रश्नांची पकड घेतली तो प्रश्न म्हणजे शहाजहानचा जर मृत्यू झाला तर त्याच्यानंतर गादीवर कोण येणार मुसळमानी राजवटीची हिंदुस्थानात सुरवात झाल्यापासून हा प्रश्न नेहमी तलवारीच्या जोरावर सोड-विण्यात आला आहे. बाबराने हा प्रश्न जेष्ठपणाच्या वारसा हक्काच्या तत्वावर सोडविण्याचा प्रयत्न केला परंतू या तत्वाचा रुढीने कायद्याची जी परंपरा घालून दिली होती तिच्याबरोबर संघर्ष आल्यामुळे जेष्ठपणाच्या वारसाचक्काच्या तत्वाचा फारसा प्रभाव पडला नाही. बाबर याने हुमायून याला आपला वारस नेमल्याची गोष्ट सर्वश्रुतच आहे, परंतु कामरान याला ही गोष्ट मान्य न होऊन त्याने हुमायूनच्या या हक्काला आव्हान दिले. आणि मिर्जा हिंदाळ याने तर आग्रा येथे स्वःच्या नावाची बादशहा म्हणून ग्वाही देखिल फिरविली हुमायून याने आपल्या परीने अकबर याची वारस म्हणून नियुक्ती केली परंतु जोपर्यंत मिर्जा हकीम हा हयात होता तोपर्यंत त्याने आपल्या वडिल भावाच्या सार्वभौम-त्वला कधीच मान्यता दिली नाही. जेव्हा जहांगीर हा तख्तनशीन झाला तेव्हा त्याचा मुलगा खुश्राव ह्याने सिंहासनासाठी अटीतटीचे प्रयत्न केले. परिणामी मुसलमानी अमदानीच्या कालखंडात वारसा हक्कासाठी खडाजंगी आणि रक्तपात या गोष्टी अपवादात्मक ठरण्या ऐवजी त्यांना जणू काही कायदेशीर प्रथेचे स्वरुप प्राप्त झाले.

### वारसा हक्कासाठी आता झालेले युद्ध इतके रक्तरंजित का ठरले

परंतु यापूर्वी वारसाहक्काच्या प्रश्नावरुन जी युध्दे झाली त्यामध्ये

इतका रक्तपात आणि समाज्यात प्रचंड उळथादालथ का झाली नाही हा खरोखरच एक यक्ष प्रश्न आहे. याचे कारण शोधण्यासाठी फार खोलवर विचार करण्याची वरुरी नाही. यापूर्वीच्या कोणत्याही युध्दात सिंहासनासाठी हक्क सांगणाऱ्या शरसुदारानी इतक्या प्रचंड ताकदीनिशी परस्परांबरोबर संग्राम करण्याची जीद्द दाखविली नव्हती कामरान हिंदाल, हकीम आणि खुश्राव याना केव्हाही वरचढ आणि ताकदवान अशा अनुयायाची जोड मिळाली नव्हती परंतु शहाजहानच्या चारही मुलांपैकी प्रत्येकजण जणूकाही आपल्या परीने अनाभीषिक्त सम्राट होता. प्रत्यक्ष वस्तुस्थिती अशी होती की तिमूर-चेंगीज कुळाच्या परंपरेला अनुसरुन साऱ्या मोगल साम्राज्याची विभागणी सिंहासनावर हक्क सांगणाऱ्या वारसांमध्यें झालेली होती.

शहाजहानने आपला वारस म्हणून नियुक्त केलेल्या दाराकडे अतिशय समृध्द आणि उत्तम शासन आणि स्थैर्य असलेल्या अलाहाबाद, पंजाब आणि सुलतान आदि प्रान्तांचा ताबा होता, शहाबुलंद इक्बाल हा भारी किताब आणि चाळीस हजार घोडदळाचा सेनानायक ही अननुभूत अशी पदवी याची बादशहाने त्याच्यावर खैरात केली होती. दरबारात त्याला सिंहासनाच्या बाजूलाच असलेल्या सुवर्णासनावर आसनस्थ होण्याची परवानगी देण्यात आलेली होती आणि बादशहाकडून आपल्याला अधिकाराची जागा किंवा पदवी मिळावी यासाठी उत्सुक असलेल्या प्रत्येक इछुकाला दाराची शिफारस घ्यावी लागत असे थोडक्यात साम्राज्याचा पुढील अनभिषिक्त सम्राट दारा आहे ह्याबद्दल आमजनतेची खात्री पटावी म्हणून सर्वतोपरी प्रयत्न केले जात होते आणि या पाठीमागचा उद्देश शहाजहानच्या मृत्युनंतर नव्या भिषिक्त सम्राटाचे राज्यारोहण प्रसंगी कोणत्याही कटकटी निर्माण होऊ नयेत हा होता.

धार्मिक दृष्टिकानातून विचार केल्यास दारा हा उदारमतवादी होता आणि त्याची मते आणि श्रध्दा ही अद्वैतवादी मतप्रणालीच्या तत्वज्ञानाशी मिळती जुळती होती परंतु स्वभावाने तो चंचल तापट, पिरापिरा, आणि अव्यवहारी होता स्तुतीने तो फुगून जात असे आणि त्याला सल्ला देणाऱ्या मंडळीत तोंडपुजेपणा करणाऱ्या मूर्खांचाच भरणा अधिक होता दरबारातील त्याचे व्यवहार आणि त्याच्याबद्दल शहाजहान याला वाटणारे विलक्षण प्रेम यामुळे लाडावून तो बिघडून गेला होता. राज्यकारभार करण्यासाठी जे कौशल्य असावे लागते त्या विषयी तो पूर्णपणे अनभिज्ञ राहिला होता, आणि राज्यातील कर्तबगार आणि

कार्यकुशल अधिकाऱ्याची मने जिंकून त्यांना अतकेसे करुन घेण्याची आवश्यकता कशी आहे या गोष्टीचे महत्व त्याला पटलेले नव्हते आणि आश्चर्याची गोष्ट तसे करण्याची गरज देखील त्याला कधी वाटली नाही. अशा परिस्थितीत भविष्य काळात त्याला ज्या भयानक दिव्याला तोंड द्यावे लागणार होते त्यासाठी ज्यामनःप्रवृतीची आणि शैक्षणिक संस्कारांची गरज होती त्या दृष्टीने तो अगदी कुचकामी आणि नालायक होता.[६४]

## शुजा

शहाजहानचा दुसरा शुजा यांच्या कडे बंगालची सुभेदारी होती. विलक्षण बुध्दिमत्ता चोखंदळ आवडी निवडी आणि मनमिळाऊ स्वभाव ही त्याची गुणवैशिष्टै होती "परंतु त्याची सुखासीन वृत्ती आणि भोगलालसा, बंगाल सुभ्याचे सुलभ प्रशासन आणि जवळ जवळ १७ वर्षे कोणाचीही हाडे खिळखिळी करणाऱ्या त्यां देशातील त्याचे वास्तव्य यांनी त्याला दुर्बल, आकशी कसून मेहनत आणि कष्ट करण्याचे दृष्टिने पूर्णपणे कुचकामी, सातत्याने प्रयत्न करण्याचे आणि एकदर परिस्थितीची काळजी पूर्वक छाननी करण्याचे दृष्टिने नालायक बनविले होते. त्याच प्रमाणे राजकारणाचे यथार्थ ज्ञान प्राप्त करून घेऊन योग्य तो निर्णण घेण्याची क्षमता देखिल त्याच्या अंगात नव्हती ढिल्या आणि अस्ताव्यस्त होत जाणाऱ्या सुभ्याच्या प्रशासनावर काबू राखण्यात त्याच्या हातून चालढकल झाली होती, आपल्या सैन्याची क्षमता कमी होत चालली आहे याची त्याला दखल नव्हती आणि आपल्या सर्व खात्यांचा कारभार भोंगळ बनत चालला आहे आणि त्यांची परिस्थिती निद्रीतवस्थेत असल्यासारखी होत आहे याची देखिल जाणीव त्याला झालेली नव्हती सुभ्याच्या सर्व कारभारावर जणू काही एक प्रकारची झापड पडली होती बंगालमधल्या रोगग्रस्त हवामानाचा त्याच्या तब्बेतींवर विपरीत परिणाम झाला होता, आणि जरी त्याला नुकतेच एकेचाळीसावे वर्ष लागले होते तरी वृध्दावस्थेंची चिन्हे त्याच्या शरीरावर दिसू लागली होती अर्थात् त्याच्या बुध्दिमत्तेतील चापल्य आणि तल्लखपण। ह्यांची तीक्ष्णता पहिल्यासारखीच कायम होती परंतु जर का एकादी गंभीर समस्या आणि प्रसंग उभ्दवलाच तर या चापल्याला आणि तल्लखपणाला जाग येत असे आणि अधूनमधून वीज जशी अस्मानात तळपते तव्दत अशा आणिबाणिच्या वेळी क्वचितच शुजाला ही जाग येई.[६५]

## औरंगजेब

बादशहाचा तिसरा मुलगा औरंगजेब याच्याकडे दक्षिणची सुभेदारी

होती त्याच्या तिन्ही भावांशी तुलना करता त्याचे श्रेष्ठत्व हे अप्रामाणित होते इतकेच नव्हे तर त्याच्या अंगी असलेल्या गुणवत्तेने त्याच्या व्यक्तिमत्वात भर पडली होती. वयाच्या सोळाव्या वर्षांपासून त्याने आपले आयुष्य राज्य कारभाराच्या धबडग्यात आणि हाणामारीत घालवले होते. त्याच्या अंगातील धीमे क्षात्रतेज कोणतीही गोष्ट अखेरपर्यंत तडीस नेण्याकडे त्याचा न ढळणारा कटाक्ष आणि त्याची अतुलनीय चिकाटी या गुणांमुळे त्याच्या समकालीनांमध्ये त्याच्याबद्दल जरी आत्मीयतेची भावना निर्माण झाली नव्हती तरी कौतुकाची भावना निश्चित होती बाटरव आणि कन्दहार मुलतान आणि गुजराथ आणि त्याचप्रमाणे सिधू, आणि दक्षिणदेश यामधील आपल्या कर्तृत्वाने आपल्या अंगातली जिद्द आणि कणखरपणा यांचा प्रत्यय सर्वांना आणून दिला होता. रणांगणावर जितका तो शूर आणि साहसी होता तितकाच राज्याचा कारभार शांतपणाने चालविण्याचे जे तंत्र होते त्यासाठी लागणारे व्यवहारचातुर्य आणि शहाणपणा हे गुण त्याच्या अंगी बाणाले होते आणि त्याच्याबद्दल प्रेम वाटण्याऐवजी त्याच्या परिचयातील सर्वांना जरी त्याची दहशत वाटत असे तरी कोणत्याही व्यक्तीच्या स्वभावाचे मूल्यमापन करण्याचे कसब त्याच्या अंगी होते आणि कोणाचाही उपयोग कसा आणि कुठे करुन घ्यावयाचा यामध्ये तो वाकबगार होता. त्याच्या अंगी असलेल्या या गुणवत्तेमुळे परायवाच्या घनघोर गर्तेच्या तोंडाशी असल्यानंतर देखिल केव्हाही जयतीला आपल्याकडे खेचून आणण्याची ताकत याच्या अंगात होती.

**मुराद**

शहाजहानचा चौथा मुलगा मुराद हा माळवा आणि गुजराथ या प्रांतांचा सुभेदार होता. त्याचा स्वभाव म्हणजे परस्पर विरोधी गुणवगुणाच्या समुच्चया सारखा होता. तो शूर होता पण त्याच्या शौर्यात आततायीपणा होता परंतु त्याला अधिक आकर्षण होते ते सुखासीन आणि कटकटी नसलेल्या जीवनाचे. एखाद्या बिनधास्त सैनिकाच्या अंगी असलेला तडफदारपणा आणि उतारीळपणा त्याच्या अंगाल होता पण एखाद्या यशस्वी सेनानीच्या अंगी असलेले कौशल्य आणि इतर गुण यांचा त्याच्याजवळ अभाव होता त्याच्या या गुणांना वर्तनात सौजन्य आणि सभ्यता होती पण त्याच्या या गुणा त्याच्या अंगातील भावनावशता आणि बिनव्यवहारीपणा यांनी झाकुन टाकले होंते थोडक्यात सांगावयाचे झाल्यांस त्याचे वर्णन सिंहासन मिळविण्यन्च्या आकांक्षेने झपाटलेला एक बिनडोक तरुण असे करता येईल. परंतु आपली महत्वाकांक्षा पुरी व्हावी म्हणून एखाद्या

उतमपैकी योंजनेची आखणी करुन ही योंजना प्रत्यक्षात उतरविण्यासाठी त्या व्यक्तिच्या अंगी जे डावपेच आणि जागरुकता असावी लागते ती त्याच्या व्यक्तिमत्वात नव्हती.

**दाराविरुद्ध तीन भाहेडांची युती**

व्यक्तिमत्व आणि स्वभावधर्म याबाबतीत ज्यांच्यामधे जमिन अस्मानाची तफावत होती अशा या तीन भावंडाना एकत्र आणणारा एक दुवा होता आणि हा दुवा म्हणजे दाराबद्दल यांच्या सर्वांच्या मनामधे घर करुन बसलेली विशेषाची भावना जफरनाम्याचा लेखक महमद अमीन असे सांगतो की कन्दहारवरील अयशस्वी मोहिमेवरुन जेव्हा आपापल्या सुभेदारीच्या प्रान्ताकडे जाण्यासाठी शुजा आणि औरंगजेब दिल्लीला एकत्र आले तेव्हा दिल्ली येथील सहा दिवसांच्या त्यांच्या मुक्कामात त्या दोघांनी आपल्यामधील मैत्री अधिक दृढ करण्याचा प्रयत्न केला शुजा हा औरंगजेबाच्या निवासस्थानी गेला आणि तिथे त्यानेतीना दिवसांचा मुक्काम केला; याची परतफेड म्हणून औरंगजेबाने आपल्या थोरल्या भावाचा तीन दिवस पाहुणचार घेतला ही मैत्री पक्की करण्यासाठी शुजाने आपल्या मुलीचा वाङ्गनिश्चय सुळतान महमद याजबरोबर आणि औरंगजेबाने आपल्या मुलीचा वाङ्गनिश्चय जैन अल आबिदीन याजबरोबर निश्चित केला.[६६]

**पत्रव्यवहार**

बादशहा गंभीर रित्या आजारी पडल्याची बातमी कळल्याबरोबर औरंगजेब, शुजा आणि मुराद यांनी परस्पराबरोबर जोरदार पत्रव्यवहार करण्यास सुरवात केली. ही पत्रे जलदगतीने परस्परांना मिळावी यासाठी त्यांनी गुजरात आणि बंगाल या सुभ्यात सोयिस्कर टप्प्यांवर दक्षिण ओरिसा मार्गे पत्रे पोहोचविणार पोहोचे ठेवले.[६७] यापत्रा पैकी ज्या काहिचा नाश झालेला नाही आणि जी आपल्या कालखंडापर्यंत आजतागायत टिकून आहेत त्यापत्रातून आपला भाऊ दारा यांचा उच्छाद करण्यासाठी या तीन्ही भावानी किती विलक्षण मनसुबे रचले त्या घटनेचा उलगडा होता. बंगाल मधून शुजाने आणि मुराद आणि औरंगजेब यांनी दक्षिणेमधून केलेली कूच त्यांच्यामधे यापूर्वीच जी योजना आखण्यात आली होती त्यानुसारच हीती आणि त्यामधे त्या तिघानी आग्रा येथे एकत्रित होण्याचे परस्परांना अभिवचन दिले होते.[६८]

**औरंगजेबाने दाखविलेल्या कळकळीतील ढोंगीपणा**

या पत्रव्यवहाराच्या अभ्यासायमधून आणखी एक गोष्ट बाहेर येते

आणि तो म्हणजे आपल्या दोन्ही भावाबरोबर पत्र व्यवहार करताना त्यांत दाखविलेली कळकळ आणि आदराची भावना औरंगजेब आणि मुराद हे दोघेजण शुजाला भाई जियू असे संबोधित आपल्या शुजाला विहिलेल्या एका पत्रात औरंगजेबाने सुचविले की आपल्यापैकी प्रत्येकाच्या दरबारात दुसऱ्या दोन भावाचे प्रतिनिधी असावेत आणि असे करण्याचा उद्देश त्या तिघामधे अधिकाधिक एकोपा निर्माण होण्यास आणि त्यांच्यामधे ऐक्य अधिक दृढता होण्यास सोईच जावे असे आपले मत त्याने प्रकट केले[६९] दुसऱ्या एकापत्रात त्याने शुजाला लिहिले की जर शत्रुने आपल्या पैकी कोणा एकावरही हल्ला केल्यास दुसऱ्या दोघानी त्याला सख्त प्रतिकार करावा सरतेशेवटी मोहिमेस सुरवात होण्याच्या ऐन वेळी त्याने शुजाला दाराच्या स्तुतीला आणि तडजोडीच्या बोलण्याला न फसण्याचा इशारा दिला.[७०]

### औरंगजेब आणि मुराद पत्रव्यवहार

मुराद आणि औरंगजेब यामधीलपत्र व्यवहार हा देखिल तितकाच चिकेवेधक आहे बहुतेक करुन मुरादने औरंगजेबाला लिहिलेल्या आपल्या अगदी पहिल्या पहिल्या पत्रात विजापूर वरील मोहिमेची जी यशस्वी संगता करण्यात आली त्याबाबत उल्लेख टाळल्याबद्दल तक्रार केली होती. "परंतु तुझ्या हातून ही गोष्ट घडळी यांचे कारण म्हणजे इतर गोष्टीमधे तुझे व्यवधान गुतले असावे हेच असले पाहिजे; नाहीतर अशा प्रसंगी आपल्या पत्रव्यवहारात असा विलंब होणे निश्चितच अयोग्य आहे." आणखी एकदा तो लिहितो "आपल्यामधे जो करार झाला आहे त्याची मुख्य अट म्हणजे परस्पराच्या बातम्यांची देवाण घेवाण आणि म्हणून माझी तुला अशी कळकळीची विनंती आहे की तुला ज्या काही बातम्या तुझ्या अध्यान्मिक आणि ऐहिक स्थानांकाकडून कळल्या आहेत त्या ताबडतोब मला कळव त्याचप्रमाणे बंगालमधे भाई जियूला तू काहीतरी लिही असे माझे तुला आग्रहाचे सांगणे आहे."[७१] यावर औरंगजेब मुरादला लिहितो मला असे विश्वनीयरित्या कळले आहे की, प्रशासन बदल्या आणि नेमणूका यामधे शत्रूचा दबाव प्रमाणाबाहेर आणि अवास्तव वाढला आहे आता शत्रूचे प्रयत्न खजिना गोळा करणे आणि सैन्याची जमवाजमव यामधे वेधले आहे आपल्याला अतिशय सावधगिरी बाळगण्याची वेळ आता प्राप्त झाली आहे आणि म्हणून आपण आपल्या पत्रात जरुर नसलेल्या कोणत्याही गोष्टीचा उल्लेख करणे टाळले पाहिजे."[७२] या नंतर काही कालावधीतच औरंगजेब आणि मुराद याच्यामधे

एक तह झाला आणि या तहानुसार दारावर विजय प्राप्त झाल्यानंतर साम्राज्याच्या पश्चिम भागाचे सार्वभौमत्व मुरादकडे साचविण्यात यावयाचे होते.[७३]

**औरंगजेबाचे खरे उद्दिष्ट**

सारांश औरंगजेब जो सारखे अट्टाहासाने प्रतिपादन करित होती की, दाराविरुध्द मोहिम हाती घेण्याचा त्याचा एकमेव उद्देश शहाजहानची दाराच्या कचाटयातून सुटका करणे हाच आहे ही गोष्ट म्हणजे त्याचा निव्वळ ढोंगीपणा आणि लबाडी होती अगदी सुरवातीपासूनचा त्याचा बेत स्वतःसाठी सिहांसन हस्तगत करुन घेणे हा, होना कारण आपला बाप आता साम्राज्याचा राज्यकारभार व्यवस्थित रितीने करण्यास लायक राहिला नाही याबद्दल त्याची मनोयन खात्री झालेली होती त्याने शुजा आणि प्रामुख्यकरुन मुराद याला जी अभिवचने दिली होती ती कितपत मनापासून दिलेली होती यावर मत देणे जरा कठिण आहे. परंतु नंतर ज्या काही घटना घडून आल्या त्यावरुन औरंगजेब हा लुच्चेगिरिचे आणि दुटप्पीपणाचे एक भयानक कारस्थान खेळत होता ही गोष्ट स्पष्ट होते पश्चिमेकडील प्रान्तांचे स्वामित्व मुरादकडे सोपविल्यास मुराद ह्याच्याबरोबर मैत्रीचे संबंध न राहता तो आपला एक प्रतिस्पर्धी म्हणून होईल हे जाणण्याइतका चाणाक्षपणा औरंगजेबाच्या अंगी होता ह्याविषयी शंकेला जागा घेण्यास वाव नाही आणि तसे करणे म्हणजे औरंगजेबाच्या बुध्दिमत्तेला कमी लेखण्यासारखे होते. त्याचा खापरपणजा हुमायून याने जी अशाच प्रकारची कार्यवाही केली त्याचे जे भयानक परिणाम झाले त्याविषयी तो अनभिज्ञ असण्याची शक्यता संभवते का हा प्रश्न विचार करण्याजोगा आहे. शहाजोगपणाचा मार्ग म्हणजे मुरादबरोबर मैत्री करणे हाच होता आणि एकदा जेव्हा राजकिय क्षितीजावर भरालेल्या वादळाचा उपशम झाला तेव्हा औरंगजेबाने मुरादची तुरूंगामध्ये रवानगी केली औरंगजेबाच्या या कृत्याचा नैतिक आणि सदसद्विवेकच्या भूमिकेवरुन विचार केल्यास कोणीही धिःकार करील पण त्याचबरोबर एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे आणि ती म्हणजे औरंगजेब जे काहि कारस्थान खेळत होता ते काही तत्ववेत्त्याच्या भूमिकेतून खास नव्हते त्याचे लक्ष हे सार्वभौमपद प्राप्त करुन घेण्याकडे केंद्रित झालेले होते.

**दारा आपल्याला प्राप्त झालेल्या दर्जाची मजबुती करतो**

शहाजहान आजारी पडून आता एक आठवडयापेक्षा अधिक कालावधी लोटला होता त्या मनःस्थितीत त्याने दारा यांची आपला वारस म्हणून नियुक्ती

केली. त्याने आपल्याअधिकाऱ्याना असे हुकूम दिले की त्यांनी प्रत्येक बाबतीत प्रत्येक ठिकाणी आणि सदासर्वकाळ दाराच्या सर्व आज्ञांचे पालन त्याला सम्राट समजून करावे सहाजिकच त्याने आपल्या अधिकारांची कक्षा वाढविण्यास सुरवात केली परंतु अतिशय महत्वाच्या बाबतीत शहाजहानचा सल्ला घेण्याची जरुरी आणि अनेक वेळा निर्णय घेण्याचे बाबतीत त्याच्या स्वतःकडूनच होणाऱ्या चुका यामुळे त्याच्या या प्रयत्नात अनेक तऱ्हेत्रे अडथळे निर्माण होऊन त्याला आपला मतलब साध्य करणे कठीण झाले; हे सर्व करण्यापाठीमागे त्याचा काय उद्देश होता त्याबाबत सूचना त्याने मीर जुम्ला, महाबतखान आणि शाही अधिकाऱ्याना त्याने दक्षिणेतून ताबडतोब दरबारात परत फिरण्यासाठी आणि विजापूरच्या मोहिमेसाठी त्यानी जो फौजफाटा आणि रसद् नेली होती ती सर्व बरोबर घेऊन येण्याचे जे आदेश दिले. त्यामधे प्रचीत होते. यानंतर बादशहाने दाराच्या शिफारशीनुसार त्याचे अनुयायी आणि मित्रमंडळी यास बढत्या दिल्या. दिल्लीचा सुभेदार म्हणून खलीलउल्लाखानाची नेमणूक करण्यात आली आणि कासीमखान याला गुजराथच्या सुभेदारीचे आमिष दाखविण्यात आले.[७४]

**दाराच्या प्रतिस्पर्धात उडालेली घबराट**

परिणामी सुभ्यांच्या प्रशासनातील अधिकाऱ्यांच्या बदल्या आणि नियुक्ती याबाबत बदल करण्याचा जो घाट घालण्यात आला होता त्यामुळे शुजा, औरंगजेब, आणि मुराद याच्यात विलक्षण घबराट पसरली. बिहारप्रान्त दाराकडे लावून देण्यात आला तो या योजनेतील पहिला टप्पा होता. या दिशेने आणखी पाऊल टाकले जाणार याला पुष्टी देणारी एक अफवा पसरली आणि ती म्हणजे मुरादकडून माळव्याची आणि औरंगजेबाकडून वऱ्हाडची सुभेदारी काढून घेतली जाणार ही[७५] राजपुत्रांच्या दृष्टीने संघर्षाच्या दिशेने पाऊल टाकण्यायोग्य अशी वेळ निर्माण झाली होती.

जणू एकादी खूण मिळावी आणि लगोलग सारे
पुत्र उघडउघड तयारी करतात
अगणीत प्रचंड अशा सैन्याची आणि धाव घेतात
युद्धाची धडक मारण्यासाठी
महासागरावर भन्नाट होऊन बेलगाम सुटलेले वारे
जशी धडक घेतात आपापसात तरी
आणि स्थिर करण्यासाठी शस्त्रांचा वापर करुन
सम्राट कोण होणार हे ठरविण्यासाठी

## मुराद स्वातंत्र्य पुकारतो

नोव्हेंबर १६५७ च्या मध्याला शहाजहानला पूर्णपणे बरे वाटले. दक्षिण आणि बंगाल या मध्ये ज्या अफवांना पिक आले होते आणि त्याच्यात भर म्हणून दाराने जी तयारी केली होती त्यामुळे साम्राज्याचे कधीही भरून न येण्याइतके नुकसान झाले. ऑक्टोबरच्या सुरवातीला मुरादने आपला दिवाण अलीनकी याचा खून केला, नोव्हेंबरच्या सुरवातीला सुरतेत लुटालुट केली आणि अखेर ५ डिसेंबर रोजी स्वतःच्या नावे बादशहा म्हणून द्वाही फिरविली.[७६] "सुरवातीला दाराने बादशहातर्फेच हे पत्र मुरादकडे पाठविले आहे अशा अविर्भावाचे एक पत्र रवाना केले आणि त्यामध्ये मुरादची बदली गुजराथेतून वऱ्हाडात केली असल्याचे त्याला कळविले. वऱ्हाडची सुभेदारी त्यावेळी औरंग–जेबाकडे होती त्यामुळे असे करण्यात दाराचा हेतू मुराद आणि औरंगजेब यामध्ये शत्रुत्वाची भावना निर्माण करण्याचा होता. मुरादला दाराच्या बेताची कल्पना आली. त्याने कुत्सितपणे त्याला आलेल्या पत्रातील आदेशाकडे दुर्लक्ष केले आणि त्याने गुजराथेतून कूच करण्याची वा औरंगजेबाविरुद्ध हालचाल करण्याची कोणतीच कारवाई केली नाही.[७७] इकडे शुजाने बंगालमध्ये आपल्या नावाची बादशहा म्हणून द्वाही फिरविली.

## शहाजहानतर्फे सैन्यांची पाठवणी

जेव्हा शुजा आणि मुराद यांच्या हालचालीची बातमी शहाजहानच्या काना–वर घालण्यात आली, तेव्हा त्याने त्या दोघा जरबस बसविण्यासाठी सैन्य पाठ–विण्यास संमती दिली. माळव्याकडे दोन सेनाविभागाना रवाना करण्यात आले. कासिम खानाच्या हाताखालील विभागाला गुजराथच्या सुभेदारीवरून मुरादची हकालपट्टी करण्याचा हुकूम देण्यात आला होता तर जसवंतसिंग याच्या हाताखालील दुसऱ्या सेना विभागाला दक्षिणेतून, आगेकूच करीत येणाऱ्या औरंगजेबाला रोखून धरण्याचा आदेश देण्यात आला होता. औरंगजेबाबरोबर स्नेहसंबंध राखून असल्याबद्दल बादशहाच्या मनात शायस्ताखानाबद्दल दाट संशय होता आणि म्हणून माळव्याहून त्याला परत बोलावण्यात आले. दरम्यान मुराद आणि औरंगजेब या दोघांनी उत्तरेकडे कूच करून जाण्याची आपली योजना आखली होती. विशिष्ट वेळी आणि विशिष्ट ठिकाणी दोघांच्या सैन्याची भेट व्हावी म्हणून किती टप्पे कूच करुन जावयाचे आणि किती वेळात हे देखील ठरविण्यात आलेले होते.[७८]

## औरंगजेब मीर जुम्ला याला कैद करतो

दरम्यान बादशाही फर्मानानुसार दरबाराकडे कूच करुन येत असलेल्या मीर जुम्ला यास औरंगजेबाने कैद केले,[७९] आणि २० मार्च १६५८ रोजी त्याने बुरहाणपूर सोडले, ३ एप्रिल रोजी नर्मदा नदी ओलांडली, आणि अकरा दिवसांनंतर तो मुरादला येऊन मिळाला. दरम्यान जसवंतसिंग आणि कासिम खान हे उज्जैनला येऊन पोहोचले आणि दोन्ही राजपुत्रांच्या काय हालचाली आहेत याबद्दलच्या माहितीच्या अभावी परिस्थितीत कशा प्रकारचा बदल घडून येत आहे यावर नजर ठेवण्यासाठी येथेच मुक्काम केला. या ठिकाणी कवीराय नावाच्या ब्राम्हणाने औरंगजेबाकडून जसवंत सिंगाला एक पत्र आणून दिले. या पत्रात प्रतिकाराची भूमिका सोडून देऊन शांतपणे जोधपूरला परत फिरण्याचा सल्ला औरंगजेबाने जसवंत सिंग याला दिला होता.[८०] परंतू जसवंतसिंगाने बादशहाच्या हुकुमाप्रमाणे हालचाली करण्याचा आग्रह धरला, औरंगजेबाने केलेली सूचना स्विकारण्यास नकार दिला आणि युद्धाची तयारी केली. दोन्ही विरोधी पक्षात धर्मत येथे घनघोर युद्ध झाले आणि पराभवाची मानहानी पत्करण्याऐवजी रजपूतांनी त्यांच्या नेहमीच्या प्रथेनुसार मृत्यूची खेळी करत आपल्या प्राणांची बाजी लावली. एक प्रसंग असा आला की, "औरंगजेबाने उत्तरेकडे कूच करुन जाण्याचा जो निर्णय घेतला त्याबद्दल त्याला पस्तावा करण्याची पाळी येते की काय," परंतु औरंगजबाने आपल्या अनुयायात जिद्दीची भावना निर्माण केली आणि त्यांना एकत्र केले, हल्लेखोरांवर सपाटयाने हल्ला केला आणि पराभवाच्या खाईतून विजयश्री खेचून आणली. जसवंतसिंग जखमी झाला आणि जोधपूरकडे पळून गेला आणि उर्वरीत मुसलमान फौजेने आग्र्याच्या दिशेने माघार घेतली.[८१]

## धर्मतच्या लढाईच महत्व

वारसाहक्काचा हा जो संग्राम चालला होता त्यात धर्मतची लढाई ही निर्णायक ठरली. दक्षिणेतील युध्दाचा नायक औरंगजेब हा आता जो जगासमोर आला तो कोणत्याहि प्रकारचे नुकसान न होता आला इतकेच नव्हे तर अखंड हिंदूस्थानात ज्याच्या लढवय्या कौशल्याला कोणताहि प्रतिस्पर्धी नाही या व्यक्तिमत्वाच्या जोषात त्याला या युध्दात कसलीच झीज सोसावी लागली नव्हती. ज्याची मनस्थिती दोलायमान होती त्यानी निर्णय घेऊन टाकला. त्याच्या मनात आता इतक्या शाहि शंकेला जागा नव्हती की चार भावांपैकी विजयश्रीची माळ

कोणासाठी भाग्यविधात्याने निश्चित केली होती" प्रत्यक्ष लढाईच्या मैदानावर देखिल," त्याच्या एका अनुयायाने क्षमनीय अतिशयोक्तीने लिहिल्याप्रमाणे, "साऱ्या भूतलाने आणि प्रत्यक्ष काळाने देखिल एक विजेता म्हणून त्याच्या अभिनंदनाची आरोळी दिली."[८२]

**दाराचे प्रयत्न**

नोव्हेंबर १६५७ पासून शहाजहानचे आग्रा येथे वास्तव्य होते. त्याच्या अलीकडच्या आजारिपणापासून तो अशक्त झाला होता आणि गरमीचा त्याला भयंकर त्रास होत असे आपल्या डॉक्टराच्या सल्ल्यानुसार ११ एप्रिल १६५८ रोजी त्याने आग्रा सोडले. आणि तो बिलोचपूर येथे येऊन पोहचला. इथे त्याला धर्मतच्या संग्रामाची आणि पराभवाची बातमी कळली. दाराने आता आपल्या बापाला आग्रा येथे परतण्याची गळ घातली आणि बंडखोर राजपुत्रांबरोबर मुकाबला करण्यासाठी नव्या फौजेची आग्रा येथे जमवाजमव करण्याची आपली योजना त्याला सांगितली. दरम्यान दोन्ही पक्षात समझोता व्हावा यासाठी काही अर्धवट प्रयत्न करण्यात आले. जहानआरा हिने औरंगजेबाला एक पत्र लिहिले. त्यात औरंगजेबाची खात्री पटावी म्हणून तिने त्याला असे कळविले साम्राज्याच्या कारभारावर बादशहाचे परिणामकारक नियंत्रण आहे आणि प्रार्थनेत त्याचा व्यतीत होणारा वेळ सोडल्यास बादशहा आपला सर्व वेळ आपल्या प्रजेच्या हितसंबंधाकडे आणि धर्माचा प्रसार करण्याकडे खर्च करतो. औरंगजेबाच्या उताविळपनाबद्दल तिने त्याला सूचनावजा ताकिद दिली आणि त्याला बजाविले" शहाणपणा आणि दुरदर्शीपणा यांच्या काटेकोर दृष्टिकोनातून बघितल्यास आपल्या वडिल राजपुत्राविरुध्दचा लढाईचा पवित्रा हा अक्षम्य आहे तू राजनिष्ठ आणि आज्ञाधारपणा यांचा मार्ग चोखाळवास आणि ज्या ठिकाणी कूच करुन आला आहेस तेथेच मुक्काम करुन राहणे हे योग्य आहे असे मला वाटते. दोन्ही पक्षाकडील मुसलमानाच्या जिविताची विनाकारण होणारी हानी टाळण्यासाठी तू तुझ्या प्रतिनिधिना दरबाराकडे रवाना कर."[८३] परंतु जहान आराच्या या उपदेशपर पत्राचा उपयोग उघड्या घड्यावर टाकलेल्या पाण्यासारखा होऊन औरंगजेबाने तिकडे पूर्णपणे दुर्लक्ष केले.

**औरंगजेबकडून बादशहाला पत्र**

शहाजहान याने देखिल अशाच प्रकारचा मजकूर असलेले पत्र औरंगजेबाला लिहिले असे दिसते या पत्रात याने औरंगजेब ज्या मार्गाने जात

होता त्यापासून त्याला परावृत्त करण्याचा प्रयत्न केला होता. परंतु औरंगजेबाने त्यावर त्याला कळविले, तुमच्याकडे आता राजकीय वा आर्थिक बाबींचा ताबा उरला नाही. ते सर्व अधिकार आता वडिल राजपुत्र दारा याने बळकाविले आहेत. त्याने मला सातत्याने त्रास देऊन माझा उच्छाद करण्याचा प्रयत्न केला आहे आणि माझा फायदा ज्या ज्या दिशेने आणि बाजूने होऊ शकेल अशी ठिकाणे जाणून बुजून बंद केली आहेत. माझ्या सेनादलाचा नाश व्हावा म्हणून दक्षिणच्या खजिन्यातील उत्पन्नात घट पाडण्याची त्याची इच्छा होती. प्रयत्नांची पराकाष्ठा करून मी विजापूरची इतकी काही दैन्यावस्था करून सोडली की त्याना एक तर भरपूर खंडणी देणे भाग होते किंवा त्यांचा सर्व प्रदेश लुटून आणि जाळून पोळून उध्वस्त तरी करण्यात आला असता. परंतु वडिल राजपुत्राने सैन्य मागे बोलावून घेण्याकरता निरोप्ये खाना केले आणि विजापूर मधे शांतता प्रस्थापित होण्याबाबत आशा निर्माण केल्या. यामुळे विजापुऱ्यांना चेतावणी मिळाली आणि त्यानी खूप धामधूम उडविली--- जर का दुर्दैवाने त्या परकीय देशात शाही सैन्यावर एकादी आपत्ती कोसळली असती तर साऱ्या जगात आपल्या अब्रुच्या नाचकीचे वारे लागले असते --- आणि आपल्याला आपली गेलेली इज्जत परत प्राप्त करुन घेंणे अशक्य झाले असते. परमेश्वराची माझ्यावर कृपा होती म्हणूनच मी सुरक्षितपणें त्या देशातून परत येंऊ शकलो. त्याशिवाय इतक्यावद त्याचे समाधान झाले नाही म्हणून की काय त्यानें तुम्हाला माझ्याविषयी वाटणाऱ्या प्रेमाच्या अभावाचा फायदा घेऊन माझ्याविरुद्ध चिथावले, माझ्या जहागिरीतून वऱ्हाड काढून घेतला, आणि माझ्या ताब्यातील जो काही थोडाथोडका प्रदेश होता तो हिसकावून घेण्यासाठी जसवंतसिंगाची प्रचंड सैन्य देऊन खाजगी केली आणि माझ्या ताब्यात तळहाताइतकी देखिल जाणिव राहू नये असा मनसुबा रचला. राजकीय बाबींवरील ताबा तुमच्या हातातून गेल्याची जेव्हा मला जाणीव झाली आणि जेव्हा मला असे कळले की, त्याच्या सांगण्यावरुन तुम्ही तुमच्या इतर मुलांना शत्रूवंत लेखता आणि त्याच्या इच्छेनुसार फर्माने काढता तेव्हा माझी होणारी मानहानी टाळून स्वत्व राखण्यासाठी तुमची समक्ष भेट घेऊन एकंदर परिस्तिथीची तुम्हाला माहिती करुन देण्यासाठी मी स्वत: येण्याचा निर्णय घेतला. जसवंतसिंग हा माझ्या मार्गात आडवा उभा राहिला. त्याचा मी दणदणीत पराभव केला. आता माझ्या कानी असे आले आहे की, स्वत: शहा बुलंद इक्बाल हा माझ्या बरोबर सामना देण्यासाठी धोलपूर येथे दाखल झाला आहे. माझ्या विरुद्ध यशप्राप्त करून घेणे त्याला कदापिही शक्य नाही आणि

म्हणून त्याने मुकाट्याने आपल्या पंजाबमधील जहागिरीकडे निघून जावे आणि तुमची सेवाचाकरी माझ्याकडे सोपवावी हेच सर्वार्थाने श्रेयस्कर आहे."

### दोस्तांच्या फौजा चंबळ पार करतात

औरंगजेबाच्या मनात दाराबद्दल इतके वैमनस्य का होते याचा या पत्रावरुन उलगडा होतो आणि आपल्या बापाच्या हातातून राजसत्तेचा निसटू पहाणारा राजदंड आपल्या पकडीत आणण्याकरता केवढ्या मोठ्या ठाम निश्चयाने तो रणांगणात उतरला होता याचीही यावरुन कल्पना येते. यानंतर मुराद आणि औरंगजेब यांनी उज्जैनहून कूच केले आणि ते ग्वाल्हेर येथे येऊन पोहचले. चंबळ नदी पार करण्याचे जे उतार होते ते उतार दाराने तेथे जे सैनिक ठवले होते त्यानी अडवल्याचे त्याना दिसले. यावर चंपतराय नावाच्या एका बुंदेला अधिपतीच्या सहाय्याने औरंगजेबाने चंबळ नदी भदावर येथ पार केली. हा उतार फारसा कोणाला माहित नव्हता. यावर दारान माघार घेतली आणि साभुगड येथे आपल्या सैन्याची पुनर्रचना केली. सकाळपासून मध्यप्रदेश पर्यंत चाललेल्या घनघोर युध्दानंतर दाराचा पराभव झाला आणि त्याने आग्र्याच्या दिशेने पलायन केले. औरंगजेबाची भविष्यवाणी अशात-हेनें खरी ठरली आणि दिल्लीश्वराचा मुकुटपणी त्याच्या अगदी आवाक्यात आला.

### दाराचे पलायन

सामुगढ येथून पलायन केल्यानंतर आग्रा येथे मुक्काम करण्याचे धारिष्टच दाराला झाले नाही आणि म्हणून त्याने ताजेतवाने सैन्य जमा करुन आपल्या विजयी भावाचा मुकाबला करण्यासाठी म्हणून सरळ दिशेने कूच केले. दरम्यान थोडिशी विश्रांन्ती घेण्यासाठी औरंगजेब आणि मुराद यांनी लढाईच्या मैदानावरच मुक्काम केला

### मुरादचा पश्चाताप

धर्मतच्या लढाईनंतर लगेचच बादशहा मृत्यू पावल्याच्या अफवा खोट्या आहेत याची मुराद याला जाणीव झाली आणि त्याने तावडतोब आपल्या बापाला क्षमायाचनेच्या सुरात एक पत्र लिहिले." माझ्या हृदयात तुमच्याबद्दल आज्ञाधारकपणा आणि आदर याशिवाय दुसऱ्या कोणत्याही भावनांना स्थान नाही. परंतु माणसाच्या हातून चुक ही होणारच. तुमच्या विषयी ती दुर्दैवी बातमी कानावर आल्यावर माझ्या हातून काही अपराध झाले आणि त्याबद्दल मला अतिशय खेद होत आहे. तुमच्या आजारीपणाच्या काळात दादाभाई जियू

याने आपल्या मर्जी विरुध्द काही गोष्टी केल्या, आम्ही आणि आमचे दरबारातील वकील यांच्यामधील सर्व पत्रव्यवहारावर बंदी घातली, आणि आमची, विशेषत माझी पत्रे, आपल्यासमोर ठेविली जाणार नाहीत अशी कारवाई केली. अशा परिस्थितीत आपल्याकडून उत्तराची अपेक्षा मी कशी करु ? अशा परिस्थितीत मला माझ्या मनातील संशयाचे निराकरण करुन घ्यावयाचे होते आणि म्हणून मी दरबारात येण्यासाठी कूच केले. मी अजमेर मार्गे आलो नाही याचे कारण त्या मार्गावर असलेले पाण्याचे दुर्भिक्ष आणि म्हणून मी माळव्यामधून आलो आणि तिथे मला औरंगजेब येऊन मिळाला. तो देखिल दरबारात तुमचे दर्शन घेऊन तुमच्याकडे हजेरी लावण्यासाठी निघाला होता. जसवंतसिंगाने आमचा मार्ग अडविला आणि आम्ही त्याचा पराभव केला.[८६] यानंतर आपल्या बापाला पाठविलेल्या एका पत्रात मुरादने पडते घेऊन आपल्या बापाची सपशेल माफी मागितली आहे.

मुरादची ही मनोवृती पाहिल्यानंतर असे उघडउघडपणे दिसून येते की, जरी मुरादला राजसत्तेची अभिलाषा होती तरी देखिल आपला बाप जिवंत असताना सिहासनावर अधिष्ठित होण्याच्या कल्पनेचा त्याला तिटकारा वाटत होता. गुजरातमध्ये त्याने आपल्या नावे बादशहा म्हणून व्दाही फिरविला याचे कारण आपल्या बापाचा मृत्यू झाला आहे या बातमीवर त्याचा विश्वास बसला म्हणूनच; आणि त्याने औरंगजेब आणि शुजा या दोघांना पत्रे पाठवून आपली भूमिकाच कशी योग्य आहे हे पटविण्याचा प्रयत्न केला शुजाला पाठविलेल्या एक पत्रात तो लिहितो:" बऱ्याच काळापर्यंत बादशहा हा कालवश झाल्याबद्दला मला खात्री होती; परंतु भाई औरंगजेब त्या बातमीवर विश्वास ठेवण्या अजूनही काकू करित आहे. परंतु त्याच्या मार्गदर्शनावर माझा पूर्ण विश्वास आहे."[८७] यामधे मुराद आपल्या व्यक्तीमत्वामधील स्वभाववैशिष्टचाला जागूस राहिला आणि त्याने वारसाहक्काच्या युध्दात जो भाग घेतला तो त्याच्या उतावळया स्वभावाला अनुसरुनच जर तो एकाकी राहिला असता तर त्याच्या वडिल भावाने आपल्या बापाला ज्या अपमानाच्या खाईत लोळवयास लावून आयुष्य नकोसे केले तितकी भयानक परिस्थिती भोगण्याची पाळी मुरादने आपल्या बापावर आणली नसती.

**शहाजहानचे अखेरचे प्रयत्न**

मुराद आणि औरंगजेब यांचे आग-याच्या परिसरांत आगमन झाल्या-नंतर शहाजहानने औरंगजेबाला ताबडतोब आपल्या भेटीसाठी पाचारण केले

आणि आपण त्याला पाहण्यासाठी आणि भेटण्यासाठी अतिशय उत्सुक असल्याचे कळविले. औरंगजेबाने अतिशय सौजन्याने बादशहाला कळविले की, या भेटीसाठी तो शुभमुहूर्ताचा वाट पहात आहे. त्यानंतर बाप आणि लेक या दोघांमध्ये बराच पत्रव्यवहार झाला. एका प्रसंगी खुद्द जहानआरा बादशहा कडून निरोप घेऊन औरंगजेबाला भेटण्यासाठी आली आणि तिने त्याला असे सांगितले की' तुझी नियुक्ती वारस म्हणून करण्याचा, पंजाब आणि पश्चिमेकडील सुभे यांच्यावर दाराला सुभेदारीत कायम करण्याचा, मुआज्जमला दक्षिण, मुरादला गुजरात आणि शुजाला बंगाल हे प्रांत लावून देण्याचा बादशहाचा मनसुबा आहे. परंतु औरंगजेबाने यावर असे उत्तर दिले की, दाराचा पूर्ण बंदोबस्त केल्या खेरीज आपण शहाजहानची भेट घेणार नाही. परिणामी निराश होऊन जहानआरा परत गेली.[८८]

आपल्या समोर कोणत्या प्रकारची परिस्थीती आऽऽऽ वासून उभी आहे हे समजण्याइतके चातुर्य औरंगजेबामधे निश्चितच होते. जोपर्यंत दाराच्या हातात सत्तेचा कणभर देखिल अंश होता तोपर्यंत निश्चित मनाने तो कसा बरे राहू शकणार होता ? परंतु त्याने शहाजहानच्या बाबतीत इतका जो क्रूर थंड-पणा दाखविला त्यालाही एक कारण होते आणि ते म्हणजे शहाजहानच्या मनात औरंगजेबा विषयी शत्रुत्वाची भावना होती. याला कारण खलीलउल्लाखानाने त्याच्या मनात जो संशय निर्माण केला होता ते होते.[८९] तरी देखिल औरंगजेबाने आपल्या मनाला मुरड घातली आणि आपल्या बापाला भेटण्यासाठी म्हणून त्याने आपल्य मुक्कामा पासून कूच केले, परंतु शायस्ताखान आणि शेख मीर यांनी त्याला त्याच्या बेतापासून परावृत्त केले. यानंतर काही काळाने शहाज-हान याजकडून एक फर्मान घेऊन दाराकडे आपला एक चेला हा निरोप्या आला. त्यामुळे शहाजहान याने दाराला दिल्ली मधेच मुक्काम करून राहण्यास सांगितले होते. आणि त्या काळात आपण शत्रू पक्षाला थातूरमातूर करीत अडकवून ठेवू असे कळविले होते. शहाजहानचा दुटप्पीपणा यामुळे सरतेशेवटी उघडा झाला आणि औरंगजेबाने त्याच्या भेटीस न जाण्याचे ठरविले. आग्रा किल्ल्याचा या अगोदरच पाडाव झाला होता आणि शहाजहान त्या किल्ल्यात बंदस्ति झाला होता.[९०]

### दाराची हालचाल

आग्रा येथून पलायन केल्यानंतर त्याने औरंगजेबाबद्दल इतकी दहशत घेतली की, दिल्ली येथे मुक्काम न करताच त्याने लाहोरकडे माघार घेतली

आणि त्याच्या विरुध्द कूच करुन येणाऱ्या शत्रूविरुध्द त्याने बिआस नदीच्या किनाऱ्यावर मोर्चे उभारले. दरम्यान औरंगजेबाने आग्र्याहून कूच केले आणि मथुरेजवळ विश्वास घात करुन मुरादला कैद केले त्यानंतर त्याने आपली आगेकूच चालू ठेवली आणि तो दिल्ली येथे येऊन पोहचला त्याठिकाणी त्याने फारच थोडा काळ वास्तव्य केले त्याने दाराच्या सेनाधिकाऱ्यामध्ये संशयाचे वातावरण निर्माण केले आणि ही परिस्थिती इतक्या थराला जाऊन पोहचली की दाराच्या मनात त्याचा एकनिष्ठ सेनानी दाऊदखान याच्याबद्दल किंतु निर्माण झाला दाराने लाहोर खाली केले आणि मुलतान आणि सिंधच्या. दिशेने पलायन केले औरंगजेबाच्या अधिकाऱ्यानी दाराचा सक्त पाठलाग केला सिंधमधून दाराकडे गेला आणि तेथून गुजरातमधे शिरला. गुजराथच्या सुभेदाराने त्याचे सन्मानपूर्वक स्वगत केले तेथे असताना जसपतसिंगाने त्याला मदतीचे आश्वासन दिले आणि म्हणून त्याने अजमेरकडे कूच केले, परंतु जसवंतसिंग याने आपला मोहरा फिरवून पक्षपालट केला आणि दाराला देवराई येथे औरंगजेबाच्या अधिकाऱ्याबरोबर मोठी अटीतटीची लढाई द्यावी लागली. त्यात दाराचा पराभव झाला आणि त्याने अहमदाबादेकडे पळ काढला. परंतु अहमदाबादच्या सुभेदाराने शहराचे दरवाजे त्याच्या तोंडावर बंद केले. पर्शियामधे आश्रय घेण्याचे उद्दिष्ट मनात ठेवून दाराने सिंधच्या दिशेने माघार घेतली. सिंधच्या मार्गावर दादेरचा जमिनदार मलिक जीवन याने कपटाने त्याला केले आणि औरंगजेबाच्या अधिकाऱ्यांच्या हाती त्याला सुपूर्द कैद केले. दाराला दिल्ली येथे आणण्यात आले आणि शहरामधून त्याची धिंड काढल्यानंतर त्याचा वध करण्यात आला.

### शुजा याच्या हालचाली

आतापर्यंत शुजाच्या हालचाली कडे दुर्लक्ष झाले होते. त्याची आता दरवल घेऊ. मुराद प्रमाणेच त्यानेही बंगालमध्ये बादशहा म्हणून आपल्या नावे व्दाही फिरविली होती, आणि तिन्ही राजपुत्रात यापूर्वीच ठरविलेल्या योजनेनुसार त्याने पाटण्याच्या दिशेने आगेकूच केली. पाटणा शहर लवकरच त्याच्या हाती पडले. जेव्हा शुजाच्या आक्रमणाची बातमी बादशहाला समजली तेव्हा त्याने जयसिंग आणि सुलेमान शिकोह या दोघांना त्याला प्रतिकार करण्यासाठी पाठवण्यात यावे या दाराच्या प्रस्तावाला मान्यता दिली. बनारसच्या ईशान्येला पाच मैलांवर असलेल्या बहादूरपूर येथे शुजाचा पराभव करण्यात आला. शुजाने बंगालच्या दिशेने माघार घेतली आणि त्याच्या पाठलागावर सुलेमान शिकोहने कूच केले. परंतु औरंगजेब आणि मुराद यांच्या आक्रमणाला तोंड

देण्यासाठी ताबडतोब परतण्याचे आग्रहाचे आदेश बापाकडून आल्यामुळे सुलेमान शिकोहला शुजाबरोबर १६५८ च्या मे महिन्याच्या सुरुवातीला तह करणे भाग पडले. दरम्यान औरंगजेबाने लढा दिला होता आणि विजयश्रीने त्यांच्या गळयात माळ घातली होती. त्याने दिल्लीहून शुजायाला प्रेमाची भावना व्यक्त करणारे पत्र लिहिले. परंतु औरंगजेबाच्या पंजाबमधील अनपुस्थितीने आग्रा ताब्यात घेण्याच्या शुजाच्या महत्वाकांक्षेला खतपाणी घातले गेले. इतकेच नव्हे तर शहाजहानला आपल्या ताब्यात घेऊन पूर्वीप्रमाणेच राजसत्ता पुन:प्रस्थापित करण्याच्या मनीषेने त्याला झपाटले. परंतु त्याच्या सर्व बेतांना अपयशाची मूठमाती मिळण्याचे विधिलिखित होते आणि याचे कारण औरंगजेबाचे सामर्थ्य आणि ताकद किती होती याबद्दलचे त्याचे अंदाज पूर्णपणे चुकले. आक्टोबर १६५८ च्या अखेरीला त्याने आपल्या प्रचंड सैन्यासह कूच केले आणि कसल्याही प्रकारचा प्रतिकार न होता रोहटास, चुनार आणि बनारस या शहरांचा ताबा घेतला. पण यानंतर लवकरच त्याचा समाचार घेण्यासाठी औरंगजेबाने कंबर कसली आणि खाजवा येथे त्याचा पराभव केला. शुजाने रणांगणातुन पळ काढला. त्याच्या पाठलागावर गेलेल्या मुआज्जमखान आणि राजपूत्र सुलतान महमद यानी बंगालमधून त्याची ससेहोलपट केली. आराकानच्या निबिड अरण्यांत शुजाच्या जीवनाची अतिशय दु:खद आणि दिनवाण्या पद्धतीने इतिश्री झाली.

**सुलेमान शिकोहचे भवितव्य**

वारस हक्काच्या या दुर्घटनेच्या कहाणीचा समारोप करण्या अगोदर सुलेमान शुकोहच्या नशिबी काय वाढून ठेवले गेले याचा इथे थोडासा उल्लेख केल्यास ते संयुक्तिक ठरेल. त्याच्या बापावर कोसळलेल्या आपत्तीची हकीकत कानी आल्यावर प्रथम जयसिंगाने त्याचा पक्षत्याग केला आणि काही काळानंतर दिलेरखान याने. अशा परिस्थितीत त्याने हरद्वारकडे पळ काढला आणि तो गढवालकडे नदी पारकरुन गेला. तिथे श्रीनगरचा राजा पृथ्वीसिंग याने त्याला आश्रय दिला. पण पृथ्वीसिंग याने त्याला औरंगजेबाच्या हवाली केले. औरंगजे–बाने त्याला गुंगी आणणारी मादक द्रव्ये पाजून ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत त्याला ठार मारले. यावेळी त्याचा चुलता मराड याचे त्याच किल्ल्यात वास्तव्य होते अलीनकी याचा खून केल्याच्या आरोपावरुन मुरादची पण कत्तल करण्यात आली.

**शहाजहान याची सख्त नजरबंदीची कैद**

यानंतरची जवळ जवळ साडेसात वर्षे आग्र्याच्या किल्ल्यात सख्त नजर कैदेत शहाजहान याने घालविली. सुरवातीला आलीया भोगासी असावे

सादर या उक्तीला अनुसरुन त्यांच्यावर ओढवलेल्या प्रसंगाशी मिळते जुळते न घेण्याचा हट्टीपणा केला आणि दाराला "त्याच्याबद्दल आपल्या मनात अपमित प्रेम असल्याची आणि त्याला मदत आणि सल्ला मसलत देऊ करणा-या" मजकुराची पत्रे अव्याहतपणे लिहिण्याचा उपक्रम चालू ठेवला इतकेच नव्हे तर शुजा हा पाटण्याहून आग्रा काबीज करण्याच्या उद्देशाने चालकरुन येत असल्याची बातमी कळल्यावर त्याने आपल्या सुटकेचा अखेरचा प्रयत्न केला. वृद्धदशा झालेल्या बादशहाने शुजाने हाती घेतलेल्या या मोहिमेला शुभाशिर्वाद दिले आणि त्याची सुटका करण्यासाठी कूच करुन येणाऱ्या शुजाबरोबर हातमिळवणी करण्यासाठी सर्व राजनिष्ठ प्रजाजनांना आवाहन करणारी पत्रे पाठविली. परंतु त्याच्या सर्व प्रयत्नाना अपयश आले आणि या सर्वाचा परिणाम एकच झाला आणि तो म्हणजे त्याच्या कारावासावरील बधन अधिक जाजक करण्यात आली. त्याचा दंडाधिकारी सुळतान महमद ह्याच्या फक्त हजेरीत आणि तेदेखिल औरंगजेबाच्या पूर्व संमति नुसार त्याची भेट घेता येईल असा दंडक जारी करण्यात आला होता.. त्याच्या तोंडून पडणारा प्रत्येक शब्दनशब्द औरंगजेबाच्या कानावर घालण्यात येत असे. शहाजहान याला पत्र लिहिण्यास अटकाव करण्यासाठी खोजांच्या हस्ते ही पत्रे गुपचूपपणे बाहेर पोहचविली जात असन त्याना काढण्यात आले इतरांना ताकीद देण्यात आली अखेर बंदिस्त शहाजहानला लिहिण्याचे सामानच मिळणार नाही अशी तजवीज करण्यात आली.[११]

## दंडाधिकाऱ्यांकडून शहाजहानचा होणारा त्रास

परंतु शहाजहानच्या बंदीवासातील दुरावस्थेची एवढ्यावरच समाप्ति झाली नाही. शहाजहानला अतिशय अपमान कारक पध्दतीने बारीक सारीक गोष्टी वरुन सातत्याने त्रास देण्याचा उपक्रम सुरु करण्यात आला. शहाजहानला अतिशय प्रिय असलेलेल्याचे हिऱ्याचे अलंकार मौल्यवान खडे आणि इतर वस्तु यांचे औरंगजेबाने अपहरण केले इतकेच नव्हे तर खास शाही वस्त्रभांडार, लाकडी कुलुपे लावण्यात आली. या खोल्या अतिशय जबाबदार अधिकारी किंवा औरंगजेबाच्या अतिशय विश्वासातील खोजा मुतासिद खान हे हजर असल्याशिवाय क्वचितच उघडल्या जात असत. पावला पावला आणिक तुरुंगामधील रक्षक शहाजहानचा अपमान करीत आणि त्याला एकद्या सर्वसामान्य कैद्यासारखी वागवणूक देत. अखेरीस जणू काही ईश्वरी सहाय्य त्याला प्राप्त झाले आणि त्याच्या जोरावर त्याला होत असलेल्या यमयातना सहन करण्याची ताकद त्याला लाभली. दैवदुर्बिलासाचा हा खेळ आहे अशी त्याने आपल्या

मनाची समजूत करुन घेतली आणि आपले उर्वरित आयुष्य धार्मिक विधीचे पालन आणि धार्मिक पुस्तकांचे वाचन यात व्यतीत करण्यास सुरवात केली.

**औरंगजेबच्या वर्तनाचे रिकाम विश्लेषण**

नैतिक भूमिकेवरुन विचार केल्यास औरंगजेबाने आपल्या बापाला जी वागणूक दिली तिचा अगदी कडक शब्दात धिक्कार करणे आवश्यक आहे शहाजहानच्या कैदेमधील कालखंडातील औरंगजेबाचा दृष्किोन अगदी खोलवर पाळेमुळे गेलेल्या व्देष आणि सूड यांच्या भावनांनी प्रभाविक झालेला होता बंदीवासात असलेला सम्राट हा फार मोठ्या धोक्याचे मूळ बनू शकतो ही गोष्ट जरी खरी असली तरीदेखिल शहाजहानच्या दर्जायोग्य अशा सर्वसामान्य जीवन जगण्यास जरुर असलेल्या साध्यासुध्या गोष्टीपासूनदेखिल त्याला वंचित करण्याचा जो दुष्टपणा औरंगजेबाने दाखविला त्याच कोणत्याही भूमिकेवरुन समर्थन करता येणे शक्य नाही. एकदा सिंहासनाचा कबजा हातात पडल्यावर औरंगजेबाला पुत्राची कर्तव्ये काय असतात याचा जणू काही पूर्णपणे विसर पडला अगदी कायद्याच्याच दृष्टिकोनातून बघितल्यास शाही खजिन्यावर अखेरचा मालकीहक्क हा आमजनतेचा असतो यात काहीच संशय नाही मग अशी पृच्छा केली की खुद्द औरंगजेबाने प्रजेच्या कल्याणाकरता कोणती पावले उचलली तर त्यात काहीच चुकणार नाही शाही खजिन्यातला एकत्रित झालेला अभाव धनमंचय त्याने दक्षिणेमधे निरर्थक लढाया करण्यामधे स्वतःला गुंतवून अक्षरशः उधळून टाकला भपकेबाज पोषाख करण्याचा किंवा हिऱ्यामोत्यांचे अलंकार अंगावर घालण्याचा त्याच्या मनाचा कळ नव्हता तर ज्यांच्या केवळ दर्शनाने किंवा हाताळण्याने ज्या शहाजहानला मनरची आनंद होत असे तो हिरेजडित अलंकार यांच्या नुसत्या दर्शन सुखापासून शहाजहानला वंचित करण्यामधे औरंगजेबाने काय साधले हा प्रश्न विचारता येण्याजोगा आहे आपल्या बापावरील तुरुंगवासाच्या हालाचे ओझे शक्य होईल तितके हलके करण्याचे औरंगजेबाचे मुलगा म्हणून कर्तव्य नव्हते काय? औरंगजेबाने आपल्या बापाला जी वागणूक दिली त्याचे इस्लाम धर्मशारणाच्या प्रणालेनुसार कितीही प्रकारे समर्थन केले गेले तरी मानवी स्वभावाचे विश्लेषण करणारे शास्त्र अशी जी इतिहासाची व्याख्या केली जाते तो इतिहास असा निर्णय देईल की. औरंगजेबाचे वर्तन हे कधीही क्षमा करता येणार नाही इतके क्रुरपणाचे होते,

**शहाजहानचे व्यक्तीमत्व एत्तद्देशीय बखरकांच्या दृष्टीकोनातून**

शहाजहानचे व्यक्तिमत्व हा एक अतिशय वादग्रस्त असा विषय आहे

हिंदुस्थानातातील बखरकरानी एक आदर्श मुसलमान सम्राट असे त्याचे चित्र रंगविले आहे[१२] त्याचे वर्णन ते शाराचा आधारस्तंभ धर्माचा संरक्षणकर्ता आणि हिंदुस्थानामधून इस्लामची जी अवनती होत होती ती थांबवून इस्लामची प्राणप्रतिष्ठा करणारा जसे रंगावेले आहे. त्याचा धर्मभोकेपणा, त्याची इस्लामवरील पराकाष्ठेची निष्ठा आणि सर्वसामान्य प्रजाजनांच्या हितासाठी त्याला वाटणारी विलक्षण आत्मीयता या गोष्टीची ते मुक्तकंठाणे स्तुती करतात, त्याचे अपराध ते पोटात वालतात आणि त्याच्या हातून मानवतेला काळीला लावणारी जी काही दुष्कृये घडली त्याचे समर्थन याची कृत्ये ही तत्कालीन सर्वसामान्य आणि राजकीय नैतिक मूल्यांना धरुन होती या भूमिकेबद्दल केलेले आहे सारांश या बखरकादांनी शहाजहानचे जे चित्र रंगविले आहे त्यानुसार शहाजहान हा एक गुणवत्ता आणि सौजन्य यानी संपन्न असलेला एक सम्राट होता आणि त्याचे व्यक्तिमत्व इतके प्रभावी होते की, मुद्दाम आवर्जून उल्लेख करावा असा एकही दोष त्याच्यात नव्हता.

**युरोपियन प्रवाशी**

शहाजहान याच्या व्यक्तिमत्वाचे अतिशय विरोधात्मक असे चित्र याउलट युरोपियन प्रवाशांनी रंगविलेले आहे. शहाजहान याच्या खाजगी जीवनाबाबत जे अतिशय घृणास्पद असे अनेक प्रवाद होते त्यांचे बर्निअर आणि मनुची यानी खुभासदार वर्णन केले आहे. त्याची संभावना ते एक तिरस्कारणीय पशु म्हणून करतात. त्याच्या जीवनाचे एकमेव ध्येय म्हणजे पशुतुल्य वैषणिक लालसा आणि अंगावर शहारे आणणाऱ्या बीभत्स भोगात स्वतःला बेतालपणे झोकून देऊन त्या धुंदीचा आनंद मानणे हे होते त्यानी दिलेल्या हकीकतीनुसार राजवाड्यात वारंवार भरविण्यात येणार भपकेदार बाजार, खुद्द सरकारतर्फे फारमोठ्या संस्थेने सांभाळला जाणारा नर्तकीचा ताफा, जनानखान्यात शेकडोच्या संस्थेने असलेले दासीजनाचे अस्तीत्व ही सर्व शहाजहान याची पशुतुल्य लालसा भागवण्याची अनेक साधने होती.

मनुची लिहतो, " शहाजहाने आपल्या जीवनात फक्त एकाच गोष्टीची कदर केली आणि ती म्हणजे आपल्या पापी वासनेच्या पूर्ततेसाठी देशादेशातून घतलेला स्त्रियांचा मागोवा."[१३] शहाजहानचे जाफेरखान आणि खलीलुल्लाखान यांच्या बागकां समवेत जे घाणेरडे संबंध होते त्यांचाही मनुची आपल्या लिखाणात उल्लेख करतो आणि पुढे असे लिहतो की, या संबंधाना इतकी कुप्रासिध्दी मिळाली की जेव्हा त्या दोघीजणी दरबारात जात असत तेथे अवती

भोवती जमलेले भिकारी जाफेरखानच्या बायकोकडे कुत्सितपणे बघून उध्दार काढीत, ही पहा बादशहाची राख आली अगे तुझा उपयोग बादशहा न्याहारीसाठी करतो तू आमची ओळखदेख ठेव बर का'' आणि जेव्हा खलीलुल्लाखानची बायको तेथुन जात असे ते हा ते ओरडत, ही पहा बादशहाची दुसरी राड आली; अगे बादशहा तुझा दुपारच्या भोजनासाठी उपयोग करतो, आम्हाला काहीतरी मदत कर.''[९४] बर्निअर असे उध्दार काढतो की, शहाजहान इतकी स्त्रीलंपट आणि शरीरसुखाला लाळचावलेली व्यक्ति आढळात आली नसती.[९५] शहाजहान याने आपल्या मुलीच्या मदतीने शायस्ताखानाच्या बायकोच्या अब्रूवर घाला घालून तिच्यावर बलात्कार केल्याचे मॅनरिक विधान करतो.[९६] तर पिटर मुण्डी शहाजहान याचे त्याची स्वत ची मुलगी चमनिबेगम हिच्याबरोबर अनैतितिक संबंध असल्याचे मोठ्या खुमासदारपणे वर्णन करतो.[९७] टॅव्हर्नियर याने दिलेल्या हकिकती याहून फारसा वेगळ्या नाहीत.[९८] अफवाना

ह्या मानहानीकारक पुष्टी देणारा पुरावा हिंदुस्थानी बखरकारांच्या ग्रंथात शोधून काढणे जवळ जवळ अशक्य प्राय आहे. ह्या सर्व अफवा ख-या असू शकतील अथवा या अफवांमध्ये कदाचित् सत्याचा अंशदेखिल नसेल. परंतु मोगल हे एक पात्निव्रताचे पालन करणारे नव्हते याबद्दलमात्र शंकेला जागा घेण्यास वाव नाही. शहाजहानचा तीन स्त्रियांबरोबर विवाह झाला होता. जहा–गीरच्या बायकांची संख्या जवळ जवळ वीस इतकी होती. अकबराला देखिल अनेक बायका होत्या, शहाजहान याच्या अकबराबादी महल आणि फतपुरी महल या दोन आवडत्या गायीका कन्यांचा उल्लेख ाबरीस याणे केलेला आहे.[९९] अशा त-हेच्या अनेक शदाजहान्च्या मर्जीमधल्या गाणिकाकन्यका असल्याची शक्यता संभवते. आणि तरी देखिल परदेशी प्रवाशानी शहाजहान सबधी ही जी भरमसाट विधाने केलेली आहेत ती संदिग्ध असल्यासारखी वाटतात आणि त्यामध्ये सत्याचा फार कमी अंश आहे.

### शहाजहानची गायन आणि नृत्य यामधील आसक्ती

शहाजहान हा गायकी नृत्य या कलांचा फार मोठा भोक्ता होता दरबाराचे गायक म्णून कविन्द्र, चित्रखान, लालखान आणि श्रीमान याची नावे नमूद[१००] केलेली आढळतात. दरबाराशी संलग्न असलेला फार मोठा असा नर्तकींचा ताफा होता.[१०१] बार्निअर त्यांच्या शरीरसौंण्डवाची आणि देखणे पणाची प्रसंशा करतो.[१०२] शहाजहान अधून मधून त्यांच्या समवेत रंगढंग करण्यात मश्गुल होऊन जाण्याची शक्यता नाकारता येत नाही. परंतु याचा अर्थ त्याचे सर्व

जीवन म्हणजे पशुतुल्य वैषायिक पणाच्या एका अनिर्बंध चित्र पटासारखे होते असे मानणे मात्र चुकीचे ठरेल.

## शहाजहान हा व्यसनाधीन होता काय ?

शहाजहान याला दारुचे व्यसन असल्याबद्दल संशयाला जागा आहे. मनूची असे म्हणतो की, बादशहा हा प्रत्यक्षात स्वतःपिणारा नव्हता परंतु दारुची वाढती व्यसनाधीनता कमी करण्याची पर्वा करण्याच्या भरीस तो पडला नाही.[१०३] परंतु प्रेसिडेंट फेमलीन याने २९ डिसेंबर १६४० रोजी कंपनीला पाठविलेल्या पत्रात असे लिहिले आहे की, " हा बादशहा आता चांगला माणूस म्हणुन बदलण्याच्या मार्गावर आहे, कारण त्याने तीन अथवा चार महिन्यांपूर्वी खाजगीरित्या गव्हर्नरला लिहून आमच्या पासून किंवा पोर्तुगीजां पासून त्यांच्या भाषेत जिचा द्राक्षाची दारु म्हणुन उल्लेख आहे तिचा पुरवठा त्याला करण्यासाठी कळविले, या पत्रानुसार आम्ही त्यांच्याकडे कॅनरी वाईन आणि अॅलेजंट या दोन प्रकारच्या दारुने भरलेले दोन मोठे पेटारेखाना केले. ह्या पेटाऱ्यांची रवानगी २० घोडेस्वाराच्या देखरेखी खाली हमालांच्या डोईवर देऊन काश्मिरला करण्यात आली त्याला ती दारु आवडली आहे की नाही आणि तसे असल्यास त्याच्या कडून आम्हाला आणखी दारु पाठविण्याची तजवीज करावी लागेल की काय यावावत लवकरच कळेल."[१०४] शहाजहान यान आपल्या चोविसाव्या वाढदिवशी दारुचे सेवन केल्याचा आणि नंतर दारुचे सेवन करण्या पासून स्वतःला परावृत्त केल्याचा उल्लेख या पूर्वीच्या प्रकर–णात येऊन गेलेलाच आहे.

## जहान आरा बरोबरचे अनैसर्गिक संबंध

ते जरी काही असले तरी थोडीशी दारुच्या सेवनाबद्दल हवस किंवा रंगढंगाविषयी लालसा ही सतराव्या शतकातील कालखंडाचा विचार केल्यास एकाद्या समाजाच्या व्यक्तीमत्वावर त्यामुळे शितोंडे उडविण्याइतकी सबळ कारणे ठरू शकत नाहीत. आज विसाव्या शतकातही समाजातील श्रीमंत आणि गरीब यांच्याकरता वेगवेगळे नैतिक मूल्ये आहेत, आणि मध्येयुगीन कालखंडात श्रीमंत लोकांच्या वागणुकीत आजच्या पेक्षा निच्चितच अधिक शैथील्य होते परंतु आपल्या जिवनातील नैतिक मूल्यांना आणि शूचिर्भूततेच्या भावनांनाअति शय जबरदस्तीचा धक्का देणारा जो आरोप बार्निअर याने शहाजहानवर केलेला आहे ती म्हणजे शहाजहानचे आपली मुलगी जहानआरा हिच्यबरोबर असलेले अनैसर्गिक लैंगिक सबंध तो लिहितो, शहजहानची सर्वात मोठी मुलगी बेगम

साहिब ही अतिशय देखणी आणि सर्वांगसुंदर अशी असून आपल्या बापाची अतिशय लाडकी आणि प्रेमांतली होती. त्यावेळी पसरलेली एक अफवा अशी होती की, शहाजहानला तिच्यविषयी वाटणारें प्रेम विश्वास ठेवण्याच्या मर्यादेच्या पलिकडे गेले होते आणि निर्लज्जपणे त्याने आपल्या यालालसेचे समर्थन करण्यासाठी पुढे जी मंडळी आणली होती ती म्हणजे इस्लामचेच मुल्लामौलकी किंवा इस्लामचे कायदेशास्त्रपंडित. या कायदेपंडितांच्या मते जे झाड बादशहाने स्वतः लावले होते त्या झाडाची फळे भक्षण करण्याचा त्याचा जो अधिकार असतो तो त्याच्यापासुन हिरावून घेणे म्हणजे त्याच्यावर अन्याय करण्यासारखे आहे."[१०५]

## व्हिसेन्ट स्मिथने दिलेला अभिप्राय

या सर्व घटनेंसंबंधी व्हिन्सेट असे विधान केले आहे आहे की, शहाजहानचे त्याच्या मुलीबरोबर जें अनैसर्गिक लैंगिक संबंध होते त्याचा पुरावा आपल्याला ड लाएटच्या लिखाणात सापडतो आणि त्याला दृष्टी दिली आहे ती थॉमस हर्बर्ट यानें या दोन लेखकानी आपल्या लिखाणात जो पुरावा सादर केला आहे त्याच्या आधारे स्मिथ यानें असे अनमान काढले आहे, की शहाजहान आणि त्याची मुलगी जहानआरा ह्या दोघाविरुध्द अप्रिय का होईना परंतु जो आरोप करण्यात आला आहे तो जरी निर्विवादपणें सिध्द करण्यात आलेला नसला तरी त्याच निश्चितपणें खडण देखिल झालेले नाही. हा आरोप असंभवनीय आहे असे जरी सकृदर्शनी आपण कबूल केलें तरी तो अगदीच अशक्य कोटीतील आहे असाही निर्णय आपण तडका फडकी घेंऊ शकत नाही.[१०६] दुसरीकडेंयाच विषयाच्या संदर्भात लिहिताना स्मिथनें असा अभिप्राय दिला आहे की, शहाजहानच्या विषयासक्तीनें आणि लालसेनें परिसीमा गाठलेली होती ही घोष्ट जरी नाकारता येंणार नसली आणि त्याचप्रमाणें शहाजहानची मुलगी जहानआरा हिचे अनेंक व्यक्तीबरोबर अनैतिक संबंध होते ह्या गोष्टीला ही जरी सबळ पुरण्यानिशी सिध्द करता आलें असते तरी सकृदुर्शनी आपल्याला ही गोष्ट असंभवनीय वाटते की शहाजहान आणि जहानआरा यांच्यावर ज्या प्रकारचा आरोप करण्यात आलेला तितका ती दोघेजण बेताल बनली असतील आणि बापलेक यांच्या संबंधातील सर्व मर्यादा झुगारुन देण्याइतका बेशरमपणा त्यानी दाखविला असेल अर्थात काही वर्षापूर्वी दक्षिण आफ्रिकेमधील तथाकाथिक शुध्द आचरणाच्या बोअर लोकांत अशा प्रकारचे संबंध आहेत किंवा होते आणि असे म्हटले जाते की, अशा प्रकारच्या संबंधाचे समर्थन करण्यासाठी त्यांनी धर्मग्रथातून आश्वारादाखल उतारेंही दिले होते.

**व्हिसेन्ट स्मिथ याने हे संबंध केव्हा अस्तित्वात आले याची ठरविलेली काळवेळ**

सारांश ड्लाएट आणि हर्बट यांनी जो भरभक्कम पुरावा सादर केला आहे त्यावर आधारलेले एक निश्चित असे अनुमान स्मिथ याने काढलेलें आहे आणि बनिअर आणि हॅनिअर यांनी याबाबत जें ठामपणें प्रतिपादून केलेंलें त्यामूळे या अनुमानाला पुष्टि मिळते. एका अतिशय चमत्कारीक अशा युक्तीवादाचा आधार घेऊन शहाजहान आणि जहानआरा यांच्यामधील अनैतिक संबंधाना केव्हा सुरवात झाली याची वेळ निश्चित केली आहे; तो विधान करतो की, मुमताज महल हिचा दक्षिणेत मृत्यू झाल्याबरोबर लगेच शहाजहान आणि जहानआरा यांच्यातमधील व्यभिचारी वर्तनास सुरवात झाली असावी. त्याने पुढे असेही मत प्रकट केले आहे की, हे व्यभिचारी संबंध १६५८ मधे संपूष्टात आले.

**खात्रीलायक पुराव्यावर न आधारलेला स्मिथचा युक्तींवाद**

शहाजहान आणि जहानआरा यांच्या हातून घडलेल्या या व्यभिचारी गुन्याचे राक्षसी स्वरूप लक्षात घेतल्यानंतरही आपल्याला असे म्हणावे लागेल की, ज्या पुराव्याच्या आधारावर स्मिथाने आपला युक्तीवाद मांडला आहे तो पूर्णपणे पूर्दोष आहे, असे म्हणता येणार नाही. डलापट हा फार तर उत्तमपैकी संग्रहक होता पण एस्. एम्. बॅनर्जी यानी असे मत प्रकट केले आहे त्याने जी माहिती आपल्या ग्रंथासाठी गोळा केली ती अतिशय परिश्रम पूर्वक अशी केली होती. आणि इतकेच नव्हे तर ती अतिशय विद्वत्ता प्रचूर अशी होती.[१०७] आपण क्षणभर जरी असे गृहीत धरले की, सुरत येथील डच फॅक्टर्स बरोबर तो संपर्क साधून होता तरी देखिल तेथून त्याला मिळालेली माहिती ही पूर्णपणे विश्वसनीय होती याचा हवाला कोण देणार? अशी ही शक्यता संभवत नाही का की डच फॅक्टरनी तेव्हा लोकांमध्ये जो प्रवाद पसरला होता तिच माहिती त्याला पुरवली आणि ड लाएट याने कसलाही विचार न करता ती सहीसही आपल्या लिखाणात उतरवली? हर्बर्टविषय बोलावयाचे झाल्यास तो एक पक्का वाड्:मयचोर होता. सुरत आर्णि स्वाली ही शहरे वगळयास त्याने इतर कोण–त्याही ठिकाणाला भेट दिली नव्हती आणि तरी तो अनेक शहरांचें अगदी ठळकपणे वर्णन देतो. आणि थेट तिमूर आणि चेगींजखाना पासूनच्या मोगल सम्राटांचा कुल देखिल फारशा विश्वासार्ह साधना सामुग्रीवर आधारलेली आहे. असे म्हणता येणार नाही.

तथापि या उपख्यानांत चमत्कारिक वाटणारी गोष्ट म्हणजे स्मिथ सारखा इतिहासाच्या अतिशय काटेकोर अभ्यासकाने मनुचीने ठामपणे ज्या

गोष्टी घडल्याची विधाने केली आहेत त्यांचा परामर्ष घेताना दाखविलेला निष्काळजीपणा. तो असे म्हणतो की बर्निअर याने जे विधान केले आहे ते पूर्ण पणे खालच्या दर्जाच्या लोकांमधे जे प्रवाद होते किंवा त्यांच्यात जी बोलणी होत त्यावर आधारलेले होते.[१०८] त्याशिवाय मनुची याने बर्निअरने जो पुरावा सादर केला आहे जी प्रतिक्रीया दिलेली आहे ती मोठी उद्‌बोधक आहे. तो असे म्हणतो की, "बर्निअर आपल्या पदरच्या अनेक गोष्टी मोगलांचा इतिहास लिहिताना घुसडून देतो---- अनेक न घडलेल्या गोष्टी देखिल तो आपल्या वृत्तान्तात देतो -- त्याला इथल्या घटनांची देखिल फारशी माहिती नसावी कारण मोगल दरबारामधले त्याचे वास्तव्य आठ वर्षापेक्षा अधिक झालेले नव्हते, या दरबाराचे स्वरुप इतके भव्य होते की, या दरबारांत निरिक्षण करण्याजोग्या वस्तू आणि या गोष्टींचे निरिक्षण करणेही त्याला शक्य नव्हते कारण दरबारात जाण्यासच त्याला मज्जाव होता."[१०९]

सारांश वरील प्रमाणे पसरलेल्या अफवात जर काही तथ्य असते तर मनुचीने इतक्या परखडपणे बर्निअरने केलेली विधाने खोडून टाकली नसती जेव्हा तो आपल्या लिखाणात शहाजहान आणि जहान आरा यांच्या खाजगी जीवनाबाबत ज्या काही अफवा पसरल्या होत्या त्या उद्‌धृत करतो तेव्हा त्याला जर या अफवाच्या सत्यते विषयी खात्री पटलेली असती तर शहाजहान आणि जहानआरा यांच्या मधील अनैसर्गिक लैंगिक संबंधाबद्दलच्या या अफवा सत्य असल्याचा निर्वाळा न देण्याचे त्याला काहीच कारण नव्हते जहानआरा हिच्या मर्जीतला मनुची होता याबद्दल शंका घेण्याचा काहीच जागा नाही.[११०] इतकेच नव्हे तर तिने त्याच्यावर आपली खास मर्जी असल्याचे तिच्याबाबतचे जे अनेक दाखले आपल्याला देता येतील. तरी देखिल तिच्याबाबतच जे अनेक प्रवाह समकालीन समाजात प्रस्तुत होते ते बिनधास्तपणे लिहून काढण्यास त्याने मागेपुढेहिले पा नाही. त्याशिवाय आपण काय लिहित आहोत याची बर्निअर याला स्वत:लाच पूर्ण खात्री नव्हती प्रत्येक वेळी अशा प्रकारची अफवा आहे अहे तो लिहितो आणि इतर अनेक प्रसंगी त्या घटनेची सत्यासत्यता पडताळून मगच त्याने जी विधाने केलेली आहेत तसे तो याठिकाणी करीत नाही.

त्याशिवाय शहाजहान याला आपल्या पत्नीबद्दल जे विस्सीम प्रेम वाटत होते ते विचारात घेता शहाजहान याने आपल्या मुलीबरोबर केलेला व्यभिचार हा आपल्या पत्नीच्या निधनानंतर ताबोडतोब केला हे स्मिथ याने केलेले विधान हे शहाजहांनच्या चरित्रयावर शिंतोडे उडविणारे आहे आणि म्हणून

निरर्थक ठरते त्याला झालेल्या दु:खाची तीव्रता इतकी विलक्षण होती की मुमताजच्या मृत्युनंतर काही दिवसातच त्याच्या दाढीचे केस पांढरे झाले आपल्य पत्नीचे निधनामुळे झालेल्या दु:खाची जखम ताजी असताना अशा प्रकारच व्यभिचार शहाजहानच्या हातून झाला असे भडक चित्र रंगविणे हे फक्त विकृत कल्पनाविलासातूनच होऊ शकते. शहाजहानची तूलना दक्षिण आफ्रिकेतील बोअर बोकाबरोबर करणे म्हणजे अतिशय कोत्या मनोवृत्तीचे प्रदर्शन करण्यासारखे आहे (शहाजहान बद्दल इतकी आत्मीयता दाखविण्याचे सक्सेना यांना काहीच प्रयोजित नव्हते. काही अपवाद वगळता हिंदुस्थानातील बहुतेक सर्व मसलमान राजकर्ते लंपट आणि विषयासक्त होते. मायबहिणीच्या अब्रूची त्यानी कधीच कदर बाळगली नाही वदता आणि अफवा याला काहीतरी आधार असलन पाहिजे आणि म्हणून शहाजहान आणि जहानआरा यांच्या हातून हा व्यर्थचार घडलाच नसेल असे म्हणता येणार नाही. अनुवादक)

शहाजहान आणि जहानआरा या दोघाबद्दल ही जी गावगप्प पसरली होती तिचे मूळ शहाजहानला आपल्या ह्यात असलेल्या सर्व मुलांमधल्या या मोठ्या मुलीसंबंधी जी असीम आत्मीयता आणि प्रेम वाटत होते. जहानआरा हिने शहाजहानला तिच्या बद्दल वाटणाऱ्या प्रेमाला तितक्याच उत्कटतेने जो प्रतिसाद दिला त्याबद्दलचा पुरावा आपल्याला हिंदुस्थानी बखरकारांच्या वृत्तान्तात मिळतो. इतकेच नव्हे युरोपियन प्रवाशांनीदेखिल आपल्या हकीकतीत या गोष्टीची ग्वाही दिली आहे बर्निअर लिहितो :' शहाजहान याने आपल्या या अतिशय लाडक्या मुलीवर अनिर्बंध असा विश्वास टाकला ती त्याच्या सुरक्षिततेकडे लक्ष देत असे आणि तिचे इतके बारकाव्याने आणि कटाक्षाने लक्ष असे की, इतके बारकाव्याने आणि कटाक्षाने लक्ष असे की, तिच्या वैयक्तिक देखरेखीखाली तयार न झालेले खाद्यपदार्थ बादशहाच्या जेवणखाणामधे कधीच येत नसते."१११ मनुची असे सांगतो की आपल्या बापाला जहानआरा अतिशय प्रेमाने आणि कर्तव्यतत्परतेने जेऊ घालीत असे.

या विषयावर सर रिचर्ड टेंपल यानी जो अभिप्राय दिला आहे तो या ठिकाणी संपूर्णपणे उद्धृत करणे हे उचित ठरेल. सर टेंपल लिहितात." शहाजहान आणि जहानआरा यांच्या व्यभिचाराची ही जी गोष्ट आहे ती माझ्या मते उच्चस्थानी असलेल्या व्यक्तिबद्दल मानहानिकारक बाजारगप्प उठविण्याचे एक उदाहरण आहे; आणि अशाच तऱ्हेच्या गोष्टी हिंदुस्थानचा इतिहास म्हणून आपल्यापर्यंत पोहचविल्या जातात; या बाबतीत जहानआरावर तिच्या प्रेमातल्या

आणि कसलाही धरबंद नसल्याबद्दल कुप्रसिध्द असलेल्या तिच्या बापाने तिच्यावर जाहिररित्या मानसन्मानाची जी धर धरात केली त्याची कारणमीमांसा म्हणून आणि तिचे मोगळ सम्राटांच्या मुलींना राजकीय कारणास्तव वग्र करण्याचीसाठी जो प्रतिबंध करण्यात येत असे आणि जी गोष्ट सर्वादूर माहिती होती त्यामध्ये आपल्याला आढळेल.[११२] सर टेंबल यांनी दिलेल्या अभिप्रायाला आढळेल. सर टेंपल यांनी दिलेल्या अभिप्रायाला आपण बीलया इतिहासकाराने जहानआरा हिला जे योग्य मार्गी प्रशस्तीपन दिले आहे त्याची जोड देता येईल. तो म्हणतो, "तिचे नाव पित्याविषयी वाटणाऱ्या अजोड अप्रत्यप्रेमाचे एक उदाहरण आणि कर्तव्यापोटी निर्माण होणाऱ्या गोष्टीबद्दल विलक्षण आत्मीयता याचा नमुना म्हणून इतिहासाच्या पानापानाला ललामभूत ठरेल---तिने वृध्द बापाच्या विपन्नावस्थेत त्याला आधार दिला. इतकेच नव्हे तर स्वखुषीने आपल्या वैयक्तिक स्वातंत्याला तिलांजली दिली आणि आपल्या बापाजवळ त्याच्या आग्रा किल्ल्यामधील बंदीवासात तिने आपले आयुष्य व्यतीत केले."[११३]

हा विषय संपवून शहाजहानच्या वैयाक्तिक चारित्र्याचे समीक्षण आपण केल्यास आपल्याला असे दिसून येईल की शहाजहानची ही विषयांधता म्हणजे त्याच्या चारित्र्यसमुद्रातील एकाद्या बिंदूसारखी होती. १६१४ पासून पुढे त्याचे आयुष्य म्हणजे अविरत कष्टमय असे आहे. त्याच्या हातून जी काही कामगिरी झाली ती एकाद्या कामपिपासू आणि सिंहासनावर अधिष्ठित झाल्यावर देखिल बुद्धि आणि भावना यांचा समन्वय साधण्याचा बाणा त्याने कायम ठेवला तसे पाहिले तर तख्तनशीन होण्यासाठी त्याला रक्ताचे पाट वाहावावे लागले आणि तरी देखिल तो दयाळू आणि न्यायी वृत्तीचा सम्राट होता. (मूळलेखकाचे हे विधान परस्परविरोधी आहे.— अनुवादक) त्याच्यामधे असामान्य चैत्यधन्य होते, दूरदृष्टि आणि धाडसीपणा होता आणि या सर्वांवर ताण म्हणजे अनुयायांमधे उस्फूर्त कार्यक्षमता निर्माण करण्याची कुवत होती. त्याच्या पूर्वजांप्रमाणेच आपल्या साम्राज्याचा प्रादेशिक विस्तार करण्याची दुर्दम्य मह-वाकांक्षा त्याच्यामधे होती, आणि त्याच्या पासून ती त्याच्या मुलगा औरंगजेब याच्यामधे आली. परंतु दक्षिणेमधे अहमदनगर खालसा केल्यानंतर त्याने ही महत्वाकांक्षा काबूमधे आणली आणि विजापूर आणि गोवळकोंडा यांना दिलेल्या शरणागतीवर समाधान मानले भपके पणाच्या सभाटीत तो जल्लोष मानीत असे, सौंदर्य आणि भव्यता याच्या प्रेमापोटी तो स्वतःला विसरुन जात असे जणू काही एकाद्या अनुभूतीच्या आहारी जाऊन भपकेदार कपडा, भव्य सिंहासन, अप्रितिम गालीचे मनमोहक कनाती यामधे स्वतःला सामावून

घेण्यात तो वेडा होई. मौल्यवान खड्यांचा तो गुणज्ञ गुणीजन होता आणि त्यांच्या किंमतीचे कांटेकोरपणे मोजमापन करण्यात त्याचा हातखंडा असे. साऱ्या पृथ्वीमधे त्याच्याजवळ विविध पैलू पाडलेल्या हिऱ्यांचा जो संचय होता तो विलक्षण अप्रितिम होता असे म्हटल्यास त्यात अतिशयोक्ति होणार नाही. त्याला आपल्या जवळील वस्तूंचा गाजावाजा करण्याची वेडी हौस होती. आणि परदेशस्थ विशेषतःपार्शियाचे रट्रॅन्स आणि आक्सीयाना आणि तुर्कस्तान यांचे वकील, यांच्यावर आपल्या संपत्तीचा प्रभाव पडावा म्हणून तो हजारो रुपये उधळून टाकी. दान करण्याचे कामी तो अनंत हस्ते देणारा दाता होता. त्याच्या सौर आणि चान्द्रमानानुसार होणाऱ्या तुलादानाचे वेळी तो अमाप द्रव्य वाटीत असे परंतु त्याशिवाय वेळोवेळी मोठ्यामोठ्या रकमा तो मक्का आणि मेदिनाकडे गरीबांना वाटण्यासांठी रवाना करी.

वयाची साठी गाठल्यानंतर त्याच्या अंगच्या जोश हा हळूहळू ओसरु लागला रमजानच्या उपवासातून त्याची सुटका करण्याच्या उद्देशानें आणि उपवासाच्या ऐवजी दान देण्याची त्याला परवानगी द्यावी ह्या हेतूने उलेमा फतवे काढू लागले.[११४] कडक अशा बंदीवासात जीणे घालविण्याचे यांच्या नशिबी आल्यानें त्याची शरीर प्रकृति प्रमाणाबाहेर ढासळली.[११५] एका औषधी वनस्पतिचे तेल अंगाला चोळल्याचा परिणाम होऊन १६६६ च्या जानेवारीत तो आजारी पडला.[११६] त्याला कसल्यातरी विलक्षण तापानें घेरले आणि त्यात भर म्हणून की काय आतडी आतून पिळवटून आणि ओढून धरली गेल्यामुळें त्यची परिस्थिती अधिकच बिकट झाली त्याचा खाजगी शल्यचिकित्सक बृध्दावन याने उपययोजना करुन नऊ दिवसात त्यच्या शरीरावर जे आक्रमण करण्यास सुरुवात केली होती त्याविरुध्द लढा देण्याची ताकद याच्यात आता उरली नव्हती आणि त्याची प्रकृती हळूहळू खालावत चालली जानेवारी २२ रोजी त्याच्या जिवीताची आशा सर्वांनी सोडली त्यानें अतिशय आत्मीयतेने आणि कळकळीने त्या सर्वसाक्षी परमेश्वराचे आभार मानले, आपल्या मुलांना क्षमा करण्यासाठी त्याची मनोभावे प्रार्थना केली, त्याच्या नावे त्याने आपले मृत्यूपत्र केले आणि समोर उत्तुंगपणे उभ्या असलेल्या ताजमहालची साक्ष ठेवून त्याने आंपले प्राण सोडलें. त्याच्या जनान्यातील स्त्रिया आणि त्याचे रक्षक आणि नोकर यांच्या हुंदक्याची सारा आसमंत गजबजून गेला एका शोकांतिक मधूनच उदयास ज्यावेळी त्याची राजशाही कारकीर्द दुसऱ्या एका शोकांतिकेमधून अस्तमान झाली. परमेश्वर त्याच्या पापांची क्षमा करुन त्याच्यावर दयेचा वरदहस्त ठेवो.

# तळटीपा

## प्रकरण १२ वे तळटीपा

(१) लाहोरी, खंड १, पान २४३; कजविनी, पान १६७–ब.

(२) लाहोरी, खंड १, पान २५४; कजविनी, पान १७२–ब.

(३) लाहोरी, खंड १, पान २९६; कजविनी, पान १९०.

(४) लाहोरी कोणत्याही नावाचा उल्लेख करीत नाही, खंड १, पान ३००; कजविनी तिचे नाव हुस्न आरा बेगम असे देतो; पान १९१.

(५) लाहोरी, खंड १, पाने ३८४–८९; कजविनी, पाने २३२–३५–ब. त्याशिवाय पहा बी. एम्. Add. 8910 यामधील ताज महलचा उल्लेख आणि शहजानने स्वत: रचलेल्या काव्यपंक्ती.

(६) बादशहाने उपनेत्र (glasses) वापरावयास सुरुवात केली असे कजविनी सांगतो. पान २३२–ब.

(७) कजविनी, पान २३५; लाहोरी, खंड १, पान ४०३.

(८) कजविनी, पान २४७–ब आणि पान २५०; लाहोरी, खंड १, पान ४२२ आणि पान ४२८.

(९) कजविनी, पान २५१; लाहोरी, खंड १, पान ४३०.

(१०– कजविनी, पाने २५६––५७–ब आणि २६१–२६५. तीस लक्ष रुपये खर्च करण्यात आल्याचे कजविनी सांगतो; लाहोरी, खंड १, पाने ४५२–६०.

(११) कजविनी, पाने २६५–६६–ब; लाहोरी, पाने ४६०–४६५.

(१२) कजविनी, पाने २७४–७७–ब. साईदाई गीलानी ही घटना घडल्याची ग्वाही देतो आणि औरंगजेबाची तुला रुप्यात झाली असे सांगतो; तालिबाई कलीम याचीच पुनरुक्ती करतो; कजविनीने ही संपूर्ण घटना गद्यात लिहून बादशहाला नजर केली. बादशहाने प्रशंसेचे उग्दार काढले. त्याच्या भत्त्यात वाढ करण्यात आली. त्याच्यावर बादशहाची मर्जी बसली आणि बादशहा वारंवार त्याला काव्यरसाने भरलेली गद्य कवने लिहिण्यास सांगू लागला (पान २७७–ब). लाहोरी, (खंड १, पाने ४८९–९२)

या संबंधात कजविनी अथवा कालीम यांच्या नावांचा उल्लेख करीत नाही. लाहोरी तो उल्लेख करतो फक्त साईदाई गीलानी याचा (पान ४९३).

(१३) कजविनी, पान ३००; लाहोरी, खंड १, पान ५३६.

(१३) कजविनी, पान ३००; लाहोरी, खंड १, पान ५३६.

(१४) कजविनी, पान ३०४; लाहोरी, खंड १, भाग २, पान ४.

(१५) दाराचे आजार पण हे त्याच्या मुलीच्या मृत्युच्या झालेल्या दुःखामुळे होते असे कजविनी सांगतो. पान ३०७; लाहोरी, खंड १, भाग २, पाने ९-१०.

(१६) कजविनी, पान ३१२–ब; लाहोरी, खंड १, भाग २, पान २०.

(१७) याबाबत कजविनी आणि जलालुद्दीन तबातबाई यांनी आपापल्या बादशहानामा या ग्रंथात केलेली काश्मीरची वर्णने पडताळून पहा; त्याचप्रमाणे कुदसी आणि कालीम यांचे काव्यात्मक वर्णन देखिल पहावे. कजविनी या प्रसंगी शाही लवाजम्यात होता, पान ३२९.

(१८) कजविनी, ३२६–ब; लाहोरी, खंड १, भाग २, पान ४९.

(१९) कजविनी, पान ३३३; लाहोरी, खंड १, भाग २, पान ६२.

(२०) कजविनी, पान ३३७; लाहोरी, खंड १, भाग २, पान ७०.

(२१) कजविनी, पान ३३७; लाहोरी, खंड १, भाग २, पान ७०.

(२२) कजविनी, पान ३४०; लाहोरी, खंड १, भाग २, पान ७४.

(२३) कजविनी, पान ३५०; लाहोरी, खंड १, भाग २, पान १०५.

(२४) कजविनी, पाने ३५४–ब–३५७; लाहोरी, खंड १, भाग २, पाने १२०–१२३.

(२५) कजविनी, पान ३६०; लाहोरी, खंड १, भाग २, पान १२३.

(२६) कजविनी पान ३६३; लाहोरी खंड १ भाग २ पान १३५.

(२७) कजविनी पान ३८६; लाहोरी, खंड १, भाग २, पान २०५.

(२८) कजविनी, पान ३९३–ब; लाहोरी, खंड १, भाग २, पान २२४.

(२९) कजविनी, पान ४००; लाहोरी, खंड १, भाग २, पान २३५.

(३०) कजविनी, पान ४०२; लाहोरी, खंड १, भाग २, पाने २४४–४५.

(३१) कजविनी, पाने ४०६–७ आणि पाने ४०८–ब–४१०; लाहोरी, खंड १ भाग २. पाने २६६–७१.

(३२) लाहोरी, खंड २, पान ११०.

(३३) लाहोरी, खंड २, पान १६३.

(३४) लाहोरी, खंड २, पान १९२.

(३५) लाहोरी, खंड २, पान २५७.

(३६) लाहोरी, खंड २, पाने ३०४–५.

(३७) लाहोरी, खंड २, पान ३२०.

(३८) लाहोरी, खंड २, पाने ३४४–४९.

(३९) लाहोरी, खंड २, पाने ३६३–६९, ३७५, ३९३–४००. जहान आरा हिला एका इंग्रज गृहस्थाने बरे केले ही गोष्ट धादांतपणे खोटी असल्याचे विल्यम फॉस्टर याने सिद्ध केले आहे. यासंबंधात पहा.
Introduction to the English Factories in India 1642-45, xxxv-vi.

(४०) लाहोरी, खंड २, पाने ३८०–८४; ही घटना प्रत्यक्ष पाहणारा महमद सादिक असे सांगतो की, सलाबतखान हा मक्रमतखान याच्याशी संभाषण करीत होता आणि बादशहा, अब्दुल्लाखान फिरोज जंग याच्या बाबतचे फर्मान लेखनिकाला लिहून घेण्यासाठी सांगत होता. आपल्या विरुद्ध सलाबतखान तक्रार करीत असल्याचा संशय अमरसिंग याला आला.

(४१) लाहोरी, खंड २, पान ४०७.

(४२) लाहोरी, खंड २, पान ४१३.

(४३) वारीस, पान ५–ब.

(४४) वारीस, पान १२–ब.

(४५) वारीस, पान १२.

(४६) वारीस, पान १५–ब; सालिह, पान ५४१.

(४७) वारीस, पान २८–ब.

(४८) वारीस, पान ५०–ब.

(४९) वारीस पाने ६२–६४; Archaeological Survey of India Reports, 1911-12.

(५०) वारीस पान ७५.

(५१) वारीस पान ९१.

(५२) वारीस, पान ९९-ब.

(५३) वारीस, (Add, 6556) पान ४६२-ब.

(५४) वारीस, पाने ४७५–ब–७७ आणि पान ४८७.

(५५) वारीस, पान ४८१.

(५६) वारीस, पान ४८१–ब

(५७) वारीस, (Or. 1675), पाने १२३ ब–१२६.

(५८) वारीस, (Add, 6556), पान ४८९.

(५९) वारीस, पान ४९०.

(६०) वारीस, पान ४९१.

(६१) वारीस, पान ५१९.

(६२) वारीस, पान ५२१.

(६३) Sarkar : History of Aurangzib, Vol. I, p. 302-3

(६४) लताईफ–उल्–अखबार या ग्रंथाचा लेखक दाराच्या व्यक्तिमत्वाचे अतिशय काटेकोरपणे आणि यथातथ्य वर्णन देतो.

(६५) Sarkar: History of Aurangzib, Vol. II, p. 127-28.

(६६) जफदजामा–इ–आलमगीरी, पान ९.

(६७) औरंगजेबाचे शुजाला पत्र, इनायतनामा, पान ३८–ब.
जामिउल इन्शामधील मुरादचे औरंगजेबाला पत्र, पान ३५९.

(६८) इनायत नामा, पान ३७; जामिउल इन्शा, पान ३७५.

(६९) इनायत नामा, पान ३८–ब.

(७०) इनायतनामा, पान ३७.

(७१) जमिउल इन्शा; मुरादचे औरंगजेबाला पत्र, पान ३७५.

(७२) इनायतनामा; औरंगजेबाचे मुरादला पत्र, पान ४१.

(७३) इनायतनामा; औरंगजेबाचे मुरादला पत्र, पान ४०; जफरनामा, पान १७–ब.

(७४) Sarkar : History of Aurangzib, Vol. I, p. 308

(७५) जामिउल् इन्शा; मुरादचे औरंगजेबाला पत्र, पान ३५५.

(७६) Sarkar: History of Aurangzib, Vol. I, p. 309.

(७७) Sarkar : Vol. I, p. 309

(७८) जामिउल् इन्शा; मुरादचे औरंगजेबाला पत्र, पान ३६६.

(७९) जामिउल् इन्शा; मुराद औरंगजेबाला लिहितो की "तू मिर जुम्ला याला कैद करुन आपल्या पक्षाकडे वळवून घेतले आहेस याचा मला आनंद होत आहे."

(८०) खुलासात उत तवारीख, पान ३८४.

(८१) Sarkar: Vol. II, pp. 1-30

(८२) Sarkar: Vol. II, pp. 1-30

(८३) जामिउल् इन्शा, पान १५७–५८; जहान आरा हिने हे पत्र आपला स्वतःचा बक्षी महमद फारुक याच्या हस्ते पाठविले.

(८४) जामिउल् इन्शा, पाने १५८–६०.

(८५) ही व्यक्ति म्हणजे गोहदचा जमिनदार हाथीराज होय असे फुतूहात आलमगिरीचा लेखक म्हणतो, पान २३–ब; दिलकुषामधे ही व्यक्ति चम्पत होती असा उल्लेख आहे, पान १५६; त्याचप्रमाणे छत्र प्रकाश, पान ५; याबाबत खुलासात उत तवारीखच्या कर्त्याने मौन पाळले आहे.

(८६) जामिउल् इन्शा; मुरादचे शहाजहानला पत्र, पाने ३७९–८०.

(८७) जामिउल् इन्शा; मुरादचे शुजाला पत्र, पान ३७६.

(८८) जफरनामा, पान ३६; फुतूहात आलमगिरी, पान २७.

(८९) जफरनामा, पान ३२–ब; महमद सादिक सांगतो की वाटाघाटी करणाऱ्यांपैकी तो स्वतः एक होता. तो असेही म्हणतो की, औरंगजेबाने खलीलुल्लाखान याला अडकवून ठेवले आणि फाजिलखान आणि स्वतः लेखक याना जाण्यास सांगितले, पाने २०१–२; विश्वस्तपूर्ण पुराव्यावर सालिहमधे एकंदर घटनेचा वरीलप्रमाणेच तर्जुमा देण्यात आला आहे, पान ६५७.

(९०) जफरनामा, पान ३८.

(९१) Sarkar: Vol. III, p. 145

(९२) कजविनी, पान ३०२; लाहोरी, खंड १, पान १३९.

(९३) मनुची, खंड १, पान १९५.

(९४) मनुची, खंड १, पान १९४.
(९५) बर्निअर, पान २७३.
(९६) मॅनरिक, खंड २, पाने १४०–४४.
(९७) पिटर मंडी, खंड २, पान २०३.
(९८) टॅव्हर्निअर, खंड १, पान ३४४.
(९९) बारीस, पान ७०.
(१००) बारीस, पाने ७१, ८०, १००–ब.
(१०१) मनुची, खंड २, पान ३३६; पेलसॅअर्ट, पान ८३.
(१०२) बर्निअर, पान २७४; मनुची, खंड २, पान ३३६.
(१०३) मनुची, खंड २, पान १०५.
(१०४) The English Factories in India (1637-41) p. 289.
(१०५) बर्निअर, पान १२.
(१०६) The Indian Antiquary, 1914, pp. 240-44
(१०७) De Laet : Empire of The Great Moghul : the Introduction.
(१०८) मनुची, खंड १, पान २१७; मनुचीने त्याच्या माहितीच्या साधनाबाबत जे प्रतिपादन केले आहे ते पहा, खंड १, पान २२०.
(१०९) मनुची, खंड २, पाने ७५–७६.
(११०) मनुची असे सांगतो की, बेगम साहिब हिच्या जनान्याच्या नोकरवर्गासाठी मनुचीने जे काही केले त्याची परत फेड म्हणून बेगमने तिच्याजवळील खास दारुच्या बाटल्या त्याच्याकडे पाठविल्या.
(१११) बर्निअर, पान १२, जहान आराने आपल्या बापाच्या मृत्यूवर जी काव्य-रचना केली ती पहावी, सालिह, पान ६८८–ब.
(११२) The Indian Antiquary, 1915, p-24.
(११३) Beale : Dictionary of Oriental Biography, p, 190, and Sarkar : Vol. I, pp. 73-74 and Vol. III, P. 158-59.
(११४) बारीस, पान ६८.
(११५) सालिहमधे असे विधान आहे की शहाजहान याने मीर सय्यद महमद कनौजी बरोबर कुराणाचे वाचन केले.
(११६) हे तेल रिजकुल्ला मुकर्रबखान याने तयार केले. सालिह, पान ६७६.

# सूची *



---

*ही संपूर्ण सूची श्री. पी. एन्. नारखेडे, संशोधन अधिकारी, दर्शनिका विभाग, महाराष्ट्र शासन, मुंबई यांनी केली आहे.

## आ

क :

ख :

ग :

ज :

द :



ध :

न :



प :

व :



श :

ह :